# कालिदास

लेखक :

महामहोपाध्याय पद्मभूषण **वासुदेव विष्णु मिराशी,**

एम्. ए., डी. लिट्.,

माजी प्राचार्य, मॉरिस कॉलेज, नागपूर, व

विदर्भ महाविद्यालय, अमरावती,

संस्कृत, पालि व प्राकृत विभागाचे माजी अध्यक्ष,

नागपूर विश्वविद्यालय,

भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षण विभागाचे सन्मान्य सल्लागार,

फेलो, भारतीय साहित्य अकादमी.






**महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ, मुंबई**

आवृत्ती पहिली : १९३४
आवृत्ती दुसरी : १९५७
आवृत्ती तिसरी : १९७५
आवृत्ती चौथी : १९९९



**प्रकाशक**
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत,
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग, दादर,
मुंबई-४०००१४.

**मुद्रक**
मायक्रोग्राफ
रामदूत, डॉ. भालेराव मार्ग,
गिरगांव, मुंबई - ४०० ००४.

मूल्य : रु. १४०/-

माझे पितृतुल्य वडील बंधु

**कै. ती. सीताराम विष्णु मिराशी**

यांच्या पवित्र स्मृतीस

प्रेमादरपूर्वक अर्पण

## चौथ्या आवृत्तीचे निवेदन

कविकुलगुरू कालिदास यांचे स्थान संस्कृत साहित्यात एकमेव अद्वितीय मानले जाते. त्यांची तीन नाटके आणि तीन महाकाव्ये हा भारताचा फार मोठा मौल्यवान ठेवाच होय यात शंका नाही. गीर्वाणभाषा ही मुळातच अत्यंत सरल, सुलभ आणि मधूर भाषा आहे. कालिदासाच्या ललित साहित्यकृतींनी तिचे माधुर्य आणखीनच वाढलेले आहे.

अशा या श्रेष्ठ कवीचे चरित्र मात्र अद्यापही उपलब्ध नाही. हा कवी कोणत्या काळात होऊन गेला यासंबंधीही संशोधकात एकमत नाही. इ. स. पूर्व दीडशे वर्षापासून इ.सनाचे सातवे शतक या कालावधीत केव्हातरी हा महाकवी होऊन गेला याबद्दल फक्त एकमत आहे. या महाकवीचा काल, जीवन आणि ग्रंथ यासंबंधी विवेचक लेखन पद्मभूषण महामहोपाध्याय डॉ. वा. वि. मिराशी यांनी १९३४ मध्ये प्रथम मराठीत केले. त्याचे सामान्य वाचक आणि अभ्यासक यांनी मन:पूर्वक स्वागत केले. १९५७ मध्ये या ग्रंथाची दुसरी आणि १९७५ मध्ये तिसरी आवृत्ती प्रसिध्द झाली. हा ग्रंथ दुर्मिळ झाल्यामुळे आता साहित्य संस्कृती मंडळ चौथी आवृत्ती प्रसिध्द करीत आहे. त्याचेही पूर्वीप्रमाणेच रसिक स्वागत करतील याची मला खात्री वाटते.

मंडळाच्या अत्यंत प्रतिष्ठेच्या समजल्या जाणाऱ्या या ग्रंथाची ही चौथी आवृत्ती प्रसिध्द करताना म्हणूनच मंडळाला अतिशय आनंद होत आहे.

आश्विन शुध्द नवमी, शके १९२१
**दसरा,**
१९ ऑक्टोबर, १९९९
दादर, मुंबई - ४०००१४.

**द. मा. मिरासदार,**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.

# निवेदन

मराठी भाषेला आणि साहित्याला आधुनिक ज्ञानविज्ञानाच्या व आधुनिक सांस्कृतिक मूल्यांच्या आविष्काराचे सामर्थ्य प्राप्त व्हावे, आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृती, इतिहास, कला इत्यादी विषयांत मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य प्राप्त व्हावे, विविध विद्या व कलाविषयक उत्कृष्ट ग्रंथांची निर्मिती करून मराठी भाषेला जागतिक उच्च स्थान मिळवून द्यावे या उद्देशाने महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळाने बहुविध वाङमयीन कार्यक्रम आखला असून तो व्यवस्थितपणे कार्यवाहीत आणण्याकरिता विश्वकोश समिती, इतिहास समिती, भाषांतर समिती, मराठी वाङमयकोश समिती, ललितकला समिती, प्रकाशन समिती आदी समित्या स्थापन केल्या आहेत.

२. ललितकला समितीच्या कार्यक्रमात मंडळाच्या बहुविध वाङमयीन कार्यक्रमास अधिक संस्कृतिप्रवण करण्यासाठी ललितकलाविषयक नाट्य, नृत्य, वाद्य, चित्र, मूर्ती व गायन या विषयांचे संशोधन, विवरण व इतिहास यांचा अंतर्भाव आहे. या कार्यक्रमात कला व कलासंबद्ध विषयांवर मूलभूत संशोधन करून लिहिलेले ग्रंथ, संगीत व संगीतशास्त्र, नाटक व नाट्यशास्त्र, नृत्य व शिल्प इत्यादींवरील प्रमाणभूत जुन्या ग्रंथांची भाषांतरे, विविध कलांचा इतिहास, कलाकारांची चरित्रे इत्यादी वाङमयाच्या प्रकाशनाबरोबरच संस्कृत व मराठीतर अन्य भारतीय भाषांतील तसेच पश्चिमी व अन्य परदेशी भाषांतील ललितकलाविषयक अभिजात वाङमय मराठीत भाषांतरित करून प्रकाशित करण्याचा कार्यक्रम अंतर्भूत आहे. या कलांचा वाङमयाच्या द्वारे मराठी वाचकांस संक्षेपाने व विस्ताराने परिचय करून देणे हा मंडळाचा महत्त्वाचा उद्देश आहे.

३. या योजनेखाली मंडळाने कै. के. नारायण काळे यांनी अनुवादित केलेले स्तानिस्लाव्स्कीचे 'अभिनय साधना', श्री. श्री. ह. देशपांडे यांनी अनुवादित केलेले कोपलॅंडचे 'संगीत व कल्पकता', डॉ. श्री. ना. रातंजनकर यांनी लिहिलेले 'पं. विष्णु नारायण भातखंडे', प्रा. र. पं. कंगले अनुवादित 'रस-भाव-विचार' व 'दशरूपक-विधान' (भरत नाट्यशास्त्र रससिद्धान्तविषयक अध्याय ६ व ७ आणि नाट्यशास्त्रविषयक अध्याय १८ व १९ ची भाषांतरे), श्री. श्री. ह. देशपांडे अनुवादित

महाराष्ट्राचे संगीतातील कार्य', श्री. बा. गं. आचरेकर लिखित 'भारतीय संगीत व संगीतशास्त्र', डॉ. ग. ह. तारळेकर अनुवादित शार्ङ्गदेवाचे 'संगीत रत्नाकार' व डॉ. शं. अ. टेंकशे लिखित 'रागवर्गीकरण' ही पुस्तके प्रकाशित केली आहेत. भरतमुनीचे 'नाट्यशास्त्र' (संगीतविषयक अध्याय २८), नंदिकेश्वराचे 'अभिनय-दर्पण', भामहाचे 'काव्यालंकार', आनंदवर्धनाचे 'ध्वन्यालोक', दण्डीचे 'काव्यादर्श', कवी हालाची 'गाथासप्तशती', कवी बिहारीची 'सतसई', जयदेव कवीचे 'गीतगोविन्दम्', स्तानिस्लाव्स्कीचे 'Building a Character', स्ट्रॅविन्स्कीचे 'Poetics of Music', भरत के. अय्यर यांचे 'Kathakali', डॉ. बी. सी. देव यांचा 'Encyclopædia of Indian Musical Instruments' इत्यादी ग्रंथांची भाषांतरे मंडळाच्या वतीने क्रमाने प्रकाशित व्हावयाची आहेत. याशिवाय, श्री. पार्वतीकुमार संपादित 'तंजावरची नृत्यसाधना', डॉ. भा. कृ. आपटे संपादित 'Maratha Wall Paintings', डॉ. सौ. श्यामला बनारसे लिखित 'सांगीतिक मानसशास्त्राची मूलतत्त्वे', डॉ. श्री. व्यं. गोखले यांचे 'हिंदुस्थानी संगीतातील लय आणि ताल विचार' इत्यादी ग्रंथही लवकरच मंडळाच्या वतीने प्रकाशित होणार आहेत.

४. मंडळाने स्वतः प्रकाशित केलेल्या व करावयाच्या ललितकलाविषयक ग्रंथांखेरीज तज्ज्ञ लेखक व कलाकार व कलासंस्था यांना कलाविषयक संशोधनासाठी व प्रकाशनासाठी अनुदानेही मंडळाने दिली आहेत. श्री. ह. वि. दात्ये यांचे 'गायनी कळा', श्री. निखिल घोष यांचे 'रागतालाची मूलतत्त्वे व अभिनव स्वरलेखन पद्धती' (इंग्रजीत व मराठीत), प्रा. अशोक दा. रानडे यांचे 'संगीताचे सौंदर्यशास्त्र', पं. बाळकृष्ण कपिलेश्वरी यांचे 'श्रुतिस्वरदर्शन' व 'स्वरप्रकाश', डॉ. ना. ग. जोशी यांचे 'मराठी छंदोरचनेचा विकास', श्री. बा. र. देवधर यांनी लिहिलेले 'कै. विष्णु दिगंबर पलुस्कर यांचे चरित्र' व 'थोर संगीतकार' इत्यादी ग्रंथांच्या प्रकाशनाकरिता मंडळाने सुयोग्य अनुदाने दिली आहेत. गांधर्व महाविद्यालयाच्या 'संगीत कलाविहार' या मासिकालाही गेली अनेक वर्षे मंडळाचे अनुदान दिले जात आहे.

५. संगीत विषयातील संशोधनाच्या संदर्भात, रुपारेल महाविद्यालय, मुंबई, येथील भौतिकी विभागामध्ये मंडळाच्या अनुदानाने संगीत-ध्वनि विज्ञानाचे मौलिक संशोधन झाले आहे. त्यामधून व्यावहारिक उपयोगाच्या दृष्टीने लक्षणीय अशी माहिती व वाद्य मिळू न शकल्यामुळे ते कार्य आता स्थगित केले आहे. तानसेन म्युझिक ॲकॅडेमी, मुंबई, या संस्थेला स्वयंचलित 'सूरमंडल' तयार करण्यासाठी मंडळाने

अनुदान दिले आहे. श्री. बा. दा. मोहिते, सांगली, यांना ४८ श्रुतींवर आधारलेल्या सप्तकाची बाजाची पेटी तयार करण्यासाठीही अनुदान दिले आहे. डॉ. ह. वि. मोडक, वास्तव विभाग, वाडिया महाविद्यालय, पुणे, यांना दक्षिण भारतातील देवळांतील स्तंभांमधून निघणाऱ्या संगीतसुरांच्या संशोधनाकरिताही अनुदान दिले असून त्यांची ध्वनीमुद्रिते तयार झाली आहेत. दण्डतारारहित तंबोरा तयार करण्याचा प्रयत्न कै. डॉ. श्री. ब. निंभोरकर, अमरावती, यांनी काही वर्षे केला. त्याकरिताही मंडळाने अनुदान दिले आहे. एकंदरीत संशोधनाच्या प्रयत्नांतून प्रायोगिक उपयुक्ततेच्या दृष्टीने लक्षणीय यश प्राप्त झालेले नाही हे येथे नमूद केले पाहिजे. परंतु, संशोधनाचे प्रयत्न सतत चालले पाहिजेत म्हणून मंडळ सतत प्रयत्नशील आहे. जे. ग्रिफिथ्स् या इंग्लिश संशोधन कलावेत्याने अजिंठा येथील चित्रांचा संग्रह काही वर्षांपूर्वी प्रसिद्ध केला. अजिंठा येथील चित्रकला ही भारतातील प्राचीन चित्रकलेचा एक वैभवशाली भाग आहे. या चित्रसंग्रहाचे पुनर्मुद्रण करून ते प्रकाशित करण्याची कार्यवाही मंडळातर्फे चालू आहे.

६. कविकुलगुरू कालिदास याचा काल, जीवन व ग्रंथ यांविषयी विवेचक ग्रंथ पद्मभूषण महामहोपाध्याय डॉ. वासुदेव विष्णु मिराशी यांनी १९३४ मध्ये नागपूरच्या 'नवभारत' ग्रंथमालेत प्रसिद्ध केला. सामान्य वाचक आणि विद्वान अभ्यासक यांनी त्याचे सारखेच सहर्ष स्वागत केले. त्यानंतर या ग्रंथाची १९५७ मध्ये दुसरी आवृत्ती प्रकाशित केली. दुसऱ्या आवृत्तीच्या प्रती आता उपलब्ध नसल्यामुळे सदर पुस्तकाची तिसरी आवृत्ती प्रकाशित करणे आवश्यक झाले. डॉ. मिराशी यांच्या ग्रंथाचे हिंदी, उडिया व इंग्रजी अनुवादही प्रसिद्ध झाले असून ते तितकेच लोकप्रिय झाले आहेत. इतर भारतीय भाषांमध्येही त्याचे अनुवाद होऊ लागले आहेत. कालिदास भारताचा राष्ट्रकवी आहे. त्याचे सर्वसमावेशक चरित्र नेहमी मराठी वाचकांस उपलब्ध असणे आवश्यक आहे. म्हणून साहित्य-संस्कृति मंडळाने डॉ. मिराशी यांच्या "कालिदास" या ग्रंथाची तृतीयावृत्ती मंडळाच्या वतीने प्रकाशित करण्याचे ठरविले. कालिदासावरील अलिकडच्या संशोधनाची भर या तृतीयावृत्तीमध्ये डॉ. मिराशी यांनी घातली आहे. या ग्रंथाच्या प्रथमा व द्वितीयावृत्तीप्रमाणेच प्रस्तुत तृतीयावृत्तीचेही वाचकांकडून सहर्ष स्वागत होईल अशी आशा आहे.

श्रावण शु. ५, शके १८९७,
नागपंचमी,
११ ऑगस्ट १९७५,
सचिवालय, मुंबई-३२.

लक्ष्मणशास्त्री जोशी,
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ.

# प्रस्तावना

## प्रथमावृत्ति

पाच-सहा वर्षांपूर्वी नागपूरच्या 'महाराष्ट्र' वर्तमानपत्रात मी कालिदासावर सहा लेख लिहिले. ते वाचकांना फार आवडल्यामुळे माझ्या काही सन्मान्य मित्रांनी कालिदासाचे चरित्र लिहिण्याविषयी मला आग्रह केला. पण इतर व्यवसायांमुळे हे काम मागे पडले. पुढे माझे मित्र प्रो. श्री. ना. बनहट्टी यांनी 'नवभारत ग्रंथमाले' ची कल्पना काढली, त्या वेळी त्यांनी माझ्या नावावर कालिदास हा विषय घातला. तथापि, माझ्या संमतीशिवाय तो त्यांनी जाहीरही केला नसता, तर आज हे पुस्तक प्रकाशित होण्याचा योग आला असता, असे मला वाटत नाही. तेव्हा या बऱ्यावाईट पुस्तकाचे बरेचसे श्रेय अथवा जबाबदारी प्रो. बनहट्टी यांची आहे.

कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचा कालिदासावरील मार्मिक निबंध प्रसिद्ध झाल्यास आज साठांवर वर्षे झाली. या दीर्घ कालात युरोपीय व इतर हिंदी भाषांतल्याप्रमाणे मराठीतही बरेच कालिदासविषयक संशोधन झाले आहे. तथापि, कालिदासविषयक विविध प्रश्नांचा सर्व बाजूंनी विचार करून लिहिलेल्या ग्रंथाची केवळ मराठीतच नव्हे, तर माझ्या माहितीप्रमाणे इंग्लिश भाषेतही, उणीव आहे. मराठीतील ही उणीव शक्य तो भरून काढावी, या हेतूने हा प्रयत्न केला आहे.

कालिदासविषयक वादग्रस्त प्रश्नांचा ऊहापोह अनेक विद्वानांनी केला आहे. तथापि, त्यांपैकी बहुतेक प्रश्न अद्यापि अनिर्णीत आहेत. म्हणून प्रस्तुत पुस्तकात या प्रश्नांविषयी केवळ स्वतःचे मत न देता, आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या प्रमुख मतांचाही उपन्यास व परीक्षण केले आहे. त्यामुळे वाचकांस आपले मत बनविण्यास मदत होईल, असे वाटते. संस्कृतज्ञ वाचकांस प्रस्तुत पुस्तकातील हा भाग मनोरंजक व महत्त्वाचा वाटेल, अशी आशा आहे. इतर वाचकांसही तो सुलभतेने ग्रहण करता यावा म्हणून या पुस्तकातील कालिदासकालीन परिस्थिति, त्याची काव्ये व नाटके यांविषयीची प्रकरणे सविस्तर लिहिली आहेत. ती प्रथम वाचली असता इतर भाग समजण्यास अडचण पडणार नाही, असे वाटते. प्रस्तुत पुस्तकात उद्धृत केलेल्या

संस्कृत श्लोकांचे बहुतेक ठिकाणी मराठी भाषांतर दिले आहे. प्रत्येक ठिकाणी तसे करणे विस्तारभयास्तव शक्य नव्हते. तथापि, अशा ठिकाणीही त्यांचा सारांश किंवा मथितार्थ दिला असल्यामुळे संस्कृतानभिज्ञ वाचकांसही एकंदर विवेचन समजण्यास अडचण पडणार नाही, अशी आशा आहे.

प्रस्तुत पुस्तकात मला उपलब्ध असलेल्या सर्व कालिदासविषयक ग्रंथांचा व लेखांचा मी उपयोग केला आहे व बहुतेक ठिकाणी पूर्वगामी संशोधकांच्या ऋणाचा निर्देश केला आहे. जिज्ञासु वाचकांस परीक्षणाची सत्यासत्यता स्वतः पडताळून पाहता यावी म्हणून बहुतेक महत्त्वाच्या ठिकाणी संदर्भ दिले आहेत. या पुस्तकात इतर संशोधकांच्या मतांचा केवळ अनुवाद नसून बहुश्रुत वाचकांस त्यातील प्रत्येक प्रकरणात नवीन संशोधन, माहिती व विचार आढळतील, असा मला भरवसा आहे. शेवटी, ज्या थोर कवीच्या रम्य ग्रंथांनी विद्यार्थिदशेपासून माझ्या मनावर मोहिनी घातली, त्याच्या चरित्राचे व ग्रंथांचे मला प्तले ते सत्य स्वरूप मराठी वाचकांपुढे मांडून मला आज अंशतः त्याचा उतराई होता येत आहे, याबद्दल अत्यानंद होत आहे.

हे पुस्तक लिहिताना ज्यांच्या ग्रंथांचा व लेखांचा मी उपयोग केला आहे, त्या सर्वांचा मी अत्यंत आभारी आहे. या ठिकाणी श्री. के. ल. ओगले यांच्या कालिदासविषयक मार्मिक लेखांचा प्रामुख्याने उल्लेख केला पाहिजे. आठव्या प्रकरणातील राजकारण व शिक्षण या विषयांवरच्या कालिदासीय विचारांचे विवेचन करतांना मला त्यांच्या लेखांची मदत झाली आहे. 'नवभारतग्रंथमाले'चे संपादक प्रो. श्री. ना. बनहट्टी यांनी पुस्तक छापले जात असता अनेक उपयुक्त सूचना केल्या त्याबद्दल त्यांचेही आभार मानतो.

नागपूर :
१५ मार्च १९३४.

वा. वि. मिराशी

## द्वितीयावृत्ति

प्रस्तुत पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर अनेकांनी त्याच्या परीक्षणात प्रशंसोद्‌गार काढले. लौकरच त्याच्या प्रती दुर्मिळ झाल्या. पुण्याचे 'व्हीनस प्रकाशन'चे मालक श्री. स. कृ. पाध्ये यांच्या साहाय्याने आता त्याच्या द्वितीयावृत्तीचा योग येत आहे, याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानतो.

गेल्या वीस वर्षांत कालिदासकालविषयक बरेचसे नवीन संशोधन झाले आहे. त्याचा अन्तर्भाव व परीक्षण प्रस्तुत आवृत्तीत केले आहे.

नागपूर :
३ जानेवारी १९५७.

वा. वि. मिराशी

## तृतीयावृत्ति

प्रस्तुत ग्रंथ हा माझा पहिला संशोधनप्रबंध. त्यानंतर गेल्या चाळीस वर्षांत मी अनेक इंग्रजी व मराठी संशोधन ग्रंथ लिहिले. काहींनी मला मोठी कीर्ति मिळवून दिली. तथापि, आजही मला या माझ्या पहिल्या ग्रंथापत्याबद्दल कौतुक वाटते. अनेक मराठी वाचकांस मी 'कालिदास' ग्रंथाचा लेखक म्हणूनच परिचित आहे.

चाळीस वर्षांपूर्वी मी हा ग्रंथ लिहिला तेव्हा कालिदासविषयक अनेक प्रश्न वादग्रस्त होते. प्रस्तुत पुस्तकातील विवेचनाने आणि नंतरच्या माझ्या संशोधनाने ते सुटण्यास मदत झाली असावी. आता सहसा कोणी कालिदास ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात होऊन गेला असे प्रतिपादित नाही, किंवा मेघदूतातील रामगिरीचे स्थान रामटेकहून अन्यत्र मानीत नाही. या व इतर काही वादग्रस्त प्रश्नांची सविस्तर व सप्रमाण चर्चा प्रस्तुत ग्रंथात केली आहे. चाळीस वर्षांपूर्वी मी प्रतिपादिलेल्या मतांस आता विद्वन्मान्यता मिळाली आहे, याचे मला समाधान वाटते.

गेली काही वर्षे प्रस्तुत ग्रंथ अत्यंत दुर्मिळ झाल्यामुळे महाराष्ट्र शासनाच्या साहित्य-संस्कृति मंडळाने त्याची तृतीय आवृत्ति काढण्याचे ठरविले, याबद्दल मी त्या मंडळाचे हार्दिक आभार मानतो. मध्यंतरीच्या काळातील संशोधनाचा यात अन्तर्भाव करून ते अद्ययावत् केले आहे.

प्रस्तुत आवृत्तीतील शुद्धलेखन मराठी महामंडळाच्या नियमांस अनुसरून आहे. फक्त तत्सम शब्दांच्या शेवटचे ऱ्हस्व स्वर दीर्घ केले नाहीत.

नागपूर :
आषाढ शुक्ल एकादशी,
शकसंवत् १८९७,
दिनांक १९ जुलै १९७५.

वा. वि. मिराशी

# अनुक्रमणिका

# का लि दा स



## प्रकरण पहिले

## कालनिर्णय

**ख्यातिं कामपि कालिदासकृतयो नीताः शकारातिना ।**

**अभिनन्दकृत रामचरित.**

आपले संस्कृत वाङमय अनेक विषयांत अत्यंत समृद्ध आहे. धर्म, तत्त्वज्ञान, व्याकरणादि शास्त्रे, काव्ये, नाटके इत्यादि विविध विषयांवरचे शेकडो ग्रंथ प्रकाशित झाले आहेत व कित्येक हस्तलिखितावस्थेत प्रकाशनाची वाट पाहत आहेत. शिवाय अनेक कारणांनी काळाच्या उदरात जे गडप झाले, त्यांची तर गणनाच करता येणे शक्य नाही. आज हजारो वर्षे शेकडो ग्रंथकारांनी आपले बुद्धिवैभव खर्च करून या ग्रंथसंपत्तीत भर टाकली आहे. पण अशा या विशाल ग्रंथभांडारात ऐतिहासिक ग्रंथांची मात्र अत्यंत उणीव आहे. नाही म्हणावयास कल्हणाची 'राजतरंगिणी', बाणाचे 'हर्षचरित', राजशेखराची 'विद्धशालभञ्जिका', पद्मगुप्ताचे 'नवसाहसांकचरित', बिल्हणाचे 'विक्रमांकदेवचरित' असे हाताच्या बोटांवर मोजता येण्यासारखे काही ग्रंथ आहेत. यांपैकी बहुतेक ग्रंथांत खऱ्या ऐतिहासिक कथानकाला असंभाव्य व अद्‌भुत गोष्टींची इतकी मुरड दिलेली आढळते व कविकल्पनेच्या इतक्या भराऱ्या मारलेल्या दिसतात की, त्यांतून ऐतिहासिक

भाग हुडकून काढणे कठीण होते. प्राचीन काळच्या अशोक, विक्रमादित्य, समुद्रगुप्त, चंद्रगुप्त, भोज इत्यादि चक्रवर्ती नृपतींच्या कुलांविषयी, त्यांच्या कारकीर्दीतील प्रमुख गोष्टींविषयी, त्यांच्या स्वभावाविषयी जर आपले इतके अज्ञान तर त्यांच्या आश्रयाने राहणाऱ्या ग्रंथकारांविषयी बोलावयासच नको. आता भवभूति, बाण, राजशेखर, बिल्हण असे काही संस्कृत ग्रंथकार आहेत की, ज्यांनी आपल्या ग्रंथांत स्वतःचे कुल, विद्वत्ता, राजाश्रय, इत्यादि गोष्टींविषयी अल्पस्वल्प माहिती दिली आहे. ती आधुनिक वाचकांचे समाधान करण्यापुरती नसली तरी इतर कवींच्या मानाने बरीच आहे यात शंका नाही. या कवींनी अहंमन्यतेचा दोष पत्करूनही जर ही माहिती ग्रंथनिविष्ट केली नसती तर इतर ग्रंथकारांप्रमाणे त्यांच्याही बाबतीत विद्वानांत त्यांच्या कालाविषयी रणे माजून राहिली असती. कारण त्यांच्या समकालीनांनी त्यांच्या हयातीत किंवा निधनानंतर त्यांची कितीही प्रशंसा केली असली तरी त्यांपैकी एकालाही त्यांची चरित्रे लिहून ठेवण्याची बुद्धि झाली नसती, यात संशय नाही.

खुद्द कालिदासाचीच गोष्ट घ्याना. सर्व प्राचीन व अर्वाचीन, एतद्देशीय व परदेशीय विद्वानांनी त्याची मुक्तकंठाने प्रशंसा करून संस्कृत कवींमध्ये त्याला अग्रपूजेचा मान दिला आहे व तन्निदर्शक **कविकुलगुरु** ही पदवी अर्पण केली आहे ; इतकेच नव्हे तर अखिल जगाच्या साहित्यसम्राटांच्या मालिकेत त्याचे नाव गोवले आहे. अशा या कविश्रेष्ठाचे कुल, चरित्र, विद्वत्ता, स्वभाव इत्यादिकांविषयी विश्वसनीय अशी कितीशी माहिती आपणांस प्राचीन वाङ्मयात सापडेल ? स्वतः अत्यंत विनयशील असल्याने त्याने आपल्या नाटकांत प्राचीन पद्धतीस अनुसरून स्वतःचा केवळ नामनिर्देश केला आहे व तोही आपल्या काव्यांत गाळला आहे. त्याची निरपेक्षता इतकी की, ज्या उदार नृपतीचा त्याला आश्रय होता, त्यावर द्रव्याच्या लालचीने त्याने केलेली एकही प्रशस्ति आढळत नाही, इतकेच नव्हे तर काही अप्रत्यक्ष उल्लेख वगळल्यास आपल्या ग्रंथांमध्ये स्वतःच्याप्रमाणे त्याच्याही नामाचा निर्देश त्याने केलेला नाही. महनीय विभूतींची, जगज्जेत्या सम्राटांची व श्रेष्ठ ग्रंथकारांची चरित्रे लिहिण्याची चाल

आपणांमध्ये नसल्यामुळे त्याच्या काळानंतर लौकरच त्याच्या चरित्राविषयीची विश्वसनीय माहिती लुप्त झाली व तिची जागा भाकड दंतकथांनी बळकाविली. अशा अनेक दंतकथा प्राचीन काळच्या विद्वानांत प्रचलित होत्या व त्यांपैकी काही बल्लालकवीच्या 'भोजप्रबंध' या इतर दृष्टीने रमणीय व रसाळ पण ऐतिहासिकदृष्ट्या गचाळ ग्रंथात एकत्रित केल्या आहेत. हा ग्रंथ इ. स. च्या सोळाव्या शतकात म्हणजे कालिदासानंतर शेकडो वर्षांनी लिहिला गेल्यामुळे त्याला ऐतिहासिक महत्त्व काडीचेही नाही. परंपरागत प्राचीन ऐतिहासिक गोष्टी या ग्रंथात कवीने गोळा केल्या, असे मानावे तर तेही संभवनीय दिसत नाही. कारण, या ग्रंथात कालिदासाला भवभूति, भारवि, दण्डी, इत्यादि कवींचा समकालीन म्हणून वर्णिले आहे; पण या ग्रंथकारांच्या ग्रंथांतील व इतर बलवत्तर प्रमाणांवरून ते कालिदासानंतर अनेक वर्षांनी निर-निराळ्या काळी होऊन गेले, असे विद्वानांनी सिद्ध केले आहे. शिवाय या सर्वांचा आश्रयदाता म्हणून वर्णिलेला जो प्रसिद्ध धारानरेश भोज तो त्या सर्वांनंतर कित्येक शतकांनी म्हणजे इ. स. च्या अकराव्या शतकात होऊन गेला, असे खुद्द त्याच्या ताम्रपटांवरून सिद्ध झाले आहे. तेव्हा यावरून कालिदासादि कवींच्या चरित्रांकरिता हा ग्रंथ किती निरुपयोगी आहे हे दिसून येईल.

परंपरागत विश्वसनीय माहितीच्या अभावी कालिदासाचे जन्मस्थान, काल व चरित्र यांविषयी अनेकांनी अनेकविध तर्क केले आहेत. या सर्वांत त्याच्या कालाचा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा व इतर सर्व प्रश्नांच्या विवेचनाला मूलभूत असल्याने त्याचा या प्रकरणात विचार करू.

कालिदासाच्या कालाच्या दोन स्पष्ट मर्यादा सर्व विद्वानांनी मान्य केल्या आहेत. कालिदासाने आपल्या 'मालविकाग्निमित्र' नाटकाचे संविधानक शुंगवंशातील राजा अग्निमित्र याच्या चरित्रातून घेतले आहे. हा अग्निमित्र मौर्य वंशाचा उच्छेद करून मगध साम्राज्य बळकावणाऱ्या सेनापति पुष्यमित्राचा मुलगा. याचा काल इ. स. पूर्वी सुमारे १५० हा विद्वानांनी निश्चित केला आहे. तेव्हा इ. स. पूर्वी १५० च्या पलिकडे कालिदासाचा काल नेता येत नाही. ही

झाली त्याच्या कालाची पलीकडील मर्यादा. यानंतर कालिदासाचा स्पष्ट नावाने उल्लेख प्रथम उत्तरेतील कनोजच्या हर्ष (इ. स. ६०६–६४७) नामक सम्राटाचा आश्रित जो प्रसिद्ध संस्कृत कवि बाणभट्ट, त्याच्या 'हर्षचरिता'च्या प्रस्तावनेत व दक्षिणेतील बादामी नामक पूर्वचालुक्यांच्या राजधानीपासून ईशान्येस १५ मैलावर असलेल्या 'ऐहोळे' (कानडी 'अय्यावोळे') या गावी जुन्या जैनमंदिरात एका शिलाखंडावर कोरलेल्या इ. स. ६३४ च्या रविकीर्ति या जैन कवीच्या प्रशस्तीत आढळतो. हे दोन्ही उल्लेख इ. स. च्या सातव्या शतकातील आहेत. याच्या अलीकडे कालिदासाचा काल ओढता येत नाही. या दोन मर्यादांत कालिदासाच्या कालाविषयी पुढील मते प्रतिपादिलेली आढळतात : (१) इ. स. पूर्वी दुसरे शतक (डॉ. कुन्हन राजा); (२) इ. स. पूर्वी पहिले शतक (श्री. चिंतामणराव वैद्य); (३) इ. स. चे तिसरे शतक (श्री. द. वें. केतकर); (४) इ. स. च्या चौथ्या शतकाचा उत्तरार्ध (डॉ. सर रामकृष्णपंत भांडारकर आदिकरून बरेच हिंदी व बहुतेक युरोपीय विद्वान); (५) इ. स. चे पाचवे शतक (प्रो. पाठक); (६) इ. स. चे सहावे शतक (प्रो. मॅक्समुल्लर, म. म. हरप्रसाद शास्त्री). आता ही मते ज्या प्रमाणांवर अधिष्ठित झाली आहेत, त्यांची सत्यासत्यता उपलब्ध असलेल्या पुराव्याच्या कसोटीवर घासून ठरवू.

**१. इसवी सनापूर्वी दुसरे शतक**

'मालविकाग्निमित्र' नाटकाच्या भरतवाक्यात—

आशास्यमीतिविगमप्रभृति प्रजानां
संपत्स्यते न खलु गोप्तरि नाग्निमित्रे ॥

असा शुंगवंशी अग्निमित्राचा उल्लेख आहे. सामान्यतः भरतवाक्यात शांतता, समृद्धि व सौराज्य यांविषयी प्रार्थना असते. क्वचित् राजाचा उल्लेख आढळतो व तो तत्कालीन राजाचा निदर्शक समजला जातो. 'मालविकाग्निमित्रा'तील भरतवाक्य या दुसऱ्या प्रकारचे आहे. त्यावरून कालिदास खिस्तपूर्व दुसऱ्या शतकात विदिशेस राज्य करणाऱ्या अग्निमित्राच्या आश्रयास होता, असे अनुमान डॉ. कुन्हन राजा यांनी केले आहे. 'मेघदूता'त कालिदासाने 'तेषां दिक्ष प्रथित-

विदिशालक्षणां राजधानीम्' (दशार्ण देशाची सर्वत्र प्रसिद्ध असलेली राजधानी विदिशा) असे विदिशेचे वर्णन केले आहे, ते शुंगकालीन विदिशेसच लागू पडते, यासारखी काही उपोद्बलक प्रमाणेही त्यांनी दिली आहेत.*

पण हे मत बरोबर आहे, असे वाटत नाही. 'मालविकाग्निमित्र' हे कालिदासाचे पहिले नाटक. निश्चितपणे कालिदासपूर्वकालीन म्हणता येतील अशी फारच थोडी नाटकें सध्या उपलब्ध आहेत व त्यांतील बहुतेक त्रुटित किंवा संक्षिप्त स्वरूपाची आहेत. त्यामुळे कालिदासकाळी भरतवाक्याची कोणती पद्धति रूढ होती हे सांगता येत नाही. कालिदासाच्या इतर दोन नाटकांची भरतवाक्ये सामान्य स्वरूपाची आहेत. तेव्हा 'मालविकाग्निमित्र' नाटकाच्या भरतवाक्यावरून कालिदास अग्निमित्राच्या काळी होऊन गेला, असे निश्चित अनुमान काढता येत नाही. शिवाय कालिदास कोणा एका विक्रमादित्याच्या दरबारी होऊन गेला, अशी फार जुनी आख्यायिका आहे. पण अग्निमित्राने ही पदवी धारण केली होती, असे मानण्यास यत्किंचितही आधार नाही. विदिशेचे महत्त्व गुप्तकालातही पूर्वीप्रमाणेच अबाधित होते, हे विदिशेच्या (भिलशाच्या) जवळील उदयगिरि (प्राचीन नीचैर्गिरि) येथील गुप्तकालीन लेणी, शिल्पे व कोरीव लेख यांवरून स्पष्ट दिसते. तेव्हा 'मेघदूता'तील विदिशेचे वर्णनही या मताला उपोद्बलक होत नाही.

### २. इसवी सनापूर्वी पहिले शतक

(१) कालिदास शककर्त्या विक्रमादित्याच्या दरबारी राजकवि म्हणून होता, अशी प्राचीन पंडितांची परंपरागत समजूत आहे. कालिदासानेही आपल्या 'विक्रमोर्वशीय' या नाटकाच्या नावात व त्याच नाटकातील पात्रांच्या संभाषणात दोन ठिकाणी† 'विक्रम' या शब्दाचा सहेतुक उपयोग केलेला दिसतो. तेव्हा शेक्सपीयरने आपल्या नाटकात इंग्लंडच्या जेम्स राजाचा जसा उल्लेख केला आहे, तसाच कालिदासानेही आपल्या आश्रयदात्याचा श्लेषद्वारा गर्भित उल्लेख केला असावा, असे दिसते

* *I. H. Q.*, Vol. XVIII, pp. 128 f.

† दिष्टया महेन्द्रोपकारपर्याप्तेन विक्रममहिम्ना वर्धते भवान्। विक्रमोर्वशीय, अं. १.
अनुत्सेक: खलु विक्रमालङ्कार:। विक्रमोर्वशीय, अं. १.

व त्यावरून तो एखाद्या विक्रमादित्याच्या दरबारी असावा, असे अनुमान होते. हा विक्रमादित्य सध्या चालू असलेल्या विक्रमसंवताचा संस्थापक अशी प्रचलित समजूत आहे. हा विक्रमसंवत् इ. स. पूर्वी ५७ व्या वर्षी सुरू झाला. तेव्हा कालिदासही इ. स. पूर्वी पहिल्या शतकात होऊन गेला, असे प्राचीन परंपराभिमानी मानतात. हेच मत श्री. चिंतामणराव वैद्य, प्रो. र. ना. आपटे, प्रो. शारदारंजन राय, अलाहाबाद विश्वविद्यालयातील संस्कृतचे प्रोफेसर चट्टोपाध्याय यांनी विविध प्रमाणे पुढे मांडून स्थिर करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांतील मुख्य प्रमाणांचा पुढे थोडक्यात विचार करू. पण या मतावर पहिला मुख्य आक्षेप हा की, ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात विक्रमादित्य नावाचा राजा होऊन गेला, याला निश्चित प्रमाण सापडत नाही.* या राजाच्या पूर्वीच्या अशोकादि भारतवर्षीय राजांचे कोरीव लेख सापडतात, पण या विक्रमादित्याचा एकही लेख अद्यापि उजेडात आला नाही. संस्कृत व प्राकृत वाङ्मयांत विक्रमादित्याचे क्वचित् उल्लेख आढळतात हे खरे. उदाहरणार्थं, हालाच्या प्राकृत 'सत्तसई' मध्ये विक्रमादित्याच्या दातृत्वाचा, 'कथासरित्सागर' व 'बृहत्कथामञ्जरी' मध्ये त्याच्या भूतवेतालादिकांवर मिळविलेल्या विजयाचा व जैनांच्या 'कालकाचार्यकथानका' मध्ये त्याने केलेल्या शकांच्या पराभवाचा उल्लेख आहे. पण 'सत्तसई' मध्ये वेळोवेळी अनेक फेरफार करण्यात आले, हे आता सिद्ध झाले आहे. तीतील विक्रमादित्याच्या दातृत्वाचे वर्णन गुप्तनृपति द्वितीय चंद्रगुप्त विक्रमादित्याविषयी असावे, हे आता दाखविता येते. बाकीचे ग्रंथ ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकानंतर कित्येक शतकांनी झालेले आहेत; त्यामुळे त्यांतील वर्णनावर किती विश्वास ठेवावा हा प्रश्न आहे. दुसरे असे की, विद्वानांनी त्या काळाच्या इतिहासाची जी संगति लाविली आहे, तीत या विक्रमादित्याला कोठेही निश्चित स्थान लाभत नाही. ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात शकांनी हिंदुस्थानावर स्वारी करून काठेवाड, माळवा, महाराष्ट्र, कोंकण इत्यादि प्रांत आपल्या अमलाखाली आणले होते, यात संशय नाही; कारण त्यांचा एक क्षत्रप नहपान व त्याचा

---

* या प्रश्नाचे सविस्तर विवेचन डॉ. अ. स. अळतेकर यांनी *Dr. S. K. Belvalkar Felicitation Volume*, pp. 268 f. मध्ये केले आहे.

जावई ऋषभदत्त (प्राकृत 'उषवदात') यांचे लेख नाशिक, कार्ले वगैरे ठिकाणी सापडले आहेत, त्यांत त्या प्रकारचे वर्णन आहे. पण या नहपानाचा पराभव करून ज्याने शकांस या प्रांतातून पिटाळून लावले, त्या गौतमीपुत्र सातकर्णीने विक्रमादित्य ही पदवी धारण केल्याचे त्याच्या कोरीव लेखांवरून दिसत नाही. तसेच एखादा संवत् त्याने स्वतःच्या नावाने सुरू केल्याचेही दिसत नाही. शिवाय, ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात होऊन गेलेल्या एका विक्रमादित्याने हा संवत् चालू केला असता तर त्याच्याशी त्याचे नाव लवकरच संलग्न व्हावयास पाहिजे होते. पण वस्तुस्थिति अशी आहे की, इ. स. च्या १० व्या शतकात 'विक्रमकाल' या सामासिक शब्दाचा उपयोग 'एक विशिष्ट शक' या अर्थी प्रथमच केलेला आढळतो व या ठिकाणीही 'विक्रम'पदाने 'विक्रमादित्य' हा अर्थ विवक्षित आहे काय, याबद्दल शंका आहे. राजपुतान्यातील उदयपूर-जवळच्या एकलिंगजी गावातील विक्रम सं. १०२८ च्या कोरीव लेखात व विक्रम सं. १०५० मध्ये लिहिलेल्या अमितगतीच्या 'सुभाषितरत्न-संदोहां'त प्रथम या शकाच्या नावातील 'विक्रम' हा शब्द 'विक्रमादित्य नृप' या अर्थी निःसंदिग्ध रीतीने योजिलेला आढळतो. प्रो. कीलहॉर्न याने या शकाच्या अनेक मित्यांचे निरीक्षण करून असे अनुमान काढले आहे की, हा शक कोणी विक्रमादित्याने सुरू केला नसून त्याशी त्याचे नाव हळूहळू संलग्न होत गेलेले दिसते. याचे कारण असे की, जसा शालिवाहन शकाचा प्रथमपासून चैत्रात आरंभ होत असे, तसाच विक्रम-संवताचा कात्तिकात म्हणजे शरदृतूत होत असे. या ऋतूत राजेलोक लढाईस जात म्हणून त्या ऋतूला 'विक्रमकाल' असे हर्षचरितादि अनेक संस्कृत ग्रंथांत म्हटले आहे. शरद् ऋतूत आरंभ होणे हे विक्रमसंवताचे वैशिष्ट्य असल्याने त्यालाही कवि 'विक्रमकाल' म्हणू लागले. पुढे या सामासिक शब्दाचा खरा अर्थ स्मरणातून गेल्यावर लोक त्याचा 'विक्रमादित्याने चालू केलेला काल किंवा शक' या अर्थी उपयोग करू लागले व अशा रीतीने विक्रमादित्याचे नाव या शकाशी हळूहळू संलग्न झाले. डॉ. रामकृष्णपंत भांडारकरांच्या मते हा शक माळव्यात पुष्कळ वर्षे चालू होता व त्या प्रांतात (चौथ्या शतकात) द्वितीय चंद्रगुप्त या विख्यात, पराक्रमी व दानशूर राजाने विक्रमादित्य ही पदवी धारण

करून राज्य केलें होते. पुढे कित्येक शतकांनी या शकाचा आरंभ कोणी कसा केला याचे लोकांस विस्मरण पडल्यावर (चंद्रगुप्त) विक्रमादित्याच्या नावाशी त्याचा संबंध जोडण्यात आला असावा. वरील दोन उपपत्तीं-पैकी कोणतीही स्वीकारली तरी खिस्ती शकाच्या १० व्या शतकापर्यंत विक्रमादित्याने हा शक चालू केंला, ही समजूत प्रचलित नव्हती, हे स्पष्ट आहे. शिवाय या शकाचे अगदी पहिले म्हणजे संवत् २८४, २९५, ३३५, ४८०, ४९३, ५२४ व ५८९ चे कोरीव लेख प्रसिद्ध झाले आहेत, त्यांतील काहींत त्याचे नाव 'कृत' असे आले आहे आणि इतर लेखांत 'मालवानां गणस्थित्या', 'श्रीमालवगणाम्नाते', 'मालव-गणस्थितिवशात्' असा एखादा शब्दसमुच्चय योजून या शकाचा उल्लेख केला आहे. त्यावरून हा शक प्रथम मालवगणानें सुरू केला असावा व त्याचे आरंभीचे नाव 'कृत' असावे, असे अनुमान होते. पाणिनीच्या 'अष्टाध्यायी'वरून (५.३.११४) प्राचीन काळी या 'मालव' लोकांचा आयुधजीविसंघ होता, म्हणजे पेशव्यांच्या वेळच्या गारद्यांप्रमाणें हे लोक वेतन घेऊन कोणाच्याही बाजूने लढत असत, असे दिसते. अलेक्झांडरास हे शूर लढवय्ये पंजाबात आढळले. पुढे पंजाब सोडून हे हळूहळू दक्षिणेकडे सरकले व सध्याच्या माळवा प्रांताच्या उत्तरेस त्यांनी एक 'गण' म्हणजे प्रजासत्ताक राज्य स्थापले व आपल्या गणाच्या नावाने नाणी पाडली. अशी शेकडो नाणी राजपुतान्यात नगर या गावी सापडलेली इतिहासज्ञांस माहीत आहेत. त्यांपैकी कित्येकांवर 'मालवानां जयः' किंवा 'मालवगणस्य जयः' असे शब्द आढळतात, त्या-वरून त्यांनी तत्कालीन एखाद्या बलाढ्य शत्रूवर—कदाचित् शकांवर—विजय मिळविला असावा, असे बॅ. काशीप्रसाद जायस्वाल यांनी अनुमान केले आहे. आपल्या गणराज्याच्या स्थापनेचे किंवा बलाढ्य शत्रूवर मिळविलेल्या विजयाचे स्मरण राहावे म्हणून त्यांनी हा शक चालू केला, असे दिसते. पुढे ते माळव्यात येऊन राहिल्यावर तेथेही लोक त्याचा उपयोग करू लागले. तथापि हा मूळचा मालवगणाचा शक ही जाणीव होती तोपर्यंत, म्हणजे इ. स. च्या सहाव्या शतकापर्यंत, मालवांचे नाव त्याशी संबद्ध झालेले आढळते, यात आश्चर्य नाही.

वरील विवेचनावरून खिस्तपूर्व पहिल्या शतकात विक्रमादित्य

नावाच्या राजाने सध्याचा विक्रमसंवत् सुरू केला, ही प्रचलित समजूत निराधार आहे, हे वाचकांच्या ध्यानात येईल. खिस्तपूर्व पहिल्या शतकांतील विक्रमाचे अस्तित्व याप्रमाणे संशयित ठरल्यावर कालिदास हाही त्या काळी होऊन जाणे संभवनीय नाही ; कारण त्याचा आश्रयदाता कोणी विक्रमादित्य असावा हे त्याच्या ग्रंथांतर्गत उल्लेखांवरून दिसते, असे वर दाखविले आहे. असो. आता या मताच्या सिद्धयर्थ जी इतर प्रमाणे पुढें मांडली जातात त्यांपैकी काही महत्त्वाच्या प्रमाणांचे परीक्षण करू —

(२) 'रघुवंशा'च्या सहाव्या सर्गांत इंदुमतीस्वयंवराचे वर्णन करताना खालील श्लोक आले आहेत:—

अथोरगाख्यस्य पुरस्य नाथं दौवारिकी देवसरूपमेत्य ।
इतश्चकोराक्षि विलोकयेति पूर्वानुशिष्टां निजगाद भोज्याम् ॥ ५९ ॥
पाण्डयोऽयमंसार्पितलम्बहारः क्लृप्ताङ्गरागो हरिचन्दनेन ।
आभाति बालातपरक्तसानुः सनिर्झरोद्गार इवाद्रिराजः ॥ ६० ॥

यात पाण्डय राजा उरगपुर येथे राज्य करीत होता, असे म्हटले आहे. पुढे ६३ व्या श्लोकात * 'या पाण्डय राजाशी लग्न करून तू दक्षिण दिशेची सवत हो' असा सुनंदेने इंदुमतीस उपदेश केला आहे. तसेच सर्ग ४, श्लोक ४९ मध्येही 'रघूने दक्षिणेत पाण्डयांचा पराभव केला' असे कवीने वर्णिले आहे. पुष्कळदा अनवधानाने मोठमोठे कवीसुद्धा ऐतिहासिक कालविपर्यासाचा (anachronism चा) दोष करीत असतात व नकळत स्वकालीन परिस्थिति वर्णीत असतात. काव्यशास्त्रदृष्टया हा दोष गणला असला तरी त्याबद्दल संशोधक प्राचीन संस्कृत कवींस धन्यवादच देतात. कारण पुष्कळ वेळां अशा स्थली कवीच्या कालनिर्णयाचे एखादे अचूक गमक सापडते. या दृष्टीने वरील श्लोकांचा विचार करून श्री. चिंतामणराव वैद्यांनी कालिदास खिस्तपूर्व पहिल्या शतकात होऊन गेला, असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. † तो असा—वरील श्लोकांत पाण्डय राजे दक्षिणेत वलाढय असून 'उरगपुर' येथे राज्य करीत होते असे वर्णिले आहे. हे अर्थातच

* रत्नानुविद्धार्णवमेखलाया दिशः सपत्नी भव दक्षिणस्याः ।

† *Annals of the Bhandarkar Institute*, Vol. II, p. 63.

विदर्भातील नागपूर असणे शक्य नाही. कारण ते दक्षिणेत नाही किंवा त्या प्रांतावर पाण्ड्यांचा कधी अंमल होता, असेही दिसत नाही. तेव्हा उरगपुर म्हणजे हल्लीचे 'उरैयूर' असावे. प्राकृत व्याकरणाच्या नियमाप्रमाणे 'उरगपुर' यातील 'ग' व 'प' या व्यंजनांचा लोप होऊन व मध्ये एक 'य' घुसून उरैयूर हे नाव सिद्ध होणे शक्य आहे. खिस्तोत्तर पहिल्या शतकात करिकाल नामक प्रसिद्ध चोल नृपतीनें पराभव करीपर्यंत पाण्ड्य राजे दक्षिणेत प्रबल होते. करिकालाने त्यांचा पराभव केल्यावर त्यांनी उरैयूर येथून कावेरीपत्तनम् येथे आपली राजधानी नेली. त्यापूर्वी उरैयूर हीच पाण्ड्यांची राजधानी असावी. इ. स. च्या तिसऱ्या शतकात पांड्य राजे पुन: प्रबळ झाले ; पण त्यानंतर त्यांची राजधानी उरैयूर नसून मदुरा ही होती. वरील श्लोकांत कालिदासाने स्वकालीन परिस्थिति वर्णिली आहे, असे मानले तर त्याचा काल खिस्तोत्तर पहिल्या शतकापूर्वी असला पाहिजे. कारण त्या शतकानंतर उरैयूर ही केव्हाही पाण्ड्य नृपतींची राजधानी नव्हती.

वरील प्रमाण परीक्षणाच्या कसोटीस उतरत नाही. 'उरगपुर'पासून 'उरैयूर' हे नाव सिद्ध होणे अशक्य नाही हे खरे. पण यात गोम ही की, उरैयूर ही कधीकाळी पाण्ड्यांची राजधानी होती, याला इतिहासाचा अगर दंतकथांचाही पुरावा नाही. याच्या उलट, मदुरा हीच अगदी प्राचीन काळापासून पाण्ड्यांची राजधानी होती, असे व्हिन्सेंट स्मिथ प्रभृति इतिहासकार म्हणतात. मदुरा या गावाचे तामिळ नाव 'अळवाय' आहे व त्याचा अर्थ नाग असाच आहे. पण उरगपुर याने मदुरा ही, कवीस विवक्षित आहे असे मानले तर हे प्रमाण 'खिस्तपूर्व पहिले शतक' या पक्षाप्रमाणे 'खिस्तोत्तर चवथे किंवा पाचवे शतक' या पक्षालाही साधक होईल. कारण खिस्तोत्तर तिसऱ्या शतकापासून सातव्या शतकात पल्लवनृपति सिंहविष्णु याने पराभव करीपर्यंत पाण्ड्यनृप दक्षिणेत प्रबल होते व त्यांची राजधानी मदुराच होती, हे प्रसिद्ध आहे. तेव्हा वरील प्रमाण निर्णायक होऊ शकत नाही.

(३) **'मालविकाग्निमित्रा'तील अनावश्यक उल्लेख—** कै. प्रो. शिवरामपंत परांजपे यांनी 'मेघदूतावरून कालिदासाविषयी' (साहित्यसंग्रह, भाग १, पृ. ८८) या आपल्या सरस निबंधात असे म्हटले

आहे की, " मालविकाग्निमित्र नाटकात इरावती व धारिणी दोन उप-नायिका घालणे, धारिणीचा भाऊ वीरसेन हा जातीने कमी दर्जाचा होता, हे कथानकाला जरूर नसलेले विधान करणे, नाटकाच्या पाचव्या अंकात पुष्यमित्राने आपल्या पत्रात 'विगतरोषचेतसा' म्हणजे 'राग टाकून ये' असे जे अग्निमित्राला लिहिले आहे त्यातील रागाचे कारण न सांगणे, इत्यादि अनावश्यक गोष्टींवरून कालिदासाला शुंगकालीन बारीकसारीक गोष्टींची माहिती होती, म्हणून तो अग्निमित्राच्या किंवा त्याच्या जवळच्या काळात होऊन गेला असावा." अशाच तऱ्हेचे मत प्रो. चट्टोपाध्याय यांनीही प्रकट केले आहे व त्यावरून शुंगांच्या कथा लोकांच्या स्मरणातून जाण्यापूर्वी म्हणजे अग्निमित्राच्या काळापासून एका शतकाच्या आत अथवा खिस्तपूर्व ५७ च्या सुमारास कालिदास होऊन गेला असावा, असे मानले आहे.

त्याच उल्लेखांवरून विद्वान् संशोधक निरनिराळी अनुमाने कशी काढू शकतात, याचे हे उत्तम उदाहरण आहे. कारण कालिदास हा गुप्त-कालात (खिस्तोत्तर पाचव्या शतकात) होऊन गेला, असे मानणाऱ्या डॉ. श्री. व्यं. केतकरांनी साडेपाचशे वर्षानंतर कवीला अशा बारीक ऐतिहासिक गोष्टींचे ज्ञान असणे शक्य नाही, असे गृहीत धरून वर उल्ले-खिलेली पात्रे व प्रसंग या नाटकात घालण्यात व अशी विधाने करण्यात कालिदासाचा उद्देश निराळाच होता, असे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांनी केलेली कारणमीमांसा येणेप्रमाणे :—" कालिदासाच्या 'मालविकाग्निमित्रा'त तत्कालीन समाजावर टीका करून टाळ्या मिळविण्याचा हेतु मुळीच लपत नाही. एखाद्या राणीला दारू पिऊन झिंगलेली अशी रंगभूमीवर आणणे, राणीच्या भावाचा अकरमासेपणा चव्हाट्यावर आणणे इत्यादि गोष्टी नाटकात आणण्यास कवीस बरेच धारिष्टय पाहिजे हे उघड आहे .... (म्हणून) कवीला आपले नाटक प्राचीन काल दाखविणारे आहे, असे ढोंग करणे अत्यंत उपयुक्त होते. गावातल्या लोकांमध्ये राणीची चेष्टा चांगली केली म्हणून हशा पिकवा-वयास सापडतो व राणीची देखील तिला दारू पिण्यास ऐतिहासिक आधार आहे, अशी समजूत करून देऊन शाबासकी मिळविणे कवीस शक्य होते."

'मालविकाग्निमित्रां'तील वरील गोष्टींवरून काढलेली दोन्ही अनुमाने सयुक्तिक भासत नाहीत. शुंगकालानंतर ५००/५५० वर्षांनी झालेल्या कालिदासास त्या कालाविषयी बारीकसारीक माहिती असणे शक्य नाही, हे म्हणणे आम्हांस पटत नाही. कारण त्याच्याहीनंतर २००/२५० वर्षांनी होऊन गेलेल्या बाणाच्या 'हर्षचरितात' त्या कालाविषयी जी माहिती दिसते, ती सध्या उपलब्ध असलेल्या कोणत्याही पुराणात दिसत नाही. उदाहरणार्थ, या सर्व पुराणांत सेनापति पुष्यमित्राने बृहद्रथ मौर्यास ठार मारून गादी बळकावली असा उल्लेख आहे, पण त्यास केव्हा व कसे मारले याविषयी काहीच माहिती मिळत नाही. ती माहिती बाणाने, हर्ष दिग्विजयास निघाला असता त्यास गजसैन्याधिपति स्कंदगुप्त याने जो उपदेश केला त्यात, पुढीलप्रमाणे दिली आहे—'सैन्याची पाहणी करण्याच्या मिषाने मूर्ख बृहद्रथ राजाला बोलावून सेनापति पुष्यमित्राने त्यास ठार मारले'. कालिदासानंतर कित्येक वर्षांनी होऊन गेलेल्या विशाखदत्ताला शुंगकालाच्याहीपुर्वी दीडशे वर्षे झालेल्या मगधातील राज्यक्रांतीवर सविस्तर ऐतिहासिक उल्लेख घालून नाटक रचता येते, तर त्यापेक्षा कमी कालाच्या व्यवधानानंतर कालिदासास तरी तसे का करता येऊ नये? सध्याच्यापेक्षा जास्त ऐतिहासिक साधने कालिदासकाळी अस्तित्वात असावीत, असे वाटते. प्राचीन काळी राजांच्या वंशावळीचेच नव्हे तर त्यांच्या कारकीर्दीत होऊन गेलेल्या महत्त्वाच्या गोष्टींचे टांचण करून ठेवण्याचा प्रघात होता. अशा प्रकारचे कलिंगदेशच्या खारवेल नावाच्या राजाच्या कारकीर्दीचे सविस्तर वर्णन हाथीगुम्फेमध्ये खडकावर कोरलेले प्राचीन इतिहासाच्या अभ्यासकांस माहीत आहे. अशा प्रकारचे शुंगराजाच्या कारकीर्दीचे वृत्तान्त कालिदासकालीही शुंग व गुप्त या दोन्ही राजांची राजधानी झालेल्या पाटलिपुत्र शहरी अस्तित्वात असणे व ते गुप्तकालीन कालिदासास उपलब्ध होणे असंभवनीय नाही.

(४) **अश्वघोषाच्या ग्रंथांतील साम्य**— इ. स. १८९३ मध्ये अश्वघोषाचे 'बुद्धचरित' व इ. स. १९१० मध्ये त्याच कवीचे 'सौंदरनंद' प्रसिद्ध झाल्यापासून विद्वानांचे लक्ष या काव्यांत व कालिदासाच्या ग्रंथांत दिसणाऱ्या साम्याकडे वळले व त्यांच्यात

दोन तट पडले. प्रो. कोवेलसारख्या युरोपीय व काही हिंदी संशोधकांनी या साम्यावरून कालिदासाने आपल्या कल्पना अश्वघोषाच्या काव्यांतून घेतल्या, अर्थात् तो त्यानंतर म्हणजे इ. स. च्या पहिल्या शतकानंतर* होऊन गेला, असे मानले ; तर उलट प्रो. शारदारंजन राय, प्रो. चट्टोपाध्याय वगैरेंनी अश्वघोषानेच कालिदासाच्या कल्पना चोरल्या, असे दाखवून खिस्तपूर्व पहिले शतक हा कालिदासाचा काळ निश्चित करण्याचा प्रयत्न केला. या वादाचा विचार करण्यापूर्वी एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. ती ही की, यांपैकी कोणतेही मत सिद्ध झाले तरी त्यामुळे त्यांपैकी कोणाही कवीच्या अभिमान्यांस वाईट वाटण्याचे कारण नाही. कारण राजशेखराने म्हटल्याप्रमाणे, 'सर्वोऽपि परेभ्य एव व्युत्पद्यते,' प्रत्येक ग्रंथकार पूर्वजांचे भांडवल घेऊन व्यापार करीत असतो. तेव्हा निर्विकार मनाने या दोन कवींचे कालदृष्टचा पौर्वापर्य ठरविण्याकरिता या साम्यस्थलांचा विचार करण्यात अडचण येऊ नये. हे साम्य दोन प्रकारचे आहे : प्रसंगसाम्य व शब्दार्थोक्तिसाम्य. पैकी पहिल्याचा विचार करता अशी काही साम्यस्थळे अश्वघोषाचे 'सौंदरनंद' व कालिदासाचे 'कुमारसंभव' यांत आढळतात. अश्वघोषाच्या काव्यात शाक्यकुलोत्पन्न नंदाने बौद्धधर्म कसा स्वीकारला, याची कथा आहे. बुद्धाने विविध प्रकारांनी संसारत्याग करण्याविषयी नंदाला उपदेश केला, तरी भिक्षु होण्यास त्याचे मन घेईना. पुढे फारच आग्रह झाल्यावर त्याने मोठ्या नाखुषीने संमति दिली व आपले मुंडन करविले. ही बातमी सुंदरीला कळताच तिला अत्यंत दुःख झाले. तिच्या शोकाचे वर्णन या काव्याच्या सहाव्या सर्गात आले आहे. त्यांत व 'कुमारसंभवा'त शंकराने मदनाला भस्म केल्यावर रतीने केलेल्या विलापाचे जे वर्णन आले आहे, त्यात काही ठिकाणी बरेच साम्य आढळते. तसेच त्यानंतरच्या सर्गांत वर्णिलेल्या नंदविलापात व 'रघुवंशा'तल्या अजविलापात काही बाबतीत प्रसंगसाम्य आहे. तथापि त्यांपैकी एकावरून दुसरा प्रसंग सुचला असला पाहिजे, असे म्हणण्याइतके ते निर्णायक

* अश्वघोष हा सुप्रसिद्ध कुशाणवंशीय सम्राट् कनिष्क याचा समकालीन होता. पुष्कळ हिंदी व युरोपीय विद्वानांच्या मते कनिष्काने इ. स. ७८ मध्ये सुरू होणारा सध्याचा शालिवाहन शक स्थापला. यावरून अश्वघोषाचा काळ खिस्तोत्तर पहिले शतक हा धरला आहे.

नाही. अशाच तऱ्हेचे आणखीही काही समान प्रसंग या दोन कवींच्या काव्यांत दाखविता येतील. 'बुद्धचरितां'त (सर्ग ३) शीतर्तूत तरुण गौतम पित्राज्ञेने विहारार्थ नगराबाहेर जात असता त्याला पाहण्याकरिता पुरस्त्रियांची झालेली गर्दी व 'कुमारसंभवां'त (सर्ग ७) विवाहाकरिता शंकर हिमालयाच्या ओषधिप्रस्थ नामक नगरात, व 'रघुवंशां'त (सर्ग ७) इंदुमतीस्वयंवरानंतर अज कुंडिनपुरात प्रवेश करताना तदवलोकनार्थ नगरस्त्रियांची उडालेली धांदल यांतील प्रसंगसाम्याकडे संशोधकांचे लक्ष गेले व त्यावरून दोन्ही पक्षांनी भिन्नभिन्न अनुमाने काढली आहेत. पण याबाबतीतही, असले प्रसंग नेहमी घडतात, त्यामुळे प्रतिभासंपन्न कवीचे त्याकडे साहजिक लक्ष जाणे शक्य असते, असे म्हणता येईल. इ. स. च्या १० व्या शतकात होऊन गेलेल्या पद्मगुप्त कवीनेही आपल्या 'नवसाहसांकचरित' काव्यात या तऱ्हेचाच प्रसंग वर्णिला आहे, त्यावरूनही ही गोष्ट स्पष्ट होईल. दुसरे असे की, या दोन्ही कवींच्या वर्णनात फारच थोडे कल्पनासाम्य आहे. दोन्ही वर्णने काळजीपूर्वक वाचून खालील एका ठिकाणी मात्र आम्हांस किंचित् कल्पनासाम्य आढळले—

अश्वघोष — वातायनेभ्यस्तु विनिःसृतानि परस्परोपासितकुण्डलानि।
स्त्रीणां विरेजुर्मुखपंकजानि सक्तानि हर्म्येष्विव पंकजानि॥

बुद्ध० ३, १९.

कालिदास — तासां मुखैरासवगन्धगर्भैर्व्याप्तान्तराः सान्द्रकुतूहलानाम्।
विलोलनेत्रभ्रमरैर्गवाक्षाः सहस्रपत्राभरणा इवासन्॥

कुमार० ७, ६२; रघु० ७, ११.

या दोन वर्णनात खिडक्यांतून पाहणाऱ्या स्त्रियांच्या मुखांना कमलसमूहाची उपमा दिली आहे. अश्वघोष ही उपमा देऊन थांबला आहे, तर कालिदासाच्या पद्यांत त्याच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे या कल्पनेचा पूर्ण विकास केला आहे. यावरून अनुमानच काढावयाचे तर कालिदासाची कल्पना नंतरची असावी हेच म्हणता येईल.

आता शब्दार्थसाम्याचा विचार करू. प्रो. चट्टोपाध्याय यांनी 'कालिदासाचा काल' (The Date of Kālidāsa) या आपल्या निबंधात कालिदास व अश्वघोष यांच्या काव्यांतील शब्दार्थसाम्य कसोशीने

तपासले असून त्याची बरीच उदाहरणे दिली आहेत. पण त्यांपैकी चारपाचच विशेष साम्य दाखवितात. काही तर अशी आहेत की, ती इतरत्रही, उदाहरणार्थ 'वाल्मीकिरामायणा'तही आढळतात. तेव्हा त्यावरून कोणतेही अनुमान काढणे योग्य होणार नाही. उदाहरणार्थ, खालील पद्यांतील साम्य पहा—

अश्वघोष — वाता ववुः स्पर्शसुखा मनोज्ञा दिव्यानि वासांस्यवपातयन्तः।
सूर्यः स एवाभ्यधिकं चकाशे जज्वाल सौम्यार्चिरनीरितोऽग्निः॥
बुद्ध० १, ४२.

कालिदास — दिशः प्रसेदुर्मरुतो ववुः सुखाः प्रदक्षिणार्चिर्हविरग्निराददे।
बभूव सर्वं शुभशंसि तत्क्षणं भवो हि लोकाभ्युदयाय तादृशाम्॥
रघु० ३, १४.

या दोन उताऱ्यांत बरेच कल्पनासाम्य आहे, यात शंका नाही. तथापि अशी वर्णने करण्याचा सर्वसाधारण कविसंप्रदाय असल्याने यांपैकी एक वर्णन वाचल्याशिवाय दुसरे सुचलेच नसते, असे म्हणता येत नाही. शिवाय, दोघांही कवींनी आपल्या कल्पना 'वाल्मीकिरामायणा'तून घेतल्या असणे शक्य आहे. विश्वामित्राबरोबर रामलक्ष्मण यज्ञरक्षणार्थ अयोध्येतून निघाल्या वेळेचे वाल्मीकीने केलेले वर्णन पहा—

ततो वायुः सुखस्पर्शो नीरजस्को ववौ तदा।
विश्वामित्रगतं रामं दृष्ट्वा राजीवलोचनम्॥
पुष्पवृष्टिर्महत्यासीद्देवदुंदुभिनिःस्वनैः।
शंखदुंदुभिनिर्घोषः प्रयाते तु महात्मनि॥
बालकाण्ड, २, ४–५.

सरस्वतीच्या साम्राज्यात विशिष्ट कल्पनांचा मक्ता कोणाही कवीला दिला नाही. म्हणून कल्पनासाम्याबरोबरच उक्तिसाम्य असेल तरच उसनवारीचा आरोप लागू पडेल. अशी फारच थोडी स्थळे या दोन कवींच्या काव्यांत दाखविता येतात. त्यांतील काहींचा विचार करू.

१. अश्वघोष—तं गौरवं बुद्धगतं चकर्ष भार्यानुरागः पुनराचकर्ष।
सोऽनिश्चयान्नापि ययौ न तस्थौ तरंस्तरङ्गेष्विव राजहंसः॥
सौन्दर० ४, ४२.

कालिदास—तं वीक्ष्य वेपथुमती सरसाङ्गयष्टि-
निक्षेपणाय पदमुद्धृतमुद्वहन्ती ।
मार्गाचलव्यतिकराकुलितेव सिन्धुः
शैलाधिराजतनया न ययौ न तस्थौ ॥

कुमार० ५, ८५.

२. अश्वघोष—आदित्यपूर्वं विपुलं कुलं ते नवं वयो दीप्तमिदं वपुश्च ।
कस्मादियं ते मतिरक्रमेण भैक्षाक एवाभिरता न राज्ये ॥

बुद्ध० १०, ४.

कालिदास—एकातपत्रं जगतः प्रभुत्वं नवं वयः कान्तमिदं वपुश्च ।
अल्पस्य हेतोर्बहु हातुमिच्छन् विचारमूढः प्रतिभासि मे त्वम् ॥

रघु० २, ४७.

३. अश्वघोष—द्वंद्वानि सर्वस्य यतः प्रसक्तान्यलाभलाभप्रभृतीनि लोके ।
अतोऽपि नैकान्तसुखोऽस्ति कश्चिन्नैकान्तदुःखः पुरुषः पृथिव्याम् ॥

बुद्ध० ११, ४३.

कालिदास—कस्यैकान्तं सुखमुपनतं दुःखमेकान्ततो वा
नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण ॥

मेघदूत, ११४.

या उताऱ्यांतील साम्य आश्चर्यकारक आहे व त्यावरून एका कवीची काव्यें दुसऱ्याने वाचली असावीत, असे निःसंशयपणे म्हणता येईल. पण केवळ या उताऱ्यांवरून कोणी कोणाची नक्कल केली, हे सांगणे कठीण आहे. अश्वघोषापेक्षा कालिदासाच्या वरील पद्यांत अधिक लालित्य आहे हे कोणीही कबूल करील. पण अश्वघोष हा महान् तत्त्वज्ञानी होता ; सर्वसाधारण जनांचे मन आकर्षण करण्याकरिता आपण ही काव्ये लिहावयास घेतली असे त्याने स्वतःच म्हटले आहे. त्याची प्रतिभाही असामान्य होती यात संशय नाही. तथापि काव्य-निर्मिति हा त्याचा प्रधान उद्देश नसल्याने आपल्या काव्याचे संस्करण करण्याकडे त्याचे तितके लक्ष नव्हते. याच्या उलट कालिदासाचे. त्यामुळे "त्याने अश्वघोषाच्या कल्पना व काही प्रमाणात शब्दयोजनाही उचलून त्यांच्यावर जास्त संस्कार करून त्या आपल्या काव्यात योजिलेल्या दिसतात" असे काही म्हणतील ; तर दुसरे "सर्वच ठिकाणी

कालिदासापेक्षा अश्वघोषाच्या काव्यात कृत्रिमता जास्त दिसते व संस्कृत काव्येतिहासात 'जितकी जास्त कृत्रिमता तितका कवि नंतरचा' हा सामान्य नियम असल्याने अश्वघोष कालिदासानंतरचा", असे प्रतिपादितील. तेव्हा या वादाचा निर्णय करण्याकरिता दुसरे काही गमक पाहिले पाहिजे. उदाहरणार्थ, एकाचे काही विशिष्ट शब्दप्रयोग होते ते दुसऱ्याने उचलले असे दाखविता आले तर या बाबतीत निर्णय करण्यास मदत होईल. या दृष्टीने या कवीची काव्ये वाचताना आम्हांस एक प्रमाण दिसले, ते वाचकांपुढे मांडतो.

अश्वघोषाची काव्ये वाचताना त्याने 'प्रागेव' या शब्दद्वयाचा उपयोग संस्कृत 'किमुत' या अर्थी म्हणजे 'मग. . . विषयी काय विचारावे!' असा अर्थ व्यक्त करण्यास अनेकदा केलेला आढळतो. उदाहरणार्थ, खालील श्लोक पहा—

एवमाद्या महात्मानो विषयान् गर्हितानपि।
रतिहेतोर्बुभुजिरे प्रागेव गुणसंहितान् ॥

बुद्ध० ४, ८१.

नीतिशास्त्रज्ञ उदायी नामक गौतमाचा मित्र त्याचे विरक्त मन विषयोपभोगाकडे वळविण्याकरिता प्राचीन कथांतून अनेक उदाहरणे देऊन म्हणतो 'अशा प्रकारे मोठमोठ्या लोकांनी भोगलालसेने निंद्य विषयांचाही उपभोग घेतला आहे, मग चांगल्या विषयांविषयी तर बोलावयास नको.' 'प्रागेव' याचा याअर्थी उपयोग संस्कृत बौद्ध वाङमयात इतरत्रही* अनेक ठिकाणी आढळतो; पण हिंदु वाङमयात कोठेही आढळत नाही व म्हणून प्रो. आपट्यांच्या संस्कृत कोशात व इतर अमरकोशादि प्राचीन संस्कृत कोशांतही त्याचा हा अर्थ दिलेला नाही. पण आश्चर्याची गोष्ट ही की, कालिदासाच्या 'ऋतुसंहार' या काव्यात एका श्लोकात (६,२३) त्याचा असा प्रयोग केला आहे—

कुन्दैः सविभ्रमवधूहसितावदातै-
रुद्द्योतितान्युपवनानि मनोहराणि।
चित्तं मुनेरपि हरन्ति निवृत्तरागं
प्रागेव रागमलिनानि मनांसि यूनाम् ॥

* याप्रमाणेच बुद्ध० ४, १०; आर्यशूरकृत जातकमाला, पृ. ५१ इत्यादि स्थळे पाहा.

'विलासी युवतींच्या हास्याप्रमाणे शुभ्र अशी जी कुन्दपुष्पे त्यांनी उज्ज्वल झालेली उपवने मुनींचेही विरक्त चित्त आकर्षितात, मग अनुरागयुक्त अशी तरुणांची मने ती आकर्षितील यात नवल काय ? '

यांतील 'प्रागेव' याचा हा प्रयोग संस्कृत टीकाकारांस इतका अपरिचित आहे की, त्यांपैकी एकाने 'मुनिचित्तापहरणात्प्रागेव' असे त्याचे व्याख्यान केले आहे. पण ते असावे तितके समर्पक नाही. यावरून कालिदासाने संस्कृत-बौद्ध ग्रंथ, विशेषत: आपल्यापूर्वीच्या कवींची काव्ये वाचली होती हे सिद्ध होत नाही काय ? कालिदास ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात होऊन गेला असे मानले तर, त्यापूर्वी संस्कृत भाषेत बौद्ध वाङमय होते असे मानावे लागेल. पण ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकात महायान पंथाचा उत्कर्ष झाल्यावरच बौद्ध लोक संस्कृत भाषेत ग्रंथरचना करू लागले. तत्पूर्वी त्यांचे ग्रंथ पालि भाषेत होते, हे विद्वानांस माहीत आहे. तेव्हा कालिदासास अश्वघोषापूर्वी म्हणजे ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात घालता येत नाही. याच्या उलट तो गुप्तकालात किंवा तदनंतर झाला असल्यास प्रथम प्रथम त्याने आपल्यापूर्वीची बौद्ध कवींची काव्ये वाचली असतील व त्यांतील काही विशिष्ट शब्दप्रयोग न कळत त्याच्या प्रथम प्रथमच्या काव्यांत आले असतील. पुढे हे प्रयोग हिंदु ग्रंथांत येत नाहीत असें ध्यानात आल्यावर ते त्याने टाळले असतील, असे अनुमान करता येते. *

(५) **भीटा येथील पदक.**—इ. स. १९०९-१० मध्ये प्रयागाजवळ असलेल्या भीटा या गावी केलेल्या उत्खननात एक मोठ्या आकाराचे भाजक्या माती (terra-cotta) चे पदक सापडले. त्यावर मध्यभागी चार घोड्यांच्या रथात दोन व्यक्ति बसलेल्या दिसतात. पुढे जरत्कारू-सारखा एक अस्थिपंजर मात्र राहिलेला मनुष्य, मागच्या बाजूस एक झोपडी व जवळच एका वृक्षाजवळ एक ललनाकृतीही दिसत आहे. खालच्या बाजूस मत्स्यकमलादिकांनी युक्त असा तलाव व मध्यभागी एक व्यक्ति व त्याच्या बाजूस दोन हरिणे व एक पिसारा उभारून नाचत असलेला मोर ही दृग्गोचर होतात.† यावरून ह्या पदकात 'शाकुंतला 'च्या

* 'रघुवंशा'त (१६, ६९) 'प्रागेव'चा प्रयोग केला आहे. पण तेथे त्याचा अर्थ निराळा आहे. प्रागेव मुक्ता नयनाभिरामा प्राप्येन्द्रनीलं किमुतोन्मयूखम्। हा श्लोक पाहा.

† *Cambridge History of India*, Vol. I (Ancient India) मध्ये दिलेला या पदकाचा फोटो पहा.

प्रथमांकातील दृश्य दाखविले आहे, असे प्रो. शारदारंजन राय यांनी अनुमान केले आहे. रथातील दोन व्यक्ति या दुष्यन्त व त्याचा सारथी, पुढील जरत्कारूसारखा मनुष्य म्हणजे कण्वाश्रमातील तापसी, झाडाजवळची स्त्री म्हणजे शकुंतला, असे त्यांचे म्हणणे आहे. हे पदक शुंगकालातील आहे, असे काही विद्वानांचे मत आहे. त्यावरून कालिदास खिस्ती शकापूर्वी होऊन गेला, असे प्रो. राय यांचे अनुमान आहे. *

या अनुमानातही काही तथ्य नाही. आधी हे पदक शुंगकालातीलच, असे विधान करण्यास भक्कम पुरावा नाही. दुसरी गोष्ट ही की, पदकावरील दृश्य 'शाकुंतला' तील आहे, असे मानण्यात काही अडचणी आहेत. रथाच्या पुढे हरिण पळत आहे, असे दाखविले नाही. पुढे जागा नव्हती म्हणून तो खाली दाखविला असे म्हणावे तर तेथे एक नसून दोन हरिण दिसतात व तेथेही ते भीतीने पळत नसून विहार करीत आहेत, असे वाटते. कारण जवळच मोर आपला पंखाकृति पिसारा उभारून नाचताना दिसतो. यावरून तरुण गौतम रथात बसून विहार करण्याकरिता जात असता त्याला मार्गात एक वृद्ध मनुष्य भेटतो व त्यावरून त्याला वार्धक्याची प्रथम कल्पना येते, असे जे अनेक प्राचीन बौद्ध ग्रंथांत वर्णिलेले आढळते, तेच येथे शिल्पकाराने दाखविले असावे, ही कल्पना जास्त सयुक्तिक भासते. 'बुद्धचरिता'तील असे अनेक प्रसंग प्रस्तरादिकांवर चित्रित करण्याचा पूर्वी प्रघात होता, हे सांची येथील तोरणांवरून सिद्ध झाले आहे. उलट 'शाकुंतला'दि नाटकांतील दृश्ये अशा प्रकारे पदकांवर उमटविण्याचा प्रघात नव्हता व त्यात काही हेतुहि दिसत नाही. †

**(६) बृहत्कथेच्या संस्कृत रूपान्तरांतील विक्रमादित्यविषयक उल्लेख.**— 'कथासरित्सागरा'च्या शेवटच्या लंबकात महेन्द्रपुत्र विक्रमादित्याची कथा दिली आहे. तीत तो शंकराचा माल्यवान् नामक गण असून त्याच्या आज्ञेने म्लेच्छांच्या विनाशाकरिता, बौद्ध धर्माच्या पाडावाकरिता व वैदिक धर्माच्या पुनरुज्जीवनाकरिता पृथ्वीवर अवतरला होता, असे म्हटले आहे. 'कथासरित्सागर' ही 'बृहत्कथे'ची संस्कृत

---

* Ray : Kālidāsa's *Śākuntala* (1920), Introduction, p. 9.

† K. Chattopadhyaya : *The Date of Kālidāsa*, pp. 157-8.

आवृत्ति आहे. 'बृहत्कथा' पैशाची भाषेत ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकात रचली होती. तेव्हा हा विक्रमादित्य संवताचा संस्थापक असला पाहिजे. हा विक्रमादित्य माळव्यात उज्जयिनी येथे राज्य करीत होता, म्हणून त्याच्या संवताला 'मालवसंवत्' असे नाव पडले. कोरीव लेखांत 'मालवानां गणस्थित्या', 'मालवगणास्थितिवशात्', 'श्रीमालवगणाम्नाते' असे शब्दप्रयोग या संवताचा निर्देश करताना आढळतात. त्यांतील 'गण' शब्दाचा अर्थ 'गणना' असा आहे. 'गणस्तु गणनायां स्यद्गणेशे प्रमथे चये' असे त्या शब्दाचे अर्थ 'शब्दार्णव' नामक कोशात दिले आहेत. तेव्हा वरील शब्दप्रयोगाचा अर्थ 'मालवदेशामध्ये प्रचलित असलेल्या गणनेच्या पद्धतीप्रमाणे' असा होतो. 'गाथासप्तशती'त विक्रमादित्याच्या दातृत्वाविषयी एक गाथा* आली आहे. हा ग्रंथ हाल नामक राजाने ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकात रचलेला आहे ; तेव्हा हा विक्रमादित्य संवत्स्थापक विक्रमादित्यच असला पाहिजे, असे अनुमान प्रा. कृ. मो. शेंबवणेकर यांनी केले आहे.†

प्रा. शेंबवणेकरांची प्रमाणे अत्यंत निर्बल आहेत. 'कथासरित्सागर' हा इ. स. च्या अकराव्या शतकात काश्मीरमध्ये रचलेला संस्कृत ग्रंथ. त्याचे मूळ पैशाची भाषेतील गुणाढ्याची 'बृहत्कथा' ही होती. ती आता उपलब्ध नाही. 'कथासरित्सागरा'शिवाय तिची आणखी दोन रूपांतरे—'बृहत्कथामंजरी' व 'बृहत्कथाश्लोकसंग्रह'—विद्यमान आहेत. यांशिवाय गुणाढ्याची कथा 'नेपालमाहात्म्यां'तही येते. या चार ग्रंथांतील कथांत अनेक भेद आहेत. मूळ 'बृहत्कथे'त विक्रमादित्याची कथा होती, किंवा तिच्या आणि तिच्या संस्कृत रूपांतरांच्या मध्ये जो हजार वर्षांचा दीर्घ कालावधि लोटला त्यामध्ये ती कल्पित कथा घुसडण्यात आली, हे निश्चित करणे जरूर आहे. कथेच्या स्वरूपावरून अनुमान

---

* संवाहणसुहरसतोसिएण देन्तेण तुह करे लक्खम्। चलणेण विक्कमाइत्तचरिअं अणुसिक्खिअं तिस्सा॥ गाथा क्र. ४६४. भावार्थ–एक स्त्री आपल्या प्रियकरास म्हणते "तूं तिचे पाय चुरीत होतास, त्या वेळी त्या आनंदात तुझ्या हातावर लाक्षारसाने काढलेल्या आकृति उमटविण्यात तिच्या पायाने विक्रमादित्याच्या चरणाचे अनुकरण केले आहे; कारण विक्रमादित्य राजा आपल्या सेवकांच्या कामगिरीने संतुष्ट होऊन त्यांच्या हातावर लक्ष (नाणी) ठेवीत असतो." [यात 'लक्ख' पदावर श्लेष असल्याने त्याचे 'लाक्षा' व 'लक्ष' (नाणी) असे दोन अर्थ होतात.]

† *The Glamour about the Guptas*, p. 25.

केले तर ती ऐतिहासिक असेल असे दिसत नाही. त्या कथेतील विक्रमादित्याने अपरान्त(कोकण)सहित सर्व दक्षिण देश, मध्यदेश, सौराष्ट्र, वंग, अंग, काश्मीरादि उत्तरेचे देश व अनेक द्वीप जिंकले होते, असे 'कथासरित्सागरा'त वर्णन आहे. हे वर्णन खिस्तपूर्व पहिल्या शतकातील कोरीव लेखादि ऐतिहासिक साधनांवरून जो भारताचा इतिहास आता ज्ञात झाला आहे, त्याशी विसंगत आहे. शिवाय या कथेत कालविपर्यास हा महान् दोष आहे. या कथेतील विक्रमादित्य खिस्तपूर्व पहिल्या शतकातील मानल्यास त्याची कथा खिस्तपूर्व पाचव्या शतकात होऊन गेलेल्या नरवाहनदत्ताला काश्यप किंवा कण्वमुनीने एका अरण्यात सांगितली, असे जे 'कथासरित्सागर' (१८, १, ३–८) व 'बृहत्कथामञ्जरी' (१०, १, २–१२) या 'बृहत्कथे'च्या दोन्ही रूपांतरांत वर्णिले आहे, त्याची संगति कशी लावावयाची? नरवाहनदत्त हा वत्सराज उदयनाला वासवदत्तेच्या पोटी झालेला मुलगा. उदयन हा गौतम बुद्धाचा समकालीन होता. तेव्हा तो खिस्तपूर्व सहाव्या शतकाच्या अखेरीस व त्याचा मुलगा नरवाहनदत्त खिस्तपूर्व पाचव्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेला, यात संशय नाही. तेव्हा नरवाहनदत्ताला ज्याची कथा सांगितली तो विषमशील विक्रमादित्य विक्रमसंवताचा संस्थापक होऊच शकत नाही.

सध्याच्या माळव्याला खिस्तपूर्व पहिल्या शतकात 'मालव' असे नाव नव्हते. खिस्तोत्तर चौथ्या-पाचव्या शतकात मालवगणाची तेथे वस्ती झाली, तेव्हा ते नाव त्याला मिळाले. तेव्हा मालव देशात हा संवत् स्थापला म्हणून त्याला 'मालवसंवत्' म्हणू लागले व मागे उल्लेखिलेल्या शब्दप्रयोगाचा अर्थ 'मालव देशातील गणनेप्रमाणे' असा आहे. हे म्हणणे लटके पडते. शिवाय या मालवसंवताचे आरंभीचे लेख माळव्यात सापडले नसून राजस्थानमध्ये पूर्वीच्या उदेपूर, कोटा, जयपूर आणि भरतपूर संस्थानांत सापडले आहेत. कोरीव लेखांतील 'श्रीमालवगणाम्नाते' इत्यादि उल्लेखांत 'गण' याचा अर्थ गणना करणे शक्य नाही. नाही तर मालवगणाच्या व यौधेयगणाच्या नाण्यांवरील 'मालवगणस्य जयः', 'यौधेयगणस्य जयः' या लेखांचा अर्थ 'मालवांच्या आणि यौधेयांच्या गणनेचा जयजयकार' असा होईल व तो हास्यास्पद ठरेल, हे उघड आहे.

'गाथासप्तशती' सध्या मूळ स्वरूपात राहिली नाही, हे तीत इ. स. च्या चौथ्या-पाचव्या शतकांतील वाकाटक नृपति सर्वसेन व प्रवरसेन, व आठव्या शतकातील वाक्पतिराज इत्यादि कवींच्या गाथा समाविष्ट केल्या आहेत, त्यांवरून दिसून येईल. 'सप्तशती'तील काही गाथा हालाच्याही पूर्वीच्या असतील तर काही हालानंतर शेकडो वर्षांनी रचलेल्या दिसतात. तेव्हा 'सप्तशती'तील गाथांचा पुरावा इतर ग्रंथांच्या किंवा प्रसंगांच्या कालनिर्णयार्थ ग्राह्य धरण्यापूर्वी त्या गाथा विशिष्ट कालात रचल्या गेल्या, हे ठरविणे जरूर आहे. पण तसे करणे सध्या दुरापास्त असल्याने अशा पुराव्यावर भिस्त न ठेवणे बरे. शिवाय 'गाथासप्तशती'तील विक्रमादित्याच्या दातृत्वाचे वर्णन गुप्त नृपति द्वितीय चंद्रगुप्त-विक्रमादित्याला लागू पडते. त्याने केवळ लक्षावधिच नव्हे तर कोट्यावधि नाणी दान दिल्याच्या कथा लोकात प्रचलित होत्या, हे राष्ट्रकूट नृपति प्रथम अमोघवर्ष याच्या संजान येथे सापडलेल्या ताम्रपटातील खालील उल्लेखावरून दिसून येईल—

**लक्षं कोटिमलेखयत्किल कलौ दाता स गुप्तान्वयः** [अर्थ:—तो कलियुगातील गुप्तवंशी दाता (द्वितीय चंद्रगुप्त) लाख, कोटी अशी नाणी दान दिल्याबद्दल (आपल्या कोषाध्यक्षाला) लिहावयास लावीत असे.]

तेव्हा 'गाथासप्तशती'तील प्रस्तुत गाथेवरूनही विक्रमादित्य नृपति ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात होऊन गेला, हे सिद्ध होत नाही.*

कालिदास ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात होऊन गेला, हे मत अनेक भारतीय विद्वानांनी प्रतिपादिले आहे, व त्याला दंतकथांचा आधार असल्यावरून सर्वसाधारण वाचकांचा तेच सत्य मानण्याकडे स्वाभाविक कल असतो ; म्हणून या मताचे इतके सविस्तर परीक्षण केले. या मताच्या सिद्धयर्थ कालिदासकालीन कायदा, त्याच्या ग्रंथांतील अकृत्रिम रम्यता इत्यादि प्रमाणे काही संशोधकांनी पुढे मांडली आहेत, पण ती सर्वांना पटण्यासारखी नाहीत. विस्तारभयास्तव या पक्षाचे परीक्षण येथेच संपवून तिसऱ्या मताकडे वळू.

---

*याची सविस्तर चर्चा आमच्या 'गाथासप्तशतीचा काल' या लेखात केली आहे. 'संशोधनमुक्तावलि', सर पहिला, पृ. १०४–१२३ पाहा.

**३. खिस्तोत्तर तिसरे शतक**

विजापूरचे ज्योतिषशास्त्रज्ञ श्री. द. वें. केतकर यांनी 'रघुवंशा'तील खालील ज्योतिषविषयक उल्लेखावरून कालिदास इ. स. २८० च्या सुमारास होऊन गेला, असे प्रतिपादिले आहे.* 'रघुवंश' १६–४३ या श्लोकात 'घर्म आजगाम' (उन्हाळा येऊन ठेपला) या वर्णनात जानेवारी ते एप्रिल हे महिने संपून मे महिना आल्याने दोन-तृतीयांश भाग संपलेल्या उदगयनाचा निर्देश केल्यानंतर त्याने पुढील श्लोकात दक्षिणायनस्थल सांगितले आहे—

अगस्त्यचिह्नादयनात्समीपं दिगुत्तरा भास्वति संनिवृत्ते।
आनन्दशीतामिव बाष्पवृष्टिं हिमस्रुतिं हैमवतीं ससर्ज॥

[सूर्य अगस्त्यचिन्ह (म्हणजे दक्षिण) अयनस्थानाजवळ (दक्षिण दिशेकडून) परत आलेला पाहून उत्तर दिशा आनंदित होऊन आपल्या शीतल अश्रूंप्रमाणे हिमालयातील हिमप्रवाह सोडती झाली.]

दक्षिणायन लागण्याच्या वेळी उन्हाळा अत्यंत कडक होऊन त्यायोगे हिमालयातील बर्फ वितळते व त्याचे प्रवाह वाहू लागतात, त्यांना उत्तर दिशेने आपली सवत जी दक्षिण दिशा तिला सोडून आपणाजवळ आलेल्या आपल्या सूर्यरूपी प्रियकराला पाहून गाळलेल्या शीत आनंदाश्रूंची रम्य उपमा या श्लोकात दिली आहे. या वर्णनात दक्षिणायनाचे स्थान अगस्त्य तारा हे सांगितले आहे. अगस्त्याचे अश्विनीनक्षत्रारंभापासून अंश ९० आहेत, असा निर्देश 'सूर्यसिद्धान्त' व वराहमिहिरकृत 'पञ्चसिद्धान्तिका' यांत आहे. वरील वर्णनावरून कालिदासकाळी क्रान्तिवृत्तातील अश्विन्यारंभापासून ९० अंशांवर म्हणजे पुनर्वसु नक्षत्रातील पोलक्स् या ताऱ्याजवळ दक्षिणायन किंवा कर्कटक संक्रान्ति होत असे, असे स्पष्ट दिसते. वराहमिहिराच्या काळी (इ. स. ५२० या वर्षी) दक्षिणायन पुनर्वसु नक्षत्राच्या मध्यावर (म्हणजे ८६ अंश, ४० कलांवर) होत असे. एक नक्षत्रात्मक (१३ अंश, २० कला) चलनाला ९६०. वर्षे लागतात. म्हणून दक्षिणायनस्थान ९० अंशावर असण्याचा काल इ. स. २८० हे वर्ष असले पाहिजे. तेव्हा कालिदास

* D. V. Ketkar, "*Date of Kālidāsa*", *A. B. O. R. I.*, Vol. XXXVI, pp. 150 f.

तिसऱ्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेला असावा, असे श्री. केतकर यांचे अनुमान आहे.

वरील अनुमानही कालिदासकालाचे निर्णायक मानता येत नाही. अगस्त्य हा दक्षिणेत राहणारा मुनि. म्हणून कालिदासाने 'रघुवंश' ४, ४४ श्लोकामध्ये दक्षिण दिशेचा 'अगस्त्याचरिता आशा' असा उल्लेख केला आहे. प्रस्तुत श्लोकातही 'अगस्त्यचिह्नात् अयनात्' या शब्दांनी 'दक्षिणायन' एवढाच अर्थ विवक्षित असावा व तसा तो संस्कृत टीकाकारांनी दिलाही आहे. 'अगस्त्याच्या अंशांवर (म्हणजे अश्विन्यारंभापासून ९० अंशांवर) झालेले दक्षिणायन' इतका तांत्रिक अर्थ कालिदासास विवक्षित होता काय, याबद्दल शंका वाटते. दुसरे असे की, कालिदासास सूक्ष्म रीतीने स्वकालीन दक्षिणायनस्थान सांगावयाचे असते तर त्याने अगस्त्यासारख्या क्रान्तिवृत्ताबाहेरच्या ताऱ्याचा निर्देश न करता त्या वृत्तातील पुनर्वसु नक्षत्राचाच उल्लेख केला असता. शिवाय अयन-चलन सूक्ष्म गतीने होत असल्यामुळे शंभर-दीडशे वर्षांत त्यात फारसा फरक होत नाही. त्यामुळे काटेकोरपणे पाहता इ. स. २८० मध्ये असलेली परिस्थिति इ. स. ४०० च्या सुमारास झालेल्या कालिदासाने वर्णन केली असली तर त्यात आश्चर्य नाही. तेव्हा हे अनुमान कालिदास गुप्तकालात होऊन गेला या मताला बाधक होणार नाही. कालिदासाला ज्योतिषाचे चांगले ज्ञान होते, तरी तो कवि होता, ज्योतिषी नव्हता. तेव्हा त्याच्या ग्रंथांत ज्योतिषग्रंथांत आवश्यक असणारा काटेकोरपणा अपेक्षिणे योग्य होणार नाही.

### ४. ख्रिस्तोत्तर पाचवे शतक

रघुवंशाच्या चौथ्या सर्गात रघूच्या दिग्विजयाचे वर्णन करताना कालिदासाने खालील श्लोक घातले आहेत:—

ततः प्रतस्थे कौबेरीं भास्वानिव रघुर्दिशम्।
शरैरुस्रैरिवोदीच्यानुद्धरिष्यन् रसानिव ॥
विनीताध्वश्रमास्तस्य वंक्षुतीरविचेष्टनैः।
दुधुवुर्वाजिनः स्कंधाल्लँग्नकुंकुमकेसरान् ॥
तत्र हूणावरोधानां भर्तृषु व्यक्तविक्रमम्।
कपोलपाटनादेशि बभूव रघुचेष्टितम् ॥ रघुवंश, ४, ६६–६८.

या श्लोकांत रघूने उत्तरेत वंक्षु नदीच्या तीरावर हूणांचा पराभव केला, असे वर्णन आले आहे. 'अमरकोशा'च्या क्षीरस्वामी या टीकाकारानेही केशराला बाल्हीक कां म्हणतात याचे स्पष्टीकरण करताना या श्लोकांचा उल्लेख केला आहे, त्यावरून ही वंक्षु नदी बाल्हीक (पूर्वीचा बॅक्ट्रिया किंवा सध्याचा बल्ख) या देशातून वाहणारी ऑक्सस नदीच होय, हे स्पष्ट आहे. हूणांनी ऑक्सस नदीवर इ. स. ४५० च्या सुमारास आपले राज्य स्थापले व पुढे लौकरच हिंदुस्थानावर स्वारी केली. ही स्वारी कुमारगुप्ताच्या कारकीर्दीच्या शेवटी झाली असावी. तिचा युवराज स्कंदगुप्ताने मोठ्या शौर्याने प्रतिकार केला, असे इ. स. ४५५-४५६ च्या काठेवाडातील गिरनार पर्वताजवळच्या शिलालेखावरून सिद्ध झाले आहे. 'रघुवंशा'त हूण ऑक्सस नदीवर होते, असे कालिदासाने वर्णिले आहे. ही परिस्थिति त्याच्या वेळची असावी व त्यावरून तो ग्रंथ इ. स. ४५० (ऑक्सस नदीच्या काठी हूणराज्य स्थापित होण्याचा काळ) व ४५५-४५६ (गिरनार शिलालेखाचा काल) यांच्या दरम्यान लिहिला असला पाहिजे. म्हणून कालिदास पाचव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास होऊन गेला असावा, असे प्रो. पाठक यांनी प्रतिपादिले आहे.*

हे अनुमानही निर्णायक आहे असे वाटत नाही. इ. स. च्या पाचव्या शतकापर्यंत हिंदी लोकांस हूण लोकांची माहिती नव्हती, असे जे प्रो. पाठकांनी गृहीत धरले आहे, ते खरे नाही. पारश्यांच्या 'अवेस्ता' ग्रंथात व आपल्या 'महाभारतां'तही हूणांचा उल्लेख आहे. इ. स. च्या तिसऱ्या शतकात लिहिलेल्या 'ललितविस्तर' ग्रंथात बुद्धाने आपल्या बाळपणी शिकलेल्या लिपींची नावे आली आहेत त्यांत हूणलिपीचा अंतर्भाव केलेला आहे. खिस्तपूर्व १४० च्या सुमारास हूणांनी 'यूएची' (ज्यांना पुढे कुशाण ही संज्ञा प्राप्त झाली त्या) लोकांना ऑक्सस नदीच्या दक्षिणेस पिटाळून लावले. तेव्हापासून ऑक्ससच्या उत्तरेस त्यांचा अंमल असावा किंवा निदान वरचेवर त्या बाजूस त्यांची टोळधाड येत असावी. तेव्हा खिस्तोत्तर पाचव्या शतकात त्यांनी ऑक्सस नदीच्या काठी राज्य स्थापीपर्यंत ते त्या नदीच्या उत्तरेस आहेत, हे कालिदासासारख्या चौकस माणसास माहीत नसणे अशक्य आहे. म्हणून

* K. B. Pathak: *Meghadūta* (1916), Introduction, p. X.

त्याचा काळ इ. स. च्या पाचव्या शतकाच्या मध्यापर्यंत ओढण्याची जरूरी नाही.

५. ख्रिस्तोत्तर सहावे शतक

इ. स. च्या सहाव्या शतकात हिंदुस्थानात संस्कृत विद्येचे पुनरुज्जीवन झाले, त्यावेळी कालिदास झाला असावा, असे मत प्रो. मॅक्समूलरने प्रथम पुढे मांडले. अनेक कारणांमुळे त्याचे हे मत आता कोणी मानीत नाही. पण अलीकडे काही विद्वानांनी दुसऱ्या काही प्रमाणांवरून ते मत सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. कै. महामहोपाध्याय हरप्रसाद शास्त्री यांनी 'बिहार व ओरिसा रीसर्च सोसायटी जर्नल' च्या पुं. १ व २ मध्ये, व धारचे श्री. का. कृ. लेले व श्री. शि. का. ओक यांनी 'विविधज्ञानविस्तार' पु. ५३ मध्ये या मताच्या सिद्धयर्थ अनेक प्रमाणे पुढे मांडली आहेत. विस्तारभयास्तव त्यांच्या प्रत्येक प्रमाणाचा येथे विचार करणे शक्य नाही. तथापि काही मुख्य प्रमाणे थोडक्यात पुढे मांडून त्यांचे परीक्षण करू:—

(१) **यशोधर्मन्-विक्रमादित्य व मातृगुप्त-कालिदास.**—प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्यूएनत्संग हा इ. स. ६२९ ते ६४५ पर्यंत हिंदुस्थानात प्रवास करीत होता. त्याने माळव्यात (Molapo मध्ये) शीलादित्य या नावाच्या राजाने सुमारे इ. स. ५३० ते ५८० पर्यंत पन्नास वर्षे राज्य केले, असे म्हटले आहे. कल्हणकृत 'राजतरंगिणी' वरून असे दिसते की, उज्जैनीच्या विक्रमादित्याने काश्मीरच्या सिंहासनावर आपला विद्वान् मित्र व कवि मातृगुप्त यास बसविले होते. विक्रमादित्याच्या मृत्यूनंतर मातृगुप्ताने गादी सोडली व नंतर राज्याचा खरा वारस प्रवरसेन हा राजा झाला. त्याने स्थापिलेले प्रवरपूर ह्यूएनत्संगाच्या वर्णनावरून सहाव्या शतकात वसलेले दिसते. तेव्हा विक्रमादित्याचाही काळ सहावे शतक हाच धरला पाहिजे. यास्तव ह्यूएनत्संगाने वर्णिलेला माळव्याचा राजा शीलादित्य व हा विक्रमादित्य हे एकच असावेत. 'राजतरंगिणी'त या विक्रमादित्याने शकांचा उच्छेद केला, असे म्हटले आहे. याच शतकात माळव्यात यशोधर्मदेव नावाचा एक प्रबळ राजा होऊन गेला. त्याचे दोन कोरीव लेख* मंदसोर येथे सापडले आहेत

* यापैकी एक इ. स. ५३२ चा आहे.

त्यांवरून त्याने मिहिरकुल या बलाढ्य हूण राजाचा पराभव केला होता, आपले साम्राज्य गुप्त व हूण राजांच्या साम्राज्यापेक्षाही जास्त विस्तीर्ण केले होते व 'राजाधिराज' 'परमेश्वर' ही बिरुदे धारण केली होती, असे समजते. यशोधर्मन् हाच ह्यूएनत्संगाचा शीलादित्य व कल्हणाचा हर्ष-विक्रमादित्य. याने पराजित केलेल्या हूणांनाच कल्हणाने व अल्बेरुणीने शक म्हटले असावे. या विक्रमादित्याने ज्याला काश्मीरच्या सिंहासनावर बसविले, तो मातृगुप्त हाच कालिदास असावा. मातृगुप्ताने काश्मीरच्या राज्याचा त्याग केल्यावर प्रवरसेन गादीवर आला. त्याच्या नावाने प्रसिद्ध असलेले 'सेतुबंध' हे प्राकृत काव्यही विक्रमादित्याच्या आज्ञेवरून कालिदासाने लिहिले, अशी विद्वानांत आख्यायिका प्रचलित होती, असे त्या काव्याच्या एका अकबरकालीन टीकाकाराच्या उल्लेखावरून दिसते. त्यावरूनही विक्रमादित्य, प्रवरसेन व कालिदास हे समकालीन होते, हेच सिद्ध होते.

वरील प्रमाणावर अनेक ठिकाणी आक्षेप घेता येईल. ह्यूएनत्संग ज्याला 'मोलापो' (Molāpo) म्हणतो, तो प्रदेश कोणता, याबद्दल विद्वानांत पुष्कळ चर्चा झाली आहे. तिचा विचार करून व्हिन्सेन्ट स्मिथ* या प्रसिद्ध इतिहासलेखकाने ठरविले आहे की, मही नदीचे खोरे, साबरमतीच्या पूर्वेकडील थोडा भाग व दक्षिण राजपुतान्याचा डोंगराळ प्रदेश या भागालाच ह्यूएनत्संग 'मोलापो' म्हणत असावा. त्याची राजधानी उज्जैनी नव्हती. कारण याच चिनी प्रवाशाने पुढे उज्जैनीचे राज्य निराळे होते, असे वर्णिले आहे. ह्यूएनत्संगाने ज्याची अत्यंत धार्मिक म्हणून स्तुति केली आहे, तो यशोधर्मन् नसून वलभीचा पहिला शीलादित्य होय, असे प्रो. सिल्व्हन लेव्ही यांनी दाखविले आहे. 'राजतरंगिणी' हा ग्रंथ इ. स. च्या बाराव्या शतकात लिहिलेला. तो त्या काळच्या इतिहासापुरता विश्वसनीय असला तरी प्राचीन काळाविषयी तसा नाही. उलट त्यात बऱ्याच असंभवनीय व अतिशयोक्तीच्या गोष्टी भरलेल्या आहेत, हे सिद्ध झाले आहे. यशोधर्मन् हाच विक्रमादित्य असता तर त्याने 'राजाधिराज' व परमेश्वर' या बिरुदांप्रमाणे 'विक्रमादित्य' ही मानार्ह पदवी आपल्या लेखांत उल्लेखिली असती.

*Early History of India* (3rd. Ed.), p. 323.

त्याला 'शकारि' तर मुळीच म्हणता येत नाही. कारण ख्रिस्तोत्तर सहाव्या शतकात शकांचे नाव कोठेच येत नाही. मातृगुप्त हाच कालिदास असता तर कल्हणाने त्याच्या वर्णनार्थ जे दोनशे श्लोक लिहिले, त्यांत एकदा तरी तसा उल्लेख केला असता. मातृगुप्ताने प्रवरसेनाकरिता 'सेतुबंध' काव्य लिहिले असणे शक्य नाही. कारण— (१) 'राजतरंगिणी'त तसा उल्लेख नाही; (२) प्रवरसेनाचे व विक्रमादित्याचे वैर होते, असे कल्हणाने वर्णिले आहे, तेव्हा प्रवरसेनाकरिता विक्रमादित्याने कालिदासास ते काव्य लिहिण्यास आज्ञा केली असेल, असे वाटत नाही; (३) प्रवरसेन राज्यावर आल्यावर त्याने आग्रह केला तरी मातृगुप्त काश्मिरात राहिला नाही; तर लागलीच काशीस जाऊन त्याने संन्यास घेतला (राजतरङ्गिणी, ३, २९०–३२०), असे कल्हणाने वर्णिले आहे. यावरून वरील गोष्ट अशक्य होय, हे दिसून येईल.

(२) **वराहमिहिराच्या ग्रंथातील साम्य.**—वराहमिहिर सहाव्या शतकात होऊन गेला हे निश्चित आहे. त्याने दृक्प्रत्ययानुरूप अयनबिंदू निश्चित केले व त्याच्या वेळेपासून वर्षाऋतूची प्रवृत्ति आषाढाच्या आरंभी मानण्यात येऊ लागली. तत्पूर्वी श्रावणात दक्षिणायनाचा व म्हणून वर्षाऋतूचा आरंभ मानला जात असे, असे त्याच्या ग्रंथातील विधानावरून दिसते. कालिदासाने आपल्या 'मेघदूता'त 'आषाढस्य प्रथमदिवसे मेघमाश्लिष्टसानुम्' इत्यादि वर्णनात वर्षाऋतूचा आरंभ आपल्या वेळी आषाढात होत होता, असे दाखविले आहे. म्हणून तो वराहमिहिराचा समकालीन किंवा नंतरचा असावा. इतरत्रही अनेक ठिकाणी वराहमिहिराच्या ग्रंथांतून त्याने ज्योतिषविषयक कल्पना घेतलेल्या दिसतात. याकरिता खालील उदाहरणे पहा—

(अ) वराहमिहिर—**भूच्छायां स्वग्रहणे भास्करमर्कग्रहे प्रविशतीन्दुः।**

बृहत्संहिता-राहुचार.

कालिदास—**छाया हि भूमेः शशिनो मलत्वे-**
**नारोपिता शुद्धिमतः प्रजाभिः॥** रघु० १४, ४०.

या दोन्ही ठिकाणी भूमीच्या छायेमुळे चंद्राला ग्रहण लागते, असे म्हटले आहे.

(आ) वराहमिहिर—सलिलमये शशिनि रवेर्दीधितयो मूर्छितास्तमो नैशम्।
बृहत्संहिता–चंद्रचार.

कालिदास—पुपोष वृद्धिं हरिदश्वदीधितेरनुप्रवेशादिव बालचन्द्रमाः।
रघु० ३, २२.

या दोन्ही स्थळी चंद्र सूर्याच्या किरणांनी प्रकाशित होतो, ही कल्पना आली आहे. तेव्हा वराहमिहिर व कालिदास हे दोघेही विक्रमादित्याच्या नवरत्नांपैकी होते, या परंपरागत गोष्टीत तथ्य असावे.

वरील प्रमाणहि विशेष प्रबळ दिसत नाही. यक्षाने आषाढाच्या शुक्ल प्रतिपदेस मेघ पाहिला; पण त्यावेळी वर्षाकालाचा आरंभ झाला नव्हता. मेघदूताच्या चौथ्या श्लोकात 'प्रत्यासन्ने नभसि' म्हणजे 'वर्षाऋतु जवळ आला असता,' असे म्हटले आहे. त्यावरूनही आषाढ शुक्ल प्रतिपदेस पावसाळा सुरू झाला नव्हता, हे स्पष्ट आहे. पुढे 'शापान्तो मे भुजगशयनादुत्थिते शार्ङ्गपाणौ मासानन्यान्गमय चतुरो लोचने मीलयित्वा' (माझा शाप भगवान् विष्णु आपल्या सर्पशयनावरून उठतील तेव्हा कार्तिक शुक्ल एकादशीस संपणार आहे. म्हणून तू चार महिने डोळे मिटून माझी वाट पाहत राहा), असे यक्ष आपल्या पत्नीस सांगत आहे. तेव्हा यक्षाने आषाढ शुक्ल प्रतिपदेस मेघ पाहिला. तो आषाढ शुक्ल एकादशीस अलकेस पोचेल अशी त्याची अपेक्षा होती, हे स्पष्ट आहे. तेव्हा आषाढ शुक्ल एकादशी ते कार्तिक शुक्ल एकादशी हे चार महिने वर्षाऋतूचे कालिदासकाळी गणले जात, हे स्पष्ट आहे. अर्थात् कालिदास आषाढाच्या आरंभी वर्षाऋतूची सुरुवात होते असे मानणाऱ्या वराहमिहिरापेक्षा प्राचीन होता, हे सिद्ध होते.* आता वर जी ज्योतिषविषयक कल्पनासाम्याची स्थळे दाखविली, त्यापैकी पहिल्या ठिकाणी कालिदास चंद्रग्रहणाविषयी बोलत नसून चंद्रावर दिसणाऱ्या डागांचे कारण सांगत आहे, हे स्पष्ट आहे. दुसऱ्या ठिकाणची 'चंद्र सूर्यकिरणांनी प्रकाशित होतो' ही कल्पना फार प्राचीन आहे. कारण खिस्तपूर्व आठव्या शतकातील यास्काच्या 'निरुक्तां'तहि ती 'अथाप्यस्यैको रश्मिश्चन्द्रमसं प्रति दीप्यते तदेतेनोपेक्षितव्यम्।

* या प्रश्नाची सविस्तर चर्चा आमच्या 'संशोधनमुक्तावलि: सर ६' (पृ. ४१—५४) मध्ये केली आहे ती पाहावी.

आदित्यतोऽस्य दीप्तिर्भवति ।' (अ. २, ६) याप्रमाणे दिलेली आढळते. तेव्हा या कारणामुळे कालिदासास वराहमिहिराचा समकालीन मानणे युक्त होणार नाही.

(३) दिङ्नागाचार्यांचा 'मेघदूता'तील उल्लेख.— कालिदासाने आपल्या 'मेघदूत' काव्यात यक्षाला अलकेचा मार्ग सांगताना—

स्थानादस्मात्सरसनिचुलादुत्पतोदङ्मुखः खं
विङ्नागानां पथि परिहरन् स्थूलहस्तावलेपान् ॥　　मेघदूत, १४.

या पद्यार्धात श्लेषाने स्वसमकालीन निचुल व दिङ्नाग या दोन विद्वानांचा उल्लेख केला आहे, असे दक्षिणावर्त व मल्लिनाथ या टीकाकारांनी म्हटले आहे. 'त्यापैकी रामगिरीच्या जवळपास राहणारा व कालिदासाचा सहाध्यायी निचुलकवि हा कालिदासाच्या काव्यांवरील आक्षेप दूर करीत असे, तर दिङ्नाग हा कालिदासाने आपल्या कल्पना दुसऱ्याच्या ग्रंथांतून चोरल्या, असे मोठ्या अभिनिवेशाने हातवारे करून सांगत असे. तेव्हा त्या आचार्याच्या स्थूलहस्तांना दूर सारून, हे मेघा, तू उत्तरेकडील आपला मार्ग आक्रमण कर, असे कालिदास यक्षमुखाने मेघास सांगत आहे.' दिङ्नाग हा प्रसिद्ध बौद्ध तत्त्वज्ञ इ. स. च्या सहाव्या शतकात होऊन गेला. कारण त्याचा गुरु वसुबंधु हा इ. स. ४८० पर्यंत हयात होता. यावरूनही कालिदास हा सहाव्या शतकात होऊन गेला, हे सिद्ध होते.

या प्रमाणातही विशेष 'राम' नाही. कालिदास आपल्या काव्यांत क्वचित् श्लेष योजतो हे खरे. तथापि, शक्य तेथे श्लेषाचा उपयोग करण्याची बाण, सुबंधु, श्रीहर्ष यांच्यासारखी त्याला सवय नव्हती. तेव्हा तसेच काही विशेष प्रमाण असल्याशिवाय श्लेषमूलक वैयक्तिक उल्लेख त्याच्या काव्यांत न पाहणेच बरे. दुसरे असे की, 'दिङ्नागानां' ह्या पदाने कवीला प्रतिस्पर्ध्याचा उल्लेख करावयाचा असता तर तो खचित बहुवचनाचा उपयोग करता ना. शिवाय दिङ्नाग हा एक नैयायिक होता. काव्यशास्त्राचा त्याचा व्यासंग होता, असा कोठेही उल्लेख नाही. तेव्हा त्याने कालिदासाचे दोष दाखविण्याची उठाठेव केली असेलसे वाटत नाही. वरील पद्यात निचुल व दिङ्नाग या व्यक्तींचा उल्लेख आहे असे मानले तरी वरील काळ सिद्ध होत नाही. डॉ. कीथ,

प्रो. मॅक्डोनेल वगैरेंच्या मते दिङ्नाग इ. स. ४०० च्या सुमारास होऊन गेला. त्याचा गुरु वसुबंधु हा वामनाच्या 'काव्यालंकारसूत्रवृत्ती'तील एका उल्लेखावरून चंद्रगुप्तपुत्राचा सचिव होता, असे दिसते. पुष्कळ विद्वानांच्या मते हा चंद्रगुप्त म्हणजे गुप्तकालसंस्थापक पहिला चंद्रगुप्त (इ. स. ३१९–३३०) व त्याचा पुत्र म्हणजे प्रसिद्ध सम्राट् समुद्रगुप्त. तेव्हा वसुबंधु हा चौथ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास व त्याचा शिष्य दिङ्नाग त्याच शतकाच्या अंती होऊन गेला असावा, हे उघड आहे.

(४) **'ज्योतिर्विदाभरणा'तील उल्लेख.**—'ज्योतिर्विदाभरण' ग्रंथाच्या बाविसाव्या अध्यायात तो ग्रंथ शकारि विक्रमादित्याच्या आश्रयास असणाऱ्या कालिदासाने रचला व तो कवि त्याच्या नवरत्नांपैकी एक होता, असे म्हटले आहे.* ग्रंथातील काही ज्योतिषविषयक उल्लेखांवरून हा ग्रंथ तेराव्या शतकातील, असे मानण्यात येते; पण या ग्रंथकाराने वराहमिहिराने दिलेला कलियुगारंभ मानला असल्याने ग्रंथाचा रचनाकाल इ. स. ५८० हा येतो. या ग्रंथात व कालिदासाच्या काव्यांत अनेक ठिकाणी कल्पनासाम्य आढळते.† शेवटच्या विक्रमप्रशस्तीची भाषा असावी तितकी जोरदार नाही, हे खरे, पण यावर असे म्हणता येईल की, महाकवींच्या सर्वच ग्रंथांतील भाषासौष्ठव सारखे असते, असे नाही. उदाहरणार्थ, भाषेच्या पुराव्यावरून 'ऋतुसंहार' व 'मालविकाग्निमित्र' हे ग्रंथ कालिदासाचे असावे किंवा नसावे, याबद्दल पुष्कळ दिवस विद्वानांस संशय होता. तेव्हा कालिदास इ. स. च्या सहाव्या शतकात यशोधर्मन् विष्णुवर्धन याच्या दरबारी होऊन गेला असावा.

वरील मतही सयुक्तिक भासत नाही. 'ज्योतिर्विदाभरण' हा ग्रंथ सहाव्या शतकातील, असे कबूल केले तरी तो रघुवंशादि उत्कृष्ट ग्रंथ लिहिणाऱ्या कालिदासाचा असणे शक्य नाही. या ग्रंथातील निर्देश (अ. २२, श्लो. २० पहा) खरा मानावयाचा, तर तो कालिदासाने 'रघुवंशा'दि काव्यांनंतर लिहिला, असे मानले पाहिजे. यावेळी कालिदास परिणतप्रज्ञ झाला होता. त्याच्या हातून या ग्रंथातल्यासारखी सदोष

---

* धन्वन्तरिक्षपणकामरसिंहशङ्कुवेतालभट्टघटखर्परकालिदासाः ।
ख्यातो वराहमिहिरो नृपतेः सभायां रत्नानि वै वररुचिर्नव विक्रमस्य ॥ २२, १०.

† ज्योति० ४, ८५ व कुमार० १, ३ पाहा.

भाषा लिहिली जाणे शक्य नाही. 'ऋतुसंहार' व 'मालविकाग्निमित्र' यांचा दाखला येथे उपयोगी पडणार नाही ; कारण ते ग्रंथ कवीने प्रथम लिहिले, हे स्पष्ट आहे. तेव्हा त्यांत कवीची भाषाशैली तितकी मधुर व निर्दोष दिसत नसल्यास नवल नाही. तेव्हा कालिदासाच्या नावावर दुसऱ्या कोणी हा ग्रंथ दडपून दिला, किंवा दुसऱ्या कोणी कालिदास नामक ग्रंथकाराने हा लिहिला असावा. अशा प्रकारचे तीन कालिदास राजशेखराच्या काळी (इ. स. चे १० वे शतक) माहीत होते. त्यांस उद्देशून त्याने म्हटले आहे—

एकोऽपि जीयते हन्त कालिदासो न केनचित्।
शृंगारे ललितोद्गारे कालिदासत्रयी किमु ॥

"शृंगाररस वर्णन करण्यात व मधुर भाषाशैलीत एका कालिदासाची बरोबरी करणारा अद्यापि कोणी झाला नाही, मग तीन कालिदासांना (अर्थात् निरनिराळ्या विषयांत) मागे टाकणारा कोठला सापडावयाला !"

(५) **कालिदासीय ग्रंथांतील ज्योतिषविषयक उल्लेख.**—कलकत्ता विश्वविद्यालयाचे गणिताचे प्राध्यापक श्री. प्रबोधचंद्र सेनगुप्त यांनी कालिदासाच्या ग्रंथांतील काही ज्योतिषविषयक उल्लेखांचे गणित करून इ. स. चे सहावे शतक हा त्या कवीचा काल ठरविण्याचा प्रयत्न केला आहे.* त्यांच्या काही प्रमाणांचा विचार करू.

(अ) 'मेघदूता'मध्ये वर्णिले आहे की, रामगिरीवर राहणाऱ्या निर्वासित यक्षाने आषाढाच्या अखेरच्या दिवशी (आषाढस्य प्रशमदिवसे) मेघ पाहिला ; त्यानंतर लवकरच श्रावण मास सुरू होणार होता (प्रत्यासन्ने नभसि, श्लो. ४) ; पुढे चार महिन्यांनी (कार्त्तिकातील प्रबोधिनी एकादशीस) भगवान् विष्णु आपल्या भुजगशयनावरून उठणार होते (शापान्तो मे भुजगशयनादुत्थिते शार्ङ्गपाणौ, श्लो. १२०). या उल्लेखांवरून प्रा. सेनगुप्त यांनी खालील अनुमाने काढली आहेत :—

यक्षाने चान्द्र मास आषाढ याच्या एकादशीस मेघ पाहिला. त्यानंतर दुसऱ्या दिवशी श्रावण सुरू होणार होता. तेव्हा त्या तिथीस संपणारा आषाढ सौर मास असला पाहिजे. त्या दिवशी कालिदासकाळी दक्षिणायनारंभ होत असे व पावसाळ्यास सुरुवात होई. या तीन उल्लेखांचे

* P. C. Sengupta, *Ancient Indian Chronology*, pp. 263 f.

गणित केले असता हा दिवस २० जून इ. स. ५४१ हा येतो. म्हणून कालिदास सहाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास होऊन गेला असावा.

पण हे विवेचन बरोबर वाटत नाही. सौर मासांचा उल्लेख कालिदासाच्या इतर ग्रंथांतच नव्हे तर प्राचीन कोरीव लेखांतही आढळत नाही. 'मेघदूता'तील खरा पाठ 'आषाढस्य प्रथमदिवसे' असा आहे, हे आम्ही इतरत्र दाखविले आहे. 'प्रत्यासन्ने नभसि' याचा अर्थ 'श्रावण मास जवळ आला असता' असा नसून 'वर्षाकाल जवळ आला असता' असा आहे. 'नभो व्योम्नि नभा मेघे श्रावणे च पतद्ग्रहे। घ्राणे मृणालसूत्रे च वर्षासु च नभाः स्मृतः ॥' या 'विश्वकोशा'तील श्लोकात तो अर्थ दिला आहे. 'मेघदूता'तील वरील पाठ व हा अर्थ घेतल्यास त्या काव्यातील विधाने सुसंगत दिसतात हे मागे (पृ. २९ वर) दाखविले आहे.*

(आ) 'शाकुंतला'च्या शेवटच्या अंकात शकुंतलेची ओळख पटल्यावर दुष्यंत म्हणतो—

स्मृतिभिन्नमोहतमसो
दिष्ट्या प्रमुखे स्थितासि मे सुमुखि।
उपरागान्ते शशिनः
समुपगता रोहिणी योगम् ॥ शाकुं. ७, २२.

[प्रिये, ग्रहण सुटल्यावर चंद्राशी योग झालेल्या रोहिणीप्रमाणे तू, ओळख पटल्यामुळे ज्याच्या मनाचा मोह नष्ट झाला आहे, अशा माझ्यासमोर उभी आहेस.]

प्रा. सेनगुप्त यांच्या मते यात कालिदासाने समक्ष पाहिलेल्या खग्रास चंद्रग्रहणाचा उल्लेख असावा. त्यावरून गणित करून त्यांनी हे खग्रास चंद्रग्रहण उज्जैनी येथे ८ नोव्हेंबर इ. स. ५४२ रोजी रात्री ८-३६ वाजता सुरू होऊन मध्यरात्रीनंतर २० मिनिटांनी सुटले, असे निश्चित केले आहे. त्यावेळी चंद्राचा रोहिणी तारेशी योग होता. म्हणून कालिदास सहाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास होऊन गेला, असे अनुमान त्यांनी केले आहे.

काही लोक एखाद्या गोष्टीचा कसा अतिरेक करतात, याचे हे उत्कृष्ट उदाहरण आहे. कालिदासाला रोहिणी-चंद्राच्या युतीचे दृश्य अत्यंत

* या प्रश्नाची सविस्तर चर्चा 'संशोधनमुक्तावलि' सर ६, पृ. ४१-५० वर केली आहे.

सुंदर वाटत असे, म्हणून त्याने त्याचा उल्लेख इतरत्रही केला आहे.* तेव्हा 'शाकुंतला'त दुष्यंत व शकुंतला यांच्या पुनर्मीलनाला हीच उपमा त्याने योजिली तर त्यात आश्चर्य नाही. या मीलनापूर्वी दुष्यंताचे मन दुर्वासाच्या शापाने मोहग्रस्त झाले होते. म्हणून उपमान देताना रोहिणीशी युति होण्यापूर्वी चंद्राला ग्रहण लागले होते, अशी कल्पना कवीने केली आहे. ही कल्पना सुचण्यास त्याने ही परिस्थिति आकाशात प्रत्यक्ष पाहिली असण्याची जरूरी नाही.

या तऱ्हेची आणखीही एक-दोन ज्योतिषविषयक उल्लेखांची प्रमाणे प्रा. सेनगुप्त यांनी दिली आहेत. पण ती यांपेक्षाही दूरान्वित आहेत. विस्तारभयास्तव त्यांचे परीक्षण येथे केले नाही.

येथवर कालिदासकालविषयक काही मतांचे परीक्षण करून ती सयुक्तिक नाहीत, हे दाखविले. आता आम्हांस संमत असलेले मत सप्रमाण पुढे मांडतो.

### ६. ख्रिस्तोत्तर चौथे-पाचवे शतक

कालिदास सहाव्या शतकात होऊन गेला, या मताला काही आधार नाही, हे वर दाखविले आहे. याच्याही पुढे जाऊन तो पाचव्या शतकाच्या द्वितीयार्धापूर्वी केव्हा तरी होऊन गेला असावा, असेही आपणांस एका प्रमाणावरून म्हणता येते. त्याकडे आता वळू.

मध्यहिंदुस्थानात मन्दसोर येथे इ. स. ४७३ चा एक शिलालेख डॉ. फ्लीटने आपल्या गुप्तकालीन कोरीव लेखांच्या पुस्तकात† प्रसिद्ध केला आहे. या लेखात लाट म्हणजे मध्य व दक्षिण गुजराथ येथून निघून मन्दसोर येथे येऊन वसति केलेल्या कोष्टयांच्या संघाने कुमारगुप्ताच्या कारकीर्दीत इ. स. ४३७ मध्ये एक सूर्यमंदिर बांधले व पुढे इ. स. ४७३ मध्ये त्याचा जीर्णोद्धार केला, त्याचे वर्णन आले आहे. त्या प्रसंगी त्या संघाने वत्सभट्टि नामक कवीकडून एक प्रशस्ति तयार करवून ती एका शिलाखंडावर कोरून ठेवली. या प्रशस्तीत अनेक ठिकाणी कालिदासाच्या काव्यांचे अनुकरण केलेले दिसते, असे डॉ. बुल्हर, कीलहॉर्न, मॅकडोनेल, कीथ वगैरे विद्वानांनी दाखवून दिले आहे. उदाहरणार्थ,

* हञ्जे निपुणिके, एष रोहिणीसंयोगेन अधिकं शोभते भगवान् मृगलान्छनः। विक्रमो० ३.
† Dr. Fleet : *Gupta Inscriptions* (No. 18).

खालील साम्य पहा—

कालिदास—विद्युद्वन्तं ललितवनिताः सेन्द्रचापं सचित्राः
संगीताय प्रहतमुरजाः स्निग्धगंभीरघोषम् ।
अन्तस्तोयं मणिमयभुवस्तुंगमभ्रंलिहाग्राः
प्रासादास्त्वां तुलयितुमलं यत्र तैस्तैर्विशेषैः ।।
मेघदूत, ६६.

वत्सभट्टि— चलत्पताकान्यबलासनाथान्यत्यर्थशुक्लान्यधिकोन्नतानि ।
तडिल्लताचित्रसिताभ्रकूटतुल्योपमानानि गृहाणि यत्र ।।
श्लो० १०.

या दोन्ही पद्यांत उत्तुंग गृहांची व मेघांची एकाच प्रकारची तुलना आली आहे. तसेच खालील साम्यही लक्षात घेण्यासारखे आहे—

कालिदास—निरुद्धवातायनमन्दिरोदरं हुताशनो भानुमतो गभस्तयः ।
गुरूणि वासांस्यबलाः सयौवनाः प्रयान्ति कालेऽत्र जनस्य सेव्यताम् ।।
न चन्दनं चन्द्रमरीचिशीतलं न हर्म्यपृष्ठं शरदिन्दुनिर्मलम् ।
न वायवः सांद्रतुषारशीतला जनस्य चित्तं रमयन्ति सांप्रतम् ।।
ऋतुसंहार, ५, २-३.

वत्सभट्टि—– रामासनाथभवनोदरभास्करांशुवह्निप्रतापसुभगे जललीनमीने ।
चन्द्रांशुहर्म्यतलचन्दनतालवृन्तहारोपभोगरहिते हिमदग्धपद्मे ।।
श्लो० ३१.

यांतील वत्सभट्टीच्या पद्यांत कालिदासाच्या श्लोकांचे प्रतिबिंब स्पष्टपणे पडलेले दिसते. वत्सभट्टि हा अगदी साधारण प्रतीचा कवि. त्याच्या कृतीत अनेक दोष विद्वानांनी दाखविले आहेत.* तेव्हा त्यानेच कालिदासाच्या कल्पना उसन्या घेतल्या असाव्यात, असे सहजच अनुमान होते व या प्रमाणावरून कालिदास पाचव्या शतकाच्या द्वितीयार्धापूर्वी होऊन गेला असावा, असे निश्चित विधान आपणांस करता येते.

आता कालिदासाच्या काळाची पलीकडील मर्यादा जरा जास्त निश्चितपणे ठरविता येते काय पाहू. कालिदासाने वात्स्यायनाच्या 'कामसूत्रा'चा फार काळजीपूर्वक अभ्यास केला होता, असे दिसते. विवाहित

* डॉ. बुल्हर यांचा लेख : *Indian Antiquary*, Vol. 54, pp. 146-7.

स्त्रीची कर्तव्ये सांगताना वात्स्यायनाने खालील सूत्रे लिहिली आहेत—

श्वश्रूश्वशुरपरिचर्या तत्पारतंत्र्यमनुत्तरवादिता । ··भोगेष्वनुत्सेकः । परिजने दाक्षिण्यम् । ··नायकापचारेषु किञ्चित्कलुषिता नात्यर्थं निवदेत् ।

कामसूत्र, पृ० २३९, २३६.

या इतस्ततः विखुरलेल्या वचनांस एके ठिकाणी गुंफून कालिदासाने कण्वमुखाने नववधूंस खालील पद्यात उत्कृष्ट उपदेश केला आहे—

शुश्रूषस्व गुरून् कुरु प्रियसखीवृत्तिं सपत्नीजने
भर्तुर्विप्रकृताऽपि रोषणतया मा स्म प्रतीपं गमः ।
भूयिष्ठं भव दक्षिणा परिजने भोगेष्वनुत्सेकिनी
यान्त्येवं गृहिणीपदं युवतयो वामाः कुलस्याधयः ॥

शाकुन्तल, ४, १७.

'शाकुंतला'त जे सर्वोत्कृष्ट चार श्लोक आहेत म्हणून म्हणतात, त्यांत वरील श्लोकाची गणना रसिकांनी एकमताने केली आहे. पण त्या श्लोकातील मूळ कल्पना वात्स्यायनाच्या, हे वरील उताऱ्यांच्या तुलनेवरून स्पष्ट होईल. तेव्हा कालिदास वात्स्यायनानंतर झाला असला पाहिजे. वात्स्यायनाचा काल 'कामसूत्रा'तील राजकीय परिस्थितीच्या उल्लेखांवरून खिस्तोत्तर तृतीय शतकाचा मध्य हा विद्वानांनी ठरविलेला आहे.* तेव्हा कालिदास इ. स. २५० नंतर होऊन गेला असावा.

तेव्हा इ. स. २५० ते ४५० या दोनशे वर्षांत कालिदासाचा काळ शोधला पाहिजे. कालिदास हा उज्जैनीस रहात असावा, असे त्याच्या ग्रंथांवरून दिसते. त्याचा आश्रयदाता कोणी 'शकारि' विक्रमादित्य असावा, असे परंपरागत गोष्टी व त्याच्या ग्रंथांतील 'विक्रम' नावावरील श्लेष यांवरून अनुमान होते, हे वर दाखविलेच आहे. या प्रकरणाच्या आरंभी जे ११ व्या शतकातील अभिनन्द कवीचे वचन उद्धृत केले आहे, त्यातही कालिदासाचे ग्रंथ कोणा शकारीच्या आश्रयाने प्रसिद्धि पावले, असे म्हटले आहे. वरील दोनशे वर्षांच्या काळात द्वितीय चंद्रगुप्त व त्याचा नातू स्कन्दगुप्त या दोघांनीच विक्रमादित्य ही पदवी धारण केली होती, असे त्यांच्या नाण्यांवरून दिसते. त्यांपैकी द्वितीय चंद्रगुप्त यालाच 'शकारि' म्हणता येईल. कारण याने इ. स. ३९५ च्या

* H. G. Chakladar : *Social Life in Ancient India*, p. 33.

सुमारास काठेवाडच्या परकी शकवंशीय क्षत्रपांचा समूळ उच्छेद करून तो प्रांत आपल्या राज्यास जोडला, असे शिलालेख व नाणी यांवरून सिद्ध झाले आहे. त्याची राजधानीही उज्जैनीस होती. शिवाय तो मोठा, दानशूर म्हणून प्रसिद्ध होता व त्याचा विद्वानांस उदार आश्रय असे. कौत्स शाब नावाच्या त्याच्या एका सांधिविग्रहिक मंत्र्याने विदिशे-जवळ उदयगिरि येथे एक लेख* कोरविला आहे. त्यात त्याने आपला 'शब्दार्थन्यायलोकज्ञ' व 'कवि' म्हणून स्पष्ट निर्देश केला आहे. त्यावरून विद्वान् माणसांस मोठमोठ्या हुद्यांवर नेमण्याची त्याची पद्धत होती, असे दिसते. तो स्वतःही मोठा विद्वान् होता. कालिदास, मेंठ इत्यादि विद्वानांप्रमाणे उज्जैनीच्या ब्रह्मसभेपुढे त्याने स्वतःही परीक्षा दिली होती, असे राजशेखराच्या 'काव्यमीमांसे'त उद्धृत केलेल्या एका प्राचीन वचनावरून दिसते.† राजशेखराने म्हटल्याप्रमाणे राजाच कवि असल्यावर सर्व लोक काव्य करू लागतात व त्यांना त्याचा आश्रय मिळतो. तेव्हा या चंद्रगुप्त विक्रमादित्याच्याच आश्रयास कालिदास असावा, असे अनुमान करता येते.

कालिदासाच्या चवित्राविषयी जी थोडी माहिती अलीकडे उपलब्ध झाली आहे, तिनेही वरील अनुमानास बळकटी येते. क्षेमेन्द्राच्या 'औचित्यविचारचर्चे'त अधिकरणौचित्याचे उदाहरण म्हणून खालील श्लोक कालिदासाच्या 'कुन्तलेश्वरदौत्य' नामक ग्रंथातून घेतला आहे—

इह निवसति मेरुः शेखरः क्ष्माधराणा-
मिह विनिहितभाराः सागराः सप्त चान्ये।
इदमहिपतिभोगस्तम्भविभ्राजमानं
धरणितलमिहैव स्थानमस्मद्विधानाम् ॥

औचित्यविचारचर्चा, पृ. १४०.

या श्लोकातील स्थानवर्णनाचे औचित्य क्षेमेन्द्राने येणेप्रमाणे व्यक्त केले आहे—सम्राटांचा दूत माण्डलिक राजाच्या सभेत गेला असता त्याला

---

* Dr. Fleet : *Gupta Inscriptions*, No. 6.

† श्रूयते चोज्जयिन्यां काव्यकारपरीक्षा।—इह कालिदासमेण्ठावत्रामररूपसूरभारवयः। हरिचन्द्रचन्द्रगुप्तौ प्रकाशिताविह विशालायाम्॥—काव्यमीमांसा, अ. १०. 'सुभाषितरत्नकोशा'दि प्राचीन श्लोकसंग्रहांत विक्रमादित्याच्या नावावर दिलेले श्लोक द्वितीय चन्द्रगुप्तानेच रचले असावे.

आपल्या प्रभूच्या पदवीला अनुरूप अशी मानाची जागा मिळाली नाही. तेव्हा तो कार्यवशात् भूमीवरच बसला (व इतर मानकऱ्यांनी चेष्टा केली तेव्हा) धीरगंभीर स्वराने म्हणतो : "शेषफणारूपी स्तंभांनी निश्चल झालेले हे भूमितलच आम्हांस योग्य स्थान आहे. कारण पर्वतश्रेष्ठ मेरु व सातही महासागर या आसनावरच विराजमान आहेत व त्यांच्याइतकीच माझी योग्यता आहे." हा दूत किंवा वकील कोण व तो कोणत्या सम्राटाचा हे समजण्यास, नुकतेच एक साधन उपलब्ध झाले आहे. थोडया वर्षांपूर्वी मद्रासेकडे धाराधीश भोजराजाचा 'शृंगारप्रकाश' हा ग्रंथ ज्ञात झाला. त्याच्या आठव्या प्रकाशात कालिदासाच्या तोंडी खालील श्लोक घातला आहे—

असकलहसित्वात् क्षालितानीव कान्त्या
मुकुलितनयनत्वाद्व्यक्तकर्णोत्पलानि ।
पिबति मधुसुगन्धीन्याननानि प्रियाणाम्
त्वयि विनिहितभारः कुन्तलानामधीशः ॥

[तुझ्यावर (राज्याचा) भार टाकून कुन्तल देशाचा राजा किंचित् हास्याने ज्यांच्यावर कांति पसरली आहे, नयन झाकले असल्याने ज्यांच्या कर्णावरची कमले स्पष्ट दिसत आहेत, अशी सुरापानाने सुगन्धित झालेली आपल्या प्रियांची मुखे चुंबीत आहे.] अर्थातच कालिदास हा स्वतःच वकील म्हणून कुन्तलेश्वर नामक सामन्ताच्या दरबारी गेला होता, असे दिसते. परत उज्जैनीस गेल्यावर विक्रमादित्याने 'कुन्तलेश काय करीत असतो ?' असे विचारल्यावरून वरील श्लोकात कालिदासाने 'कुन्तलेश तुझ्यावर राज्याचा भार टाकून स्त्रियांशी विलास करण्यात दंग असतो', असे उत्तर दिले आहे. हा श्लोक भोजाच्या 'सरस्वतीकंठाभरणा'त व राजशेखराच्या 'काव्यमीमांसे'तही उद्धृत केला आहे. राजशेखराने वरील श्लोकात थोडा बदल करून—

पिबतु मधुसुगन्धीन्याननानि प्रियाणां
मयि विनिहितभारः कुन्तलानामधीशः ।

काव्यमीमांसा, अ० ११.

म्हणजे 'माझ्यावर भार टाकून कुन्तलेश तसे करो' असे विक्रमादित्याने कालिदासाला उत्तर दिले, असे दाखविले आहे. कालिदास हा मोठा विद्वान्

व चतुर मुत्सद्दी होता, हे त्याच्या ग्रंथांवरून आम्ही पुढे दाखविणार आहो. तेव्हा त्याला आपला वकील म्हणून सामन्तसभेत विक्रमादित्याने पाठविले असले तर त्यात आश्चर्य नाही.

आता हा कुन्तलेश कोण याचा विचार करू. या प्रश्नावर आतापर्यंत दोन मते व्यक्त झाली आहेत : दक्षिण महाराष्ट्र व म्हैसूरचा उत्तरभाग यास साधारणपणे कुन्तल असे म्हणत. म्हैसूर संस्थानात शिमोगा जिल्ह्यात तालगुंड येथे कंदवांचा एक शिलालेख सापडला आहे. त्यात काकुस्थवर्मन् या राजाने आपली मुलगी देऊन गुप्तराजाच्या कुळाला प्रसिद्ध केले, असे म्हटले आहे. त्यावरून चंद्रगुप्त विक्रमादित्याने या राजाची मुलगी आपल्या मुलाकरिता केली असावी व तो विवाहसंबंध जुळवून आणण्याच्या नाजूक कामावर कालिदासाची योजना झाली असावी, असे मुंबईच्या सेंट झेविअर कॉलेजातील इतिहासाचे प्राध्यापक फादर हेरास यांनी अनुमान केले आहे.* पण त्याला विशेष आधार दिसत नाही. कारण तालगुंडच्या लेखात अमक्याच गुप्तराजाने कदम्बराजकन्या वरिली, असे दिले नाही. शिवाय, वर दिलेल्या श्लोकात सूचित केल्याप्रमाणे कदम्बनृपतीचे राज्य चंद्रगुप्ताच्या तंत्राने चालले होते, याला पुरावा नाही. आणखी असे की, काकुस्थवर्म्याच्या व चंद्रगुप्ताच्या काळात ५०/६० वर्षांचे अंतर आहे. तेव्हा वरील अनुमान बरोबर आहे असे वाटत नाही.

दुसरे मत प्रो. कृष्णस्वामी ऐयंगार यांचे. त्यांनी आपल्या लेखात हा कुन्तलेश वाकाटकवंशी द्वितीय प्रवरसेन असावा असे प्रतिपादिले आहे.† चंद्रगुप्ताच्या काळी गुप्त व वाकाटक या घराण्यांचा वैवाहिक संबंध आला होता, कारण चंद्रगुप्ताने आपली मुलगी प्रभावतीगुप्ता ही वाकाटकवंशी द्वितीय रुद्रसेन यास दिली होती. हा रुद्रसेन विवाहानंतर थोड्याच वर्षांनी वारला. तेव्हा प्रभावतीगुप्ता आपल्या अल्पवयी मुलाच्या नावाने राज्य करू लागली. तिला मदत करण्याकरिता चंद्रगुप्ताने आपल्या पदरचे अनुभवी अधिकारी व मुत्सद्दी विदर्भात

---

* *J. B. O. R. S.*, Vol. XII, Part IV.

† प्रो. ऐयंगार यांचे समग्र लेख (ओरिएंटल बुक एजन्सीने प्रकाशित केलेले), भाग १, पृ. २७१—२७४ पाहा.

पाठविले होते, असे दिसते. कारण प्रभावतीगुप्तेच्या ताम्रपटांत वाकाटकांच्या वंशावळीला प्राधान्य दिले नसून गुप्तांच्या वंशावळीला दिले आहे.* या प्रसंगी राजकवि कालिदास हाही विदर्भात आला असावा व त्याने तेथे असताना 'मेघदूत' काव्य रचले, असे अनुमान करता येते. कालिदासाचा वाकाटकांशी असा संबंध आल्यामुळे कुन्तलेश हा वाकाटक द्वितीय प्रवरसेनच असावा, असे मत प्रो. ऐयंगार यांनी प्रतिपादिले. "या प्रवरसेनाचे कुन्तल देशावर राज्य नव्हते; तेव्हा त्याला 'कुन्तलेश्वर' कसे म्हटले?" असा आक्षेप या मतावर येण्याची शक्यता होती; पण त्याचे निराकरण प्रो. ऐयंगार यांनी पुढील प्रकारे केले: अजंठ्याच्या एका लेखात या प्रवरसेनाचा आजा पहिला पृथिवीषेण याने कुन्तलाधिपतीचा पराभव केला होता, असे म्हटले आहे. त्यानंतर वाकाटकांनी 'कुन्तलेश' ही पदवी धारण केली असावी. याला उपोद्बलक असा पुरावा श्रीकृष्ण कवीच्या 'भरतचरित' काव्यात आढळतो. या काव्याच्या आरंभी प्राचीन कवींची स्तुति करताना श्रीकृष्ण कवीने प्रवरसेनाचा 'कुन्तलेश' म्हणून निर्देश केला आहे.† या सर्व प्रमाणांवरून द्वितीय प्रवरसेन हाच कुन्तलेश असावा, असे मत प्रो. ऐयंगार यांनी प्रतिपादिले व त्यावेळी उपलब्ध असलेल्या पुराव्यावरून तेच सयुक्तिक भासत असल्याने इतरही काही संशोधकांनी त्याला पुष्टि दिली. तथापि, प्रो. ऐयंगार यांच्या मतावर काही ठिकाणी आक्षेप घेता येण्याजोगा होता. गुप्त व वाकाटक यांचा इतका घनिष्ठ संबंध असता प्रथम प्रसंगी कालिदासाचा असा अपमान वाकाटकांच्या दरबारी झाला असेल, हे संभवनीय वाटत नव्हते. शिवाय वाकाटकांनी कुन्तलनृपतीचा पराभव केला होता, हे खरे असले तरी त्यांनी स्वत: 'कुन्तलेश' ही पदवी धारण केली होती,

---

* प्रभावतीगुप्तेचा पुण्यास सापडलेला ताम्रपट पाहा. एपिग्राफिया इंडिका, पु. १५, पृ. ३९. इ.

† तो श्लोक येणेप्रमाणे — 'जलाशयस्यान्तरगाधसत्त्वमलब्धबन्धं गिरि चौर्यवृत्त्या। लोकेष्वलं कान्तमपूर्वसेतुं बबन्ध कीर्त्या सह कुन्तलेशः॥' भरतचरित, सर्ग १, श्लो. ४. यात अनेक शब्दांवर श्लेष आहे. भावार्थ—'श्रीरामचंद्राने समुद्रात मोठमोठ्या पर्वतप्राय शिला जोडून तयार झालेला व लंकेपर्यंत जाणारा असा सेतु बांधला; पण कुन्तलेशाने त्याच्यावरही ताण केली. कारण त्याने मन्दबुद्धींना आकलन न होणारा, अन्य ग्रंथांतून काही चोरून न घेता रचलेला, जगात सुप्रसिद्ध व सुंदर असा अपूर्व सेतु (सेतुबन्ध काव्यग्रंथ) आपल्या कीर्तीसह निर्माण केला.'

असे त्यांच्या कोरीव लेखांवरून दिसत नाही. उलट बालाघाट येथे सापडलेल्या त्यांच्या अगदी शेवटच्या ताम्रपटातही वाकाटक नृपति नरेन्द्रसेन याचा कुन्तल राजकन्येशी विवाह झाल्याचा उल्लेख आहे; यावरूनही वाकाटक व कुन्तलेश हे भिन्न होते, हे उघड आहे. श्रीकृष्ण कवि निश्चित कोणत्या काळी होऊन गेला हे माहीत नाही, तथापि त्याचे काव्य बरेच अलीकडचे दिसते. तेव्हा त्यातील विधानाचा पुरावा या विवादास्पद बाबतीत निर्णायक मानता येत नाही.

प्रस्तुत लेखकाच्या अलीकडच्या संशोधनावरून या प्रश्नावर जास्त प्रकाश पडत आहे. कोल्हापूर,* दौंड † इत्यादि ठिकाणी गेल्या काही वर्षात तीन ताम्रपट सापडले आहेत. त्यांचा साकल्याने विचार करता इ. स. च्या चौथ्या शतकापासून दक्षिण महाराष्ट्रात मानपुर येथे एक राष्ट्रकूट घराणे राज्य करीत होते, असे स्पष्ट दिसते. या घराण्याचा मूळ पुरूष मानाङ्क हा असून त्याने आपल्या नावे मानपुर नामक नगर स्थापून तेथे आपली राजधानी केली होती. वर उल्लेखिलेल्या ताम्रपटांपैकी कोल्हापूरजवळ सापडलेल्या ताम्रपटात मानाङ्काला 'श्रीमत्कुन्तलानां प्रशासिता', 'समृद्ध अशा कुन्तल देशाचा अधिपति' असे म्हटले आहे. त्यावरून हा मानाङ्क कुन्तल देशावर राज्य करीत होता, हे स्पष्ट दिसेल. कुन्तल देशात कृष्णा नदीचे खोरे व त्याच्या दक्षिणेचा महाराष्ट्र यांचा समावेश होत असे. 'विख्यातकृष्णवर्णे तैलस्नेहोपलब्धसरलत्वे। कुन्तलविषये नितरां विराजते मल्लिकामोदः॥' हा उत्तर चालुक्यांच्या एका ताम्रपटातील‡ चालुक्यनृपति जयसिंह उर्फ मल्लिकामोद याविषयी आलेला श्लेषपूर्ण सुंदर श्लोक पाहा. यात कुन्तल देशात कृष्णवर्णा ऊर्फ कृष्णा नदी वाहते,

* म्हैसूर आर्किऑलॉजिकल सर्व्हे रिपोर्ट, सन १९२९, पृ. १९७ इ.; संशोधनमुक्तावलि, सर ५, पृ. ११७ इ.

† महाराष्ट्रातील काही प्राचीन ताम्रपट व शिलालेख, पृ. १ इ.

‡ ए. इं. पु. १२, पृ. १५३. या श्लोकाचे श्लेषांमुळे दोन अर्थ होतात :— (१) कृष्णवर्णाबद्दल प्रख्यात असलेल्या व तेलाच्या चिक्कणतेने सरळ झालेल्या (युवतीच्या) केशपाशात मोगरीचा सुवास अतिशय खुलतो. (२) ज्यामध्ये कृष्णवर्णा नामक प्रसिद्ध नदी आहे व तैलप राजाविषयीच्या निष्ठेने ज्यातील लोक सद्वर्तनी झाले आहेत अशा कुन्तल देशात (तैलपाचा नातू) मल्लिकामोद ऊर्फ जयसिंह अतिशय शोभतो.

असा स्पष्ट निर्देश आहे. कोल्हापूरच्या ताम्रपटात अने नदीच्या तीरावरील काम्यक व जावल या वाड्यांसहित पांडरंगपल्ली नामक गाव एका ब्राह्मणास दान दिल्याचा उल्लेख आहे. यातील अने नदी ही कृष्णा नदीस मिळणारी येन्ना नदी किंवा वेणा नदी असावी. जावल तर जावळीचे प्राचीन रूप दिसते. काम्यक गाव जावळीच्या आसपास सापडते काय, हे पाहिले पाहिजे. तथापि, एवढ्या निर्देशावरून सातारा जिल्हा राष्ट्रकूट मानाङ्काच्या राज्यात अंतर्भूत होत होता, यात संशय नाही. वरील ताम्रपटातील कुन्तल देशाचा उल्लेख आतापर्यंत वाचता न आल्यामुळे हे राष्ट्रकूट घराणे कोठे राज्य करीत होते, याविषयी संशोधकांनी अनेक तर्क-वितर्क केले होते ; पण या दोन ताम्रपटांच्या प्राप्तिस्थानांवरून व त्यात उल्लेखिलेल्या ग्रामनामांच्या शोधावरून दक्षिण महाराष्ट्रात सातारा, कोल्हापूर, सोलापूर या भागांवर या राष्ट्रकूटांचे राज्य होते, असे स्पष्ट दिसते. त्यांची राजधानी मानपुर हे सातारा जिल्ह्यातील माण तालुक्याचे मुख्य गाव माण हे असावे.

या ताम्रपटातील अक्षरवटिका व काही कालनिर्देश यांवरून हे घराणे इ. स. च्या चवथ्या शतकापासून दक्षिण महाराष्ट्रात राज्य करीत असावे, असे दिसते. त्यांचे राज्य उत्तरेस गोदावरी नदीपर्यंत पसरले असावे. गोदावरीच्या उत्तरेस विदर्भात वाकाटकांचा अंमल होता. इ. स. च्या चौथ्या शतकात वाकाटक वंशाच्या दोन शाखा गोदावरीच्या उत्तरेस राज्य करीत असलेल्या आढळतात. वडील पातीची राजधानी नागपूर-जवळचे नन्दिवर्धन असून तिच्या अंमलाखाली उत्तर वऱ्हाड व मध्यप्रांताचे नागपूर, वर्धा, भंडारा, छिंदवाडा, बैतूल, बालाघाट इत्यादि जिल्हे होते. धाकट्या पातीची राजधानी वत्सगुल्म (हल्लीचे अकोला जिल्ह्यातील वाशीम) असून तिच्या राज्यात अजंठा पर्वतराजीच्या दक्षिणेचा व गोदावरीच्या उत्तरेचा मुलूख अंतर्भूत होत होता, असे दिसते. वाकाटकांची धाकटी पाती व राष्ट्रकूट यांची राज्ये एकमेकांस लागून असल्यामुळे त्यांच्यामध्ये कटकटीचे प्रसंग वरचेवर उद्‌भवत असले तर त्यात आश्चर्य नाही. याचे प्रत्यंतर या दोन्ही राजवंशांच्या कोरीव लेखांत आढळते. वत्सगुल्माच्या वाकाटकांचा एक कोरीव लेख अजंठा येथील १६ नंबरच्या

गुहेत कोरला आहे. त्यात विंध्यसेन* नामक राजाने कुन्तलेशाचा पराजय केल्याचा उल्लेख आहे. याच्या उलट राष्ट्रकूटांच्या कोल्हापूरजवळ सापडलेल्या ताम्रपटात मानाङ्क नृपतीने विदर्भ व अश्मक देश जिंकल्याचे नमूद केले आहे. अश्मक हे गोदावरीच्या तीरावरील प्रदेशाचे नाव होते. दुसरा देश विदर्भ हा वत्सगुल्म वाकाटकांच्या अंमलाखालचा दक्षिण विदर्भ असावा. तेव्हा हे दोन राजवंश समकालीन मानण्यास काहीच हरकत नाही.

द्वितीय चंद्रगुप्त विक्रमादित्याचा वाकाटकांना आश्रय होता, तसा या राष्ट्रकूटांनाही होता, असे दिसते. कदाचित् वाकाटकांप्रमाणे या राष्ट्रकूट घराण्याशीही त्याने विवाहसंबंध जोडला असेल. दक्षिणेतील राजांशी विवाहसंबंध करून त्यांचे सख्य कायम करणे, ही गुप्तांची राजनीति होती. दक्षिण कुन्तलावर राज्य करणाऱ्या कदंबांशीही गुप्तांचा विवाहसंबंध होता, हे वर दाखविले आहे. चंद्रगुप्ताचा समकालीन राष्ट्रकूटवंशी राजा देवराज हा होता. याला राष्ट्रकूटांच्या ताम्रपटात देवराज इंद्राची उपमा दिली आहे. कदाचित् इंद्राप्रमाणे हा देवराज विलासलोलुप असेल. याच्या दरबारीच कालिदासाला चंद्रगुप्ताने आपला वकील म्हणून पाठविले होते, असे दिसते. कालिदासाने केलेल्या रिपोर्टात हा कुन्तलेश विलासोपभोगात मग्न झाला असून त्याने तुझ्यावर (म्हणजे विक्रमादित्यावर) आपल्या राज्याच्या संरक्षणाची जबाबदारी टाकली आहे, असे म्हटले आहे व चंद्रगुप्तानेही कालिदासाच्या श्लोकात थोडा फरक करून 'माझ्यावर राज्याचा भार टाकून कुन्तलेश विलासमग्न होवो' असे उत्तर दिले, असे 'काव्यमीमांसा'दि ग्रंथातील उल्लेखांवरून दिसते.

वाकाटक व हे कुन्तलेश राष्ट्रकूट या दोन्ही राजवंशांना चंद्रगुप्ताचा आश्रय असल्याने त्यांच्यामध्ये पुढे स्नेहसंबंध उत्पन्न झाले व त्यांचेच पर्यवसान चंद्रगुप्ताचा पणतू वाकाटक-नृपति नरेन्द्रसेन याचा विवाह कुन्तलेशाची कन्या अज्झितभट्टारिका हिच्याशी होण्यात झाले, असे वाकाटकांच्या बालाघाट येथे सापडलेल्या ताम्रपटावरून दिसते.

* अजंठ्याचा लेख त्रुटित असल्याने पं. भगवानलाल इंद्रजी, डॉ. बुल्हर वगैरेंनी या राजाचे नाव पृथिवीषेण असे वाचले होते. कारण त्यावेळी वाकाटकांच्या दोन शाखा होत्या अशी माहिती उपलब्ध नव्हती. प्रस्तुत लेखकाने अलीकडे हा लेख हैद्राबाद आर्किऑलॉजिकल सीरीज, नं. १४ व 'वाकाटक नृपति आणि त्यांचा काळ', पृ. ३४१–३५६ यामध्ये प्रसिद्ध केला आहे.

कालिदास चंद्रगुप्तकालीन होता, याला आणखीही एक प्रमाण देता येते. 'सेतुबन्ध' किंवा 'रावणवहो' (संस्कृत 'रावणवध') या नावाचे प्राकृत भाषेत लिहिलेले एक मोठे काव्य प्रसिद्ध आहे. याची बाणाने 'हर्षचरिता'च्या प्रास्ताविक श्लोकात स्तुति केली आहे, त्यावरून ते इ. स. च्या सातव्या शतकापूर्वी लिहिले गेले, यात संशय नाही. हे काव्य विक्रमादित्याच्या आज्ञेने प्रवरसेनाकरिता कालिदासाने लिहिले, असे एका टीकाकाराचे विधान वाचकांच्या लक्षात असेलच. तो प्रवरसेन कांश्मीरचा राजा असणे शक्य नाही, हे आपण मागे निश्चित केले आहे. चंद्रगुप्त विक्रमादित्य व वाकाटक (द्वितीय) प्रवरसेन यांचा संबंध लक्षात घेता ते काव्य चंद्रगुप्ताच्या आज्ञेने कालिदासाने लिहिले किंवा निदान तपासले असावे असे वाटते. या काव्याच्या पहिल्या आश्वासाच्या ९ व्या पद्यात हे काव्य राजाने गादीवर आल्यावर लौकरच रचले, असे म्हटले आहे. या श्लोकावर टीका करताना रामदास या टीकाकाराने प्रवरसेन म्हणजे भोजदेव असे कित्येक म्हणतात, असे लिहून ठेवले आहे. विदर्भाच्या राजघराण्यास 'भोज' अशी संज्ञा होती, हे कालिदासाच्या 'रघुवंशा'वरून स्पष्ट आहे. त्यावरून वाकाटक प्रवरसेन हाच त्या काव्याचा कर्ता असून त्या काव्याच्या रचनेत कालिदासाने त्याला मदत केली असावी असे अनुमान करण्यास हरकत नाही.*

कालिदास द्वितीय चंद्रगुप्त विक्रमादित्य याच्या आश्रयास होता, असे मानले तरच त्याच्या ग्रंथांत तत्कालीन राजकीय घटनांचे प्रतिबिंब पडले आहे, असे दाखविता येते. 'मालविकाग्निमित्र' नाटक वाकाटक नृपति द्वितीय रुद्रसेन व चंद्रगुप्तकन्या प्रभावतीगुप्ता यांच्या विवाहप्रसंगी लिहिले असावे. वाकाटकांच्या दरबारी असताना कालिदासाने 'मेघदूत' रचले व 'सेतुबंध' काव्य लिहिले अगर तपासले, असे वर दाखविले आहे. 'विक्रमोर्वशीया'त विक्रमादित्याच्या नावाचा संबंध उघड दिसतो.

---

* 'भरतचरित' या संस्कृत काव्याचा कर्ता कृष्णकवि याने 'सेतुबन्ध' काव्याचा निर्माता (वाकाटक) प्रवरसेन यास कुन्तलेश म्हटले आहे खरे; पण हा कवि प्रवरसेनानंतर कित्येक शतकांनी होऊन गेलेला दिसतो. तत्कालीन लेखांवरून वाकाटकांचे राज्य कुन्तल देशावर होते, असे दिसत नाही. उलट त्यांची कुन्तलेशांशी युद्धे व विवाहसंबंध झाल्याचे कोरीव लेखांत नमूद आहे. म्हणून कृष्ण कवीचे विधान या विवादास्पद बाबतीत प्रमाण मानता येत नाही.

चंद्रगुप्तपुत्र कुमारगुप्त याच्या जन्मोत्सवप्रसंगी 'कुमारसंभव' लिहिले असावे. 'रघुवंशा'तील रघुदिग्विजयवर्णनात कवीला द्वितीय चंद्रगुप्ताचा दिग्विजय अभिप्रेत असावा. अशा प्रकारचा संबंध दुसऱ्या कोणत्याही राजाच्या बाबतीत दाखविता येत नाही, हे ध्यानात ठेवण्यासारखे आहे.

वरील विवेचनावरून कालिदास द्वितीय चंद्रगुप्त विक्रमादित्याच्या आश्रयास होता, हे स्पष्ट होईल. चंद्रगुप्ताने इ. स. ३८० पासून ४१३ पर्यंत राज्य केले. म्हणून **कालिदास चौथ्या शतकाच्या शेवटी व पाचव्या शतकाच्या आरंभी होऊन गेला असावा.**



## प्रकरण दुसरे

# कालिदासकालीन परिस्थिति

**महीतलस्पर्शनमात्रभिन्नमृद्धं हि राज्यं पदमैन्द्रमाहुः ।**

रघुवंश, २, ५०

**मा**गील प्रकरणात आपण कालिदासाचा काळ निश्चित केला. त्या काळी कालिदासासारखा अद्वितीय संस्कृत कवि उत्पन्न होण्यास काय कारणे झाली, ती अजमावण्याकरिता तत्कालीन राजकीय, धार्मिक व सामाजिक परिस्थितीचे थोडक्यात निरीक्षण करू.

परिस्थितीचा थोर लोकांच्या कार्यावर किती परिणाम होतो, याविषयी दोन मते आहेत : कोणी म्हणतात, थोर मनुष्य ईश्वराचे देणे. तो एखाद्या काळच्या परिस्थितीमुळे उत्पन्न झाला, असे मानणेच गैर आहे. पुष्पाचा सुगंध सभोवार पसरण्यास त्याची वेल उद्यानातच वाढली असली पाहिजे, असे थोडेच आहे ! याच्या उलट कित्येक वेळा 'वनलता आपल्या गुणांनी उद्यानलतांना मागे टाकतात', असे कालिदासानेच म्हटले आहे. या म्हणण्यात अगदीच तथ्य नाही असे नाही. श्रेष्ठ मनुष्यात दैवी अंश असतो, असे आपल्या 'भगवद्गीते'तच म्हटले आहे व पुष्कळदा थोर लोक आपल्या गुणांच्या प्रभावाने प्रतिकूल परिस्थितीसही अनुकूल करून घेतात, असे आपण पाहतो. तथापि, त्यांच्या कार्यावर

परिस्थितीचा मुळीच परिणाम घडत नाही, असेही म्हणता येत नाही. अँडिसनने एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे जगात एके ठिकाणी ओझ्याच्या भाराखाली दडपून गेलेला जरत्कारू हमाल दिसतो तर दुसरीकडे एखादा सँडो वारभर कपडा घेऊन बारीक सुईने टाके मारताना दृष्टीस पडतो. तेव्हा प्रत्येक मनुष्यास योग्य ती परिस्थिति मिळत नाही व तिच्या अभावी त्याच्या अंगच्या गुणांचा पूर्ण विकास होत नाही, हेच खरे. अरण्यातील लता आपल्या फुलांनी आसमंतातील भाग सुगंधित करीत असते, पण एखाद्या रसिकाशिवाय तिच्या गुणांचे कौतुक कोण करणार? याच न्यायाने कालिदासाच्या अगोदर त्याच्यापेक्षा कमीजास्त प्रतिभेचे ग्रंथकार झाले नसतील, असे कोणी म्हणावे ? पण ते झाले असल्यास, 'निराश्रया न शोभन्ते पण्डिता वनिता लताः' या सुभाषितात म्हटल्याप्रमाणे त्यांना राजाश्रय मिळाला नसल्यामुळे व जनाभिरुचीचीही त्यांस मदत नसल्या-कारणाने त्यांच्या ग्रंथांची नावेही आज लुप्त झाली आहेत. तेव्हा कालिदासाच्या हातून इतकी उत्कृष्ट ग्रंथरचना होण्यास तत्कालीन परिस्थिति त्याला अनुकूल असली पाहिजे, असे वाटल्यावाचून राहत नाही.

कालिदासकालीन परिस्थितीचे सम्यग्ज्ञान होण्यास तत्पूर्वीच्या कालाचे सिंहावलोकन करणे अवश्य आहे. विश्वसनीय ऐतिहासिक साधनांवरून आपल्या भारतवर्षाचा इतिहास खिस्तपूर्व चौथ्या शतका-पासून स्थूलरूपाने ज्ञात झाला आहे. खिस्तपूर्व ३२७ या वर्षी अलेक्झां-डरने हिंदुस्थानावर स्वारी केली. त्यावेळी उत्तर हिंदुस्थानात नंद राजांचे साम्राज्य भरभराटीत होते. त्यांची राजधानी मगधात पाटलिपुत्र येथे होती. अलेक्झांडर परत गेल्यावर चंद्रगुप्ताने विष्णुगुप्त-चाणक्य या पाताळयंत्री मुत्सद्द्याच्या साह्याने मगधात राज्यक्रान्ति घडवून आणली व ती संधी साधून स्वतः गादी बळकावली. चंद्रगुप्ताने पुढे आपल्या राज्याची उत्तम व्यवस्था लावली व मोठ्या पराक्रमाने सेल्यूकस निकेटर या यवनाधिपतीचा पराभव करून बलुचिस्थान, अफगाणिस्थान व पंजाब हा मुलूख आपल्या राज्यास जोडला. त्याचा मंत्री चाणक्य उर्फ कौटिल्य याचा 'अर्थशास्त्र' या नावाचा राजनीति-विषयक उत्कृष्ट ग्रंथ अलीकडे प्रकाशित झाला आहे. त्यावरून तत्कालीन राजकीय व सामाजिक परिस्थितीची चांगली कल्पना येते.

चंद्रगुप्तानंतर त्याचा मुलगा बिंदुसार व नातू अशोक यांच्या कारकीर्दीत मगध साम्राज्याचा चोहो बाजूस विस्तार झाला. उत्तरेस हिंदुकुश पर्वतापासून दक्षिणेस म्हैसूरपर्यंत व पश्चिमेस बलुचिस्थानपासून पूर्वेस बंगालपर्यंत सर्व प्रदेश अशोकाच्या अंमलाखाली होता. एवढ्या मोठ्या साम्राज्याची व्यवस्थाही अशोकाने चोख ठेवली होती.

अशोकाने आपल्या शिलालेखांत लोकांनी बौद्ध श्रमणांप्रमाणेच ब्राह्मणांस मान द्यावा असे म्हटले आहे. तथापि, त्याच्या कारकीर्दीत संस्कृत विद्येस उत्तेजन मिळालेले दिसत नाही. बौद्धधर्माच्या प्राचीन संप्रदायाप्रमाणे त्याचे लेख तत्कालीन जनपदभाषेत लिहिलेले आहेत. अशोक खिस्तपूर्व २३२ या वर्षी वारला. त्याच्यानंतर त्याचे राज्य सुमारे पन्नास वर्षेच टिकले. खिस्तपूर्व १८५ च्या सुमारास शुंगवंशीय पुष्यमित्राने बृहद्रथ नावाच्या शेवटल्या मौर्य राजास ठार मारून गादी बळकाविली. राज्यासनावर स्थिर झाल्यावर पुष्यमित्राने हिंदुधर्मीयांवर अशोकादि बौद्धधर्मीय राजांनी घातलेली नियंत्रणे काढून घेतली. त्याने स्वत: दोन अश्वमेध केले, असा उल्लेख अयोध्येस सापडलेल्या एका शिलालेखात* आला आहे. त्यावरून त्याने वैदिकधर्मानुयायांस पशुवधात्मक यज्ञयाग करण्यास परवानगी दिली होती, हे दिसून येते. त्याने संस्कृतविद्येस उत्तेजन दिले होते. पतंजलीने आपला 'महाभाष्य' हा व्याकरणावरचा सर्वमान्य ग्रंथ पुष्यमित्राच्याच कारकीर्दीत लिहिला व स्वत: त्याच्या हातून यज्ञ करविला, असा महाभाष्यात उल्लेख आहे.

अशोक हिंदुस्थानात राज्य करीत असता हिंदुकुशाच्या पलीकडे खिस्तपूर्व २५० च्या सुमारास बॅक्ट्रिया येथे ग्रीकांनी एक स्वतंत्र राज्य स्थापले होते. अशोकानंतरचे मौर्य राजे प्रबळ नसल्याने या ग्रीक लोकांनी पूर्वेकडे हातपाय पसरण्यास आरंभ केला व हळूहळू पंजाब व सिंध हे प्रांत घशात घातले. पुष्यमित्राचा अश्वमेधाचा घोडाही यवनसेनेने अडविला होता. पण त्यावेळी पुष्यमित्राचा नातू वसुमित्र याने आपल्या पराक्रमाने यवनांचा पाडाव करून घोडा परत मिळविला, असा कथाभाग 'मालविकाग्निमित्रा'त आला आहे, तो खरा दिसतो.

शुंगांचे राज्य खिस्तपूर्व ७३ च्या सुमारास नाहीसे होऊन त्याच्या

*Epigraphia Indica*, Vol. XX, p. 54.

जागी काण्व हे ब्राह्मण राजे झाले. त्यांनी सुमारे ४५ वर्षे राज्य केल्यावर त्यांचा दक्षिणेच्या सातवाहनांनी पाडाव करून साम्राज्यसत्ता बळकावली. शेवटचे शुंग व काण्व यांच्या राजवटीत हिंदुधर्मास व संस्कृतविद्येस उत्तेजन मिळाले असावे. 'मनुस्मृती'ला सध्याचे स्वरूप याच कालात प्राप्त झाले, असे संशोधकांचे मत आहे. तथापि, एकंदरीत हा काळ फारच धामधुमीचा गेला. कारण या अवधीत शकयवनांच्या अनेक स्वाऱ्या झाल्या, असे गर्गसंहितेतील 'युगपुराणा'वरून दिसते. एकदा तर अम्लात नावाच्या शकाधिपतीने पाटलिपुत्रावर स्वारी केली व ते शहर ताब्यात आल्यावर त्यातील लोकांची सरसहा कत्तल केली व चातुर्वर्ण्याबाहेरचे (शक) लोक आणून त्यांची तेथे वसती केली. शकयवनांच्या स्वाऱ्यांमुळे देशात जी भीषण परिस्थिति उत्पन्न झाली तिचे हृदयद्रावक वर्णन गर्गाचार्यांनी येणेप्रमाणे केले आहे—"या दारुण महायुद्धात राष्ट्रातील सर्व पुरुष कामास आल्यामुळे स्त्रियांना सर्व कामे करावी लागली. त्यांनी नांगर धरले व धनुष्यबाण घेऊन शेतांचे रक्षण केले. जिकडे तिकडे स्त्रिया संघ करून राहू लागल्या. पुरुष इतके दुर्मिळ झाले की, एकेकाला दहा-दहा वीस-वीस स्त्रिया वरू लागल्या. ग्रामांत तसेच नगरांतही स्त्रियाच सर्व व्यवहार पाहू लागल्या. चातुर्वर्ण्याची घडी विस्कटून गेली. शूद्र ब्राह्मणांची कामे करू लागले व जटा-वल्कले धारण करून परिव्राजक म्हणून हिंडू लागले. वैदिक धर्मात परकीयांचा प्रवेश झाला व जिकडे तिकडे दंभाचे साम्राज्य पसरले. गृहस्थाश्रमातील आपत्तीस कंटाळून लोक भराभर संन्यास घेऊ लागले. याच कालात दोन वर्षे अवर्षण पडल्याने मोठा दुष्काळ पडून हजारो लोक मृत्यूमुखी पडले."

गेल्या दोन महायुद्धांनंतर युरोपीय देशातील परिस्थितीचे वर्णन ज्यांनी वाचले आहे, त्यांना गर्गाचार्यांच्या वरील वर्णनात अतिशयोक्ति वाटणार नाही. 'गर्गसंहिता' ह्या ग्रंथात काण्वांच्या राजवटीच्या अखेरीपर्यंतचेच वर्णन आले असल्यामुळे, शेवटच्या काण्व राजाच्या कारकीर्दीच्या अखेरीस तो लिहिला गेला असावा, असे अनुमान होते.*

*See Prof. K. H. Dhruva's article, "Historical Contents of the *Yuga Purāṇa*". *J. B. O. R. S.*, Vol. XXI, pp. 18—66.

तेव्हा त्यांतील हकीकत विश्वसनीय मानण्यास हरकत नाही. परकीयांच्या या स्वाऱ्यांमुळे उत्तर हिंदुस्थानात काही काळ अत्यंत बंडाळी माजून राहिली होती. या अवधीत अनेक हिंदु व जैन ग्रंथांचा नाश झाला असावा. 'पातंजल महाभाष्या 'त प्रसंगोपात्त आलेल्या उताऱ्यांवरून शुंगकाळी काव्यवाङ्मय बरेच समृद्ध असले पाहिजे, असे दिसते. ते सर्व वाङ्मय, तसेच बरेचसे प्राचीन श्रौत व स्मार्त ग्रंथ, पुराणे वगैरेंचा पुढे मागमूसही राहिला नाही. खुद्द 'महाभाष्या 'ची एकही प्रत उत्तरेस उपलब्ध नव्हती. म्हणून चंद्राचार्य या वैयाकरणाने दक्षिणेतून तो ग्रंथ महाप्रयासाने मिळवून त्याचा उत्तरेत प्रचार केला, असे भर्तृहरीच्या 'वाक्यपदी' यात म्हटले आहे.

अशोकाच्या मृत्यूनंतर लौकरच दक्षिणेत सातवाहनांनी आपले स्वातंत्र्य पुकारले. त्यांचा मूळ पुरुष सातवाहन हा होता. त्याच्या वंशातील श्रीशातकर्णीने अश्वमेध यज्ञ केल्याचा नाणेघाटातील कोरीव लेखांत उल्लेख आहे.* याशिवाय या लेखात गवामयन, आप्तोर्याम, गर्गत्रिरात्र इत्यादि श्रौत यज्ञ केल्याचे व त्यावेळी ब्राह्मणांना हजारो गाई, घोडे व कार्षापण (त्या वेळची नाणी) दिल्याचे वर्णन आहे. त्यावरून अशोकाच्या मृत्यूनंतर लौकरच उत्तरेप्रमाणे दक्षिणेतही वैदिकधर्माने राजाश्रयाच्या बळावर डोके वर काढलेले दिसते. उत्तरेत धुमाकूळ घालत असता शकांनी दक्षिणेतही राज्य स्थापण्याचा प्रयत्न केला व काही काळ तो सिद्धीसही गेला. दक्षिणेतील स्वाऱ्यांत भूमक व नहपान या नावांच्या शकांनी पुढाकार घेतला. नहपान पुढे बऱ्याच मोठ्या प्रदेशाचा 'क्षत्रप' किंवा प्रांताधिपति झाला. शिलालेख व नाणी यांवरून नहपानाच्या अंमलाखाली काठेवाड, राजपुतान्याचा काही भाग, माळवा, गुजराथ, उत्तर कोकण, नाशिक व पुणे हे जिल्हे इतका प्रदेश असावा, असे दिसते.

नहपानाने महाराष्ट्रात अंमल बसविला, त्या वेळी सातवाहनांना देशत्याग करावा लागला. पण लौकरच गौतमीपुत्र सातकर्णीने संधी साधून नहपानाच्या वंशजांचा पूर्ण पराभव करून त्याच्या वंशाचा समूळ उच्छेद केला व उज्जनीपर्यंत आपले राज्य पसरविले. गौतमीपुत्राने नहपानाची

* Nanaghat Cave Inscription, *Archaeological Survey of Western India*, Vol. X, pp. 60 ff

नाणी लोकांकडून मागवून घेऊन त्यांवर आपला शिक्का मारून त्यांचा पुनः प्रचार करविला. या वंशात पुढे वासिष्ठीपुत्र पुळुमावि, यज्ञश्री, सातकर्णि वगैरे बरेच राजे होऊन गेले. पुराणांतील गणनेप्रमाणे सातवाहनांनी सुमारे ४५० वर्षे म्हणजे ख्रिस्तपूर्व २२५ पासून ख्रिस्तोत्तर २२५ पर्यंत राज्य केले असावे.

सातवाहन राजे वैदिकधर्मानुयायी होते. नाशिकच्या एका लेखात गौतमीपुत्राला 'क्षत्रियांचा दर्प हरण करणारा' व 'एकब्राह्मण' असे म्हटले आहे, त्यावरून ते ब्राह्मणही असावेत. शकांच्या अमदानीत चाललेल्या चातुर्वर्ण्यसंकराला त्यांनी आळा घातला, असे नाशिकच्या एका लेखावरून दिसते. तथापि, त्यांचा बौद्ध धर्मासही आश्रय होता. गौतमीपुत्र, त्याची माता बालश्री, त्याचा मुलगा पुळुमावि या सर्वांनी बौद्धभिक्षूंकरिता लेणी कोरविली, त्यांच्या चरितार्थाकरिता गाव दान दिले, वगैरे उल्लेख नाशिक व कार्ले येथील लेण्यांत आढळतात. त्यांवरून त्यांच्या कारकीर्दीत दोन्ही धर्मांच्या अनुयायांना समानतेने वागविण्यात येत होते, असे दिसते. सातवाहन राजे वैदिकधर्मानुयायी होते तरी त्यांनी संस्कृत विद्येला आश्रय दिल्याचे दिसत नाही. 'कथासरित्सागरा'त एका सातवाहन राजाला जलविहाराच्या वेळी स्त्रीने उच्चारलेल्या 'मोदकैस्ताडय' (अंगावर पाणी मारू नको) या साध्या वाक्याचा अर्थ कळला नाही, असे म्हटले आहे. राजशेखराच्या 'काव्यमीमांसे'त कुन्तलाधिपति सातवाहनाने आपल्या अन्तःपुरात, प्राकृत भाषाच वापरली पाहिजे, असा सक्त नियम केला होता, असे म्हटले आहे, त्यावरूनही वरील गोष्टीत तथ्य दिसते. शिवाय सातवाहनांचे सर्व लेख प्राकृत भाषेतच आहेत. बौद्धधर्माच्या प्रचारापासून प्रथम पालि व नंतर प्राकृत भाषांना जे महत्त्व आले, ते पुढे गुप्त राजांच्या अमदानीपर्यंत तसेच राहिले.

शकांनंतर उत्तर हिंदुस्थानात प्रथम पल्हवांचे व नंतर कुशाणांचे साम्राज्य पसरले. कुशाणवंशातील कुजूल काडफीसस्, वीम काडफीसस्, कनिष्क, हुविष्क व वासुदेव यांची नावे प्रसिद्ध आहेत. वीम काडफीसस्ने हिंदु धर्म स्वीकारला असे दिसते. कारण त्याच्या नाण्यांवर त्याला 'माहेश्वर' असे म्हटले आहे आणि शिव व नंदी यांच्या आकृतीही

उमटविल्या आहेत. सर्व कुशाण राजांत कनिष्क हा श्रेष्ठ गणला जातो. दक्षिणेत सध्या चालू असलेला शालिवाहन शक हा कनिष्काने इ. स. ७८ या वर्षी सुरू केला, असे बहुतेक विद्वानांचे मत आहे. त्याची नाणी काबूल पासून गाझीपूरपर्यंत सापडतात. एकदा तर त्याने पाटलिपुत्रावर चाल करून तेथील पंडित अश्वघोष यास पकडून आपल्या राजधानीस नेले. दक्षिणेत काठेवाड व माळवा येथे राज्य करणारे क्षत्रप त्याचे अंकित होते, त्यावरून त्याच्या हिंदुस्थानातील राज्यविस्ताराची कल्पना येईल. तो स्वतः बौद्धधर्मीय होता. त्या धर्माच्या प्रसारार्थ त्याने स्तूप बांधले व विद्वान् भिक्षूंची काश्मीरात एक परिषद भरविली. या परिषदेचा अध्यक्ष प्रसिद्ध तत्त्वज्ञ व कवि अश्वघोष हा होता.

ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकाच्या अखेरीस कुशाण साम्राज्याचा ऱ्हास होऊ लागला. त्यानंतर त्यांचे राज्य पाचव्या शतकात हूणांच्या स्वाऱ्या होईपर्यंत पंजाब व काबूल या प्रांतांवरच राहिले होते. दक्षिणेत माळवा व सौराष्ट्र या प्रांतांत शकवंशीय क्षत्रपांनी चौथ्या शतकाच्या अखेरीपर्यंत टिकाव धरला होता. दक्षिणेत सातवाहन साम्राज्याचाही तिसऱ्या शतकाच्या आरंभी अस्त झालेला दिसतो. कुशाण व सातवाहन साम्राज्यें ज्या प्रदेशांत पसरली होती, त्यांत अनेक लहान लहान राज्ये उत्पन्न झाली. ही राज्ये चौथ्या शतकात गुप्तांनी उत्तरेत व वाकाटकांनी दक्षिणेत आपले राज्य पसरीपर्यंत जीव धरून होती, असे गुप्त व वाकाटक यांच्या कोरीव लेखांवरून दिसते.

येथवर केलेल्या ऐतिहासिक सिंहावलोकनावरून ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकापासून ख्रिस्तोत्तर चौथ्या शतकापर्यंतच्या राजकीय स्थितीची वाचकांस कल्पना येईल. शुंगसाम्राज्याच्या अंतापासून गुप्तांच्या उदया-पर्यंत सुमारे चार शतके उत्तर हिंदुस्थानात हिंदुधर्माला व संस्कृतविद्येला कोणी बलाढ्य राजा पुरस्कर्ता मिळाला नाही.* दक्षिणेत महाराष्ट्रातील सातवाहन राजे वैदिकधर्मानुयायी होते तरी त्यांचे लक्ष संस्कृतविद्येकडे

---

* गुप्तराजांच्या उदयापूर्वी सुमारे शंभर वर्षे नागवंशी राजांनी उत्तर हिंदुस्थानात अश्वमेधयज्ञ करून हिंदुधर्माचे पुनरुज्जीवन केले व संस्कृत विद्येला आश्रय दिला, असे डॅ. जायस्वाल म्हणतात (*History of India, 150 to 350 A. D.*, p. 7). हे मत विद्वत्संमत व्हावयाचे आहे.

नव्हते. या काळातले बहुतेक सर्व लेख प्राकृत भाषेत आहेत. नाण्यांवर राजांची नावे व बिरुदे प्राकृत भाषेतच लिहिलेली आढळतात. जनतेतही बौद्ध धर्माचा सर्वत्र प्रसार झाल्याने दानधर्माचा ओघ स्तूप व चैत्ये (देवळे) बांधण्यात, बौद्ध भिक्षूंस राहण्याकरिता लेणी कोरविण्यात आणि स्तूप व लेणी यांना शोभा आणण्याकरिता शिल्पकाम व चित्रकाम करण्यात खर्च झालेला दिसतो. सांची व भरहूत येथील स्तूपांस व कार्ले, नाशिक, अजंठा इत्यादि ठिकाणांच्या लेण्यांत राजेलोकांप्रमाणेच श्रेष्ठी, व्यापारी, सोनार, सुतार, कारकून इत्यादि विविध धंद्यांच्या लोकांनी, तसेच शक-यवनादि परकीयांनीही देणग्या दिलेल्या विद्यमान कोरीव लेखांवरून दिसतात, त्यावरून वरील गोष्ट स्पष्ट होईल.* या काळातील एकही वैदिकधर्मीय देवालय अगर शिल्पकाम अस्तित्वात नाही, यावरूनही हेच अनुमान निघते. या काळातही हिंदुधर्म टिकून राहिला होता व क्वचित् स्थळी त्याला राजाश्रय मिळाला असेल; नाही असे नाही. उदाहरणार्थ, उत्तरेत वीम काडफीसस्ने व माळव्यात रुद्रदामन् यासारख्या क्षत्रपांनी हिंदुधर्म स्वीकारलेला दिसतो व त्यांचा त्यास थोडाफार आश्रयही असावा. विशेषत: क्षत्रपांची राजधानी उज्जैनी येथे संस्कृत विद्येस उत्तेजन मिळत गेले असेल. इ. स. १५० च्या रुद्रदामन्च्या गिरनार येथील शिलालेखा-वरून त्याच्या काळी व्याकरणादि शास्त्रे, संगीतादि कला, गद्यपद्य काव्य-वाङ्मय व तदुपयोगी अलंकारशास्त्र यांचा अभ्यास होत असावा, असे दिसते. क्षत्रपांच्या राज्यातच भास, सौमिल्ल, कविपुत्र इत्यादिकांची नाटके व वात्स्यायनाचे 'कामसूत्र' लिहिले गेले असावे. सर्वसाधारण जनतेचे संस्कृतविद्येकडे लक्ष नव्हते, तरी विद्वानांवर आपल्या लालित्यादि गुणांनी तिने मोहिनी टाकावयास सुरवात केली होती, यात संशय नाही. कारण तसे नसते, तर अश्वघोषासारख्या कट्टर बौद्धधर्मीयाने आपली काव्ये संस्कृतात रचली नसती. 'सौंदरनंद' काव्याच्या अखेरीस 'लोकांचे लक्ष अन्य विषयांकडून काढून मोक्षाकडे लावण्याकरिता, मधांतून कडू औषध द्यावे, त्याप्रमाणे मी हे संस्कृत काव्य रचले आहे', असे त्याने स्पष्ट म्हटले आहे. तथापि, या चारशे वर्षांच्या काळात नाव घेण्यासारखे संस्कृत

*Cf. Dr. Sir R. G. Bhandarkar : *A Peep into the Early History of India* (1920), p. 43.

काव्यनाटकादि ग्रंथ फारसे निर्माण झाले नाहीत. याच्या उलट याच काळात पालि वाङमय भरभराटीस आले व प्राकृततही 'बृहत्कथा'दि ग्रंथ निर्माण झाले. त्यांवरून संस्कृत विद्येला राजाश्रय मिळाल्याची उदाहरणे अपवादात्मकच होत, हे दिसून येईल.

या काळात हिंदुधर्मास विशेष राजाश्रय नव्हता व जनतेतही त्याचा प्रसार बौद्धधर्माच्या मानाने कमी होता. तरी त्यातील विचारी लोक नव्या कालास अनुसरून त्याची पुनर्घटना करण्यात गुंतले होते, असे दिसते. वैदिकधर्माची तत्त्वे सर्वसाधारण लोकांस समजावी म्हणून पूर्वीच्या संक्षिप्त व दुर्बोध सूत्रग्रंथांबद्दल मनुस्मृति, याज्ञवल्क्यस्मृति यांसारख्या स्मृति सुबोध अनुष्टुभ् छंदात लिहिल्या गेल्या. 'महाभारत' व 'रामायण' या ग्रंथांसही सध्याचे रूप याच काळात प्राप्त झाले असावे. बौद्ध व जैन धर्मांचा अहिंसेवर कटाक्ष आहे व ते तत्त्व सर्वमान्य होत आहे, असे पाहून या स्मृतींतही ते तत्त्व मान्य करण्यात आले व पूर्वीच्या हिंसाविधानात्मक वचनांस पुष्कळ अपवाद घालण्यात आले. या काळाच्या आरंभी शिव, कुबेर, अश्विनीकुमार, धर्म, इंद्र, संकर्षण, वासुदेव इत्यादि देवतांची पूजा होत असे, असे कौटिलीय 'अर्थशास्त्र' व नाणेघाटातील सातवाहनांचे शिलालेख * यांवरून दिसते. यांतून पुढे ब्रह्मा, विष्णु व शिव या देवांना प्राधान्य आले. याशिवाय स्कंद, सूर्य इत्यादिकांची पूजाही प्रचारात आली. पूर्वीपासून तत्त्वज्ञान हे वैदिकधर्माचे वैशिष्ट्य होते. उपनिषदांत ईश्वर, जीव व जगत् यांविषयी अनेक ठिकाणी खोल व उद्बोधक विचार विखुरलेले होते, त्यांचा समन्वय करून वेदान्तसूत्रे लिहिली गेली. तसेच सांख्य, योग, न्याय, मीमांसा इत्यादि शास्त्रांची मूलभूत सूत्रे याच काळात निर्माण झाली. हे सर्व वाङमय पाहिले असता बौद्धधर्माशी टक्कर देण्यास वैदिकधर्माने कशी तयारी चालविली होती व राजाश्रयाची संधी सापडताच त्याचा त्याने कसा पाडाव केला, हे ध्यानात येईल.

तिसऱ्या शतकाच्या शेवटी उत्तर हिंदुस्थानात गुप्त व विदर्भात वाकाटक ही घराणी उदयोन्मुख असलेली दृष्टीस पडतात. यांपैकी पहिल्या घराण्याचा संस्थापक महाराज गुप्त हा मगधातील एका संस्थानाचा राजा होता. पहिल्या दोन पिढ्यांत गुप्तांचे राज्य गंगेच्या

*Bühler: Nanaghat Cave Inscription, *A. S. W. I.*, Vol. IX, pp. 60 ff.

काठाकाठाने मगधापासून अयोध्येपर्यंत पसरले होते. महाराज गुप्ताचा नातू पहिला चंद्रगुप्त याने वैशालीच्या लिच्छविकुलोत्पन्न राजकन्येशी विवाह केला. या विवाहाच्या योगाने वैशाली व मगध ही राज्ये एका छत्राखाली आली व त्यामुळे चंद्रगुप्ताचे सामर्थ्य वाढले. पुढे त्याने आसपासची लहान राज्ये जिंकून आपल्या राज्यास जोडली व नंतर 'महाराजाधिराज' ही पदवी धारण केली. आपला व लिच्छवि कुळाचा सन्मान्य संबंध जाहीर करण्याकरिता त्याने स्वतःच्या व पत्नीच्या नावाने सोन्याची नाणी पाडली. त्याने एक नवीन शकही सुरू केला. त्याला पुढे 'गुप्तशक' हे नाव प्राप्त झाले. त्याचा मुलगा समुद्रगुप्त हा त्याच्यापेक्षाही शूर व महत्त्वाकांक्षी निघाला. त्याने उत्तर हिंदुस्थानातील अनेक राजांचा उच्छेद करून त्यांचा प्रदेश आपल्या राज्यास जोडला व दक्षिण हिंदुस्थानातही स्वारी केली. या दिग्विजयानंतर त्याने हरिषेण नामक आपल्या दरबारच्या कवीला आपला पराक्रम गद्यपद्यात्मक काव्यात वर्णन करावयास सांगून ते वर्णन अशोकाच्या शिलास्तंभावर कोरून ठेविले.* तो स्तंभ अद्यापि प्रयागच्या किल्ल्यात आहे व त्यावरील लेख थोडा खराब झाला आहे, तरी त्यावरून त्याच्या दिग्विजयाची पूर्ण कल्पना येते.

समुद्रगुप्त हा हिंदुधर्माचा कट्टा अभिमानी व पुरस्कर्ता होता. त्याने दिग्विजय संपल्यावर अश्वमेध यज्ञ केला व तन्निदर्शक नाणी पाडली. पुष्यमित्र शुंगाच्या कालानंतर जवळ जवळ पाचशे वर्षे उत्तर हिंदुस्थानात एखादा अपवाद वगळल्यास बहुधा कोणी अश्वमेध केल्याचे नमूद नाही. त्यामुळे समुद्रगुप्तास त्याच्या वंशजांच्या लेखात 'चिरोत्सन्नाश्वमेधाहर्ता' असे यथार्थ विशेषण दिले आहे. त्याच्या 'अश्वमेध' नाण्यांवर त्याचे 'अश्वमेधपराक्रमः' हे बिरुद आढळते. समुद्रगुप्त हा मोठा विद्वान्, रसिक व कलाभिज्ञ होता. प्रयागच्या शिलास्तंभावरच्या लेखात "त्याला विद्वानांची संगति फार आवडे, त्याने स्वतः शास्त्रांचे अध्ययन केले होते व आपल्या कुशाग्रबुद्धीने बृहस्पतीस व संगीतनैपुण्याने तुम्बरूस व नारदास लज्जित केले होते, उत्कृष्ट काव्यनिर्मितीमुळे त्याला 'कविराज'

* See Allahabad Stone Pillar Inscription of Samudragupta, (*G. I.*, No.1).

ही पदवी मिळाली होती, हरिषेणादि कवि त्याच्या सांनिध्यात काव्य करण्यास शिकले", असे म्हटले आहे.

समुद्रगुप्त इ. स. ३७५ च्या सुमारास कालवश झाला असावा. त्यानंतर त्याचा पुत्र चंद्रगुप्त विक्रमादित्य गादीवर आला, असे आतापर्यंत समजत असत. पण अलीकडील संशोधनावरून* समुद्रगुप्तानंतर त्याचा मुलगा रामगुप्त ह्याला गादी मिळाली असे दिसते. पंजाब व काबूल येथे राज्य करणाऱ्या कुशाणांनी समुद्रगुप्तापुढे मान वाकविली होती, पण त्याच्या निधनानंतर त्यांनी चळवळ करण्यास सुरवात केली असावी. त्यांचे पारिपत्य करण्याकरिता रामगुप्ताने त्यांच्यावर स्वारी केली. त्याच्याबरोबर त्याचा बंधु चंद्रगुप्त व राणी ध्रुवस्वामिनी ही होती. या स्वारीत त्याला अपयश आले व आपल्या राणीला शत्रूच्या अंतःपुरात पाठवून देण्याच्या अपमानास्पद अटीवर त्याने आपली व आपल्या लोकांची मुक्तता करवून घेतली. त्याचा भाऊ चंद्रगुप्त हा मोठा शूर व कुलाभिमानी होता. त्याला ही अट मुळीच मान्य झाली नाही. पण त्यावेळी शत्रूच्या कचाट्यांत सापडल्यामुळे ती कबूल करण्याशिवाय गत्यंतर नव्हते. तथापि, तो मोठा युक्तिबाज व धैर्यवान् होता. त्याने स्वतः स्त्रीवेष घेऊन व आपल्याबरोबर स्त्रीवेषधारी सैनिक घेऊन शकनृपतीच्या शिबिरात प्रवेश केला आणि संधी साधून त्याला ठार मारले व त्याच्या सेनेचा फडशा उडविला. ध्रुवस्वामिनीला अर्थातच आपल्या भ्याड पतीबद्दल अत्यंत तिरस्कार व चंद्रगुप्ताबद्दल प्रेम वाटू लागले. पुढे चंद्रगुप्ताने आपल्या भावास पदच्युत करून गादी बळकाविली. गुप्तांच्या घराण्यात कर्तृत्ववान् पुरुषासच गादी मिळावी, असा नियम दिसतो. त्यावरून राज्यातील विचारी व प्रबळ मंत्र्यांचेही त्यास साहाय्य असावे असे वाटते. नंतर त्याने ध्रुवस्वामिनीशी विवाह केला. तिजपासून त्याला कुमारगुप्त व गोविंदगुप्त हे पुत्र झाले. त्याची कुबेरनागा नावाची दुसरीही एक राणी होती, तिजपासून त्याला प्रभावतीगुप्ता ही मुलगी झाली.

* डॉ. अ. स. अळतेकर यांच्या *J. B. O. R. S.*, Vol. XIV, p. 223 वरील 'एक नवीन गुप्तराजा' हा लेख व आमचा 'संशोधनमुक्तावलि, सर पहिला' यातील 'रामगुप्ताच्या चरित्रावर नवीन प्रकाश' आणि संशोधन मुक्तावलि, सर ६, मधील 'गुप्तकालीन एक समस्या: रामगुप्त' हे लेख पाहा. आता रामगुप्ताचे तीन मूर्तिलेख विदिशेजवळ सापडले आहेत. (*J. O. I*, Vol. XVII, pp. 247 f.) त्यांवरून या घटनांविषयी मुळीच संशय राहिला नाही.

गादीवर आल्यावर चंद्रगुप्ताने प्रथम उत्तरेतील कुशाण राजाचा पाडाव केला व त्यानंतर माळवा व काठेवाड येथे राज्य करणाऱ्या क्षत्रपांवर चाल केली. हे शकवंशीय क्षत्रप कुशाणवंशीय राजांनी सिंध, काठेवाड व माळवा या प्रांतांवर नेमलेले मूळचे प्रांताधिपति होत. त्यांचे त्या भागात सुमारे सव्वातीनशे वर्षे राज्य चालू होते व शेवटी शेवटी उत्तरेतील त्यांच्या सम्राटांची सत्ता संपुष्टात आल्यावर ते वाह्यत: आपणांस क्षत्रप किंवा महाक्षत्रप म्हणवीत असले तरी एकंदरीत स्वतंत्रच होते. अशा वलिष्ठ शत्रूचा पराजय करण्यास दुसऱ्या एखाद्या प्रबल राज्याच्या साहाय्याची अपेक्षा होती. त्या वेळेस विदर्भात वाकाटक घराणे उदयास आले होते. या घराण्याचा मूळ पुरुष विंध्यशक्ति याचे नाव पुराणात व अजंठ्याच्या एका त्रुटित लेखातही आले आहे. अजंठ्याच्या लेखांत त्याला द्विज म्हटले आहे, त्यावरून सातवाहनांप्रमाणेच वाकाटक हेही ब्राह्मण असावेत. विंध्यशक्ति मगधाच्या महाराज गुप्ताचा समकालीन असावा. त्याचा मुलगा प्रथम प्रवरसेन याने अग्निष्टोम, आप्तोर्याम इत्यादि श्रौतयाग केले होते. पुढे या वंशात पृथिवीषेण या नावाचा महापराक्रमी राजा झाला. तो समुद्रगुप्ताचा समकालीन होता. त्याचे राज्य महाराष्ट्र व विदर्भ या देशांवर पसरलेले दिसते. समुद्रगुप्ताने दक्षिणेतील पूर्व किनाऱ्यालगतचे देश जिंकले, पण पश्चिमेकडील देश पादाक्रांत न करताच तो मागे फिरला. त्यावरून त्याने वाकाटकांशी दोन हात करण्याचे मुद्दाम टाळले असावे, असे दिसते. वाकाटक व क्षत्रप यांची राज्ये एकमेकांस लागून होती, त्यावरून त्यांमध्ये राजनीतीच्या सामान्य तत्त्वाप्रमाणे वितुष्ट असले पाहिजे. तेव्हा चंद्रगुप्ताने वाकाटकांशी स्नेहसंबंध जोडून क्षत्रपांवर चाल केली व त्यांचा पुरा नायनाट केला. राजकारणाने घडून आलेला हा संबंध दृढ करण्याकरिता त्याने आपली मुलगी प्रभावतीगुप्ता पृथिवीषेणाच्या मुलास म्हणजे द्वितीय रुद्रसेन यास दिली. ही गोष्ट इ. स. ३९५ च्या सुमारास घडली असावी, असे नाणी व शिलालेख यांवरून संशोधकांनी अनुमान केले आहे.*

* V. A. Smith, The Vākāṭaka Dynasty of Berar in the Fourth & Fifth Century A. D (*J. R. A. S.* for 1914, p. 317.)

क्षत्रपांचा समूळ उच्छेद केल्यावर काठेवाड व माळवा हे प्रांत चंद्रगुप्ताने आपल्या राज्यास जोडले, उज्जैनी येथे आपली राजधानी नेली व 'विक्रमादित्य' ही पदवी धारण केली. तेव्हापासून उज्जैनीशी विक्रमादित्याचे नाव संलग्न झाले आहे. यानंतर थोड्याच वर्षांनी त्याचा जामात द्वितीय रुद्रसेन हा मरण पावला. त्यावेळी त्याचे दामोदरसेन व दिवाकरसेन उर्फ द्वितीय प्रवरसेन हे मुलगे अल्पवयी होते. म्हणून चंद्रगुप्ताने आपल्या दरबारचे धोरणी व कर्तबगार अधिकारी विदर्भास पाठवून तेथील कारभार चालविण्यास आपल्या मुलीस मदत केली. प्रवरसेन वयात आल्यावर त्यास गादी मिळाली. त्यानंतर तो राज्यकारभार कसा करतो, हे पाहण्यास चंद्रगुप्ताने आपल्या दरबारचा मुत्सद्दी व कवि कालिदास यास विदर्भास पाठविले असे दिसते. या प्रसंगाने कालिदासाचे विदर्भात कांही काळ वास्तव्य झाले असावे.

ह्याप्रमाणे चंद्रगुप्ताचे राज्य सर्व उत्तर हिंदुस्थानभर पसरले होते व दक्षिण हिंदुस्थानातही महाराष्ट्र व विदर्भ यांचा राज्यकारभार त्याच्या तंत्राने चालला होता. त्याच्या विस्तृत साम्राज्यात हिंदुधर्माचा सर्वत्र प्रसार झालेला दिसतो. या वेळेपासून हिंदु देवांस दिलेल्या देणग्यांचे कोरीव लेख दृष्टीस पडतात. अलीकडे प्रसिद्ध झालेल्या मथुरेच्या शिलालेखात एका शैव आचार्याने शिवलिंगाची प्रतिष्ठापना केल्याचा उल्लेख आहे. त्याच्या एका मांडलिकाने विदिशेजवळ उदयगिरि येथे विष्णु व चंडिका यांच्या मूर्ति कोरविलेल्या अद्यापि विद्यमान आहेत. तेथेच दुसऱ्या एका शिलालेखात चंद्रगुप्ताच्या वीरसेन नामक परराष्ट्रमंत्र्याने शिवाच्या पूजेकरिता एक गुहा कोरल्याचा निर्देश आहे. विदर्भात प्रभावतीगुप्तेने रामटेकावर कार्त्तिक शुद्ध द्वादशीस श्रीरामचंद्राच्या पायांजवळ दिलेला ताम्रपट प्रसिद्ध आहे. चंद्रगुप्त व त्याचा जामात रुद्रसेन हे विष्णुभक्त होते, तर चंद्रगुप्ताचा नातू द्वितीय प्रवरसेन हा शिवोपासक होता. या सर्व उल्लेखांवरून चंद्रगुप्ताच्या साम्राज्यात हिंदुधर्माची कशी भरभराट झाली, ते दिसून येते.

चंद्रगुप्त हा स्वत: मोठा विद्वान्, रसिक व संस्कृतविद्येचा अभिमानी होता. उज्जयिनीच्या विद्वत्परिषदेपुढे त्याने कालिदासादि इतर कवींप्रमाणेच स्वत: परीक्षा दिली होती, हे मागील प्रकरणात सांगितलेच आहे.

त्याच्या एका सुवर्णमुद्रेवर त्याला 'रूपकृती' असे म्हटले आहे. त्यावरून त्याने रूपके-(नाटके)-ही लिहिली असावीत असे दिसते. त्याने आपल्या अंत:पुरातही संस्कृत भाषाच उपयोगात आणली पाहिजे, असा नियम केला होता. त्याच्या सुवर्णमुद्रांवर त्याचे श्लोकार्धांत निरनिराळ्या प्रकारे आलंकारिक वर्णन केले आहे. त्यावरूनही त्याचे संस्कृत भाषेवरील प्रेम दिसून येते. संस्कृत विद्येला असा पुरस्कर्ता मिळाल्यावर ती अत्यंत वैभवसंपन्न झाली तर त्यात नवल काय? चंद्रगुप्त विद्वान् लोकांना मोठमोठ्या अधिकारांवर नेमीत असे. त्याचा परराष्ट्रमंत्री कौत्सगोत्रीय वीरसेन शाब हा व्याकरण, अर्थशास्त्र व न्याय यांत निष्णात असून कवीही होता, असे त्याच्या लेखात म्हटले आहे. 'मुद्राराक्षस' नाटकाचा कर्ता विशाखदत्त हाही चंद्रगुप्ताच्या दरबारी होता, असे काही विद्वानांचे मत आहे. या कवीच्या 'देवीचन्द्रगुप्तम्' नावाच्या नाटकातील काही उतारे अलीकडे प्रसिद्ध झाले आहेत, त्यांवरून वर दिलेली रामगुप्ताची हकीकत जुळविली आहे. याशिवाय कामन्दकाचा 'नीतिसार' हा अर्थशास्त्रावरचा ग्रंथ व काही पुराणेही या कालात झाली असावी, असे संशोधकांचे म्हणणे आहे. या कालात स्थापत्य, शिल्पकला, चित्रकला इत्यादि कलाही ऊर्जितावस्थेस आल्या. गुप्तकालीन इमारती अद्यापि क्वचित ठिकाणी दृष्टीस पडतात. उदयगिरि येथे व इतरत्र तत्कालीन शिल्पकलेचे व अजंठ्याच्या लेण्यांत चित्रकलेचे थोडेसे काम अवशिष्ट आहे, त्यावरून या कलांमध्ये तत्कालीन कारागिरांनी किती प्रावीण्य मिळविले होते, याची कल्पना येते.

चंद्रगुप्ताच्या राज्यात सर्वत्र शांतता, सुव्यवस्था व सौराज्य होते, असे तत्कालीन लेखांवरून दिसते. हिंदु, बौद्ध, जैन इत्यादि हिंदुस्थानातील सर्व धर्मांच्या अनुयायांना आपापल्या धर्माच्या आज्ञांप्रमाणे वागण्यास स्वातंत्र्य होते. समुद्रगुप्ताच्या दिग्विजयापासून राज्याचा विस्तार वाढला, अनेक राजांकडून खंडणी येऊ लागली, व्यापाराचे मार्ग खुले झाले, शूर व कर्तबगार मनुष्यांस आपल्या अंगचे गुण दाखविण्यास संधी मिळाली व विद्वानांच्या विद्वत्तेचे चीज होऊ लागले. देशातील सुबत्तेचे प्रतिबिंब तत्कालीन नाण्यांत दिसून येते, असे म्हणतात. चंद्रगुप्ताची सोन्याची नाणी अनेक प्रकारची व विपुल सापडतात, त्यावरून त्याच्या राज्यातील भरभराटीचे

अनुमान करता येते. फा ह्यानने उत्तर हिंदुस्थानात शेकडो मैल प्रवास केला, पण त्याला कोठेही चोरांकडून त्रास झाला नाही ; यावरून चंद्रगुप्ताच्या राज्यातील सुव्यवस्थेची कल्पना येते. 'सर्व लोक सुखी व आनंदी असून गुणोत्कर्षात एकमेकांवर वरचढ करण्याचा प्रयत्न करीत आहेत असे दिसते', असे त्याने लिहून ठेवले आहे. देशात सर्वत्र धर्मशाळा व धर्मार्थ दवाखाने होते व त्यांत अन्नपाण्याची व औषधांची मोफत सोय केली जात असे. राज्यकारभार मोठ्या दक्षतेने चालविण्यात येई व अपराध्यांस शिक्षा सौम्य प्रमाणात दिली जात असे. सारांश, त्या वेळच्या लोकांना आपण रामराज्यात आहो, असे वाटत असल्यास नवल नाही.

या गुप्तकालीन परिस्थितीचे प्रतिबिंब आपणांस कालिदासाच्या काव्यांत पडलेले दिसते. प्रो. कीथ यांनी म्हटल्याप्रमाणे कालिदासाच्या सर्व ग्रंथांत स्वकालीन परिस्थितीविषयी संतोष व समाधान दिसते, ते गुप्तकालीन सार्वत्रिक संपन्नतेचे द्योतक असावे. तसेच त्याच्या ग्रंथांत दिग्विजय, अश्वमेधयाग वगैरेचे जे वर्णन आले आहे, त्यातही तत्कालीन परिस्थिति इतिहासाच्या वाचकांस स्पष्ट दिसते. दिलीप, रघु, राम इत्यादि एकापेक्षा एक गुणाने वरचढ असलेल्या राजर्षींची चरित्रे रसाळवाणीने वर्णन करीत असता कालिदासाच्या मनश्चक्षूपुढे समुद्रगुप्त, चंद्रगुप्त यांसारख्या शूर, धीर, विद्वान्, प्रतिभासंपन्न, रसिक व उदार राजाधिराजर्षींची उदाहरणे असल्यास नवल नाही. वसिष्ठाश्रमाकडे जात असता दिलीपाला ब्राह्मणांना स्वतः दिलेल्या अग्रहार ग्रामांत यज्ञस्तंभ दिसले ; त्याची प्रजा मनूने घालून दिलेल्या मर्यादेपासून एक रेसभरही ढळली नाही ; आपल्याकडे गुरुदक्षिणेकरिता आलेला विद्वान् ब्राह्मण विमुख जाऊ नये म्हणून प्रत्यक्ष कुबेरावर चाल करण्याचा रघूने निश्चय केला ; अतिथीच्या राज्यात व्यापाऱ्यांना नद्या आपल्या घरच्या कूपासारख्या वाटू लागल्या व ते दरीखोऱ्यांतून घरातल्याप्रमाणे निःशंकपणे फिरू लागले ; तसेच खाणींतून रत्ने, शेतांतून उत्कृष्ट पीक व अरण्यांतून हत्ती या रूपांनी पृथिवी स्वरक्षणाबद्दल त्याला मोबदला देऊ लागली ; उज्जयिनीतील दुकानांत कोटयवधि तेजःपुंज मौक्तिकहार, शंख व शिंपले, तसेच हिरवेगार पाचूचे खडे व पोवळी व्यवस्थितपणाने लावलेली पाहून समुद्रात आता केवळ पाणीच शिल्लक राहिले आहे काय, असे कोणालाही वाटत असे ; उज्जैनी

वैभवसंपन्न असल्यामुळे तिला 'विशाला' हे सार्थ नाव प्राप्त झाले होते; आपले सुचरित कमी झाल्यामुळे स्वर्गस्थ लोक तेथे येऊन राहिले व त्यांनी आपली अवशिष्ट पुण्याई खर्चून हा स्वर्गाचा एक रम्य भागच निर्माण केला की काय असे वाटे; विदर्भ सौराज्यामुळे रम्य झाला होता; त्याची राजधानी समृद्ध होती, इत्यादि वर्णने कालिदासाच्या ग्रंथांत वाचताना बहुश्रुत वाचकांस आपण गुप्तकालातच आहो, असे वाटल्यावाचून राहत नाही. कोणत्याही कवीच्या ग्रंथांत, विशेषत: समाजस्थितीच्या वर्णनात, तत्कालीन परिस्थितीचे प्रतिबिंब न कळत पडत असते. तेव्हा कालिदासाच्या ग्रंथांत ते दिसले तर नवल नाही.



प्रकरण तिसरे

## जन्मस्थानाचा वाद

**Others abide our question. Thou art free !**
**We ask and ask--Thou smilest and art still,**
**Outtopping knowledge.***

*--Matthew Arnold.*

कालिदासाच्या कालाविषयीच्या विविध मतांचे परीक्षण करून तो उज्जैनीच्या द्वितीय चंद्रगुप्त–विक्रमादित्याच्या काळी होऊन गेला असावा, असे आपण पहिल्या प्रकरणात निश्चित केले. त्यावरून त्याच्या आयुष्याचा उत्तर भाग उज्जैनीस गेला असावा, हे उघड आहे व याविषयी सर्वांचे ऐकमत्य आहे. तथापि, तो मूळचा कोठला, त्याची जन्मभूमि कोणत्या प्रांतातील, स्वभावत: संस्कारक्षम अशा त्याच्या मनावर कोणत्या प्रदेशातील निसर्गाचा व व्यवहाराचा प्रथम ठसा उमटला, याविषयी संशोधकांनी अनेक मते प्रगट केली आहेत. त्यांचा थोडक्यात विचार करू.

या बाबतीत आपल्या भावनाप्रधान बंगाली बंधूंच्या मताचा प्रथम विचार केला पाहिजे. अखिल भारताला ललामभूत झालेला असा हा कवि आपल्या प्रांतात उत्पन्न झाला, असे ते अभिमानाने प्रतिपादितात. कलकत्त्याला त्यांनी एक कालिदास-संशोधनसमिति स्थापिली आहे व तिच्या

* आंग्लकविसम्राद शेक्सपियरविषयीची ही उक्ति कविकुलगुरु कालिदासासही लागू पडेल.

वतीने दरवर्षी ते आषाढ प्रतिपदेला निबंधवाचन, व्याख्यान, गायन, वादन, इत्यादि कार्यक्रमाने ' कालिदास उत्सव ' साजरा करीत असतात. मूर्शिदाबादेत गड्डा शिगरु या गावी कालिदासाचा जन्म झाला, असे त्यांनी ठरविले असून त्या ठिकाणी त्याचे स्मारक करण्याचा त्यांनी प्रयत्न चालविला आहे. तेथे एक कालिदास-जन्मपीठोत्सव कमिटी स्थापन झाली आहे. तिने एक कालिदास-पाठशाळा चालविली आहे व प्रतिवर्षी सरस्वती-पूजोत्सवाच्या वेळी तेथे साहित्यसम्मेलनाचा व इतर मनोरंजक कार्यक्रम करण्यात येतो. सरकारच्या मदतीने त्यांनी तेथे एक तलाव खोदवून त्याला ' कालिदाससागर ' असे नाव दिले आहे. कालिदासाला तीन स्त्रिया होत्या व त्यांच्या सहवासात तो निरनिराळ्या ठिकाणी राहत होता. विद्युन्माला या आपल्या पत्नीसह व्रक्षानीतला गावी त्याने काही दिवस वास केला ; श्रीपाट दोगाछिया या गावी त्याने आपला द्वितीय संबंध व पुत्राचा विवाह केला, अशा बंगालात अद्यापि दंतकथा प्रचलित आहेत.* दंतकथांचा पुरावा सर्वस्वी विश्वसनीय नसतो, हे आपण मागे पाहिलेच आहे. तेव्हा कालिदास बंगाली होता, हे सिद्ध करण्याकरिता बंगाली संशोधक जी प्रमाणे पुढे आणतात, त्यांचा विचार करणे जरूर आहे.

(१) कवीच्या ' कालिदास ' ह्या नावावरूनच तो बंगाली होता, हे सिद्ध होते. कालिदास हा प्रथम अगदी अडाणी होता, पण पुढे तपश्चर्येने प्रसन्न झालेल्या काली देवीच्या कृपेने तो विद्वान् व प्रतिभासंपन्न कवि झाला व नंतर कालिदास या नावाने प्रसिद्ध झाला, अशी आख्यायिका सर्व प्रांतांच्या प्राचीन परंपरेच्या पंडितांस माहीत आहे. काली देवीची पूजा बंगालात सर्वत्र होते व कालिदास हे नाव अद्यापि बंगालातच पुष्कळ लोक धारण करतात. यावरून कालिदास हा मूळचा बंगालचा, हे सिद्ध होते.

या प्रमाणात विशेष तथ्य दिसत नाही. कालिदास हा एखाद्या देवतेच्या कृपेने एकदम उत्कृष्ट कवि बनला, ही लौकिक समजूत निराधार आहे, हे आम्ही पुढे दाखविणार आहो. शिवाय कालिदास हा काली देवतेचा भक्त होता, असे दिसत नाही. त्याच्या ग्रंथांच्या आरंभी त्या देवतेची स्तुति आढळत नाही. ' ऋतुसंहारा 'दि जे सात ग्रंथ कालिदासाचे म्हणून

* वरील माहिती कालिदाससमितीच्या ' कालिदासजन्मपीठसभार अनुष्ठानपत्र ' या बंगाली चोपड्यावरून घेतली आहे.

सर्वमान्य झाले आहेत, त्यांमध्ये काली देवतेचे वर्णन फक्त एका श्लोकात (कुमार. ७, ३९) व तेही भगवान् शंकर विवाहाकरिता हिमालयगृही जात असताना ती त्यांच्या परिवारात होती म्हणून आले आहे.* त्यावरून कवीने कालिदास हे नाव काली देवतेच्या भक्तीमुळे धारण केले नसून ते त्याच्या मातापितरांनी त्याच्या बालपणी ठेवले होते, हे उघड आहे. इसवी सनाच्या चौथ्या-पाचव्या शतकात काली देवतेची पूजा माळव्यात प्रचलित असावी, असे वाटते. उदयगिरि येथे एका गुहेत द्वादशभुजा देवीची गुप्तकालातील मूर्ति अद्यापि भग्नावस्थेत विद्यमान आहे. तिला डॉ. भांडारकर आदि विद्वान् चंडिका म्हणतात.† काली हे चंडिकेचेच एक रूप होय. उज्जैनीला अद्यापि कालीचे देवालय दृष्टीस पडते. मध्य हिंदुस्थानात काली, चामुण्डा यांसारख्या उग्र देवतांची पूजा कालिदासानंतरही एक-दोन शतके चालू होती, हे सातव्या शतकातील भवभूतीच्या 'मालतीमाधवा'त मालतीला पद्मावतीच्या (सध्याच्या पवायाच्या) स्मशानात काही कापालिकांनी चामुण्डेपुढे बळी देण्याकरिता नेले होते, असा प्रसंग घातला आहे, त्यावरून सिद्ध होईल. तेव्हा कालिदासाचे आईबाप काली देवतेचे उपासक असल्याने त्यांनी कवीचे नाव कालिदास ठेवले, पण कवि स्वतः सौम्यप्रकृति असल्याने कालीभक्त नसून शिवभक्तच होता, असे स्पष्ट दिसते. हिंदुधर्माच्या उत्क्रमणावस्थेच्या त्या काळी माता-पिता एका देवतेचे, तर मुले दुसऱ्या देवतेची उपासक असत, असे दृश्य तत्कालीन इतिहासात दिसते. उदाहरणार्थ, द्वितीय चंद्रगुप्ताची मुलगी प्रभावतीगुप्ता व जावई द्वितीय रुद्रसेन विष्णूचे उपासक होते, तर त्यांचा मुलगा द्वितीय प्रवरसेन हा शिवभक्त होता, यावरूनही वरील गोष्ट सिद्ध होईल. शिवाय कालिदास हे एका लेखकाचे नाव वाकाटक नृपति द्वितीय प्रवरसेन याच्या पट्टन येथे अलीकडे सापडलेल्या ताम्रपटात आले आहे.

(२) कालिदासाने 'मेघदूता'त रामगिरीवर यक्ष 'आषाढस्य प्रथमदिवसे' म्हणजे आषाढाच्या पहिल्या दिवशी मेघ पाहता झाला, असे म्हटले आहे. बंगालात सौर मान प्रचलित असल्याने तेथे चैत्र, वैशाख

* 'कुमारसंभव' ९, ४९, या श्लोकातही पार्वतीचे मनोरंजन करण्याकरिता कालीने विकट नृत्य केले त्याचे वर्णन आहे. पण तो व त्यानंतरचे सर्ग कालिदासाचे नसावेत असे संशोधकांचे मत आहे. याविषयी विवेचन पुढे पाचव्या प्रकरणात केले आहे.

† Dr. Sir R. G. Bhandarkar : *A Peep into the Early History of India*, p. 52.

इत्यादि महिन्यांचे दिवस इंग्रजी महिन्यांच्या तारखांप्रमाणे एकोणतीस ते एकतीसपर्यंत मोजतात. तेथे शुक्ल व कृष्ण हे चान्द्रमासाचे निदर्शक शब्द प्रचलित नाहीत व महिन्याचे तसे दोन पंधरवडेही मानीत नाहीत. कालिदास हा बंगाली होता व म्हणूनच 'आषाढस्य शुक्लपक्षे प्रतिपदि तिथौ' असे न लिहिता 'आषाढस्य प्रथमदिवसे' असे लिहिता झाला. मनुष्य कोठेही राहत असला तरी त्याचे पूर्वसंस्कार लुप्त होत नाहीत. म्हणून कालिदास पुढे माळव्यात किंवा विदर्भात कामानिमित्त राहत असला तरी आपले बंगाली पंचांग विसरला नाही. तो स्वत: उत्तम ज्योतिषी होता. त्याने 'ज्योतिर्विदाभरण' नामक ज्योतिषविषयक सर्वमान्य ग्रंथ लिहिला आहे. तेव्हा त्याला सूर्योदयापासून दुसऱ्या दिवशीच्या सूर्योदयापर्यंतच्या काळास दिवस, आणि चंद्र व सूर्य यांच्या भिन्न गतीमुळे त्यांच्यामध्ये १२ अंश अंतर पडण्यास लागणाऱ्या काळास तिथि म्हणतात, ही साधी गोष्ट माहीत नव्हती, असे म्हणता येत नाही. तेव्हा पक्ष व तिथि यांचा उल्लेख न करता त्याने दिवस या शब्दाचा प्रयोग केला आहे. त्यावरून त्याचे वंगदेशीयत्व सिद्ध होते.

हे प्रमाणही परीक्षणाच्या कसोटीस उतरत नाही. 'मेघदूता'तील वरील श्लोकात कालिदासाला 'आषाढ महिन्याच्या आरंभी' एवढाच अर्थ विवक्षित असल्याने त्याने 'आषाढस्य प्रथमदिवसे' असा प्रयोग केला, असे म्हणता येईल. एखाद्या काव्यात 'शुक्लपक्षे प्रतिपत्तिथौ' यासारख्या प्रयोगाची अपेक्षा करणे बरोबर होणार नाही. दुसरे असे की सध्या कालगणनेच्या ज्या विविध पद्धति हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतांत प्रचलित आहेत, त्या तशाच पूर्वीही कालिदासकाली होत्या, हे प्रथम सिद्ध केले पाहिजे. त्या बाबतीत कोरीव लेखांचा पुरावा अत्यंत विश्वसनीय म्हणून लक्षात घेण्यासारखा आहे. ख्रिस्तपूर्व व ख्रिस्तोत्तर एक दोन शतकांतील महाराष्ट्रात सातवाहनांच्या व क्षत्रपांच्या आणि मथुरेस क्षत्रप व कुशाणवंशीय कनिष्कादि राजांच्या लेखांत मित्या दिलेल्या आढळतात. त्यांवरून असे दिसते की, त्या काळी वर्षाचे ग्रीष्म, वर्षा व हेमन्त हे तीन ऋतु मानीत असत. या ऋतूंचे दक्षिणेत* आठ पक्ष व प्रत्येक पक्षाचे

* 'रञो वासिठिपुतस सिरिपिळुमायिस संवछरे छठे ६ गिम्हपखे पंचमे ५ दिवसे...' हा नाशिकच्या लेण्यातील वासिष्ठीपुत्र श्रीपुळुमायि या सातवाहन राजाच्या लेखातील कालनिर्देश पाहा. (*Ep. Ind.*, Vol. VIII, p. 59).

१५ दिवस व उत्तरेत* चार महिने व प्रत्येक महिन्याचे सुमारे तीस दिवस अशी गणना केली जात असे. त्यावेळी चैत्र, वैशाख इत्यादि नावे फारशी प्रचारात नव्हती. काठेवाड व माळवा येथे शकक्षत्रपांच्या आश्रयाने ज्योतिर्विद्येच्या अभ्यासास उत्तेजन मिळून, चैत्रादि मास, शुक्ल किंवा कृष्ण पक्ष व तिथि ही सध्या हिंदुस्थानात बहुतेक प्रांतांत प्रचलित असलेली कालगणनापद्धति सुरू झाली व ती क्षत्रपांच्या अगदी आरंभीच्या लेखातही दृष्टीस पडते. पुढे हळूहळू इतर प्रांतांत तिचा प्रसार झाला. तथापि, कालिदासकाळी म्हणजे ख्रिस्तोत्तर चौथ्या व पाचव्या शतकात पक्ष व तिथि या शब्दांचाच माळवा व विदर्भ या प्रांतांत सर्रास उपयोग केला जात होता, असे दिसत नाही. उदाहरणार्थ, सांचीच्या द्वितीय चंद्रगुप्ताच्या आम्रकार्द्दव नामक सेनापतीच्या लेखाच्या शेवटी 'सं.९३ भाद्रपद दि. ४' व कुमारगुप्ताच्या कारकोर्दीत कोरलेल्या मानकुवार येथील मूर्तीवर 'संवत् १२९ ज्येष्ठमास दि.१८' असाच कालनिर्देश केला आहे. कालिदासाच्या 'मेघदूता'तील कालाचा उल्लेख अगदी याच तऱ्हेचा आहे. द्वितीय प्रवरसेनाच्या दुदिया गावच्या ताम्रपटात 'संवत्सर २३ वर्षापक्ष ४ दिवस १०' असा उल्लेख केला आहे. त्यावरूनही प्राचीन पद्धति त्या काळी अगदीच प्रचारातून गेली नव्हती, हे उघड आहे. काही लेखांत शुक्ल किंवा कृष्ण पक्षाचा निर्देश असला तरी दिन शब्दाचाच प्रयोग केला आहे तिथीचा नाही.† त्यावरून दिन व तिथि यांमधील जो बारीक भेद बंगाली संशोधक पुढे मांडतात, तो तत्काळी मान्य झाला नव्हता, हे स्पष्ट आहे. तेव्हा 'आषाढस्य प्रथमदिवसे' या वचनावरून कवीच्या वंग-देशीयत्वाबद्दलचे अनुमान योग्य दिसत नाही.

कालिदासाच्या ग्रंथांचे निःपक्षपातीपणाने वाचन केल्यास तो बंगाली होता, असे मानण्यास एकही निश्चित गमक सापडत नाही. जेथे कवि जन्मला, लहानपणी खेळला, वागडला, त्या ठिकाणचे संस्कार त्याच्या मनावर दृढ असावेत, त्या स्थलावर त्याचे विशेष प्रेम असावे, त्याचा उल्लेख त्याच्या ग्रंथांत वरचेवर यावा, अशी आपली अपेक्षा असते. पण कालि-

* 'महाराजस्य काणिष्कस्य सं ३ हे ३ दि २२ एतये पुर्वये' ह्या कनिष्काच्या कारकीर्दीत सारनाथ येथे बौद्धछत्रस्तंभावर कोरलेल्या लेखातील कालनिर्देश पाहा.

† विश्वबर्मन्‌चा गंगधार येथील शिलालेख (*G. I.*, No. 17).

दासाच्या ग्रंथांत बंगालविषयी तसे उल्लेख दिसत नाहीत. म्हणून कालिदास बंगाली होता, असे म्हणता येत नाही.

आता आपण 'कालिदास काश्मीरात जन्मला' या मताकडे वळू. हे मत दिल्ली युनिव्हर्सिटीचे संस्कृतचे प्रोफेसर कै. पंडित लक्ष्मीधर कल्ला यांनी एक स्वतंत्र पुस्तक* लिहून अनेक प्रमाणांनी सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. त्या सर्वांचा येथे विचार करणे शक्य नाही. तथापि, त्यांचे म्हणणे थोडक्यात पुढे मांडून त्याचा विचार करू.

"कालिदासाच्या ग्रंथात हिमालयाचे विस्तृत व सूक्ष्म वर्णन येते, हे सर्वांस माहीत आहे. 'कुमारसंभवा'त हिमालयाच्या वर्णनानेच काव्यास आरंभ झाला आहे; 'मेघदूता'तील यक्षाचे निवासस्थान अलका ही हिमालयावरच होती; 'विक्रमोर्वशीया'त पुरूरवस् व ऊर्वशी यांची प्रथम भेट काश्मीराजवळ गंधमादन पर्वतावर झाली व पुढे ऊर्वशीचा वियोग झाल्यावर राजा त्याच पर्वतावर भटकू लागला; 'रघुवंशा'च्या पहिल्या सर्गात दिलीप वसिष्ठाश्रमास जातो तोही हिमालयावरच; 'शाकुंतला'तील कण्व व मारीच यांचे आश्रम याच पर्वतश्रेष्ठावर कवीने वसविले आहेत; यावरून हिमालयावर त्याचे किती प्रेम होते, ते दिसून येईल. ही सर्व स्थळे काश्मीरात सिंधु नदीच्या खोऱ्यात होती, हे सिद्ध करता येते. उदाहरणार्थ, वसिष्ठाश्रमाजवळ गंगाप्रपात होता; त्या ठिकाणी दिलीप रक्षण करीत असलेल्या वसिष्ठाच्या धेनूवर एका सिंहाने झडप घातली. कालिदासाने त्या सिंहाला 'भूतेश्वरपार्श्ववर्ती' म्हटले आहे. काश्मीरात वरील प्रदेशातील भूतेशतीर्थ प्रसिद्ध आहे. काश्मीरातच सिंधु व मालिनी नद्या, शचीतीर्थ, सोमतीर्थ व ब्रह्मसर ही तीर्थे व शक्रघाट ही सापडतात. आपल्या कथानकाच्या सोयीसाठी शचीतीर्थ व शक्रघाट ही हस्तिनापुराजवळ होती, असें कवीने वर्णिले असले तरी ती नावे त्याला पूर्वपरिचित असल्यामुळेच सुचली असावी. 'रघुवंशा'त (२, ३५) वसिष्ठधेनूवर झडप घालणारा सिंह आपणास निकुंभाचा मित्र म्हणतो. हा निकुंभ कोण, याचा टीकाकारांस उलगडा झाला नाही. पण काश्मीरच्या 'नीलमतपुराणा'त कुबेराने दुष्ट पिशाचांबरोबर युद्ध करून त्यास

* Lachhmidhar Kalla : *The Birth-Place of Kālidāsa* (1926).

काश्मीरातून हाकून देण्याकरिता निकुंभाची योजना केली होती, अशी कथा आली आहे ; त्यावरून कालिदासास काश्मीरच्या प्राचीन कथांचे ज्ञान होते, असे दिसते. काश्मीरच्या काही विशिष्ट रीतीरीवाजांचे व लौकिक समजुतींचेही प्रतिबिंब कालिदासाच्या ग्रंथांत पडलेले दिसते. विवाहप्रसंगी सासूने किंवा दुसऱ्या कोणी सौभाग्यवती स्त्रीने वराच्या मस्तकाला माला बांधावी, असा काश्मीरात रिवाज आहे, हे तद्देशीय विवाहपद्धतीवरून दिसते. 'रघुवंशां'तही इंदुमतीने अजाच्या गळ्यात स्वत: माळ न घालता आपल्या सुनन्दा नामक उपमातेकडून ती घालविली आहे. मासे मारण्याच्या निंद्य वृत्तीमुळे धीवर जातीला काश्मीरात बहिष्कृत मानतात, असे 'ईश्वरप्रत्यभिज्ञाविमर्शिनी' नामक काश्मीरी टीकेत म्हटले आहे. 'शाकुंतला'तही शकुंतलेची अंगठी एका धीवराला सापडते. पुढे त्याला नगररक्षक पकडतात; त्यांपैकी एकजण धीवराच्या धंद्याला उद्देशून 'विशुद्ध इदानीमाजीव:' (मोठा पवित्र धंदा!) असे उद्‌गार काढतो व त्यावर, 'हा माझा पिढीजात धंदा असल्यामुळे निंद्य नाही' अशा अर्थाचे तो धीवर उत्तर करतो. या प्रवेशातही वर सांगितलेली काश्मीरातील समजूतच प्रतिबिंबित झाली आहे. कालिदास काश्मीरी शैव मताचा म्हणजे 'प्रत्यभिज्ञादर्शना'चा अनुयायी होता असे दिसते. या दर्शनात सदाशिव हे एकच सर्वव्यापी तत्त्व मानले आहे. त्याची शिव व शक्ति ही दोन रूपे सृष्टिनिर्माणाकरिता होतात. शक्तीच्या साहाय्याने शिव चराचर सृष्टि उत्पन्न करतो व स्वत:ही नियतीस्तव शक्तीचे आवरण घेऊन जीव बनतो. या आवरणामुळे त्याला स्वत:चे विस्मरण पडते. पुढे गुरूपदेशाने, अध्यात्मदर्शनाभ्यासाने किंवा इतर काही कारणाने जीवाचे आवरण नष्ट झाल्यावर त्याला आपल्या पूर्वस्वभावाची ओळख (प्रत्यभिज्ञा) पटते व नंतर त्याचे परम तत्त्वाशी ऐक्य होते. या तत्त्वज्ञानात एक प्रकारच्या नियतीमुळे जीवास स्वत:च्या सत्यस्वरूपाचे विस्मरण पडते व नंतर काही कारणाने मधला आवरणरूपी पडदा दूर झाल्यावर स्वस्वरूपाचे ज्ञान होते, ही कल्पना मुख्य आहे व ती कालिदासाच्या सर्व नाटकांत आली आहे. उदाहरणार्थ, 'मालविकाग्निमित्र' नाटकात सिद्धादेशामुळे, मालविकेला वर्षभर अज्ञातवासात रहावे लागले. पुढे

तिच्या दासी विदिशेस आल्यावर तिची विदर्भराजकन्या म्हणून सर्वांस ओळख पटली; 'विक्रमोर्वशीया'त ऊर्वशी कुमारवनात गेल्याबरोबर कार्त्तिकेयाच्या शापाने लता झाली, पुढे राजाला संगमनीय मणि मिळाल्यावर त्याच्या योगाने तिला पूर्वरूप प्राप्त झाले; 'शाकुंतला'त दुर्वासाच्या शापाने दुष्यंताला शकुंतलेची विस्मृति पडली, पण अंगठी दिसल्याबरोबर त्याची स्मृति जागृत झाली. या सर्व कथानकांवरून कालिदासाच्या नाटकांवर प्रत्यभिज्ञादर्शनाची कशी छाप बसली आहे, ते दिसून येईल. 'शाकुंतला'च्या भरतवाक्यात शंकराला 'परिगतशक्ति' असे विशेषण मुद्दाम कवीने योजिले आहे. त्यावरून कालिदास काश्मीरी होता हे सिद्ध होते. 'मेघदूतां'त अलका नगरीत यक्षाच्या निवासस्थानाचे वर्णन आले आहे, त्यात कल्पनेच्या पुष्कळ भराऱ्या असल्या तरी कवि आपल्या जन्मस्थानाचे वर्णन करतो आहे, असे स्पष्ट दिसते. अलकानगरी कैलास पर्वतावर होती, असे कवीने वर्णिले आहे. हा कैलास म्हणजे काश्मीरातील हरमुकुटपर्वतच होय. येथे शंकर वास करतात, असे म्हणतात. 'नीलमतपुराणा'त श्रीशंकर प्रयागापासून हरमुकुटपर्वतापर्यंत ज्या मार्गाने गेले त्याचे वर्णन आले आहे. त्यांना वाटेत नैमिषारण्य, गंगाद्वार, कुरुक्षेत्र, विष्णुपद, हंसद्वार व उत्तरमानसतीर्थ, ही स्थाने लागली, असे त्या पुराणात म्हटले आहे. यांपैकी बहुतेक स्थलांचे वर्णन कालिदासाने 'मेघदूता'त यक्षमुखाने केले आहे. त्यावरूनही कवीच्या मनात मेघाला हरमुकुटपर्वतावरच नेण्याचे होते, यात संशय नाही. अलकेतील यक्षाच्या निवासस्थलाचे जे वर्णन आले आहे ते हरमुकुटपर्वताच्या पायथ्याशी वसलेल्या प्राचीन मयग्रामास (म्हणजे सध्याच्या मणिगावास) अक्षरशः लागू पडते. जवळच्या टेकडीवरून सर्व गावाचा देखावा दृष्टीस पडतो. तिच्या पायथ्याशी दगडांनी बांधलेले एक सुंदर सरोवर आहे. त्याला तेथील लोक फार पवित्र मानतात. हीच यक्षाच्या घराजवळची वापी. गावापासून थोड्या अंतरावर मोठमोठ्या शिलांचा संचय आहे, तोच मेघदूतातील कुबेराचा प्रासाद असावा. येथून थोड्या अंतरावर खालच्या बाजूस वसिष्ठाचा आश्रम व भूतेशाचे पवित्र देवालय आहे. गावाच्या 'मयग्राम' या नावावरून पूर्वी येथे यक्षांची वसती असावी. अकराव्या

शतकापर्यंत मयग्राम इतिहासात प्रसिद्ध होते. विविध प्रकारांची पुष्पे, नृत्यगीतादि कला, सुरापान, इत्यादिकांचे जे वर्णन मेघदूतात आले आहे, ते काश्मीरासच लागू पडते; कारण त्या तऱ्हेची काश्मीरची वर्णने कल्हणाची 'राजतरंगिणी', बिल्हणाचे 'विक्रमांकदेवचरित' वगैरे ग्रंथांत येतात. म्हणून आपल्या काळी भरभराटीत असलेल्या मयग्राम या आपल्या जन्मभूमीचे तसे वर्णन कालिदासाने केले असल्यास त्यात आश्चर्य नाही.

इ. स. च्या सहाव्या शतकात हूणांच्या काश्मीरावर स्वाऱ्या झाल्या. त्या काळच्या धांदलीत कालिदासास पत्नी व जन्मभूमि यांचा त्याग करावा लागला व इतर काळच्या काश्मीरी पंडितांप्रमाणे तो राजाश्रयार्थ भटकू लागला. 'ऋतूसंहारा'त विंध्य पर्वताजवळील प्रदेशाची उष्णता कवीला अतिशय तापदायक होऊन त्याला प्रियेची वारंवार आठवण झालेली दिसते. यक्षाची विरहावस्था वर्णन करण्याच्या मिषाने कालिदासाने स्वतःचे वियोगदुःख वर्णिले आहे. यक्षाचे निवासस्थान हीच कवीची जन्मभूमि व ती काश्मीरात होती, हे आम्ही दाखविले आहे. त्यावरून कालिदास काश्मीरी होता, असे आपणांस म्हणता येते."

प्रो. लक्ष्मीधर कल्ला यांनी अनेक प्रमाणांनी आपले मत सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे, पण तो सफल झाला आहे, असे वाटत नाही. वरील मतावर अनेक आक्षेप घेता येतात. प्रथमतः 'कालिदास' हे नाव काश्मीरी दिसत नाही. भामह, रुद्रट, कैयट, जय्यट, मम्मट, कल्हण इत्यादि अनेक काश्मीरी पंडितांची नावे 'राजतरंगिणी' व इतर ग्रंथांवरून आपणांस ज्ञात झाली आहेत. पण 'कालिदासा'सारखे नाव त्या नाममालिकेत आढळत नाही. दुसरे असे की, कालिदास काश्मीरी असता तर कल्हणासारखा चौकस व साक्षेपी ग्रंथकार तसा उल्लेख आपल्या ग्रंथात केल्याशिवाय राहता ना. बिल्हणाच्या जीवनक्रमाचे 'राजतरंगिणी'त जे वर्णन आले आहे, त्यावरूनही वरील गोष्ट सिद्ध होते. शिवाय कालिदासाचे भौगोलिक ज्ञान अतिशय बिनचूक होते, असे त्याच्या ग्रंथांवरून दिसते. हिंदुस्थानच्या सर्व भागांचे—किंबहुना हिंदुस्थानच्या बाहेरच्याही काही प्रदेशांचे—वर्णन 'रघुवंश', 'मेघदूत'

इत्यादि ग्रथांत आले आहे. पण त्यात कोठेही चूक आढळत नाही. उलट प्रत्येक ठिकाणचे वैशिष्टच मोजक्या शब्दात सांगण्याची कालिदासाची हातोटी सर्वांनी वाखाणिली आहे. असा हा कवि काश्मीरातील अप्सरस्तीर्थ, शचीतीर्थ, शक्रावतार ही स्थळे आपल्या कथानकाच्या जरूरीस्तव हस्तिनापुराजवळ आहेत म्हणून दडपून देईल, असे वाटत नाही. ती खरोखरच त्या ठिकाणी असली पाहिजेत, असे वाटल्याशिवाय राहत नाही. शिवाय यांतील काही स्थळे दुसऱ्या ग्रंथांवरून ज्ञात होतात, त्यावरून ती काश्मीरातीलच होत, असे म्हणता येत नाही. उदाहरणार्थ, 'महाभारता'तही कण्वाचा आश्रम मालिनी नदीच्या तीरावर होता, असा उल्लेख आला आहे. कैलास, अलका, मन्दाकिनी यांच्याविषयीच्या ज्या भौगोलिक कल्पना इतर ग्रंथांवरून होतात, त्याच कालिदासाच्या ग्रंथात दिसल्या पाहिजेत. ही स्थले काश्मीरात आहेत असे साधारणत: कोणीही मानीत नाही. कालिदासाच्या ग्रंथांत निर्दिष्ट केलेल्या नद्यांची, तीर्थांची व आश्रमांची नावे 'नीलमतपुराणा'तील काश्मीर वर्णनात आली आहेत. पण ते पुराण इ. स. च्या चौथ्या-पाचव्या शतकाइतके जुने वाटत नाही. उलट 'पद्मपुराणा'प्रमाणेच त्या पुराणानेही व्यक्तींची व स्थलांची नावे कालिदासाच्या ग्रंथांवरून घेतलेली दिसतात.

काश्मीरच्या विशिष्ट रीतीरिवाजांची म्हणून जी उदाहरणे प्रो. कल्ला यांनी दिली आहेत, तीही निर्णायक वाटत नाहीत. 'शाकुंतला'तील वर उल्लेखिलेल्या प्रवेशात धीवरास समाजाने बहिष्कृत केले, असा कोठेही उल्लेख नाही. कालिदासकाली बौद्धमताचा लोकांच्या मनावर इतका पगडा बसला होता की, धीवराचा धंदाही त्यांस हिंसेमुळे निंद्य वाटू लागला होता. म्हणून कालिदासाने स्वकालीन लोकांस जातिप्राप्त कर्मे करण्यात पाप नाही, हे त्या प्रवेशात सांगितले आहे. त्यात काश्मीरातच प्रचलित असलेल्या समजुतीचा उल्लेख पाहणे योग्य होणार नाही.

कालिदासाच्या तत्वज्ञानाचा विचार करताना तो काश्मीरी शैव संप्रदायाचा अनुयायी होता काय, याचा निर्णय करू. सध्या येथे एवढे सांगण्यास हरकत नाही की, ते मत श्रीशंकराचार्यांच्या केवलाद्वैतमताशी

बरेच जुळते. ते त्यांच्या कालानंतर काश्मीरात प्रसार पावले असावे. शिवाय कालिदासाच्या ग्रंथांत ते कोठेही स्पष्टपणे आले नाही. कालिदासाच्या नाटकांत एखाद्या शापाने काही काळ प्रेमी जीवांची ताटातूट व नंतर त्यांचे मीलन होते, ही कल्पना प्रधान आहे, यात शंका नाही. पण ही कल्पना कवीस प्रत्यभिज्ञादर्शनावरून सुचली, असे म्हणण्यास आधार नाही. कारण जशी ही ताटातूट शापमूलक असते, तसेच जीवांची विस्मृतीही शापमूलक असते, असे प्रत्यभिज्ञादर्शन म्हणत नाही. 'शाकुंतला'च्या भरतवाक्यातील 'परिगतशक्ति' या विशेषणाचा 'पार्वतीसहित' असाही अर्थ करता येतो ; त्यावरूनही कवि प्रत्यभिज्ञादर्शनानुयायी अतएव काश्मीरी होता, हे सिद्ध होत नाही.

कोणताही कवि एखादा प्रसंग स्वतः अनुभविल्याखेरीज केवळ कल्पनाशक्तीने त्याचे चित्र काढू शकत नाही हे खरे. पण त्यावरून कालिदासाचे घर अलकेत होते, त्याच्या घरच्या विहिरीच्या पायऱ्या पाचूच्या शिळांनी बनविल्या होत्या, तीत सोन्याची कमळे होती व त्यांचे दांडे वैडूर्याचे होते, असे म्हणणे योग्य होणार नाही. उत्तरमेघात कवीने आपल्या कल्पनाशक्तीस स्वैर सोडून अलकेतील वैभवाचे, सौंदर्याचे व चैनीचे वर्णन उत्कट रीतीने केले आहे. त्यात वस्तुस्थिति पाहणे गैर होईल. आणखी असे की, इ. स. च्या चवथ्या शतकात कालिदासासारखा कवि उत्पन्न होण्यास काश्मीरात तशी परिस्थिति होती, हेही सिद्ध झाले नाही. या सर्व कारणांमुळे कालिदास काश्मीरी होता, हे विधान परीक्षणाच्या कसोटीस उतरत नाही.

कालिदासाने हिंदुस्थानातील अनेक प्रांतांची वर्णने हुबेहुब केली असल्याने प्रत्येक प्रांतास तो आपलाच असे वाटण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, त्याच्या अनेक ग्रंथांत विदर्भाचा संबंध येतो. त्याच्या 'मालविकाग्निमित्र' नाटकात विदर्भराजकन्येच्या प्रेमकथेचे संविधानक आहे. 'मेघदूता'तील रामगिरि म्हणजे रामटेक हे मागे सांगितलेच आहे. 'रघुवंशा'त विदर्भराजकन्या इंदुमती हिचे स्वयंवर व तिच्या निधनानंतर अजाचा शोक ज्यात वर्णिला आहे, ते म्हणजे सहावा व आठवा हे सर्ग उत्कृष्ट गणले जातात. पाचव्या सर्गात 'ऋद्धां विदर्भाधिपराजधानीम्' (५, ४०), 'सौराज्यरम्यानपरो विदर्भान्'

(५, ६०) अशी विदर्भाच्या समृद्धीविषयी व सुराज्याविषयी वचने आली आहेत. कवीने आपले सर्व ग्रंथ वैदर्भी रीतीत लिहून तिला विद्वज्जनांच्या आदरास पात्र केले आहे. यावरून कालिदास वैदर्भ होता, असेही प्रतिपादणे शक्य आहे व एका संशोधकाने तसे प्रतिपादिले आहेही.* तथापि, विदर्भातील कोणत्याही एका भागाची विशेष बारकाईची माहिती त्याने कोठेही दिली नाही. म्हणून विदर्भास त्याच्या जन्मभूमीचा मान देणे योग्य होणार नाही.

कै. म. म. हरप्रसादशास्त्री व प्रो. शि. म. परांजपे यांनी विदिशेजवळच्या बारीक स्थळांचे कालिदासाने वर्णन केले आहे, असे दाखविले आहे. 'ही स्थले एकंदर सहा असून त्यांपैकी नीचैर्गिरि हा एक डोंगर आहे आणि वननदी, निर्विन्ध्या, सिधु, गन्धवती आणि गंभीरा या पाच नद्या आहेत. यापैकी नीचैर्गिरि हा आपल्या नावाप्रमाणे लहानसा व ठेंगणासा डोंगर असावा आणि या पाच नद्या तर बोलून चालून अप्रसिद्धच आहेत. त्यांतील काही हल्लीच्या नकाशातून व जुन्या वर्णनातून क्वचित् सापडतात आणि काही कालिदासाने वर्णिल्या आहेत म्हणून त्या उज्जैनीच्या व विदिशेच्या आसपास कोठे तरी असल्या पाहिजेत असे मानावे लागते.' (साहित्यसंग्रह, भाग १, पृ. ९६). या पर्वतावर व नद्यांवर कालिदासाचे अत्यंत प्रेम होते, असे दिसते व त्यावरून प्रो. परांजपे यांनी कालिदास हा विदिशेचा व म. म. हरप्रसाद शास्त्री यांनी तो मंदसोरचा रहिवासी व यशोधर्मदेवाचा आश्रित असावा, असे प्रतिपादले आहे. पण ते मनास पटत नाही. विदिशा व उज्जैनी यांच्यामधल्या बारीक-सारीक नद्यांचे कालिदासाने वर्णन केले आहे हे खरे ; तथापि, खुद्द विदिशेच्या वर्णनास त्याने सारे दोन-तीनच श्लोक घातले आहेत. तो यशोधर्मदेवाच्या काळापूर्वी शंभर सव्वाशे वर्षे होऊन गेला, असे आपण पहिल्या प्रकरणात ठरविले आहे. कालिदासाच्या काळी विदिशेवर गुप्तांखेरीज दुसऱ्या प्रबळ राजांचे राज्य होते असे दिसत नाही. तेव्हा इतर बऱ्याच स्थलांच्या मानाने कालिदासाने मंदसोर व विदिशा यांचे वर्णन जास्त केले असले तरी त्या वर्णनात मातृभूमीवरच्या प्रेमाची उत्कटता व्यक्त होत नाही.

* F. G. Peterson : A Note on Kālidāsa, *J. R. A. S.*, 1926, p. 726.

पण विदिशेनंतर ज्या नगरीची वाट कवीने यक्षमुखाने मेघास सांगितली आहे, त्या उज्जैनीच्या वर्णनात मात्र तो अगदी तल्लीन झालेला दिसतो. रामटेकाहून कैलासास जाताना विदिशा कदाचित् वाटेवर पडेल ; पण उज्जैनी बरीच दूर पश्चिमेस राहते. म्हणून 'उत्तर दिशेस जाणाऱ्या तुला जरी थोडे वाकडे जावे लागले, तरी मेघा ! उज्जैनीच्या सौधांवर क्षणभर टेकण्यास अनमान करू नको' असा आग्रह यक्ष मेघास करीत आहे. कालिदासाने उज्जैनीच्या वर्णनास पुरे अकरा श्लोक दिले आहेत. या श्लोकांत उज्जैनीच्या अगणित संपत्तीचे, सिप्रा नदीवरून पहाटे वाहणाऱ्या मंजुळ सुगंधि व शीत वायूचे, तेथील निरनिराळ्या स्थलांबद्दल प्रसिद्ध असलेल्या प्राचीन कथांचे, त्या नगरीतील प्रसिद्ध महाकाल नामक शिवाच्या देवालयाचे, देवाच्या सायंकालच्या आरतीच्या वेळी होणाऱ्या वेश्यानृत्याचे व रात्री प्रियकरास भेटण्यास जाणाऱ्या अभिसारिकांचे कवीने इतके सुंदर वर्णन केले आहे की, उज्जैनीचे तत्कालीन स्वरूप वाचकांच्या मनश्चक्षूपुढे पूर्णपणे उभे राहते. इतके विस्तृत वर्णन अलकेशिवाय दुसऱ्या कोणत्याही नगरीचे कवीने केले नाही, हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. अलका ही बोलून चालून स्वर्गीय नगरी. तिचे वर्णन करताना कवीने आपल्या कल्पनाशक्तीस स्वैर सोडले असले तर त्यात आश्चर्य नाही. पण ज्याअर्थी दुसऱ्या कोणत्याही भूलोकच्या नगरीविषयी कालिदासाचे प्रेम इतके उचंबळून येत नाही, त्याअर्थी उज्जैनीसच त्याचे बाळपणापासूनचे दिवस गेले असावेत, हे उघड आहे.



## प्रकरण चौथे

# चरित्रविषयक अनुमाने

लोकोत्तराणां चेतांसि को नु विज्ञातुमर्हति ।

— उत्तररामचरित.

कालिदासाच्या चरित्राविषयी खालील दंतकथा* प्राचीनपरंपराभिज्ञ पंडितांत प्रचलित आहेत—

कालिदास हा एका ब्राह्मणाचा मुलगा होता. तो पाच-सहा महिन्यांचा असताना त्याचे आईबाप वारले व तो पोरका झाला. अशा अवस्थेत दैववशात् तो एका गवळ्याच्या दृष्टीस पडला. त्याने त्याला घरी नेऊन लहानाचा मोठा केले. स्वत: गौरवर्ण व शरीराने सुकुमार असल्याने तो इतर गवळ्यांच्या मुलांत खेळत असला तरी सहज ओळखू येई. तथापि, त्याला मुळीच शिक्षण न मिळाल्यामुळे वयाच्या अठरा वर्षांपर्यंत तो अगदी अडाणी राहिला. जेथे तो रहात होता, त्या नगराच्या राजाला एक अतिशय रूपवती व कलाभिज्ञ अशी मुलगी होती. ती उपवर झाल्यावर तिच्याकरिता राजाने पुष्कळ वर पाहिले. पण त्यांपैकी एकही अखिलशास्त्रकलाविशारद नसल्याने तिला पसंत पडेना.

---

* R. V. Tullu : Traditionary Account of Kālidāsa. (*Ind. Ant.*, Vol. XII, pp. 115-17.)

शेवटी राजाने कंटाळून वरसंशोधनाचे काम प्रधानावर सोपविले. प्रधानाला काही कारणाने राजकन्येचा सूड घ्यावयाचा होता. एकदा तो गच्चीवर बसला असता हा गवळ्याच्या मुलांबरोबर जात असलेला ब्राह्मणकुमार त्याला दिसला. लागलीच त्याला एक युक्ति सुचली. त्याने त्याला आपल्या वाड्यात बोलाविले व आपल्या येथील अत्यंत मौल्यवान् वस्त्रालंकारांनी त्याला भूषित करून व बरोबर अनेक तरुण, शास्त्रीपंडितांचा लवाजमा देऊन राजकन्येला निरोप पाठविला की, काशीचे एक विद्वान् पंडित आले आहेत. तरी त्यांची परीक्षा घेऊन आदरसत्कार करावा. तिच्या अनुमतीने त्याला शिष्यसमुदायासह राजसभेत आणले. तेथील पंडितांनी त्याच्या शिष्यांपुढेच हात टेकले, तेव्हा राजकन्येला त्याची परीक्षा घेण्याची जरूरी वाटली नाही. तो स्वतः गौरकाय व देखणा असल्यामुळे राजकन्येचे त्याच्यावर प्रेम बसले व लौकरच त्यांचा विवाह झाला. पण पुढे दोन-चार दिवसांत त्याचे बिंग बाहेर पडले. तेव्हा त्याला ठार मारण्याचा धाक घालून तिने त्याच्याकडून सर्व वस्तुस्थिति समजून घेतली. त्यावेळी तिला अत्यंत दु:ख झाले. तथापि, विवाह होऊन गेल्यावर काय करणार? नंतर तिने त्याला काली देवीची उपासना करण्यास सांगितले. त्यानेही देवीच्या पायांजवळ धरणे धरले, व ती प्रसन्न होईना तेव्हा स्वतःचा शिरच्छेद करण्यासही तो तयार झाला. त्याची भक्ति व दृढनिश्चय पाहून देवी प्रसन्न झाली व त्याच्या मस्तकावर तिने वरद हस्त ठेविला. तेव्हापासून तो अत्यंत विद्वान् व प्रतिभासंपन्न कवि झाला व 'कालिदास' या नावाने प्रसिद्धि पावला.

कालिदास परत आल्यावर राजकन्येस भेटला. त्या वेळी तिने त्याला 'अस्ति कश्चिद्वाग्विशेषः' (आपल्या वाणीत काही फरक झाला आहे काय?) म्हणून विचारले. यावेळी कालिदासाची वैखरी देवीच्या प्रसादाने पवित्र झाली होती, म्हणून त्याने 'अस्त्युत्तरस्यां दिशि देवतात्मा हिमालयो नाम नगाधिराजः' असा आरंभ करून 'कुमारसंभव', 'कश्चित्कान्ताविरहगुरुणा' इत्यादि प्रकारे 'मेघदूत' व 'वागर्थाविव संपृक्तौ वागर्थप्रतिपत्तये' अशा मंगलाने युक्त असा 'रघुवंश' अशी तीन काव्ये धडाधड म्हणून दाखविली. पुढे त्याचे अनेक ग्रंथ झाले व त्याची कीर्ति

दिगंतरी पसरली. अशा रीतीने आपला भाग्योदय करणाऱ्या राजकन्येस मात्र तो मातृवत् व गुरुवत् मानू लागला. त्यामुळे चिडून जाऊन राजकन्येने तुला स्त्रीच्या हातूनच मृत्यु येईल, असा शाप दिला. तेव्हा-पासून कालिदासाच्या आयुष्याला निराळेच वळण लागले. त्याचा बराच काळ वेश्यांच्या सहवासात जाऊ लागला. एकदा सिंहलद्वीपात आपला मित्र 'जानकीहरण'कर्ता कुमारदास यास भेटण्याकरिता तो गेला असता तेथील वेश्येच्या तोंडून 'कमले कमलोत्पत्तिः श्रूयते न तु दृश्यते' (एका कमळातून दुसरे कमळ निघते असे आम्ही ऐकतो, पण तसे कोठेही दिसत नाही) ह्या श्लोकार्धाच्या पूर्तीकरिता राजाने मोठे बक्षीस लाव-ल्याचे त्यास समजले. त्याने लागलीच 'बाले तव मुखाम्भोजात्क-थमिन्दीवरद्वयम्' (हे बालिके, तुझ्या मुखकमलावर नेत्ररूपी निळी कमळे कशी दिसतात?) असा श्लोकार्ध रचून त्या समस्येची पूर्ति केली. राजाने देऊ केलेल्या बक्षिसाच्या लोभाने वेश्येने कालिदासाला गुप्तपणे ठार मारले. पण कुमारदासास संशय आला म्हणून त्याने दरडावून विचारताच तिने आपला गुन्हा कबूल केला. आपल्या प्रिय मित्राचा अशा रीतीने अंत झाल्याचे समजल्यावर राजाला अतिशय वाईट वाटले व त्याने दुःखाच्या भरात कालिदासाच्या चितेवर स्वतःस जाळून घेतले. कालिदासास जेथे अग्नि दिला, ती जागा अद्यापि सिंहलद्वीपात माटर नावाच्या दक्षिण प्रांतात किरिंदी नदीच्या मुखाजवळ दाखवितात, असे कै. म. म. डॉ. सतीशचंद्र विद्याभूषण यांनी म्हटले आहे.

राजदरबारी असता कालिदासाने आपल्या प्रतिभेने व समस्यापूर्तीने अनेक प्रसंगी पंडितांस व आपल्या आश्रयदात्या विक्रमादित्यास चकित केल्याच्या अनेक आख्यायिका पंडितवर्गास माहीत आहेत. अशा कित्येक आख्यायिका बल्लालकवीने, कालिदास अकराव्या शतकातील दानशूर भोजराजाच्या सभेत होता असे कल्पून, 'भोजप्रबंधा'त दिल्या आहेत. त्यासारख्याच एकदोन येथे देतो—

एकदा एका पंडिताने राजसभेत येऊन 'अम्भोधिर्जलधिः पयोधिरुदधि-र्वारांनिधिर्वारिधिः।' अशी समुद्रवाचक सहा संस्कृत पर्याय शब्द जींत गुंफिले आहेत अशी ओळ म्हटली, व समस्यापूर्ति करण्याबद्दल पंडितांस आव्हान केले. सर्व पंडित स्तब्ध बसले व त्याला जयपत्र मिळणार

इतक्यात कालिदासाने पुढे होऊन खाली दिल्याप्रमाणे श्लोक पुरा केला:–

अम्बा कुप्यति तात मूर्ध्नि विधृता गङ्गेयमुत्सृज्यताम्
विद्वन् षण्मुख सन्ततं मयि रता तस्या गतिः का वद ।
कोपाटोपवशाद्विवृद्धवदनः प्रत्युत्तरं दत्तवान्
अम्भोधिर्जलधिः पयोधिरुदधिर्वारांनिधिर्वारिधिः ।

"एके दिवशी कुमार कार्त्तिकेयाने श्रीशंकरांना म्हटले, 'बाबा, तुम्ही या गंगेला डोक्यावर चढविलेली पाहून आईला फार राग आला आहे. तिला टाकून द्या.' श्रीशंकरांनी उत्तर दिले, 'अरे, पण जी सदैव माझ्यावर प्रेम करते, तिने कोठे जावे?' त्याबरोबर कार्त्तिकेयाला राग येऊन त्याच्या सहाही मुखांतून 'अम्भोधिः जलधिः पयोधिः' इत्यादि प्रकारे सागरवाचक शब्द बाहेर पडले!" या समस्यापूर्तीने तो पंडित खजिल झाला, पण राजास अतिशय आनंद झाला, हे सांगावयास नकोच.

ईश्वरी कृपा नसली तर विद्या संपादन करण्यास अत्यंत श्रम पडतात, हे माहीत असल्याने कालिदास गरीब अज्ञ ब्राह्मणांस राजदरबारी पारितोषिक मिळविण्यास मदत करीत असे. एके प्रसंगी एक ब्राह्मण राजसभेत आला. त्याला पुरुषसूक्ताची पहिलीच ओळ येत होती. तेवढी त्याने सभेत म्हणून दाखविली; पण तेवढ्याने राजा थोडाच संतुष्ट होणार! कालिदास त्या सभेत होता व ब्राह्मणाच्या मुद्रेवरून त्याचे विद्वत्तेचे भांडवल संपुष्टात आलेले त्याने ताडले; पण त्या गरीब ब्राह्मणास साहाय्य करण्याकरिता तो पुढे होऊन म्हणाला—"महाराज! या ब्राह्मणाने आपली मोठ्या खुबीने स्तुति केली आहे. त्याच्या म्हणण्याचा आशय हा—

सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपाद् ।
चलितश्चकितश्छन्नस्तव सैन्ये प्रधावति ॥

"राजा! तुझे सैन्य शत्रूवर चाल करीत असता शेष पृथ्वीच्या भाराने स्वस्थानापासून चळतो, इन्द्र चकित होतो व सूर्य धुळीने झाकला जातो." या श्लोकात कालिदासाने मोठ्या खुबीने यथासंख्य अलंकार साधून राजाकडून त्या गरीब ब्राह्मणास मोठे पारितोषिक मिळवून दिले.

याप्रमाणे नमुन्यादाखल काही दंतकथा व आख्यायिका वर उद्धृत केल्या आहेत, त्यांवरून त्यांची तऱ्हा कळून येईल. अशा आख्यायिकांवर किती विश्वास ठेवावा, याविषयी पहिल्या प्रकरणात (पृ. ३)

आम्ही थोडे विवेचन केले आहे. अशा प्रकारच्या कालिदासचरित्र-विषयक आख्यायिका तिबेटी भिक्षू तारानाथ (खिस्तोत्तर १७ वे शतक) याच्या ग्रंथात प्रथम आढळतात, त्यावरून त्या कालिदासाच्या काळानंतर हजार-बाराशे वर्षांनंतरच्या आहेत, हे दिसून येईल. बाण, अभिनंद, सोड्ढल वगैरेंनी कालिदासप्रशस्तिपर अनेक श्लोक लिहिले आहेत. तथापि, या आख्यायिकांना अनुकूल असा एकही उल्लेख त्यांत सापडत नाही. कालिदास व कुमारदास यांच्या सख्याविषयीचा उल्लेखही सोळाव्या शतकातील एका सीलोनी ग्रंथात प्रथम दिसतो. त्यामुळे तोही विश्वसनीय मानता येत नाही. 'जानकीहरण' कर्ता कुमारदास हा इ. स. ५१७–५२६ मध्ये ज्याने राज्य केले, तो सिंहलद्वीपचा राजा असणे शक्य नाही व त्या कवीचा काळ इ. स. ७००–७५० हा असावा, असे प्रो. कीथ* यांनी अनेक प्रमाणांनी दाखविले आहे. मागे पहिल्या प्रकरणात विविध प्रमाणांवरून कालिदास इ. स. ४०० च्या सुमारास होऊन गेला असावा, असे आपण निश्चित केले आहे. त्यावरूनही वरील आख्यायिकेत काही तथ्य नाही हे दिसून येईल.

विश्वसनीय परंपरागत आख्यायिकांच्या अभावी आपणांस कवीच्या समग्र ग्रंथांचे आलोकन करून तच्चरित्रविषयक माहितीचे कण जमविले पाहिजेत. प्रत्येक ग्रंथकाराच्या विद्वत्तेचे, मतांचे व स्वभावाचे प्रतिबिंब त्याच्या ग्रंथांत पडत असते, हे तत्त्व आता सर्वमान्य झाले आहे. शेक्स-पीयरसारख्या ज्या ग्रंथकारांच्या चरित्राविषयी आपणांस विश्वसनीय माहिती नाही, त्यांच्या ग्रंथांतील विविध प्रकारच्या उल्लेखांवरून अनुमाने करून आपले व वाचकांचे समाधान करण्याचा पाश्चात्य चरित्र-कारांचा संप्रदाय आहे ; त्यास अनुसरून खालील प्रयत्न केला आहे. अशा प्रयत्नाने कवीच्या चरित्रातील विविध प्रसंग ज्ञात होणे शक्य नसते. तसेच कवीचे सर्व ग्रंथ लक्षात न घेता एखाद्या ठिकाणच्या उल्लेखाचा कीस काढून अनुमान करीत गेले तर अंधगजन्यायाने पुष्कळदा फसगत होते. तथापि, या मर्यादा लक्षात ठेवून कवीच्या ग्रंथांचे परीक्षण केले असता पुष्कळ मनोरंजक माहिती मिळेल व ती दंतकथांपेक्षा जास्त विश्वसनीय ठरेल, यात संशय नाही.

* Keith : The Date of Kumāradāsa, *J. R. A. S.*, 1901, pp. 578—582.

कालिदास हा ब्राह्मणकुळात जन्मला होता, यात संशय नाही. गुप्तकालात हिंदुधर्माचे व संस्कृतविद्येचे पुनरुज्जीवन झाले त्या वेळी क्षत्रिय-वैश्यादि इतर जातींचे लोकही संस्कृतविद्येत पारंगत होत असत, असे समुद्रगुप्त, चंद्रगुप्त, हरिषेण इत्यादिकांच्या कवित्वनैपुण्याबद्दल जे कोरीव लेखांत उल्लेख आढळतात, त्यांवरून सिद्ध होते; तथापि, कालिदासाच्या बहुतेक सर्व ग्रंथांत ऋषींची, विद्वान् ब्राह्मणांची व यज्ञकर्त्या यजमानांची शब्दचित्रे आपुलकीच्या भावनेने काढलेली दिसतात व 'शाकुंतला'त त्याने स्वतः वैदिक वृत्तात रचलेला एक श्लोक घातला आहे, त्यांवरून त्याच्या ब्राह्मणजातीविषयी संशय राहत नाही. तो मंदसोरचा रहिवासी असावा, असे कल्पून म. म. हरप्रसाद शास्त्री यांनी तो दसोरा ब्राह्मण असावा असे म्हटले आहे, ते मात्र मान्य करता येत नाही. कारण मंदसोरपेक्षा उज्जैनीशीच त्याचा जास्त संबंध दिसतो, हे आपण मागे पाहिले आहे.

प्राचीन काळी विविध विद्यांचा अभ्यास करण्याकरिता हिंदुस्थानात अनेक ठिकाणी विद्यापीठे होती. पंजाबात तक्षशिला, मगधात नालंदा, काठेवाडात वलभी, माळव्यात उज्जैनी या ठिकाणांच्या विद्यापीठांचे सुंदर वर्णन प्राचीन पालि वाङ्मयात व चिनी यात्रेकरूंच्या प्रवासवर्णनांत आढळते. याशिवाय ठिकठिकाणी विद्वान् ब्राह्मणांनी स्थापिलेली गुरुकुले असत. अशा ठिकाणी वेदवेदांगे, व्याकरणज्योतिषादि शास्त्रे, न्याय-मीमांसादि दर्शने यांचेच केवळ अध्ययन होत नसे, तर सुधामधुर काव्येही निर्माण करण्यास प्रोत्साहन मिळत असे, असे बाणाच्या 'हर्षचरिता-'वरून दिसते. बाण कालिदासानंतर दोन शतकांनी होऊन गेला; तथापि त्याने वर्णिलेली परिस्थिति तत्काली नवीन निर्माण झाली नसून प्राचीन काळापासून चालत आली होती, यात संशय नाही. अशा एखाद्या गुरुकुलात कालिदासाचा अभ्यास झाला असावा, असे वाटते. 'रघुवंशा'च्या पहिल्या सर्गात वसिष्ठाच्या आश्रमाचे कवीने फार सुंदर वर्णन केले आहे. दिलीप राजा आपल्या पत्नीसह सायंकाळी आश्रमात पोचला. त्या वेळी वनातून समिधा, दर्भ व फळे घेऊन तपस्वी आश्रमात परत येत होते; पर्णकुटिकांच्या द्वारांजवळ ऋषिपत्नी हरिणांपुढे नीवाराचे दाणे टाकीत होत्या व ती हरिणेही त्यांच्या सभोवती

अपत्यांप्रमाणे उड्या मारीत होती ; ऋषिकन्या वृक्षांच्या आलवालांत पाणी ओतून पक्ष्यांनी ते निःशंक प्यावे म्हणून दूर जात होत्या; अंगणात नीवार धान्याच्या राशी केल्या होत्या व जवळच हरिणे रवंथ करीत बसली होती; सायंकाळच्या यज्ञकर्मात अग्नीस अर्पिलेल्या हविर्भागाचा सुगंध जिकडे तिकडे पसरला होता इत्यादि दृश्य त्याच्या दृष्टीस पडले. नंतर रात्री दर्भाच्या बिछान्यावर तो निजला व पहाटे वसिष्ठ-शिष्यांच्या अध्ययनघोषाने तो जागृत झाला, असे कवीने वर्णिले आहे. याच काव्याच्या पाचव्या सर्गातही वरतंतूच्या, 'शाकुंतला'त कण्व व मारीच यांच्या व 'विक्रमोर्वशीया'त च्यवनाच्या आश्रमाचे जे मनोहर वर्णन आले आहे, त्यावरून तत्कालीन आश्रमांतील व्यवस्था, नियम व अभ्यासक्रम यांचा कवीस चांगला परिचय होता, असे दिसते.

अशा गुरुकुलात चौदा विद्यांचा अभ्यास होत असे, असे कालिदासाने म्हटले आहे. त्या विद्या 'याज्ञवल्क्यस्मृती'त येणेप्रमाणे सांगितल्या आहेत——

पुराणन्यायमीमांसाधर्मशास्त्राङ्गमिश्रिताः।
वेदाः स्थानानि विद्यानां धर्मस्य च चतुर्दश ॥

'चार वेद, शिक्षाव्याकरणादि सहा अंगे, पुराण, न्याय, मीमांसा व धर्मशास्त्र या चौदांना विद्या अशी संज्ञा आहे व हीच धर्माचीही मूलस्थाने होत.' कवीने श्रुति, स्मृति, इतिहास, पुराण, दर्शने, शैवपांचरात्रादि मते, अर्थशास्त्र, कामशास्त्र व नाट्यशास्त्र ही राजसिद्धान्तत्रयी, निरनिराळ्या देशांतील लोकव्यवहार, यांशिवाय धनुर्वेद, रत्नपरीक्षा, योगशास्त्र इत्यादि विषयांचा अभ्यास करावा, असे प्राचीन आचार्यांचे मत राज-शेखराने उद्धृत केले आहे (काव्यमीमांसा, अ. ८). कालिदासाने यांपैकी बहुतेक विषयांचे मार्मिक अध्ययन केले होते, असे त्याच्या ग्रंथांतील उल्लेखांवरून दाखविता येते.

या उल्लेखांचा विचार करण्यापूर्वी एक-दोन गोष्टी लक्षात ठेवणे जरूर आहे. वर निर्दिष्ट केलेल्या विषयांपैकी कोणत्याही विषयावर कालि-दासाने एखादा स्वतंत्र ग्रंथ लिहिला नाही किंवा एखादा संस्कृत वाङ्मयाचा इतिहास लिहून त्यात त्या सर्वांचा परामर्श घेतला नाही. या विषयांचे उल्लेख कथानक वर्णन करण्याच्या ओघात, उपमादि अलंकारांच्या

प्रयोगात किंवा पात्रांच्या संभाषणात सहजगत्या आलेले, अत एव तुरळक आहेत. कालिदास अतिशय विद्वान् असला तरी विनयशील होता; म्हणून त्याने कोठेही आपले पांडित्य दाखविण्याचा प्रयत्न केला नाही. तथापि, त्याची ग्रंथसामग्री विविधविषयप्रचुर असल्याने तीत अनेक विषयांचे उल्लेख कमीजास्त प्रमाणांत येतात व त्यांयोगे त्या त्या विषयांचे त्याचे ज्ञान अजमावता येते.

कालिदासाचे शिक्षण एखाद्या गुरुकुलात झाले असल्यास त्याने एक किंवा अनेक वेदांचा अभ्यास केला असला पाहिजे. 'ऋग्वेदा'चा व त्याच्या उदात्तादि स्वरांचा उल्लेख 'कुमारसंभव' (२,१२) व 'रघुवंश' (१५, ७६) यांत आला आहे. 'यजुर्वेदा'तील अश्वमेधयज्ञाचा 'मालविकाग्निमित्रा'त व राज्यरक्षणार्थ उपयोगी पडणाऱ्या 'अथर्ववेदा'च्या मंत्रांचा उल्लेख 'रघुवंशा'त आला आहे. कालिदासाला 'विक्रमोर्वशीय' नाटकाचे संविधानक 'ऋग्वेद' (१०, ९५) व 'शतपथ ब्राह्मण' (५,१-२) यांवरून सुचले असावे. त्याने योजिलेल्या काही उपमांवरूनही त्याचा ब्राह्मणग्रंथांशी परिचय दिसून येतो. दिलीपाची राणी सुदक्षिणा ही यज्ञपत्नी जी दक्षिणा तिच्यासारखी होती (रघु. १, ३१) ही कल्पना 'यज्ञो गन्धर्वस्तस्य दक्षिणा अप्सरसः' या ब्राह्मणवाक्यावरून सुचलेली दिसते. 'परमेश्वराने जलात स्ववीर्य टाकले व त्यापासून चराचर सृष्टि उत्पन्न झाली' ही कल्पना व 'सृष्टि उत्पन्न करण्याकरिता परमेश्वराने स्त्री-पुरुषात्मक रूपे धारण केली' ही 'कुमारसंभवा'तील कल्पना कालिदासाने ब्राह्मणग्रंथांतून किंवा 'मनुस्मृती'तून घेतली असावी. तथापि, एकंदरीत कर्मकांडापेक्षा ज्ञानकांडाकडेच कवीचा जास्त ओढा दिसतो. उपनिषदातील अध्यात्मविद्येनेच तिन्ही वेद शोभतात, असे त्याने 'मालविकाग्निमित्रा'त म्हटले आहे. 'कुमारसंभवा'तील ब्रह्मदेव व शिव आणि 'रघुवंशा'तील विष्णु यांची वर्णने उपनिषदांच्या अभ्यासाने निश्चित झालेल्या त्याच्या एकेश्वरमताची निदर्शक आहेत. 'द्रवः संघातकठिनः स्थूलः सूक्ष्मो लघुर्गुरुः। व्यक्तो व्यक्तेतरश्चासि' इत्यादि परस्परविरोधी विशेषणांनी केलेली ब्रह्मदेवाची स्तुति वाचताना 'अस्थूलमनणु, अह्रस्वमदीर्घम्' इत्यादि उपनिषदांतील वचनांची आठवण होते. उपनिषदांतील परम तत्त्व जे ब्रह्म त्याचाही एके ठिकाणी उल्लेख

आला आहे (कुमार. ३, १५). कालिदासाने भगवद्गीतेचा चांगलाच अभ्यास केलेला दिसतो. तीतील अक्षर, क्षेत्र व क्षेत्रज्ञ या संज्ञा, समाधीत चित्त नियमन करणारा योगी निवांत स्थलीच्या दीपाप्रमाणे असतो, ही उपमा, व स्थावर सृष्टीत हिमालय ही परमेश्वराची विभूति आहे, ही कल्पना, या सर्वांचा कवीने 'कुमारसंभवा'त उपयोग केला आहे (कुमार. ३, ५०; ६, ७७; ३, ४८ इ.).

यांशिवाय भारतीय तत्त्वज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांचाही त्याने अभ्यास केला होता. सर्व सृष्टीत एकच तत्त्व भरलेले आहे, ब्रह्मा, विष्णु व शिव ही त्याची निरनिराळी रूपे होत, ही वेदान्ताची कल्पना त्याच्या सर्व ग्रंथांत आढळते. पुरुष (आत्मा) हा उदासीन आहे, सृष्टीत सर्वत्र दिसणारी प्रवृत्ति ही प्रकृतीची होय, हा सांख्यांचा सिद्धान्त 'कुमारसंभवा'त (२, १३) उल्लेखिला आहे. पण द्वैतवादी सांख्यांचे हे मत कवीस पसंत नसल्याने प्रकृति व पुरुष ही दोन्ही तत्त्वे परमेश्वराचीच रूपे होत, अशी मुरड त्याने त्यास दिली आहे. योगाचा तर कालिदासास चांगलाच परिचय दिसतो. 'कुमारसंभवा'च्या तृतीय सर्गात ध्यानस्थ बसलेल्या श्रीशंकराचे वर्णन कवीने तीन श्लोकांत सविस्तर व सुंदर रीतीने केले आहे, व पुढे एका श्लोकात (३, ५८) योगाने आपल्या हृदयातील परमात्म्याचे दर्शन होते, असे सुचविले आहे. पर्यङ्कबन्ध (कुमार. ३, ४५), वीरासन (रघु. १३, ५२) इत्यादि योगासनांचाही कवीने काही ठिकाणी निर्देश केला आहे. न्याय व वैशेषिक या तत्त्वज्ञानांच्या पारिभाषिक संज्ञांचा उपयोग करण्याचा कोठे प्रसंग आला नाही ; तथापि, त्यांचेही ज्ञान कवीस होते यात संशय नाही ; कारण 'रघुवंशा'त एके ठिकाणी (१३, १) 'शब्द आकाशाचा गुण आहे', या वैशेषिकांच्या मताचा त्याने उल्लेख केला आहे.

कालिदासाने ठिकठिकाणी स्मृतींतील विविध विषयांचा उल्लेख केला आहे. स्मृति ही श्रुतीस अनुसरते म्हणून प्रमाण, असे त्याने एका उपमेत सुचविले आहे (रघु. २, २). 'कुमारसंभवा'तील शिवपार्वतीच्या व 'रघुवंशा'तील अज-इंदुमतीच्या विवाहाचे वर्णन गृह्यसूत्रांस अनुसरून आहे. विवाहानंतर निदान तीन रात्रींपर्यंत दंपतींनी ब्रह्मचर्याने रहावे व भूमीवर आपली शय्या घालावी, असा जो गृह्यसूत्रांत नियम आढळतो,

तदनुसार श्रीशंकरांनी आचरण केले, असे कवीने वर्णिले आहे (कुमार. ७, ९४). 'मनुस्मृती'त घालून दिलेल्या नियमांप्रमाणे दिलीपाची प्रजा वागत होती (रघु. १, १७), धर्मशास्त्रांतील नियमांस अनुसरून बिनवारसा मनुष्याची संपत्ति राजाकडे जाते (शाकुं. ६), इत्यादि विधानांवरून कालिदासाने 'मनुस्मृती'सारख्या धर्मशास्त्रांचा अभ्यास केला होता, असे दिसते. याशिवाय त्याने व्याकरण, अर्थशास्त्र, कामशास्त्र इत्यादिकांचाही सूक्ष्म अभ्यास केला होता. 'कुमारसंभवा'तील 'पुराणस्य कवेस्तस्य' (२, १७) या श्लोकातील 'चतुष्टयी शब्दानां प्रवृत्तिः' हा शब्दप्रयोग त्याने 'पातंजलमहाभाष्या'वरून घेतला आहे. कालिदासाने ठिकठिकाणी उमा, रघु, अज, चंद्र, तपन, शतक्रतु इत्यादि नावांची व्युत्पत्ति दिली आहे व काही सुंदर व्याकरणविषयक उपमा योजिल्या आहेत, त्यांवरून त्याचा व्याकरणशास्त्राचा व्यासंग प्रत्ययास येतो. विक्रमादित्याने कालिदासास आपला वकील म्हणून राष्ट्रकूटांच्या दरबारी पाठविले होते, हे आपण पूर्वी पाहिलेच आहे. अर्थात् त्याचा राजकारणाचा चांगलाच अभ्यास असावा. त्याच्या ग्रंथांवरूनही तीच गोष्ट सिद्ध होते. 'मालविकाग्निमित्रा'त 'गादीवर नुकताच बसलेल्या शत्रूचा उच्छेद करणे सोपे जाते,' याविषयी एका तंत्रकाराचे वचन कवीने उद्धृत केले आहे व 'कुमारसंभवा'त (३, ६) 'शुक्रनीती'-चा स्पष्ट निर्देश केला आहे. सप्ताङ्ग, यातव्य, प्रकृति, प्रशमन, मूल, प्रत्यन्त, पार्ष्णि इत्यादि अर्थशास्त्रातच येणाऱ्या अनेक पारिभाषिक संज्ञा कवीने ठिकठिकाणी योजिल्या आहेत. 'रघु हा धर्मविजयी होता', 'सुह्म देशाच्या लोकांनी वैतसी वृत्तीचा अवलंब करून आपले प्राण वाचविले', 'विदर्भाचा राजा अग्निमित्राचा प्रकृत्यमित्र (स्वभावशत्रु) होता' इत्यादि विधानांत कालिदासाचे अर्थशास्त्राचे ज्ञान स्पष्टपणे दिसून येते. दिवस व रात्र यांच्या निरनिराळ्या भागांत राजाने कसे आचरण ठेवावे, याविषयी अर्थशास्त्रकारांनी नियम घालून दिले आहेत, त्यांप्रमाणे अतिथि राजा वागत असे, असे 'रघुवंशा'त म्हटले आहे. अर्थशास्त्रात सांगितल्याप्रमाणे अग्निमित्र, पुरूरवस् व दुष्यंत यांची अमात्यपरिषद होती व तिच्या सल्ल्याने ते राजे राज्यकारभार करीत असत ; पूरूरवस् राजाच्या राजधानीतील व्यवस्था 'नागरक' पाहत

असे, असे कालिदासाने दाखविले आहे. कालिदासाचे राजकारणातील ध्येय अत्यंत उच्च होते, हे त्याने दुष्यंत, दिलीप, रघु, अतिथि वगैरे राजर्षींची जी उदात्त चित्रे रंगविली आहेत, त्यांवरून स्पष्ट आहे. तथापि, त्याचा विचार पुढे स्वतंत्र प्रकरणात करणे योग्य होईल.

अर्थशास्त्राप्रमाणे कामशास्त्राचाही कवीने सूक्ष्म अभ्यास केला होता. मागे पहिल्या प्रकरणात कण्व मुनीने शकुंतलेला केलेल्या उपदेशातील बहुतेक कल्पना कालिदासाने वात्स्यायनाच्या 'कामसूत्रा'तून घेतल्या आहेत, हे दाखविले आहे. किंबहुना, 'शाकुंतला'च्या पहिल्या अंकातील दुष्यंत व शकुंतलेच्या सख्या यांच्यामधील संभाषणाचा रमणीय प्रसंग वात्स्यायनाच्या 'कामसूत्रा'तील 'कन्यासंप्रयुक्तक' नामक अधिकरणावरून कवीस सुचला असावा. त्या अधिकरणात लज्जापरवश तरुणीने प्रियकराशी कसे बोलावे, हे वात्स्यायनाने सांगितले आहे (कामसूत्र, पृ. २०२-३). "तिने आपल्या सखीच्या द्वारा भाषणास आरंभ करावा, ते चालू असता खाली मान घालून हसावे, तिने अतिशयोक्ति केल्यास तिच्यावर रागवावे, सखीने 'हिने मला असे सांगितले' असे बळेच म्हणावे, त्यावर तिने तिचा निषेध करावा, प्रियकराने उत्तराची याचना केली तरी बोलू नये, बोललीच तर मला हे मुळीच माहीत नाही, अशा अर्थाचे अस्पष्ट बोलावे, प्रियकराकडे पाहून स्मित करावे व कटाक्ष फेकावे." या उताऱ्यात दिलेल्या सूचनांचा कालिदासाने वरील प्रसंगी चांगलाच उपयोग केला आहे. विवाहप्रसंगी पार्वतीचे करग्रहण करताना शिवाच्या हाताला घाम सुटला व पार्वतीच्या अंगावर रोमांच उभे राहिले, असे कालिदासाने वर्णिले आहे, ते 'कामसूत्रा'तील प्रथम संगमाच्या वर्णनास अनुसरून नाही हे खरे. तथापि, विस्मृतीमुळे कवीच्या हातून ही चूक घडली असावी. पुढे ती लक्षात येताच 'रघुवंशा'त 'कामसूत्रा'तल्याप्रमाणे अज-इंदुमतीची अवस्था त्याने वर्णिली आहे. 'कामसूत्रा'त नगरात राहणाऱ्या विलासी व दाक्षिण्यसंपन्न नागरकांचे सविस्तर वर्णन आले आहे. त्याला अनुलक्षून कवीने 'साधु, आर्य! नागरकोऽसि।' 'अन्यसंक्रान्तप्रेमाणो नागरका अधिकं दक्षिणा भवन्ति।' असे 'विक्रमोर्वशीया'त व 'नागरकवृत्त्या शान्तयैनाम्'

असे 'शाकुंतला 'त म्हटले आहे. अग्निमित्राच्या प्रेमसंबंधात मदत करणाऱ्या विदूषकास इरावती राणी 'कामतंत्रसचिव' ही पदवी बहाल करते, त्यावरूनही कवीस कामशास्त्राची चांगली माहिती होती, हे दिसून येईल.

'शाकुंतला 'दि उत्कृष्ट नाटके निर्माण करणाऱ्या कवीने नाट्यशास्त्राचा उत्तम अभ्यास केला होता, हे सांगण्याची आवश्यकता नाही. आद्य नाट्यशास्त्रकार भरतमुनीने अष्टरसात्मक 'लक्ष्मीस्वयंवर' नामक नाटकाचा प्रयोग स्वर्गात अप्सरांकडून करविला होता. त्या वेळी उर्वशीने संभाषणात एक अक्षम्य चूक केली व त्यामुळे तिला मुनीने शाप दिला, असा प्रसंग 'विक्रमोर्वशीया 'त (अंक ३) आला आहे, त्या ठिकाणी संधि, वृत्ति, रस, राग इत्यादि पारिभाषिक संज्ञांचा कवीने उपयोग केला आहे. नाटकांप्रमाणे साभिनय गायनयुक्त नृत्यही त्याला चांगलेच अवगत होते, हे 'मालविकाग्निमित्रा 'च्या पहिल्या अंकावरून स्पष्ट दिसते. त्या प्रसंगी छलिक, भाविक, पंचांगाभिनय वगैरे संज्ञा कवीने योजिल्या आहेत.

याशिवाय ज्योति:शास्त्र, आयुर्वेद व धनुर्वेद हेही विषय कवीने उत्तम प्रकारे अभ्यासिले होते, असे म्हणता येते. जामित्र, उच्चसंस्थ (कुमार. ७, १; रघु. ३, १३) इत्यादि संज्ञांवरून त्याचे ग्रहज्योतिषाचे ज्ञान दिसून येते, तर 'तारकासुर हा धूमकेतूप्रमाणे लोकांच्या नाशास उत्पन्न झाला' (कुमार. २, ३२), 'शत्रूवर चाल करणारा राजा शुक्रयुक्त दिशा वर्ज्य करतो, त्याप्रमाणे मदन नन्दीची नजर चुकवून शिवाच्या तपोवनात प्रवेश करता झाला' (कुमार. ३, ४३), 'चंद्राचा उत्तरफल्गुनी नक्षत्राशी योग असता मैत्र मुहूर्तावर सौभाग्यवती व पुत्रवती स्त्रियांनी पार्वतीची वेणीफणी केली' (कुमार. ७, ६), 'मंगळ वक्री गतीने पूर्व राशीवर येतो त्याप्रमाणे राणी इरावती कदाचित् परत येईल' (माल. ३) इत्यादि विधानांवरून त्याला फलज्योतिषही अवगत होते, हे उघड आहे. रात्रीच्या प्रशांत काळी चंद्र व तारका यांच्याकडे पहात बसण्याचा त्याला नाद असावा; नाही तर 'एष चित्रलेखाद्वितीयामुर्वशीं गृहीत्वा विशाखासमीपगत इव चन्द्रः उपस्थितो राजर्षिः' (विक्र. १), 'किमत्र चित्रं यदि विशाखे शशाङ्कलेखाममनुवर्तेते' (शाकु. ३) यांसारख्या सुंदर उपमा व दृष्टांत त्याला

सुचले नसते. वैद्यकशास्त्रातील प्रमेयांचा व उपायांचा त्याने ठिकठिकाणी उपयोग केला आहे. 'भोजनाची वेळ टळली तर दोष उत्पन्न होतो असे वैद्य म्हणतात,' (माल. १), 'मित्रा! मद्यपानास कंटाळलेल्यास खडी-साखर मिळावी त्याप्रकारे ही मालविका तुझ्या दृष्टीस पडत आहे' (माल. ३) यांसारख्या विदूषकाच्या नर्मगर्भ उक्तींत व 'प्रिय अशा दुष्ट मनुष्या-चाही सर्पानि दंश केलेल्या अंगुलीप्रमाणे दिलीप त्याग करीत असे' (रघु. १, २८) अशा प्रकारच्या उपमांत त्याचे आयुर्वेदाचे ज्ञान प्रतिबिंबित झालेले आहे. 'आलीढ', 'वाजिनीराजना' इत्यादि संज्ञांवरून व 'राजाने रानटी हत्तीस मारू नये' इत्यादि त्याने उल्लेखिलेल्या नियमांवरून त्याचे धनुर्वेदाचे परिशीलन व्यक्त होते. असो.

व्याकरण, अर्थशास्त्र, ज्योतिःशास्त्र इत्यादि तर्ककर्कश बुद्धिप्रधान शास्त्रांप्रमाणे संगीत, चित्रकला, प्रसाधनकला इत्यादि प्रयोगसाध्य ललित-कलाही कालिदासास चांगल्या अवगत होत्या, हे त्याच्या ग्रंथांतील उल्लेखां-वरून दाखविता येते. संगीतामध्ये गीत, वाद्य व नृत्य यांचा अंतर्भाव होतो. पैकी नृत्याचे उल्लेख मागे दाखविले आहेत. वाद्यांचे वीणेसारखी तन्तुवाद्ये, मृदंगाप्रमाणे चर्मावृत वाद्ये, मुरलीसारखी छिद्रयुक्त वाद्ये व टाळ, झांजा यांसारखी घनवाद्ये असे चार प्रकार मानतात. यांपैकी बहुतेकांचे वर्णन कालिदासाच्या ग्रंथांत आले आहे. नारदमुनि गोकर्णक्षेत्रस्थ शंकराच्या दर्शनास जात असता त्यांच्या वीणेवर घातलेली सुरकुसुमांची माला इंदुमतीच्या वक्षःस्थलावर पडली व त्यायोगे तिला मृत्यु आला, असा प्रसंग 'रघुवंशा'त आला आहे. 'कुमारसंभवा'त प्रातःकाळी स्वरांच्या आरोहावरोहांस अनुसरून तारांवर हात फिरविणाऱ्या किन्नरांच्या मंगल गीतांनी शंकर जागृत झाले, असे कवीने वर्णिले आहे. त्या ठिकाणी सतारीसारखे तन्तुवाद्य अभिप्रेत आहे. त्याप्रमाणेच 'मेघदूता'तही यक्षस्त्री सद्गदित कंठाने पतिगुणवर्णनपर गीत गात असताना अश्रूंनी भिजलेल्या सतारीच्या तारा साफ करीत असेल, असे म्हटले आहे. वाद्यां-मध्ये मृदंग कवीला विशेष आवडत होता, असे दिसते. त्याच्या बहुतेक ग्रंथांत मृदंगवादनाचे वर्णन आले आहे. 'मालविकाग्निमित्रा'त मृदंग-वादनाने मालविकेचे नृत्य होण्याची वेळ झाली, असे सर्वांस समजल्याचे दाखविले आहे. अलकेत संगीताकरिता मृदंग वाजवीत असत असे कवीने

'मेघदूता 'त म्हटले आहे. अग्निवर्ण राजा नर्तकीच्या नाचाच्या वेळी स्वतः मृदंगाची साथ धरीत असे, असे ' रघुवंशा 'त वर्णिले आहे. मृदंग-वादनाने मेघगर्जनेची भ्रांति होऊन मयूर नृत्य करू लागतात, असे कवीने पुष्कळ ठिकाणी वर्णन केले आहे. याशिवाय रघूचा जन्म, इंदुमतीचे स्वयंवर, अतिथि राजाचे राज्यारोहण वगैरे प्रसंगांच्या उत्सव वर्णनात तूर्य किंवा सनई या वाद्यांचा व युद्धवर्णनात शंखवादनाचा उल्लेख आला आहे. सुरेल वादनाने मन प्रसन्न होते, तर बेसूर वाजविण्याने श्रोत्यांस त्रास होतो, हे कालिदासाने एका उपमेत दाखविले आहे (कुमार. १, ४५), त्यावरूनही त्याची वादनाभिरुचि व्यक्त होते.*

कालिदासाच्या अनेक ग्रंथांत गायनाचे वर्णन आले आहे. ' माल-विकाग्निमित्रा 'च्या पहिल्या अंकात साभिनय गीताने मालविका राजावरचे आपले प्रेम व्यक्त करते ; ' शाकुंतला 'च्या प्रस्तावनेत विद्वत्परिषदेच्या मनोरंजनार्थ नटी ग्रीष्मवर्णनपर गीत गाते व त्यायोगे सर्व प्रेक्षक तल्लीन होऊन चित्रासारखे तटस्थ राहतात ; पुढे पाचव्या अंकात एक राणी रागाने ओथंबलेली गीतिका गाऊन स्वतःचा त्याग केल्याबद्दल राजाचा अप्रत्यक्ष रीतीने उपालंभ करते ; ' कुमारसंभवा 'त मदनदाहानंतर निराश झाले-ल्या पार्वतीच्या सद्‌गदित कंठातून त्रिपुरविजयगीत ऐकून किन्नरी ढळढळा अश्रु गाळतात ; ' रघुवंशा 'त कुश व लव यांनी मधुरकंठाने गायिलेले मनोहर रामचरित श्रवण करून सर्व परिषद शोकाकुल होते इत्यादि प्रसंगांच्या वर्णनाने उत्तम गायनाचा श्रोत्यांच्या मनावर कसा परिणाम होतो, हे कवीने दाखविले आहे. मार्जना, करण, वर्णपरिचय, षड्‌ज, मध्यम इत्यादि गायनवादनाच्या पारिभाषिक संज्ञाही त्याने योजिल्या आहेत, त्यांवरून त्या कलांचा त्याचा अभ्यास व्यक्त होतो.

नृत्य, गायन व वादन या कलांप्रमाणे चित्रकलाही कालिदासाला उत्तम रीतीने अवगत होती. त्याने आपल्या ग्रंथांत कागदांवर व भिंतींवर काढलेली चित्रे, खांबांवर कोरलेल्या आकृति, देवांच्या प्रतिमा वगैरे चित्र-कलेच्या निरनिराळ्या प्रकारांचा उल्लेख व वर्णन केले आहे. त्याच्या ग्रंथांतील दुष्यंत, पुरूरवा आणि यक्ष हे तीन नायक, ' रघुवंशा 'तील अग्निवर्ण राजा, ' मेघदूता 'तील यक्षस्त्री ही सर्व उत्तम चित्रकार म्हणून

* के. ल. ओगले : कालिदास आणि ललितकला ( वि. ज्ञा. वि., पु. ५७, पृ. २१३ ).

दाखविलेली आहेत. 'मालविकाग्निमित्रा'तील धारिणी व 'शाकुंतला'-तील शकुंतलेच्या सख्याही चित्रकलेच्या षोकी दिसतात. त्याच्या नाटकांतील अनेक प्रसंग चित्रांच्या दर्शनावर किंवा लेखनावर बसविलेले आहेत. 'मालविकाग्निमित्रा'त अग्निमित्राला मालविकेचे प्रथम दर्शन धारिणीची दासी म्हणून एका चित्रात होते व तिच्या सौंदर्याने त्याचे मन आकृष्ट होते. पुढे एका प्रसंगी राजाचे चित्र दृष्टीस पडल्यावर त्यात इरावतीकडे निरखून पाहणाऱ्या राजास पाहून तिच्याविषयी मालविकेला मत्सर वाटतो ; 'मेघदूता'त यक्ष आपले विरहदुःख सहन करण्याकरिता क्रुद्ध झालेल्या आपल्या प्रियेचे गेरूने चित्र काढून आपण तिच्या पायां पडतो, असे दाखविण्याचा बेत करतो, तोच डोळचांत भराभर अश्रु येऊन त्याचा प्रयत्न विफल होतो; 'शाकुंतला'त शकुंतलेच्या प्रत्यादेशानंतर पश्चात्ताप पावलेला राजा, कण्वाश्रमात शकुंतलेचे त्याला प्रथम दर्शन झाले त्या प्रसंगाचे चित्र अर्धवट काढतो. या सर्व प्रसंगांवरून कथानकाच्या विकासाकरिता व पात्रांच्या भावनाविष्काराकरिता कालिदासाने आपल्या ग्रंथांत चित्रकलेचा कसा मार्मिकपणाने उपयोग करून घेतला आहे, ते दिसून येते. वर सांगितलेले दुष्यंताने काढलेले चित्र अपुरे होते, ते पूर्ण करण्याकरिता आणखी काय काय काढले पाहिजे, ते राजाने खालील श्लोकात सांगितले आहे, त्यावरून सुंदर चित्राला पार्श्वभूमीची किती आवश्यकता असते, हे कवीला उत्कृष्ट रीतीने अवगत होते, असे दिसून येते.

कार्या सैकतलीनहंसमिथुना स्रोतोवहा मालिनी
पादास्तामभितो निषण्णहरिणा गौरीगुरोः पावनाः।
शाखालम्बितवल्कलस्य च तरोर्निर्मातुमिच्छाम्यधः
शृङ्गे कृष्णमृगस्य वामनयनं कण्डूयमानां मृगीम् ॥

शाकुन्तल, ६, १७.

(या चित्रात अद्यापि मालिनी नदी, तिच्या वाळवंटात बसलेली हंसांची जोडपी, जवळच ज्यांच्यावर हरिण बसले आहेत अशा हिमालयाच्या पायथ्याच्या पवित्र टेकडया, तसेच ज्याच्या शाखांवर वल्कले वाळत घातली आहेत असे एक झाड व त्याच्या छायेत कृष्णमृगाच्या शिंगावर वामनेत्र खाजवीत असलेली हरिणी इतक्या गोष्टी मला काढावयाच्या आहेत.)

राजाने काढलेले चित्र इतके हुबेहुब होते की, शकुंतलेच्या मातेची मैत्रीण गुप्तरूपाने उभी होती तिलाही ते पाहून शकुंतला आपल्यासमोर जणू काय उभी आहे, असे वाटले. यानंतर शकुंतलेच्या अंगावर कोणकोणते पुष्पालंकार घालावयाचे त्याचे राजाने वर्णन केले आहे. पार्श्वभूमि, भावनाविष्कार, समुचित अलंकार या गोष्टींचे इतक्या बारकाईने वर्णन करणारा कवि स्वतः उत्तम चित्रकारही असला पाहिजे, असे वाटल्याशिवाय राहत नाही. 'कुमारसंभवा'त पार्वती तारुण्यात येत असता तिचे निरनिराळे अवयव हळूहळू उठावदार दिसू लागले, ही कल्पना व्यक्त करण्याकरिता चित्रकाराच्या ब्रशाने हळूहळू स्पष्ट होणाऱ्या चित्राची मार्मिक उपमा कवीने दिली आहे. "चित्रकार प्रथम साऱ्या चित्राचा बारीक रेषांनी आराखडा काढतो, नंतर त्यात केसांच्या लेखणीने म्हणजे ब्रशाने रंग भरतो. नुसता आराखडा काढला असता त्यातही निरनिराळे सर्व भाग यथोचित समाविष्ट झालेले असतातच, पण त्यांचा स्पष्ट उठावदारपणा त्यात रंग भरल्यानंतरच दिसून येतो· · 'ब्रशाने चित्र जसे उमटेल' ही उपमा कवि स्वतः चित्रकार असल्याशिवाय त्याला सुचणे अशक्य नसले तरी फार कठीण असते"* असे जे श्री. ओगले यांनी म्हटले आहे, ते कोणासही मान्य होण्यासारखेच आहे. कालिदासकाळी अजंठा येथील काही गुहांतील चित्रे रंगविली गेली, असा कोरीव लेखांचा पुरावा आहे ; त्यांवरून तत्कालीन चित्रकलेचे श्रेष्ठत्व दिसून येते.

कालिदासाला स्वदेशाच्या इतिहास-भूगोलाचे बारीक ज्ञान होते असे दिसते. 'मालविकाग्निमित्र' नाटकातील संविधानक त्याच्या काळापूर्वी पाचशे-साडेपाचशे वर्षांपूर्वी घडलेले. तथापि, त्या काळची कालिदासाची माहिती अगदी बरोबर असल्याचे अलीकडे उजेडात येऊ लागलेल्या ऐतिहासिक साधनांवरून सिद्ध होत आहे. काही वर्षांपूर्वी डॉ. श्री. व्यं. केतकर यांनी असे म्हटले होते की, "कालिदासाने 'मालविकाग्निमित्र' नाटकात पुष्यमित्र हा स्वामिवधाचे रक्त हातावर न सांडलेला असा सेनापतिपदावरच दाखविला आहे, पण त्याने अश्वमेध यज्ञ केला असेही वर्णिले आहे, त्यावरून एक तर त्यास राजकारणाचे ज्ञान नव्हते किंवा पुष्यमित्राला अशा सोज्वळ स्थितीत दाखविण्यात त्याने आपल्या

---

* के. ल. ओगले : कालिदास आणि चित्रकला (वि. ज्ञा. वि., पु. ५८, पृ. ३५७).

सद्सद्विवेकबुद्धीस चूप बसविले असले पाहिजे; तसेच पुष्यमित्राने केलेला यज्ञही अश्वमेधच होता, याला पुरावा नाही." कालिदासाला जी ऐतिहासिक साधने उपलब्ध होती, ती सर्वच सध्या अस्तित्वात नसल्याने वरच्यासारख्या विधानांचे खंडन करणे कठीण जाते. तथापि, सुदैवाने या बाबतीत तत्कालीन शिलालेखाचा* अत्यंत विश्वसनीय असा पुरावा अलीकडे उपलब्ध झाला आहे. त्यावरून असे दिसते की, पुष्यमित्राने एक नव्हे तर दोन अश्वमेध केले होते व तदनंतरही आपली 'सेनापति' हीच पदवी कायम ठेविली होती. तेव्हा कालिदासावर वरील दोन्ही आरोप लागू होत नाहीत, व त्याची ऐतिहासिक माहिती अगदी बिनचूक होती, हे सिद्ध होते.

कालिदासाच्या ग्रंथांत अनेक देशांचे, पर्वतांचे, नद्यांचे व शहरांचे वर्णन आले आहे, तथापि, त्यात कोठेही चूक आढळत नाही. 'कुमारसंभवा'च्या आरंभी व 'मेघदूता'त त्याने हिमालयाचे विस्तृत व यथातथ्य वर्णन केले आहे. भारवीसारख्या इतर कवींनीही हिमालयाचे वर्णन केले आहे, पण त्यात वस्तुस्थितीपेक्षा कल्पनेवरच जास्त भर दिलेला आहे. कालिदासाचे तसे नाही. हिमालयावर यात्रेच्या निमित्ताने अगर उन्हाळ्यात जाणारे लोक तेथील मेघांचे, रात्री प्रकाशमान होणाऱ्या औषधींचे वगैरे जे वर्णन कवीने केले आहे ते अगदी यथातथ्य आहे, असे सांगतात. वंक्षु अगर सिंधु नदीच्या तीरावर केशराची झाडे होतात, असे दुसऱ्या कोणाही कवीने वर्णिले नाही. बंगालातील साळीचे, दक्षिणेतील ताम्रपर्णीच्या काठच्या मोत्यांच्या कारखान्यांचे वगैरे कवीने केलेले वर्णन वस्तुस्थितीस अनुसरून आहे. त्यावरून स्वत: कवीने दूरदूरच्या प्रांतांत प्रवास केला असावा किंवा निदान चंद्रगुप्ताच्या साम्राज्यात कामाच्या निमित्ताने दूरच्या प्रांतांत नेमलेल्या अधिकारीवर्गापासून व निरनिराळ्या देशांतून व्यापारानिमित्त येणाऱ्या-जाणाऱ्या व्यापाऱ्यांपासून चौकसपणाने माहिती जमविली असावी. असो.

वर उल्लेखिलेल्या विषयांशिवाय कोश, छंद व अलंकार या विषयांवरच्या ग्रंथांचे कवीने अध्ययन केले असले पाहिजे, हे सांगण्याची जरूरी

* *Ep. Ind.*, Vol. XX, p 54. याविषयी सविस्तर विवेचन प्रस्तुत लेखकाच्या 'संशोधन-मुक्तावली'त (सर १, पृ. ११ इ.) पाहा.

नाही. स्वत: काव्य करण्यापूर्वी कवीने पुरातन कवींच्या ग्रंथांचा अभ्यास करावा, असे राजशेखराने म्हटले आहे. कालिदासानेही आपल्यापूर्वीच्या व्यास-वाल्मीक्यादि महर्षींचे भारत-रामायणादि ग्रंथ, काही पुराणे, अश्वघोषादि कवींची काव्ये, भास-सौमिल्ल-कविपुत्रादि नाटककारांची नाटके यांचा मार्मिक अभ्यास केला होता, असे त्याच्या ग्रंथांतील प्रत्यक्षाप्रत्यक्ष पुराव्यांवरून म्हणता येते. 'विक्रमोर्वशीया'-तील (अंक ४) 'राजा कालस्य कारणम्' ही म्हण *, 'रघुवंशा'तील (२, ५३) 'क्षतात्त्रायते इति क्षत्रिय:' ही क्षत्रिय शब्दाची व्युत्पत्ति, 'मालविकाग्निमित्रा'तील 'तिलक' पुष्पाच्या नावावरील श्लेष वगैरे कल्पना त्याने 'महाभारता'तून घेतल्या असाव्या. 'रामायणा'तील वर्षा व हेमन्त ऋतुवर्णनाची छाप त्याच्या 'ऋतुसंहारा'वर पडलेली स्पष्ट दिसते. 'रघुवंशा'तील राजांची वंशावळ त्याने प्राचीन पुराण ग्रंथांतून घेतली असावी. अश्वघोषाची काव्ये त्याने वाचली होती, हे मागेच आपण निश्चित केले आहे. भासादि नाटककारांच्या ग्रंथांतून त्याने काही कल्पना व प्रसंग आत्मसात् करून आपल्या प्रतिभेच्या भट्टीत त्यांना रमणीय रूप दिले आहे, हे पुढे एका प्रकरणात दाखवू.

मनुष्य कितीही विद्वान्, शास्त्रज्ञ व कलानिपुण असला तरी त्याचे चारित्र्य शुद्ध नसेल तर त्याच्या हातून उच्च प्रतीचे वाङ्मय निर्माण होणे शक्य नाही. 'कवीचा जसा स्वभाव तसे त्याचे काव्य ; जसा चित्रकार तसे त्याचे चित्र असा सामान्य नियम आहे' असे जे राजशेखराने म्हटले आहे (का. मी., अ. १०) ते अगदी खरे आहे. कालिदासाच्या दुर्दैवाने त्याच्या चरित्राची विश्वसनीय माहिती लौकरच लुप्त झाली व तिच्या जागी प्रसार पावलेल्या दंतकथांनी त्याच्या चरित्राचे अगदी विकृत स्वरूप लोकांपुढे मांडले. तेव्हा राजशेखराच्या वरील नियमास अनुसरून कवीच्या ग्रंथांवरून त्याचा स्वभाव कसा असावा, हे आपणांस अजमावावयाचे आहे.

कालिदासाचे एकंदर ग्रंथ लक्षात घेता तो मोठा रंगेल व विनोदी स्वभावाचा होता, याविषयी संशय रहात नाही. त्याच्या सर्व ग्रंथांत

* मुनयोऽपि व्याहरन्ति राजा कालस्य कारणमिति ।

शृंगार रसाला प्राधान्य आहे व म्हणून त्याला एका सुभाषितात 'कविता-देवीचा विलास' म्हणून वर्णिले आहे. नाटकांतील विविध प्रसंग व विशेषतः विदूषकाचे पात्र निर्माण करण्यात त्याचा विनोदी स्वभाव दृष्टीस पडतो. तो मोठा मोकळ्या मनाचा होता. कोणाबरोबरही सात पावले चालले अथवा थोडे संभाषण केले की मैत्री होते, असे त्याने म्हटले आहे (कुमार. ५, ३९; रघु. २, ५८). 'पुरुषांचे स्त्रियांवरचे प्रेम चंचल असेल, पण त्यांचे मित्रप्रेम चिरस्थायी असते', (कुमार. ४, २८) या त्याच्या उक्तीवरून त्याच्या मित्रप्रेमाची कल्पना करता येते. त्याचे हृदय अत्यंत कोमल होते. दिवसा सूर्यप्रकाशाने निस्तेज झालेल्या चंद्राच्या कोरीकडे पाहून त्याला अत्यंत दुःख होई (कुमार. ५, ४८). समाजातील धीवरासारख्या हलक्या दर्जाच्या लोकांचीही चित्रे त्याने मोठ्या मार्मिकपणे रंगविली आहेत, यावरून त्याची त्यांच्या-विषयीची सहानुभूति व्यक्त होते. कोणत्याही व्यक्तीच्या स्वभावातील मर्म हुडकून काढण्यात त्याचा हातखंडा असावा; नाही तर, 'शाकुंतला'-तील घटकेत पगडी फिरविणाऱ्या पोलीस शिपायाचे पात्र त्याच्या हातून निर्माण झाले नसते. त्याला गुणांबद्दल आदर होता, व्यक्तींबद्दल नव्हता, हे त्याच्या 'स्त्रीपुमानित्यनास्थैषा वृत्तं हि महितं सताम्' (कुमार. ६, १२) या उक्तीवरून दिसून येईल. मनुष्यप्राण्यांप्रमाणेच सृष्टीतील हरिणमयूरादि इतर प्राण्यांवर त्याचे निरतिशय प्रेम होते. आपण त्यांच्यावर प्रेम केले तर तेही आपणांशी ममतेने वागतात, हे त्याने 'शाकुंतला'च्या चौथ्या अंकात दाखविले आहे. त्याच्या बहुतेक नायिका लतावृक्षांवर अपत्यनिर्विशेष प्रेम करणाऱ्या आहेत आणि 'मेघदूता'त व इतरत्र त्याने अनेक वृक्षांचे, लतांचे व पुष्पांचे मनोहर वर्णन केले आहे, त्यावरून त्याचे निसर्गप्रेम व स्वतःच्या निरीक्षणाने मिळविलेली बिनचूक माहिती दिसून येते.

कालिदासाचे कौटुंबिक वर्तन निरपवाद नव्हते, असा प्रवाद आहे. पण त्याला त्याच्या ग्रंथांत मुळीच आधार नाही. गृहस्थाश्रमाची 'सर्वोपकारक्षम' (रघु. ५, १०) म्हणून त्याने थोरवी गाइली आहे. 'पतिपत्नीप्रेम हे सार्वत्रिक आहे. भगवान् शंकरासारख्या असामान्य इन्द्रियनिग्रही योग्यावरही त्याने आपला पगडा बसविला, मग सामान्य

जनांची काय कथा!' असे त्याने 'कुमारसंभवा'त (६, ९५) म्हटले आहे. त्याच्या ग्रंथांत स्त्रियांविषयी अतिशय आदर दाखविला आहे. 'धार्मिक कृत्य करणे तर स्त्रियांवाचून मुळीच शक्य नाही' (कुमार. ६, १३); 'विवाहसंबंध जुळवून आणण्यात स्त्रिया फारच हुशार असतात' (कुमार. ६, ३२); 'कन्येच्या विवाहाच्या बाबतीत पुरुष प्राय: स्त्रियांच्या मताने चालतात' (कुमार. ६, ८५); 'पतिव्रता स्त्रियाही पतीच्या इच्छेविरुद्ध जात नाहीत' (६, ८६) इत्यादि 'कुमारसंभवा'तील उक्तींनी कौटुंबिक जीवन सुखकर होण्यास पतिपत्नींनी परस्परांच्या मतास व इच्छेस मान देऊन वागावे, असे कवीने सुचविले आहे. त्याच्या सर्व नायिका प्रेमळ, सुस्वभावी व ललितकलानिपुण आहेत. 'रघुवंशा-'तील अजविलापात आदर्श पत्नी कशी असते, ते त्याने सुचविले आहे. इंदुमती ही अजाची गृहस्वामिनी, बिकट प्रसंगी सल्ला देणारा मंत्री, एकांतातील सखी व ललितकलेतील प्रिय शिष्या होती (रघु. ८, ६७), असे त्याने वर्णिले आहे. 'कुमारसंभवा'तील 'प्रियेषु सौभाग्यफला हि चारुता' (५, १), 'स्त्रीणां प्रियालोकफलो हि वेष:' (७, २२) इत्यादि उक्तींवरून व 'मेघदूता'तील विरहिणी यक्षपत्नीच्या वर्णनावरून पतिव्रता स्त्रीविषयी कालिदासाचे काय विचार होते, ते दिसून येते. वेश्येच्या घरी रात्रंदिवस लोळत पडणाऱ्या कवीच्या हातून इंदुमती, यक्षपत्नी, शकुंतला व सीता या स्वाभिमानी, सुशील व प्रेमळ पतिव्रतांची शब्दचित्रे काढली जाणे अशक्य आहे.

कालिदासाचे प्रेमळ हृदय लहान मुलांच्या सहवासात आनंदित होत असावे, असे वाटते. मुलाच्या योगाने पतिपत्नींचे परस्परांवरचे प्रेम कमी न होता वृद्धिगत होत जाते (रघु. ३, २४), असे त्याने म्हटले आहे. 'तपश्चर्या व दान यांनी मिळणारे पुण्य परलोकातच उपयोगी पडते, पण शुद्धवंशातील संतति इहपरलोकी सुख देते' (रघु. १, ६९), अशी मुलांची महती त्याने गाइली आहे. त्याच्या ग्रंथांत अनेक ठिकाणी लहान मुलांची सुंदर वर्णने आली आहेत. 'लहानगा रघु दाईने सांगितल्याप्रमाणे बोबडे बोल बोले, तिचा हात धरून सभेत येई, तिने शिकविल्याप्रमाणे नमस्कार करी व अशा रीतीने आपल्या पित्याचा आनंद वृद्धिगत करी', असे मोठे मनोहर वर्णन त्याने 'रघुवंशा'त

(३, २५) घातले आहे व त्याच्या यथार्थत्वामुळे स्वभावोक्तीचे उत्कृष्ट उदाहरण म्हणून ते 'साहित्यदर्पणा'त उद्धृत केले आहे. 'शाकुंतला'तही (७, १७) 'ज्यांच्या दातांच्या कळ्या नुकत्याच दिसू लागल्या आहेत, काही कारण नसताच जी हसत असतात, ज्यांचे बोल अस्पष्ट पण रमणीय असतात, अशा मुलांना मांडीवर घेऊन त्यांच्या धुळीने माखलेल्या अंगाने ज्यांची वस्त्रे मलिन होतात ते धन्य होत!' असे सुंदर वर्णन आले आहे. स्वत:चे मूल दृष्टीस पडताच ते आपले असे माहीत नसताही पुरूरवा व दुष्यंत यांच्या मनात अपत्यस्नेहाचा उमाळा आला, असे त्याने आपल्या नाटकात दाखविले आहे ; त्यावरून अपत्यप्रेम ही मनुष्याच्या स्वभावातील एक नैसर्गिक कोमल भावना आहे, हा भाव त्याने व्यक्त केला आहे. मनुष्याच्या जीवनात अत्यंत कारुण्योत्पादक असे प्रसंग येतात, त्यांमध्ये कन्येला पतिगृही पाठविण्याच्या प्रसंगाची गणना करण्यात येते. अशा वेळी तिच्या पित्याच्या हृदयात जी कालवाकालव सुरू होते, तिचे हृदयस्पर्शी शब्दचित्र त्याने 'शाकुंतला'च्या चौथ्या अंकात काढले आहे. कण्वासारख्या प्रेमळ पित्याचे शब्दचित्र रंगविणाऱ्या कालिदासाला अपत्यप्रेमाची जाणीव नव्हती, असे कोणता सहृदय वाचक म्हणेल?

कालिदासाला द्वितीय चंद्रगुप्तासारख्या सार्वभौम राजाचा उदार आश्रय होता व त्याच्या आयुष्याचा उत्तरभाग राजदरबारी गेला होता, हे आपण पाहिलेच आहे. राजसभेत नेहमी असणाऱ्या कवीच्या दृष्टीतून तेथील चालीरीती, राजेलोकांच्या आवडीनिवडी, प्रसंग पडेल त्याप्रमाणे सेवकांस मान देऊन त्यांच्याकडून काम करून घेण्याची त्यांची सवय ह्या गोष्टी निसटणे शक्य नाही. या दृष्टीने 'कुमारसंभवा'च्या तिसऱ्या सर्गातील इंद्राच्या दरबारचे वर्णन वाचण्यासारखे आहे. 'प्रयोजन पडेल त्याप्रमाणे आश्रितांवर राजेलोकांचे प्रेम कमी जास्त होत असते' (कुमार. ३, १), 'चतुर लोक प्रभूला योग्य वेळी प्रार्थना करून आपले कार्य करून घेतात' (कुमार. ७, ९३) इत्यादि उक्ति स्वानुभवाने किंवा मार्मिक निरीक्षणाने कवीला सुचलेल्या दिसतात. भगवान् शंकर विवाहार्थ निघाले त्यावेळी त्यांनी जवळच असलेल्या गणाने समोर धरलेल्या तरवारीत आपले रूप पाहिले, त्यांच्यावर सूर्याने

छत्र धरलें, प्रथम ब्रह्मदेव व नंतर विष्णु यांनी त्यांचा जयजयकार केला, नंतर आपणांस दर्शन करवावे म्हणून इंद्रादि देवांनी नंदीला खूण केली व त्याने त्यांना शिवापुढे नेले. त्यांनी अत्यंत विनीत होऊन नमस्कार केला, शंकरांनीही शिरःकम्पाने ब्रह्मदेवाचा, चार शब्द बोलून विष्णूचा, स्मित करून इंद्राचा व दृष्टिक्षेपाने इतर सर्व देवांचा सन्मान केला, असे कवीने 'कुमारसंभवा'त (७, ३६-४६) वर्णिले आहे. त्यात राजदरबारी दिसून येणारा पौर्वापर्यक्रम, ज्याची जशी योग्यता असेल तसा त्याला मिळणारा मान वगैरे गोष्टी स्पष्ट दिसून येतात. राजदरबारी असल्यामुळे कालिदासाच्या वाणीत सभ्यता व रुबाब दिसून येतो. 'विक्रमोर्वशीया'त उर्वशीला परत स्वर्गात जाण्याकरिता राजाला विचारावयाचे आहे, तेव्हा ती चित्रलेखामुखाने 'महाराजांनी परवानगी दिली तर माझ्या प्रिय मैत्रिणीसारखी महाराजांची कीर्ति मी स्वर्गास नेऊ इच्छिते' अशी राजास विनंती करते. 'शाकुंतला'त 'महाराजांच्या मधुर भाषणाने मला धीर वाटतो, म्हणून आपणांस विचारते की, महाराजांनी कोणत्या राजर्षींचा वंश अलंकृत केला आहे, कोणत्या देशातील लोकांस स्वविरहाने उत्कंठित केले आहे व कोणत्या कारणाने आपल्या अतिशय सुकुमार देहाला या तपोवनात येण्याचे क्लेश दिले आहेत?' असे प्रियंवदा दुष्यंतास म्हणते. या भाषणात कालिदासाचे राजसभोचित शिष्टसंप्रदायाचे ज्ञान उत्कृष्ट रीतीने व्यक्त झाले आहे.

कालिदास जाडा विद्वान् होता तरी अतिशय विनीत होता. 'मालविकाग्निमित्र' व 'विक्रमोर्वशीय' ही नाटकें आणि 'मेघदूत', 'कुमारसंभवा'दि काव्ये लिहिल्यावर कोणालाही आपल्या कृतींबद्दल गर्व झाला असता. त्याच्यापेक्षा कमी सरस ग्रंथनिष्पत्ति करणाऱ्या जगन्नाथ पंडिताच्या दर्पोक्ति प्रसिद्धच आहेत. पण 'शाकुंतला'-सारखे अद्वितीय नाटक व 'रघुवंशा'सारखे विविध रसांनी ओथंबलेलें अप्रतिम महाकाव्य विद्वत्परिषदेपुढे ठेवताना कवीने कोण शालीनता दाखविली आहे! कालिदास विनीत असला तरी एखाद्या राजाश्रयलोलुप लाळघोट्या पंडिताप्रमाणे स्वाभिमानशून्य नव्हता; नाही तर त्याच्या तोंडून मागे दिलेली 'इह निवसति मेरुः' इत्यादि उक्ति निघाली नसती, आणि स्वाभिमानी शकुंतला व सीता यांची शब्दचित्रे त्याच्या

लेखणीतून बाहेर पडली नसती. अशा या विद्वान्, कलाभिज्ञ, प्रेमळ, विनोदी, चतुर व स्वाभिमानी पुरुषश्रेष्ठाच्या चरित्राचा दंतकथांनी विपर्यास करावा व तो परंपराभिमान्यांनी आज शेकडो वर्षे मान्य करावा हा केवळ दैवदुर्विलास होय!

कालिदासाची राहणी कशा प्रकारची होती व त्याच्या जीविताचा दैनंदिन क्रम कोणत्या प्रकारचा होता, हे समजण्यास विश्वसनीय साधन उपलब्ध नाही. तथापि राजशेखराच्या 'काव्यमीमांसे'त (अ. १०) आदर्श कवीचे जीवनवृत्त कशा प्रकारचे असावे, याचे वर्णन आले आहे, ते काल्पनिक असले तरी वस्तुस्थितीशी फारसे विसंगत नसावे असे वाटते, म्हणून येथे दिले आहे—"कवीने नेहमी शुचि असावे. शौच तीन प्रकारचे असते. वाक्शौच, मनःशौच व कायशौच. यांपैकी पहिले दोन प्रकार शास्त्राभ्यासाने उत्पन्न होतात. कायशौचात पायांची नखे काढणे, मुखात ताम्बूल असणे, शरीराला सुगंधिद्रव्यांचा किंचित् लेप असणे, उंची पण भपकेदार नसलेले वस्त्र धारण करणे, डोक्यात पुष्पे घालणे यांचा अंतर्भाव होतो. शुद्ध वर्तन हे सरस्वतीचे आकर्षक असते. कवीचे घर संमार्जनाने स्वच्छ केलेले असावे. त्यात सहाही ऋतूंस योग्य अशी निरनिराळी स्थाने असावी. जवळपास वृक्षवाटिका, क्रीडापर्वत, वापी, पुष्करिणी, पाटकालवे, हरिणासारखे पशु, सारस, चक्रवाक, हंस, चकोर, क्रौंच, शुकसारिकादि पक्षी, उन्हाचा ताप निवारण करण्याकरिता धारागृह, लतामंडप इत्यादि साधने व झोके घेण्यास झोपाळा असावा. काव्य करून थकलेल्या मनाला विसावा मिळण्यासाठी तेथे परिजनांचा कलकलाट नसावा. त्याचे परिचारक अपभ्रंशभाषाप्रवीण, दासी मागधभाषाभिनिवेशी, अंतःपुरातील सेवक प्राकृतसंस्कृतभाषाभिज्ञ व मित्र सर्वभाषावेत्ते असावे. त्याचा लेखक सर्व भाषाकुशल, शीघ्रवाक्, हस्ताक्षर उत्तम असलेला, खुणा जाणणारा, नानालिपिज्ञ व स्वतः काव्य करण्यास शिकलेला असावा. रात्री-बेरात्री असा मनुष्य जवळ नसल्यास यांपैकी काही गुण असलेला मनुष्य असला तरी चालेल. ठराविक वेळ नेमून न दिल्यास कामे होत नाहीत; म्हणून कवीने दिवस-रात्रींचे प्रहराप्रहराचे आठ भाग करावे. सकाळी उठून संध्यावंदन केल्यावर सारस्वतसूक्ताचा त्याने

जप करावा. नंतर विद्यागृहात सुखासीन होऊन काव्याला उपयुक्त अशा विद्योपविद्यांचे प्रहरभर अध्ययन करावे ; कारण पुन: पुन: वाचन करण्यासारखे प्रतिभोत्पत्तीचे दुसरे साधन नाही. दुसऱ्या प्रहरी काव्य रचावे. मध्याह्नाच्या सुमारास स्नान करून भोजन करावे. भोजनानंतर मित्रांची काव्यसभा भरवावी. तीत समस्यापूर्ति, मातृकाभ्यास, चित्रबंध वगैरेंचा अभ्यास करावा. चौथ्या प्रहरी पूर्वाह्णी केलेल्या काव्याचे स्वत: एकट्याने किंवा काही थोड्या मित्रांबरोबर परीक्षण करावे. रचनेच्या ओघात विवेचक दृष्टि रहात नाही, म्हणून अशा तऱ्हेचे परीक्षण आवश्यक आहे. त्या वेळी अधिक असेल ते गाळावे ; न्यून असेल ते रचावे ; जेथे रचना योग्य झाली नसेल तेथे बदलावी ; काही विसरले असेल तर आठवावे. सायंकाळी संध्यावंदन व सरस्वतीची उपासना करावी. रात्री परीक्षण केलेला भाग स्वच्छ लिहून ठेवावा. पुढे दोन प्रहर झोप घ्यावी. चांगल्या निद्रेने आरोग्य चांगले राहते. चौथ्या प्रहरी प्रयत्नाने उठावे. कारण ब्राह्म मुहूर्ती मन प्रसन्न असते व निरनिराळे विषय दृष्टीपुढे येतात. " राजशेखराच्या वरील वर्णनात काही ठिकाणी अतिशयोक्ति दिसते ; तथापि विक्रमादित्यासारख्या दानशूर सार्वभौम नृपतीचा उदार आश्रय असलेल्या कालिदासाची राहणी वरील प्रकारची असणे अगदीच असंभवनीय वाटत नाही.

कालिदासाचे आयुर्मान किती होते, याविषयी कोठे निश्चित माहिती मिळत नाही. तथापि याही बाबतीत अनुमान करण्यास जागा आहे. कालिदासाच्या सर्व ग्रंथांत 'ऋतुसंहार' व 'मालविकाग्निमित्र' हे आरंभी व 'रघुवंश' हा शेवटी लिहिला असावा. 'रघुवंशा'च्या अठराव्या सर्गात आपल्या सहाव्या वर्षी गादीवर आलेल्या सुदर्शन नामक बालराजाच्या सुंदर काव्यमय वर्णनास कालिदासाने पंधरा श्लोक घातले आहेत. 'रघुवंशा'तील शेवटल्या राजांचा अनुक्रम 'विष्णुपुराणा'तील वंशावळीशी बराच जुळतो. तथापि त्या किंवा इतरही उपलब्ध पुराणात सुदर्शन बालवयात गादीवर आला होता, असा उल्लेख आढळत नाही. तेव्हा हे वर्णन कवीला प्रत्यक्ष दृश्यावरून सुचले असावे.

या प्रकारची घटना वाकाटक काळी झाली होती. वाकाटक नृपति द्वितीय रुद्रसेन ऐन तारुण्यात निधन पावल्यावर त्याचा अल्पवयी मुलगा

दिवाकरसेन गादीवर आला. त्यावेळी त्याचे वय पाच-सहा वर्षांपेक्षा जास्त नसावे ; कारण त्याची माता प्रभावतीगुप्ता पुढे निदान तेरा वर्षे त्याच्या नावाने राज्य करीत होती.* या काळात द्वितीय चंद्रगुप्ताने आपल्या मुलीस राज्यकारभारात मदत करण्यास जे आपले विश्वासू अधिकारी पाठविले त्यांमध्ये कालिदासही असावा, असे आपण मागे अनुमान केले आहे. त्यावेळी विदर्भात पाहिलेल्या बालराजाच्या राज्यकारभारावरून कवीला 'रघुवंशा 'तील सुदर्शन राजाचे वर्णन सुचलेले दिसते. दिवाकरसेन वयात आल्यावर लौकरच निधन पावला असावा; कारण त्याच्यानंतर गादीवर आलेल्या द्वितीय प्रवरसेन नामक त्याच्या लहान भावाने तीस वर्षांपेक्षा अधिक काल राज्य केले, असे त्याच्या अनेक ताम्रपटांतील कालविषयक उल्लेखांवरून दिसते. या द्वितीय प्रवर-सेनाने राज्यारंभानंतर लौकरच ' सेतुबंध ' नामक प्राकृत काव्य रचण्यास आरंभ केला. त्यात त्याला अनेक अडचणी येत होत्या, हे त्यानेच एका गाथेत (सेतु. १, ९) सांगितले आहे. या प्रसंगी कालिदासाने त्याला मदत केल्यामुळे कालिदासानेच ते काव्य विक्रमादित्याच्या आज्ञेने रचले असा समज प्रचलित झालेला दिसतो. ' मालविकाग्निमित्र ' इ. स. ३९५ च्या सुमारास प्रथम रंगभूमीवर आले, असे आम्ही पुढे दाखविले आहे. त्यावेळी कालिदास अगदी तरुण म्हणजे सुमारे पंचवीस वर्षांचा असावा. द्वितीय प्रवरसेन इ. स. ४२० च्या सुमारास गादीवर आला, असे अनेक प्रमाणांवरून दाखविता येते†. त्यावेळी कालिदासाचे वय सुमारे पन्नास वर्षांचे असावे. यानंतर सेतुबंधाची रचना झाली असल्यामुळे निधनसमयी कालिदासाचे वय पंचावन्न वर्षांपेक्षा कमी नसावे. संस्कृत ललित वाङ्मयात कालिदासाच्या इतकी विपुल ग्रंथरचना राजशेखराखेरीज दुसऱ्या कोणाही कवीची नाही. त्यामुळे वर अनुमित केलेले कालिदासाचे आयुर्मान असंभवनीय वाटत नाही.

* *Ep. Ind.*, Vol. XV, pp. 39 f.

† वाकाटकांच्या कालगणनेविषयी आमचा ग्रंथ ' वाकाटक नृपति आणि त्यांचा काल ', पृ. ९–१२, पाहा.

प्रकरण पाचवे

# कालिदासाची काव्ये

**क इह रघुकारे न रमते।**

सुभाषित.

उत्कृष्ट ग्रंथनिर्मितीमुळे एखाद्या ग्रंथकाराचे नाव एकदा प्रसिद्ध झाले म्हणजे त्याच्या नावावर अनेक ग्रंथ खपू लागतात. विशेषत: प्राचीन काळी स्वत:च्या प्रसिद्धीपेक्षा आपल्या ग्रंथांचा प्रसार जनतेत सर्वत्र व्हावा, अशी ग्रंथकारांची इच्छा असल्यामुळे अगदी साधारण प्रतीचे ग्रंथही उत्कृष्ट ग्रंथकारांच्या माथी मारलेले दिसून येतात. कित्येक वेळी एकाच नावाचे ग्रंथकार निरनिराळ्या काळी होऊन गेलेले असतात; पण कालाच्या प्रचंड ओघात त्यांचे वैयक्तिक भेद नष्ट होऊन ते आपल्यापैकी एका विशेष प्रसिद्ध अशा व्यक्तीमध्ये लय पावतात, असेही दिसून येते. कालिदासाच्या बाबतीत असेच काही झाले असले पाहिजे. ऑफ्रेक्ट साहेबांनी आपल्या 'बृहत्संस्कृतग्रंथसूची'त कालिदासाच्या नावावर तीस-पसतीस ग्रंथ दिले आहेत. त्यांमध्ये काव्यनाटकांबरोबर ज्योतिष, रत्नपरीक्षा, देवतास्तुति वगैरे विविध विषयांवरचे ग्रंथ आढळतात. यांपैकी बहुतेक ग्रंथ कालिदासाच्या नावावर दडपलेले किंवा एखाद्या उत्तरकालीन कालिदास नामक कवीने रचलेले असावे. उदाहरणार्थ, 'नलोदय' हे काव्य घ्या. कवीने

या काव्यात यमकादि शब्दालंकारांचा अतिरेक केला आहे व त्यामुळे बहुतेक ठिकाणी अर्थ अगदी दुर्बोध झाला आहे. 'रघुवंशा'दि काव्यांत कालिदासाचे शब्दालंकारांकडे विशेष लक्ष दिसत नाही. त्यामुळे हा ग्रंथ सकृद्दर्शनीच कालिदासाचा नसावा, अशी शंका येत होती व आता ग्रंथाच्या अंत:परीक्षणावरून तो ख्रिस्तोत्तर दहाव्या शतकात होऊन गेलेल्या वासुदेव नामक कवीने रचला, असे सिद्ध झाले आहे.* अशा ग्रंथांचा आपणास येथे विचार करावयाचा नाही.

'ऋतुसंहार', 'मालविकाग्निमित्र', 'कुमारसंभव', 'विक्रमोर्वशीय', 'मेघदूत', 'कुन्तलेश्वरदौत्य', 'शाकुंतल' व 'रघुवंश' हे आठ ग्रंथ मात्र कालिदासाने रचले असावे, असे आपणांस निश्चयाने म्हणता येते. याशिवाय 'सेतुबन्ध' किंवा 'रावणवहो' या प्रवरसेनाच्या नावावर प्रसिद्ध असलेल्या प्राकृत काव्यातही कालिदासाचा हात असावा, असे मागे पहिल्या प्रकरणात आपण अनुमान केले आहे. वरील नऊ ग्रंथांपैकी 'कुन्तलेश्वरदौत्या'खेरीज बाकीचे ग्रंथ आज उपलब्ध आहेत. 'कुन्तलेश्वरदौत्य' कालिदासाचेच, याबद्दल क्षेमेंद्राच्या 'औचित्यविचारचर्चे'त (पृ. १३९) स्पष्ट विधान आहे. राजशेखराची 'काव्यमीमांसा', 'शृंगारप्रकाश' वगैरे ग्रंथांत त्यांतील उतारे आले आहेत. त्यांवरून ते एक नाटक असावे असे दिसते. बाकीच्या संस्कृत ग्रंथांत 'ऋतुसंहार', 'कुमारसंभव', 'मेघदूत' व 'रघुवंश' ही काव्ये व 'मालविकाग्निमित्र', 'विक्रमोर्वशीय' व 'शाकुंतल' ही नाटके आहेत. हे आठ ग्रंथ वर दिलेल्या क्रमानेच कवीने लिहिले असावे, असे पुढे दाखविले आहे. या प्रकरणात कालिदासाच्या काव्यांचे व पुढील प्रकरणात त्याच्या नाटकांचे विवेचन करू.

कालिदासाच्या काव्यांचे समालोचन करण्यापूर्वी तत्पूर्वकालीन कवींच्या ग्रंथांचे सिंहावलोकन करणे आवश्यक आहे. आपल्या अत्यंत प्राचीन संस्कृत काव्यांचा पूर्ण लोप झाला असला तरी काव्यकलेचा उगम वैदिक कालापर्यंत नेऊन भिडविता येतो. 'ऋग्वेदा'तील उषादेवतेची विविध अलंकारांनी नटलेली सुंदर वर्णने ज्यांनी रचली, वरुणदेवाच्या सूक्तांत ज्यांनी आपल्या हृदयातील कालवाकालव व्यक्त करून करुणा भाकली, ज्यांची दाशराज्ञसूक्तासारखी युद्धांची वर्णने अद्यापि 'ऋग्वेदा'त अवशिष्ट

---

* A. S. R. Aiyar : Authorship of the Nalodaya, *J. R. A. S.* for 1925, p. 263.

आहेत, त्या आद्य ऋषिवर्यांना शृंगार, करुण व वीररसात्मक काव्ये करता येत नव्हती, असे म्हणणे शक्य नाही. तथापि वर सांगितल्याप्रमाणे ही सर्व काव्ये आता नामशेषही राहिली नाहीत. उपलब्ध ग्रंथांत आदि-काव्याचा मान ' रामायणा 'सच दिला पाहिजे. ' रामायणा 'तील रामाची पितृभक्ति, भरताचे भ्रातृप्रेम वगैरे गोष्टी अत्यंत हृदयस्पर्शी असून त्या काव्यातील विविध प्रसंग कवीने कुशल हाताने रेखाटले आहेत. त्यातील विविध कल्पना, शब्दप्रयोग व उपमादि अलंकार लुटून अश्वघोष-कालिदासादि कवींनी आपली काव्ये सजविली आहेत. उदाहरणार्थ, ' बुद्ध-चरित ' काव्यातील बुद्धाच्या अंतःपुरातील निद्रित स्त्रियांचे वर्णन कवीला ' रामायणा 'तील हनुमानाने लंकेत पाहिलेल्या तत्सदृश दृश्याच्या वर्णनावरून सुचले असावे. इतर महाकाव्यांप्रमाणे यातही वृत्तवैचित्र्य साधले आहे. असो.

पण ' रामायण ' किती झाले तरी धार्मिक बुद्धीने रचलेले महाकाव्य. तेव्हा लौकिक दृष्टीने रचलेल्या प्राचीन काव्यांचे उल्लेख कोठे सापडतात काय, हे पाहिले पाहिजे. असे उल्लेख प्रथम पतंजलीच्या ' महाभाष्या 'त व्याकरणाच्या नियमांची उदाहरणे म्हणून आलेले आहेत. पतंजलीचा काल खिस्तपूर्व द्वितीय शतकाचा मध्य हा आता निश्चित झाला आहे. त्यामुळे त्यांचे विशेष महत्त्व आहे. ' वरतनु सम्प्रवदन्ति कुक्कुटाः ', ' प्रियां मयूरः प्रतिनर्नृतीति ', ' प्रथते त्वया पतिमती पृथिवी ' इत्यादि ' महाभाष्या 'त प्रसंगवशात् आलेल्या उदाहरणांवरून पतंजलीच्या काळी विविधवृत्तांत रचलेले अलंकारादिकांनी युक्त असे बरेचसे काव्यवाङमय अस्तित्वात होते, याविषयी संशय राहत नाही. यानंतरच्या काळातही काव्यनिर्मिति चालू राहिली होती, हे कोरीव लेखांवरून दिसून येते. उदाहरणार्थ, काठेवाडातील जुनागढ शहराजवळील क्षत्रप रुद्रदामन्च्या संस्कृत शिलालेखाच्या लेखकास काव्यकलेच्या सर्व अंगांचा परिचय होता, असे त्या लेखावरून स्पष्ट दिसते.

पण हे लेख आलंकारिक भाषेत व काव्यदृष्टीने लिहिले असले तरी गद्यात आहेत. कालिदासाला ज्यांच्या ग्रंथांपासून स्फूर्ति मिळाली असेल अशा तत्पूर्वकालीन कवींची बहुतेक काव्ये विशाल कालोदरात गडप झाली आहेत. तथापि सुदैवाने त्यांपैकी एका कवीचे–अश्वघोषाचे–ग्रंथ उपलब्ध आहेत,

त्यावरून तत्कालीन काव्यरचनेची कल्पना करता येते. अश्वघोष हा जातीने ब्राह्मण असून मूळचा अयोध्येचा राहणारा. त्याच्या ग्रंथांतील उल्लेखांवरून त्याने उपनिषदे, भगवद्गीता व सांख्यादि दर्शने यांचा चांगला अभ्यास केला होता, असे दिसते. पुढे त्याने बौद्ध धर्माचा स्वीकार केला. संस्कृत वाङमयात अश्वघोषाचे नाव त्याच्या 'सौंदरनंद' व 'बुद्धचरित' या काव्यांनी चिरकाल राहील. यांपैकी पहिल्या काव्याचे अठरा सर्ग आहेत व त्यांत गौतमबुद्धाने नंद नामक आपल्या सावत्र भावास बौद्धधर्माची दीक्षा दिली त्या प्रसंगाचे सविस्तर वर्णन आले आहे. 'बुद्धचरिता'चे सतरा सर्ग आहेत. पण त्यांपैकी पहिले तेराच अश्वघोषाचे असून बाकीचे गेल्या शतकात अमृतानंद नामक कवीने रचले, असा त्यात स्पष्ट उल्लेख आहे. पहिल्या तेरा सर्गांत गौतमबुद्धाच्या जन्मापासून मारविजयापर्यंतची कथा आली आहे.

'सौंदरनंद' काव्याच्या शेवटी कवीने हे काव्य आपण आनंदप्राप्तीकरिता लिहिले नसून विषयोपभोगमग्न लोकांचे लक्ष बौद्ध धर्मात उपदेशिलेल्या मोक्षमार्गाकडे लागावे म्हणून रचले आहे, असे स्पष्ट म्हटले आहे. अश्वघोष स्वतः मोठा प्रतिभावान् कवि होता. शिवाय त्याने रामायणादि पूर्वकालीन काव्यांचा चांगला अभ्यास केला होता, म्हणून त्याची ही दोन्ही काव्ये सरस वठली आहेत. त्याची भाषा साधी पण अव्याजमनोहर आहे. त्याने बुद्ध व नंद यांच्या चरित्रांतील वेचक काव्यमय प्रसंग घेऊन त्यांना उपमादि अलंकारांनी भूषविले आहे. नंदाने भिक्षु होण्याचा निश्चय केल्याचे समजल्यावर सुंदरीने केलेला शोक, गौतम उद्यानात जाताना पौरस्त्रियांची उडालेली धांदल, ज्या रात्री तो आपले घर सोडून निघाला त्या रात्री त्याने पाहिलेले स्त्रियांचे किळसवाणे स्वरूप, गौतमाला वनात पोचवून त्याचा सेवक छंदक एकटाच कपिलवस्तूला आला त्यावेळी पौरजनांस झालेले दुःख, वगैरे प्रसंग कवीच्या अप्रतिम वर्णनशैलीने वाचकांच्या मनश्चक्षूंपुढे हुबेहूब उभे राहतात. मागे पहिल्या प्रकरणात अश्वघोष व कालिदास यांच्या काव्यांतील काही समान कल्पनांची स्थळे दिली आहेत, त्यांवरून कालिदासाने अश्वघोषाच्या काव्यांचा चांगलाच अभ्यास केलेला दिसून येईल. या अभ्यासामुळे रमणीय कल्पना व शब्दसमूह यांप्रमाणेच अश्वघोषाच्या काही विशिष्ट लकबाही कालिदासाच्या काव्यात आलेल्या

दिसतात. उदाहरणार्थ—

बभूव स हि संवेगः श्रेयसस्तस्य वृद्धये।
धातोरधिरिवाख्याते पठितोऽक्षरचिन्तकैः॥ सौंदरनंद १२, ९.

यासारख्या व्याकरणविषयक उपमा, 'यथावदेनं दिवि देवसंघा दिव्यैर्विशेषैर्महयाञ्च चक्रुः।' व 'कार्यस्य कृत्वा हि विवेकमादौ सुखोधिगन्तुं मनसो विवेकः' यांसारखे काटेतोलपणे पाहिले असता अपाणिनीय प्रयोग यांचे कालिदासाच्या काव्यांत सहजगत्या अनुकरण झालेले दृष्टीस पडते.* पण कालिदास स्वतः जास्त काळजीपूर्वक व निर्दोष रचना करणारा कलाभिज्ञ असल्यामुळे त्याने अश्वघोषाच्या ग्रंथांतील अनेक दोष टाळले आहेत. उदाहरणार्थ, अकार्ष्टाम्, अवर्धिष्ट यांसारखे श्रुतिकटु शब्दप्रयोग, 'नृपोपविश्य' यांसारख्या संधीच्या व 'गृह्य', 'विवर्धयित्वा', 'परिपालयित्वा' यांसारख्या धातुसाधितांच्या चुका, 'भट्टिकाव्या'तल्याप्रमाणे 'अवर्धिष्ट', 'अवृधत्' इत्यादि तृतीय भूतकाळच्या वैकल्पिक क्रियापदरूपांच्या प्रयोगाचा अतिरेक वगैरे गोष्टी त्याने दोषार्ह म्हणून काळजीपूर्वक टाळलेल्या दिसतात. अश्वघोषाच्या काव्यांतील यथासंख्य, पादान्तयमक वगैरेसारखे विशेष रमणीय नसलेले किंवा कृत्रिम दिसणारे अलंकार, काही पठनास अवघड असलेली वृत्ते, हीही कवीने बुद्धिपुरःसर योजिली नसावी. एकंदरीत मधुकरवृत्तीने अश्वघोषाच्या काव्यांतून सुंदर तेवढाच भाग घेऊन कालिदासाने आपले ग्रंथ रचले, असे म्हणण्यास हरकत नाही.

अश्वघोषानंतरच्या काळात त्याच्यापेक्षा सरस काव्ये निर्माण करणारे कवि निर्माण झाले असावे, पण त्यांची काव्ये आज उपलब्ध नाहीत. तथापि कालिदासापूर्वी किती निर्दोष व सरस काव्यनिष्पत्ति होत असे, याची कल्पना येण्यासाठी हरिषेणाच्या प्रयाग येथील शिलास्तंभावर कोरलेल्या प्रशस्तीतून† एक उतारा घेऊ. दुसऱ्या प्रकरणात सांगितल्याप्रमाणे ही प्रशस्ति चम्पूकाव्याचा उत्कृष्ट नमुना आहे. तिचा प्रथमार्ध पद्यात असून द्वितीयार्ध बहुतेक गद्यात आहे. गद्यभागात आलंकारिकांच्या नियमाप्रमाणे समासप्राचुर्य असले तरी अनुप्रास, उपमा, श्लेष,

* रघु० १५, ९; ९, ६१; ४, ३ पाहा.
† Fleet : *Gupta Inscriptions*, No. 1.

इत्यादि अलंकारांचा परिमित उपयोग व शब्दांचे नादमाधुर्य यांनी त्याला फार रमणीयत्व आले आहे. पण या भागापेक्षा त्याची पद्ये उत्कृष्ट असावी. शिलास्तंभाचा पृष्ठभाग खराब झाल्यामुळे प्रशस्तीचा प्रथमार्ध ठिकठिकाणी खंडित झाला आहे; तथापि खालील एकाच श्लोकावरून हरिषेणाच्या काव्यकलेची कल्पना करता येईल—

आर्यो हीत्युपगुह्य भावपिशुनैरुत्कर्णितै रोमभिः
सभ्येषूच्छ्वसितेषु तुल्यकुलजम्लानाननोद्वीक्षितः।
स्नेहव्याकुलितेन बाष्पगुरुणा तत्त्वेक्षिणा चक्षुषा
यः पित्राभिहितो निरीक्ष्य निखिलां पाह्येवमुर्वीमिति॥

या श्लोकात आपल्या वृद्धपणी पहिल्या चंद्रगुप्ताने समुद्रगुप्तास आपला उत्तराधिकारी नेमले, त्या प्रसंगाचे हृदयंगम वर्णन आले आहे. या श्लोकाची स्तुति डॉ. बुल्हरने पुढे लिहिल्याप्रमाणे मुक्त कंठाने केली आहे—"या प्रसंगाचे यापेक्षा थोडक्यात व अधिक हुबेहूबपणाने चित्र काढणे शक्य नाही. यात एकही शब्द अधिक नाही. हा श्लोक वाचताना वृद्ध चंद्रगुप्ताच्या राजसभेतील दृश्य आपल्या डोळ्यांसमोर उभे राहते. आपल्यालाच गादी मिळावी, अशी अपेक्षा असलेले त्याचे पुत्र एकीकडे बसले आहेत, तर दुसरीकडे राजा कोणा अयोग्य माणसाची निवड तर करणार नाहीना अशी भीति वाटणारे सभासद त्याच्या निकालाची वाट पाहत आहेत! अशा प्रसंगी 'हाच योग्य पुरुष आहे' असे बोलून रोमांचित शरीराने राजाने समुद्रगुप्तास आलिंगन दिले व प्रेमामुळे अश्रुपूर्ण झालेल्या अशा तत्त्वेक्षी दृष्टीने त्याच्याकडे पाहून त्याला म्हटले: 'ह्या सर्व पृथ्वीचे असे पालन कर'. हे राजाचे शब्द ऐकताच इतर राजकुमारांची मुखे म्लान झाली, पण सभासदांनी समाधानाचा सुस्कारा सोडला. हे पद्य थोडक्यात शब्दचित्र काढणाऱ्या भारतीयांच्या कलेचे एक उत्कृष्ट उदाहरण आहे." अशा काव्यनिर्मितीनंतर कालिदासाच्या 'मेघदूता'-सारखी सर्वांगसुंदर काव्ये निर्माण झाली तर त्यात आश्चर्य वाटावयास नको.

### ऋतुसंहार

कालिदासाच्या सर्व काव्यांत 'ऋतुसंहार' हे जरा कमी प्रतीचे गणले जाते. त्यावरून ते कालिदासकृत असेल काय, असा विद्वानांस संशय

येत होता. पण तो अस्थानी होता, असे अनेक प्रमाणांनी दाखविता येते. या काव्यातील दोन श्लोक (६, १७ व २०) वल्लभदेवाच्या 'सुभाषितावली'त कालिदासाचे म्हणून दिले आहेत. मागे पहिल्या प्रकरणात इ. स. ४७३ च्या मंदसोर येथील प्रशस्तीत वत्सभट्टीने 'ऋतुसंहारा'तील काही श्लोकांचे अनुकरण केलेले दाखविले आहे. त्यावरूनही हे काव्य इ. स. च्या पाचव्या शतकाइतके प्राचीन आहे यात संशय रहात नाही. शिवाय कालिदासाला ऋतुवर्णनाची मोठी आवड होती असे दिसते. त्याच्या बहुतेक ग्रंथांत एका ना एका ऋतूचे वर्णन आले आहे. 'कुमारसंभवा'त वसन्ताचे, 'विक्रमोर्वशीय' व 'मेघदूत' यात वर्षाऋतूचे, 'शाकुंतला'त ग्रीष्माचे व 'रघुवंशा'त प्राय: सर्वच ऋतूंचे वर्णन कवीने केले आहे. सरस्वती देवीच्या उपासनेला आरंभ करताना निसर्गवर्णनाशिवाय दुसरा उचित व सोपा विषय कोणता असणार? यात एखाद्या कथानकाचा संबंध येत नसल्यामुळे स्फूर्ति येईल तेव्हा व सवडीप्रमाणे श्लोक रचून ते मागाहून एकत्र गुंफता येतात. हाच विषय कवीने प्रथम घेण्याचे दुसरेही एक कारण संभवते. मागे दुसऱ्या प्रकरणात सांगितल्याप्रमाणे इ. स. च्या दुसऱ्या-तिसऱ्या शतकात कुशाण साम्राज्यामुळे हिंदुस्थानाचा पूर्व व पश्चिम देशांशी व्यापार वाढून संपत्तीचा ओघ देशात वाहू लागला. ऐश्वर्याबरोबर चैनही आलीच. त्यामुळे मध्यमवर्गातील लोकांची राहणी सुधारून त्यांचे ललितकलांकडे अधिक लक्ष जाऊ लागले. त्या काळी नगरांत राहणाऱ्या विलासी व कलाभिज्ञ नागरकांचे वात्स्यायनाच्या 'कामसूत्रा'त वर्णन आले आहे, त्यावरून त्यांचे ललितकलांस व वाङ्मयास कसे उत्तेजन मिळे, हे दिसून येते. प्रत्येक नागरकाच्या घरी त्याच्या खास दिवाणखान्यात एका उंच टेबलावर केशरचनेला लागणारे सामान, पुष्पमाला, ताम्बूल, अत्तरे वगैरे ठेविलेली असत. भिंतीतील फळ्यांवर वीणा, चित्रकर्माला उपयुक्त असे रंग, ब्रश वगैरे सामान व त्याच्याजवळ एखादे काव्यही दृष्टीस पडे. सायंकाळी चांगला पोषाक करून नागरक 'गोष्ठी' किंवा मित्रसमाज जमे त्या ठिकाणी जाई. तेथे तात्कालिक काव्यरचना, समस्यापूर्ति, पुस्तकवाचन, प्रतिमालास्पर्धा (भंडचा) इत्यादिकांत त्याचा वेळ जाई. या समाजात कलाभिज्ञ, विदुषी व चतुर अशा गणि-

कांनाही बोलावण्यात येई व केव्हा केव्हा त्यांच्या घरीही बैठकी होत; त्या वेळी काव्यनिर्मिति व कलानैपुण्य यांमध्ये स्पर्धा सुरू होई. अशा प्रसंगी ऋतुवर्णनासारखे विषय सहजच सुचणारे असतात. कालिदासाने 'ऋतुसंहार' काव्य रचले तेव्हा त्याला राजाश्रय असावा असे वाटत नाही ; कारण राजाश्रयाचा किंवा राजसभेतील दृश्याचा त्यात प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष एकही उल्लेख दिसत नाही. कित्येक श्लोकांत त्याच त्याच कल्पना पुनः पुनः आल्या आहेत. काही श्लोक प्रियेस उद्देशून लिहिले असले तरी दुसरे कितीएक 'स्त्रियांच्या सहवासात तुझा उष्णकाळ सुखात जावो,' (२, २८) याप्रमाणे पुरुषास उद्देशून रचलेले दिसतात. त्यांवरून हे खण्डकाव्य खण्डशः नागरकसमाजात रचले असावे, असे वाटते.

'ऋतुसंहार' काव्याचे सहा सर्ग असून प्रत्येकात सोळापासून अठ्ठावीसपर्यंत श्लोक आहेत. त्यात ग्रीष्म, वर्षा, शरद्, हेमन्त, शिशिर व वसन्त या सहा ऋतूंचे क्रमाने वर्णन आले आहे. प्रत्येक ऋतूच्या वर्णनात त्या ऋतूचा वृक्षलतांवर व पशुपक्ष्यांवर झालेला परिणाम व त्या ऋतूच्या आगमनाने कामिजनांच्या चित्तवृत्तीत व वर्तनात दिसून येणारा फरक व त्यांच्या मनात उत्पन्न होणारे विविध विचार यांचे कवीने सुंदर वर्णन केले आहे. उदाहरणार्थ, ग्रीष्म ऋतूचे खालील उदाहरण घ्या--

रवेर्मयूखैरभितापितो भृशं विदह्यमानः पथि तप्तपांसुभिः ।
अवाङ्मुखो जिह्मगतिः श्वसन्मुहुः फणी मयूरस्य तले निषीदति ॥
ऋतु० १, १३.

या श्लोकात 'सूर्याच्या अत्यंत उष्ण किरणांनी वरून व तापलेल्या धुळीने खालून अंगाला चटके बसत असल्यामुळे विव्हल होऊन धापा टाकणारा वक्रगति साप जातिवैर विसरून मयूराच्या छायेत जाऊन बसतो' असे कवीने वर्णन केले आहे. ग्रीष्म ऋतूत चांदणे फार रमणीय वाटते, पाण्यात नेहमी डुंबत राहावे, अशी इच्छा होते, रात्री गच्चीवर प्रियांसमवेत मदनोद्दीपक सुरापान व वीणावादन यांत कामी लोक काल घालवितात, रात्री धवल हर्म्यपृष्ठावर सुखनिद्रा घेणाऱ्या स्त्रियांची मुखे पाहून जणू काय लज्जेने चंद्र पांढरा फटफटीत होतो, इत्यादि वर्णनाने ग्रीष्म ऋतूचा कामिजनांवर होणारा परिणाम कवीने दाखविला

आहे. ग्रीष्म ऋतूनंतर पावसाळा येतो. तेव्हा तृषाकुल चातक पक्ष्यांनी याचना केल्यामुळे जलभाराने नम्र झालेले मेघ मनोहर ध्वनि करून जलवृष्टि करतात, त्या वेळी प्रवासी जनांना आपल्या स्त्रियांची आठवण होऊन अत्यंत दुःख होते, इत्यादि कल्पना वर्षा ऋतूच्या वर्णनात आल्या आहेत. शरद् ऋतूचे वर्णन करताना कवि म्हणतो—

> काशांशुका विकचपद्ममनोज्ञवक्त्रा
> सोन्मादहंसरवनूपुरनादरम्या ।
> आपक्वशालिरुचिरानतगात्रयष्टिः
> प्राप्ता शरन्नववधूरिव रूपरम्या ॥ ऋतु० ३, १.

‘ काशरूपी वस्त्र नेसलेली, प्रफुल्ल कमल हेच जिचे मुख आहे, उन्मत्तहंसरूपी नूपुरांच्या नादाने जी रमणीय दिसते व आपक्व साळीची रोपे हीच जिची सुंदर शरीरयष्टि आहे, अशी नववधूप्रमाणे सुस्वरूप दिसणारी शरद् प्राप्त झाली आहे.’ पुढे शरद् ऋतूत रात्री चंद्रप्रकाशाने, नद्या हंसांनी, तळी सारस पक्ष्यांनी, अरण्ये पुष्पभाराने लवलेल्या सप्तवर्ण वृक्षांनी व उपवने मालती पुष्पांनी पांढरी सफेत दिसतात, इत्यादि वर्णन आले आहे. चौथ्या व पाचव्या सर्गात कवीने हेमन्त व शिशिर ऋतूंचे वर्णन केले आहे. पण ते पहिल्या तीन सर्गाइतके सुंदर उतरले नाही. या ऋतूंत नजरेत भरतील असे सृष्टिसुंदरीचे पुष्पादि अलंकार दिसत नाहीत, म्हणून कवीने केवळ सृष्टिवर्णनाला चार-पाचच श्लोक दिले आहेत व इतर श्लोकांत युवयुवतींच्या प्रेमाचे, लीलांचे व संभोगाचेच वर्णन केले आहे. यापेक्षा वसंतवर्णन जास्त चांगले साधले आहे. वसन्तात वृक्ष सपुष्प, जल पद्मयुक्त, स्त्रिया मदनपरवश, वायु सुगन्धि, संध्याकाल सुखकर व दिवस रम्य असतात, असे या ऋतूचे वैशिष्टय एकाच श्लोकात कवीने सांगितले आहे. पुढील श्लोकातील वसन्तवायूचे वर्णन पहा—

> आकम्पयन् कुसुमिताः सहकारशाखा
> विस्तारयन्परभृतस्य वचांसि दिक्षु ।
> वायुर्विवाति हृदयानि हरन्नराणां
> नीहारपातविगमात् सुभगो वनान्ते ॥ ऋतु० ६, २२.

‘ धुके नाहीसे झाल्यामुळे सुखकर वाटणारा वायु पुष्पयुक्त आम्रशाखा हलवीत, कोकिलांचे आलाप सर्व दिशांत पसरवीत व जनांची अंतःकरणे

आकर्षण करीत वाहत आहे.' या श्लोकात कालिदासाच्या उत्तरकालीन काव्यात दिसून येणारे गांभीर्य, लालित्य वगैरे गुण दिसून येतात.

एकंदरीत 'ऋतुसंहारा'त कवीचे बाह्य सृष्टीवरील प्रेम व शृंगार-रसाविषयी आवड व्यक्त होते. या काव्यात त्याने स्वभावोक्तीवरच विशेष भर दिला आहे. काही ठिकाणी उपमा, उत्प्रेक्षा व रूपक हे साधे अर्थालंकार आढळतात, पण त्यांत नंतरच्या काव्यांतील अलंकारांची हृद्यता अनुभवास येत नाही. शिवाय अर्थान्तरन्यास या गोड अलंकाराचे यात एकही उदाहरण नाही. कवीच्या शब्दरचनेत अद्यापि लालित्य कमी आहे. अनेक ठिकाणी पुनरुक्ति, 'तडिल्लताशक्रधनुर्विभूषिताः पयोधराः' (२, १९) इत्यादि स्थली लतादि शब्दांचा अनावश्यक प्रयोग, क्वचित् व्याकरण-नियमभंग इत्यादि दोषही यात दिसून येतात. हे काव्य रचताना 'रामायणा'च्या किष्किंधाकांडातील वर्षा व शरद् ऋतूंची वर्णने कवीस माहीत होती, असे काही समानार्थक शब्दप्रयोग व कल्पना यांवरून म्हणता येते. खालील उदाहरणे पहा—

रामायण— बालेन्द्रगोपान्तरचित्रितेन विभाति भूमिर्नवशाद्वलेन।
गात्रानुपृक्तेन शुकप्रभेण नारीव लाक्षोक्षितकम्बलेन॥ ४, २८, २४.

ऋतुसंहार—प्रभिन्नवैदूर्यनिभैस्तृणाङ्कुरैः समाचिता प्रोत्थितकन्दलीदलैः।
विभाति शुक्लेतररत्नभूषिता वराङ्गनेव क्षितिरिन्द्रगोपकैः॥ २, ५.

पावसाळ्यात हिरव्यागार गवतावर तांबडे इंद्रगोप किडे दिसू लागतात, त्यांचे वर्णन करताना 'रामायणा'त त्यांना लाखेच्या खडीची व 'ऋतुसंहारा'त रक्तवर्ण रत्नांची उपमा दिली आहे. कालिदासाची उपमा सरस आहे; तथापि नव्या हरळीला भूमीला पोपटी रंगाच्या वस्त्राची जी मनोहर उपमा 'रामायणा'त कवीने योजिली आहे, तिचा मागमूसही कालिदासाच्या श्लोकात नाही. 'रामायणा'तील इतर श्लोकांतही नव्या नव्या कल्पना, उत्प्रेक्षादि अलंकार योजिलेले दिसतात, त्यांमुळे त्या दोन ऋतूंचे वर्णन फारच रमणीय झाले आहे. 'ऋतुसंहारा'तील वर्णन त्यापुढे बरेच फिके पडते. तथापि या काव्यावरून कवीच्या मार्मिक सृष्टिनिरीक्षणाची, उज्ज्वल नैसर्गिक प्रतिभेची व विकासक्षम कलानैपुण्याची कल्पना येते, यात संशय नाही. यामुळे या काव्यानेही त्या काळी त्याची जनतेत प्रसिद्धि झाली असावी. यानंतर लौकरच द्वितीय चंद्रगुप्ताने वाकाटकांच्या साहाय्याने

क्षत्रपांचा पराभव करून त्यांचे माळवा व काठेवाड हे प्रांत आपल्या राज्यास जोडले व उज्जैनी ही आपली राजधानी केली. वाकाटकांशी जमलेला स्नेहसंबंध दृढतर करण्याकरिता त्याने आपली मुलगी प्रभावती-गुप्ता रुद्रसेन वाकाटकास दिली. त्या विवाहोत्सवप्रसंगी कालिदासाचे 'मालविकाग्निमित्र' रंगभूमीवर आले असावे. या नाटकाचा पुढील प्रकरणात विचार करू. या नाटकाने कालिदासाचा चंद्रगुप्ताशी जो संबंध जडला तो पुढे दृढतर होत गेला असावा. पुढे लौकरच ध्रुवदेवीपासून त्याला कुमारगुप्त हा पुत्र झाला. त्या प्रसंगी कालिदासाने आपले 'कुमारसंभव' रचण्यास सुरवात केली असावी. त्या काव्याचे आता समालोचन करू.

## कुमारसंभव

सध्या उपलब्ध असलेल्या 'कुमारसंभवा'च्या प्रतीत सतरा सर्ग आढळतात, पण पूर्वी याचे बावीस सर्ग असावेत, असे काही लोकांचे म्हणणे आहे. याच्या उलट हे काव्य कवीने अर्धवट टाकले असून त्याचे मूळचे आठच सर्ग असावेत, असेही पुष्कळ विद्वानांचे मत आहे. त्याचा पुढे विचार करू.

तारकासुराने ब्रह्मदेवाच्या वराने प्रबळ होऊन देवांस त्रास दिल्यामुळे त्यांनी ब्रह्मदेवाच्या सूचनेवरून शिव व पार्वती यांचा विवाह घडवून आणला व त्या संबंधापासून उत्पन्न झालेल्या कार्त्तिकेयाला सेनापति करून त्याच्याकडून तारकासुराचा वध करविला, असे कथानक या काव्यात वर्णिले आहे. काव्याच्या आरंभी कवीने हिमालयाचे फार सुंदर वर्णन केले आहे. पुढे त्याला मेनेपासून झालेली कन्या पार्वती हिच्या जन्माचे, बाल्याचे व यौवनाचे मनोहर वर्णन आले आहे. एकदा तिला पित्याच्या जवळ बसलेली पाहून नारदाने ही पुढे शिवाची अर्धांगी होईल असे भविष्य वर्तविले होते, म्हणून हिमालयाने तिला यौवन प्राप्त झाल्यावरही तिच्या विवाहाची खटपट केली नाही. त्या वेळेस भगवान् शंकर हिमालय पर्वतावरच तपश्चर्या करीत बसले होते. त्यांची सेवा करण्यास त्याने तिला आज्ञा केली (सर्ग १). त्या सुमारासच तारकासुराच्या जाचास कंटाळून इंद्रादि देव ब्रह्मदेवास शरण गेले. त्यांच्या स्तुतीने संतुष्ट होऊन ब्रह्मदेवाने सांगितले की, मी स्वतःच तारकासुरास वर दिल्यामुळे त्याचा नाश करणे योग्य होणार नाही. करिता तुम्ही शिव व पार्वती यांचा विवाह जुळवून

आणा. त्यापासून होणारा पुत्र तारकासुराचा पराजय करून तुम्हांला त्याच्या जाचातून मुक्त करील (सर्ग २). स्वर्गास परत गेल्यावर इंद्राने मदनाला पाचारण केले व ध्यानस्थ शंकरांच्या मनात पार्वतीविषयक प्रेम उत्पन्न करण्याच्या कामगिरीवर त्याची योजना केली. आपला मित्र वसंत व स्त्री रति यांना घेऊन मदन हिमालय पर्वतावर आला. तेथे भगवान् शंकरांच्या मनात कामवासना उत्पन्न करण्याकरिता वसंताने सर्वत्र आपले साम्राज्य पसरले. शंकर ध्यानस्थ बसले होते त्या लतागृहाच्या द्वारावर नन्दी पहारा करीत होता. त्याची दृष्टि चुकवून मदनाने आत प्रवेश केला, त्यावेळी योगासन घालून भगवान् शंकर परमात्मदर्शनात मग्न होते. थोड्या वेळाने त्यांची समाधि उतरल्यावर त्यांच्या अनुमतीने नंदीने पार्वतीला आत आणले. तिने त्यांच्या पदकमली पुष्पोपहार अर्पण करून गंगा नदीत उत्पन्न होणाऱ्या कमलांच्या शुष्क बीजांची माला त्यांना देण्याकरिता पुढे केली. ते ती घेत असता योग्य संधि पाहून मदनाने आपल्या धनुष्यावर संमोहन नामक बाण लावला. त्यामुळे शंकरांच्या चित्तवृत्तीत चलबिचल झाली. पण तिचे संयमन करून त्यांनी तिचे कारण हुडकण्याकरिता सभोवार दृष्टि फेकली तो त्यांना धनुष्यावर बाण लावून आपल्यावर नेम घेत असलेला मदन दृष्टीस पडला. त्याबरोबर क्रोधाने त्यांच्या तृतीय नेत्रातून वह्नि बाहेर पडून त्याने मदनाला भस्म केले (सर्ग ३). आपल्या पतीची ती अवस्था पाहताच रतीला एकदम मूर्च्छा आली. पुढे भानावर आल्यावर तिने शोक केला. तिचे सांत्वन करण्यास मदनाचा मित्र वसंत तेथे आला. त्याला पाहून तर तिचे दु:ख दुणावले व ती अनेक गोष्टी आठवून ओक्साबोक्शी रडू लागली. दु:खातिशयाने ती देहत्याग करणार तोच आकाशवाणी झाली की, शिव जेव्हा पार्वतीशी विवाह करतील त्या वेळी मदनाला जिवंत करतील, तोपर्यंत तू त्याच्या देहाचे रक्षण कर (सर्ग ४). आपल्या समक्ष मदनाला भस्मसात् केलेले पाहून पार्वतीची अत्यंत निराशा झाली व तिने शिवप्राप्तीकरिता अतिशय उग्र तपश्चर्या आरंभिली. त्यामुळे संतुष्ट होऊन भगवान् शंकर ब्रह्मवर्चसाने तेज:पुंज दिसणाऱ्या जटाधारी ब्रह्मचाऱ्याचे रूप धारण करून तेथे आले व पार्वतीने केलेल्या पूजेचा स्वीकार करून, तिला सर्व परिस्थिति अनुकूल असताही यौवनावस्थेत इतके उग्र तप करण्याचे कारण

विचारले. तिच्या सखीकडून, तिचे मन शंकरांवर बसले आहे व त्यांच्या प्राप्तीकरिताच ही तपश्चर्येने आपले शरीर शोषवीत आहे, असे समजताच ब्रह्मचाऱ्याने शंकरांची खूप निंदा केली. त्यांच्या सर्पभूषणाचे, रक्तबिंदु गळत असलेल्या गजचर्मरूपी प्रावरणाचे, स्मशानवासाचे, अकिंचनत्वाचे व तृतीयनेत्रत्वामुळे आलेल्या कुरूपतेचे भडक वर्णन करून 'असल्या वराचा नाद सोडून दे', असा तिला उपदेश केला. ब्रह्मचाऱ्याचे ते भाषण ऐकताच पार्वतीचा क्रोध अनावर झाला. तथापि, तिने त्याचे म्हणणे खोडून काढून आपला त्यांच्या प्राप्तीबद्दलचा निश्चय पुनः प्रकट केला. त्यावर ब्रह्मचारी काही बोलणार तोच ती उठून चालूही लागली. तेव्हा शंकरांनी प्रकट होऊन तिला थांबविले व 'आजपासून मी तुझ्या तपश्चर्येने विकत घेतलेला तुझा दास झालो आहे', असे सांगितले (सर्ग ५). नंतर शंकरांनी अरुंधतीसहित सप्तर्षींना हिमालयाकडे पाठवून पार्वतीबद्दल मागणी घातली. त्यानेही पत्नीच्या अनुमतीने ती मान्य केली (सर्ग ६). पुढे मंगल तिथीवर शिवपार्वतीचा विवाह झाला. त्या वेळेस पार्वतीच्या वेशभूषेचे, तिच्या सखींनी केलेल्या विनोदाचे, शंकर हिमालयगृही येण्यास निघाले तेव्हा त्यांच्या परिवाराचे, त्यांच्या पुरप्रवेशाच्या वेळी झालेल्या नगरस्त्रियांच्या गडबडीचे व नंतर विवाहसंस्काराचे विस्तृत व रम्य वर्णन कवीने केले आहे (सर्ग ७). विवाहानंतर शंकरांनी पार्वतीसह विविधप्रकारचे उपभोग घेण्यात शेकडो ऋतु घालविले (सर्ग ८). तेव्हा इंद्रादि देवांनी अग्नीस पारावत रूपाने शिवपार्वतीच्या विवाहस्थली पाठविले. त्याला पाहून शंकरांना प्रथम राग आला तरी त्याने सर्व वस्तुस्थिति सांगितल्यावर ते संतुष्ट झाले व त्याच्या ठिकाणी त्यांनी आपले वीर्य टाकले (सर्ग ९). ते दुःसह झाल्यामुळे इंद्राच्या सांगण्यावरून त्याने ते स्वर्गंगेत टाकले; तिलाही त्याचा ताप सहन होईना, म्हणून तितक्यात स्नानास आलेल्या सहा कृत्तिकांच्या देहांत तिने ते वाटून दिले. तेथे त्याचा गर्भ झाला; पण कृत्तिकांना त्याचा भार सहन न झाल्यामुळे त्यांनी वेतसवनात त्याचा त्याग केला (सर्ग १०). त्याच सुमारास शंकरपार्वती विमानात बसून त्या मार्गाने जात होते. त्यांनी त्याला ओळखले व स्वगृही नेले. तेथे सहा दिवसांतच तो मोठा होऊन सकल शस्त्रशास्त्रांत प्रवीण झाला (सर्ग ११). पुढे इंद्रादिकांच्या विनंतीवरून शंकरांनी त्याला देवसेनेचा अधिपति करून

स्वर्गास पाठविले (सर्ग १२). त्याला पुढे करून देवांनी तारकासुरावर चाल केली (सर्ग १३). त्यानेही लढाईची तयारी केली व अनेक अपशकुन झाले तरी त्यांना न जुमानता कुमाराशी भयंकर युद्ध केले. शेवटी कुमाराच्या बाणाने विद्ध झाल्यामुळे तो युद्धात मरण पावला. त्याबरोबर कुमाराच्या शिरावर स्वर्गीय पुष्पांची वृष्टि झाली व इंद्राला पुन: स्वर्गाचे आधिपत्य मिळाले (सर्ग १४–१७).

'कुमारसंभवा 'च्या सतरा सर्गांपैकी एकंदर आठ सर्गांवरच अरुणगिरिनाथ, मल्लिनाथ वगैरेंची टीका आहे. 'कुमारसंभव' या काव्याच्या नावावरून कुमाराच्या जन्मापर्यंतचीच कथा कवीला वर्णावयाची होती, असेही कित्येक लोक अनुमान करतात ; पण ते तितकेसे सयुक्तिक भासत नाही. कारण कुमारगुप्ताच्या जन्मोत्सवप्रसंगी हे काव्य कवीने लिहावयास घेतले असल्यास त्याने त्यास ते नाव मुद्दाम दिले असण्याचाही संभव आहे. शिवाय या आठ सर्गांत कुमाराच्या जन्मापर्यंतचाही कथाभाग येत नाही, हे वर दिलेल्या सारांशावरून दिसून येईल. तेव्हा हे काव्य अपूर्णच राहिले असावे, असे वाटते. सातव्या व आठव्या सर्गांत शिवपार्वतींच्या संभोगाचे वर्णन आहे, ते सदभिरुचीस सोडून असल्यामुळे आनंदवर्धनादि आलंकारिकांनी कवीस दोष दिला आहे (ध्वन्यालोक, पृ. १४७). या वर्णनाने पार्वतीला राग आल्यामुळे तिच्या शापाने हे काव्य अपूर्ण राहिले, अशीही एक दंतकथा अरुणगिरिनाथ याने उल्लेखिली आहे त्यावरून कालिदासकाळीही अशा तऱ्हेचे आक्षेप घेतले असावेत व त्यामुळे कवीने हे अर्धवटच सोडून दिले असावे, असे वाटते. कारण काही असले तरी नवव्या सर्गापासूनचा भाग कालिदासाच्या हातचा दिसत नाही. पहिल्या भागातील सर्गांच्या मानाने यांतील सर्ग श्लोकसंख्येने लहान दिसतात. साठापेक्षा ज्यांत कमी श्लोक आहेत, असे सर्ग सबंध 'रघुवंशा 'त दोन व 'कुमारसंभवा 'च्या अष्टसर्गात्मक पहिल्या भागातही फक्त एक इतकेच आले आहेत. याच्या उलट 'कुमारसंभवा 'च्या दुसऱ्या भागातील नऊ सर्गांपैकी सात या तऱ्हेचे आहेत. या सर्गांची भाषाशैलीही पूर्वभागातल्याइतकी सफाईदार दिसत नाही. यातील उपमा-अर्थान्तरन्यासादि अलंकार व एकंदर वर्णन कालिदासाच्या इतर ग्रंथांतल्यासारखे मनोरम वठले नाही. 'उपाविशत्सुरेन्द्रेणादिष्टं सादरमासनम्', (१०, ४) वगैरे ठिकाणचा

यतिभंग, 'परित्यजध्वम्', (१२, ३६) 'मद्विग्रहमधि' (१०, १२) 'शत्रु-विजेष्यमाणम्' (१३, २१) यांसारखे व्याकरणदुष्ट प्रयोग, 'च', 'हि' यांसारख्या पादपूरणार्थक अव्ययांचा सढळ उपयोग, 'अहो अहो देवगणाः सुरेन्द्रमुख्याः शृणुध्वं वचनं ममैते ।' (१२, ५४) यासारख्या नीरस पंक्ति यांवरून हा उत्तरभाग 'कुमारसंभव' अपूर्ण राहिलेले पाहून कोणा कमी प्रतीच्या कवीने रचला असावा, असे वाटते. अश्वघोषाच्या 'बुद्धचरिता'-च्याही बाबतीत असा प्रकार झाला असल्याचे आपण मागे पाहिलेच आहे. असो.

या काव्यात महादेव, पार्वती व मदन ह्याच तीन मुख्य व्यक्ती आहेत. त्यांचे स्वरूप, स्वभाव व कृति यांच्या वर्णनात कवीने आपले शक्तिसर्वस्व खर्चले आहे. महादेव व पार्वती या दिव्य व्यक्ति. एक त्रैलोक्याचा पिता तर दुसरी जगन्माता. अशा अलौकिक् विभूतींच्या विचारविकारांचे वर्णन करताना सर्व प्रकारे अनौचित्य टाळणे जरूर होते. पण केवळ अद्‌भुत रूपाने कवीने त्यांचे वर्णन केले असते तर वाचकांना त्यात आपलेपणा वाटला नसता. या दोन्ही मर्यादा सांभाळण्यात कवीने मोठे कौशल्य प्रकट केले आहे. महान् इंद्रियनिग्रही, सदैव तपश्चर्येत मग्न, चित्ताची किंचित् चलबिचल झाली असता तिला कारणीभूत झालेल्या मदनाला देहान्त शिक्षा देणारा कठोरहृदय भगवान् शंकर पार्वतीच्या उग्र तपश्चर्येने व तिच्या स्थिर प्रेमाने प्रसन्न होतो, तिच्याशी होणाऱ्या विवाहाची आतुरतेने वाट पाहतो, तिच्याशी विविधप्रकारे विलास करतो, आपल्या संध्यावंदनामुळे ती रागावली असता तिची समजूत घालतो, असे मोठे मनोहर चित्र कवीने रंगविले आहे. स्वतःच्या सौंदर्याचा यथार्थ अभिमान बाळगणारी पण मदनदाहानंतर निराश झालेली, शिवप्राप्तीकरिता घोर तपश्चर्येने आपले सुकुमार शरीर शोषविणारी, गुरुजनांपुढे अत्यंत नम्र होणारी, पण दुर्जनांना वाक्‌ताडन करणारी, पतीच्या संध्यावंदनानेही सवतीमत्सर वाटणारी, अशी पार्वती, व जगात सर्वत्र स्थापित झालेल्या आपल्या साम्राज्यामुळे गर्विष्ठ होऊन प्रत्यक्ष शंकरांनाही मोह पाडीन अशी बढाई मारणारा, पण मनात साशंक असल्याने द्वारपाल नंदीची दृष्टि चुकवून शंकर तपश्चर्या करीत असलेल्या ठिकाणी चोरून प्रवेश करणारा मदन, यांची स्वभावचित्रेही मनोवेधक उतरली आहेत.

पहिल्या आठ सर्गातील सर्वच प्रसंग कवीने मोठ्या कुशलतेने रेखाटले आहेत. तथापि, त्यातल्या त्यात प्रारंभीचे हिमालयाचे व तृतीय सर्गातील अकालिक वसंत ऋतूतील वनश्रीचे वर्णन, चौथ्यातील रतिविलाप, पाचव्या सर्गातील बटुवेषधारी शंकर व पार्वती यांचे संभाषण, ही उत्कृष्ट साधली आहेत. या काव्यात संभोग व विप्रलंभ हे शृंगाराचे दोन्ही प्रकार व करुणरस हे मुख्यत्वाने आले आहेत. स्थलाभावास्तव यातील उत्कृष्ट स्थले विस्ताराने देता येत नाहीत ; तथापि पुढील उदाहरणांवरून वाचकांस काही कल्पना येईल—

आमेखलं संचरतां घनानां छायामधःसानुगतां निषेव्य।
उद्वेजिता वृष्टिभिराश्रयन्ते शृङ्गाणि यस्यातपवन्ति सिद्धाः॥

कुमार० १, ५.

(त्या हिमालयाच्या मध्यभागाभोवती फिरणाऱ्या मेघांची छाया खालच्या शिखरांवर सेवन करून ते वृष्टि करू लागले असता त्रासून जाऊन सिद्ध उच्च शिखरांवर जाऊन सूर्यप्रकाश सेवन करतात.) या श्लोकातील वर्णन अगदी यथातथ्य आहे असे सिमला, नैनिताल वगैरे ठिकाणी जाऊन राहिलेले लोक सांगतात.

कुबेरगुप्तां दिशमुष्णरश्मौ गन्तुं प्रवृत्ते समयं विलङ्घ्य।
दिग्दक्षिणा गन्धवहं मुखेन व्यलीकनिःश्वासमिवोत्ससर्ज॥

कुमार० ३, २५.

या पद्यात अकाली वसंतागमामुळे वाहणाऱ्या दक्षिण दिशेच्या वायूचे आलंकारिक वर्णन आले आहे. 'पूर्वी दिलेले वचन मोडून आपला प्रियकर दुसरीकडे जाऊ लागला असता ज्याप्रमाणे एखादी स्त्री दुःखाने सुस्कारे टाकते त्याप्रमाणे अकाली सूर्य उत्तरेकडे जाऊ लागला म्हणून दक्षिण दिशा जणू काय वायुरूपाने उसासे टाकू लागली.'

मदनदाहानंतर रतीने केलेला विलाप वाचून ज्याच्या डोळ्यांत अश्रु उभे राहत नाहीत, असा सहृदय वाचक विरळा ! आपल्या डोळ्यांदेखत पतीच्या देहाचे भस्म झालेले पाहताच रतीला प्रथम तर मूर्च्छाच आली. काही वेळाने भानावर आल्यावर तिने धरणीवर अंग टाकले, तिचे केस अस्ताव्यस्त झाले व तिच्या आक्रोशाने सभोवतालचे वनही जणू समदुःख झाले. मदनाचे निरनिराळे गुण व विलास आठवून ती शोक करू लागली,

त्याचे वर्णन अत्यंत हृदयद्रावक झाले आहे. उदाहरणार्थ, खालील श्लोक पहा—

हृदये वससीति मत्प्रियं यदवोचस्तदवैमि कैतवम्।
उपचारपदं न चेदिदं त्वमनङ्गः कथमक्षता रतिः॥ कुमार० ४, ९.

'तू माझ्या हृदयात वसत आहेस, असे मला बरे वाटण्यासाठी तू म्हणत होतास, पण ते मिथ्या होते, हे मला आता कळून आले; नाही तर तू अनंग (देहरहित) झाल्यावर ही रति जशीच्या तशी कशी राहिली असती ?' या श्लोकात शब्द अगदी साधे योजिले आहेत तरी त्यात रतीचा शोक उत्तम रीतीने व्यक्त झाला आहे.

पाचव्या सर्गातील ब्रह्मचाऱ्याचे छद्मी भाषण व त्यावर पार्वतीचे सडेतोड उत्तर ही दोन्ही उत्कृष्ट साधली आहेत. शंकराचे अकिंचनत्व, श्मशानवास, इत्यादि दोष ब्रह्मचाऱ्याने दाखविले, तेव्हा पार्वती त्यास काय उत्तर देते पाहा—

अकिञ्चनः सन् प्रभवः स सम्पदां त्रिलोकनाथः पितृसद्मगोचरः।
स भीमरूपः शिव इत्युदीर्यते न सन्ति याथार्थ्यविदः पिनाकिनः॥
कुमार० ५, ७७.

(शंकर स्वत: दरिद्री असले तरी दुसऱ्याला संपत्तिमान् करतात; त्रैलोक्याचे स्वामी असूनही श्मशानात राहतात, त्यांचे रूप भयंकर असले तरी त्यांना लोक शिव म्हणतात, तेव्हा त्यांचे यथार्थ ज्ञान कोणालाही झाले नाही, हेच खरे.) शंकराची कुळकथा कोणाला माहीत नाही, या आक्षेपास उद्देशून ती पुढे म्हणते—

विवक्षता दोषमपि च्युतात्मना त्वयैकमीशं प्रति साधु भाषितम्।
यमामनन्त्यात्मभुवोऽपि कारणं कथं स लक्ष्यप्रभवो भविष्यति॥
कुमार० ५, ८१.

(स्वत: नतभ्रष्ट असलास तरी शंकरांचा दोष म्हणून सांगताना तू त्यांचा एक गुणच सांगितला आहेस. ज्यांच्यापासून प्रत्यक्ष सृष्टिकर्ता ब्रह्मदेव उत्पन्न झाला, असे लोक म्हणतात, त्यांचा जन्म केव्हा झाला हे कोण सांगू शकेल ?)

आपल्या अनुभवाचे ज्यांत सारसर्वस्व साठविले आहे, अशी वचने अर्थान्तरन्यासरूपाने देण्याची कालिदासाची पद्धति या काव्याच्या पहिल्या आठ सर्गांत उत्कृष्टपणे दृष्टीस पडते. उदाहरणार्थ, खालील उक्ति पहा—

'एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्कः।' (१,३); 'स्वजनस्य हि दुःखमग्रतो विवृतद्वारमिवोपजायते।' (४, २६); 'न रत्नमन्विष्यति मृग्यते हि तत्।' (५, ४५); 'मनोरथानामगतिर्न विद्यते।' (५, ६४) इत्यादि. यांपैकी कित्येक वचने लोकांच्या जिव्हाग्री असून योग्य प्रसंगी त्यांचा म्हणीसारखा उपयोग केला जातो, हे सर्वांस माहीत आहेच.

कालिदासाने आपल्या काव्याची कथा कोठून घेतली याबद्दल विद्वानांत मतभेद आहेत. शिव व स्कंद पुराणांत कार्त्तिकेयाची कथा दिली आहे, तिच्या वर्णनात व 'कुमारसंभवा'तील वर्णनात कल्पना व उक्ति यांचे साम्य ठिकठिकाणी आढळते. उदाहरणार्थ, खालील स्थळे पाहा—

१. शिवपुराण—द्वयोरपि भवान् श्रेष्ठः सर्वगः सर्वशक्तिमान्।
वज्रं च निष्फलं स्याद्वै त्वं तु नैव कदाचन॥
कुमारसंभव—वज्रं तपोवीर्यमहत्सु कुण्ठं त्वं सर्वतोगामि च साधकं च।
३, १२.

२. शिवपुराण—अन्येषां गणना नास्ति पातयामि हरं यदि।
कुमारसंभव—कुर्यां हरस्यापि पिनाकपाणेर्धैर्यच्युतिं के मम धन्विनोऽन्ये॥
३, १०.

यांसारख्या स्थलांच्या विलक्षण साम्यावरून कालिदासाने शिव व स्कंद पुराणांतून आपली कथा घेतली असे कित्येक लोक म्हणतात; पण ते बरोबर वाटत नाही. सध्याची अठरा पुराणे व्यासकृत आहेत, अशी लोकांची समजूत असली तरी त्यांचा बहुतेक भाग अलिकडचा आहे. तेव्हा ती कालिदासापुढे होती, असे मानण्यास पुरेसा पुरावा नाही. उलट, 'कुमारसंभवा'तील प्रसंगांच्या जुळवाजुळवीत जे कौशल्य दृष्टीस पडते, ते कालिदासाचेच असावे, असे त्याच्या इतर ग्रंथांच्या पुराव्यावरून म्हणता येते. विवाहानंतर अंग देशात श्रीशंकर तपश्चर्या करीत असता मदनाने त्यांच्यावर शस्त्र उगारले म्हणून त्यांनी त्याला अनंग केले, अशी कथा 'वाल्मीकिरामायणा'त (बाल. स. २३) आली आहे, ती कालिदासाला माहीत असावी.* पण कलेच्या दृष्टीने तिच्यात बदल करणे कवीला

* या प्रकारचा उल्लेख रघु. ११, १३ मध्ये आला आहे, पण तो प्रक्षिप्त असावा. काही प्राचीन टीकाकारांनीही तो श्लोक गाळला आहे.

जरूर वाटले. म्हणून त्याने मदनाला भस्म केले तो प्रसंग पार्वतीच्या विवाहापूर्वी हिमालयावर घडला, असे वर्णिले आहे. शिवाय केवळ बाह्यरूपावर अवलंबून असणारे प्रेम टिकाऊ नसते. जे अनेक आपत्तींत व हालअपेष्टांत अविचल राहते तेच खरे प्रेम, हे आपले मत त्याने या प्रसंगाने दाखविले आहे. या मताचाच विकास पुढे 'शाकुन्तला'त झालेला दृष्टीस पडतो. तेव्हा 'कुमारसंभवा'च्या पहिल्या आठ सर्गांतील प्रसंगांची रचना व वर्णन ही कालिदासाची स्वतःची असून त्यांचे अनुकरण शिव, स्कंद व इतरही अनेक पुराणांत झालेले दिसते. यानंतरच्या सर्गांतील वर्णन मात्र कोणा नंतरच्या कवीने 'स्कंदपुराणा'तून घेतले असावे, असे जे डॉ. विंटर्निट्झ यांनी म्हटले आहे,* ते सर्वमान्य होण्यासारखे आहे.

### मेघदूत

हे खण्डकाव्य कवीने राजकारणास्तव विदर्भात काही काल वास केला त्यावेळी लिहिले असावे, असे आपण मागे पहिल्या प्रकरणात ठरविले आहे (पृष्ठ ४४). यात पुढील कथाभाग आला आहे—

अलका नगरीतील एका यक्षाने आपल्या कामात काही प्रमाद केल्यामुळे कुबेराने 'एक वर्षभर तुझे सामर्थ्य नष्ट होईल' असा त्याला शाप दिला, तेव्हा त्याला अलकानगरी सोडावी लागली व सीतादेवीने स्नान केल्यामुळे जेथील उदक पवित्र झाले आहे, अशा रामगिरीवरील आश्रमात तो एकटाच येऊन राहिला. तेथे आठ महिने झाल्यावर आषाढ महिन्याच्या आरंभी वर्षा ऋतु जवळ आला असता मेघदर्शनाने त्याला प्रियाविरह दुःसह झाला. आपल्या प्रिय पत्नीचीही अशीच अवस्था झाली असेल, असे जाणून त्याने त्या मेघालाच आपला दूत म्हणून पाठविण्याचे ठरविले. वास्तविक धूम, अग्नि, जल, वायु वगैरेच्या समवायाने उत्पन्न झालेला अचेतन मेघ यक्षाचा संदेश कसा नेणार ? पण मदनार्त यक्षाला इतका विवेक कोठला ! त्याने त्या पर्वतावर नुकतीच उमललेली कुटजपुष्पे त्याला अर्पण करून व त्याची स्तुति करून नंतर अलकेचा मार्ग सांगण्यास सुरवात केली. मालक्षेत्र, आम्रकूट पर्वत, विंध्य पर्वताच्या पायथ्याशी खडकांनी विभागलेली नर्मदा नदी इत्यादिकांचे वर्णन करून यक्षाने मेघास

* *Geschichte der indischen Litteratur*, Band III, p. 58.

दशार्ण देशाच्या राजधानीचा—विदिशेचा मार्ग सांगितला आहे.—

नीचैराख्यं गिरिमधिवसेस्तत्र विश्रान्तिहेतो-
स्त्वत्संपर्कात्पुलकितमिव प्रौढपुष्पैः कदम्बैः।
यः पण्यस्त्रीरतिपरिमलोद्गारिभिर्नागराणा-
मुद्दामानि प्रथयति शिलावेश्मभिर्यौवनानि ॥

मेघ० २५.

"त्या ठिकाणी नीचैर्गिरि नामक लहान टेकडीवर विश्रांतीकरिता तू वसावे. प्रफुल्ल झालेल्या कदम्बपुष्पांनी युक्त अशी ती टेकडी जणू काय तुझ्या संयोगामुळे रोमांचित झालेली दिसेल. त्या ठिकाणच्या गुहांत वेश्यांनी उपयोग केलेल्या सुगंधि द्रव्यांच्या परिमलावरून तेथील 'नागर' लोकांचे उद्दाम यौवन उत्कृष्ट रीतीने व्यक्त होत आहे." नंतर उज्जयिनी नगरी वाटेवर पडत नव्हती तरी तेथे जाण्याचा यक्षाने मेघाला आग्रह केला आहे. उज्जयिनीचे वर्णन कवीने फार विस्तृत व मनोहर केले आहे. उदाहरणार्थ, 'महाकाल' शिवाच्या देवालयातील आरतीच्या वेळचे वेश्यानृत्याचे वर्णन पहा—

पादन्यासक्वणितरशनास्तत्र लीलावधूतै
रत्नच्छायाखचितवलिभिश्चामरैः क्लान्तहस्ताः।
वेश्यास्त्वत्तो नखपदसुखान् प्राप्य वर्षाग्रबिन्दू-
नामोक्ष्यन्ते त्वयि मधुकरश्रेणिदीर्घान् कटाक्षान् ॥

मेघ० ३७.

'नृत्य करताना पादनिक्षेपाने ज्यांचे कमरपट्टे मधुर आवाज करीत आहेत, रत्नकांतियुक्त मुठी असलेल्या व लीलेने ढाळलेल्या चामरांनी ज्यांचे हात दमले आहेत, अशा वेश्या वर्षारंभीचे, नखक्षतांना आनंददायक होणारे जल-बिंदु तुजपासून प्राप्त झाल्यावर तुझ्याकडे भृंगमालेप्रमाणे दीर्घ असे कटाक्ष फेकतील.' नंतर मार्गात लागणारी गंभीरा नदी, देवगिरि नामक पर्वता-वरील कार्तिकेयाचे देवालय, चर्मण्वती (चंबळा) नदी, दशपुर (हल्लीचे मंदसोर), ब्रह्मावर्त देश, कुरुक्षेत्र, सरस्वती व गंगा या नद्या, व शेवटी हिमालय व त्यावर वसलेली अलका यांचे थोडक्यात पण मनोरम वर्णन करून कवीने आपल्या काव्याचा पूर्वार्ध समाप्त केला आहे. या भागात रामगिरीपासून अलकेपर्यंतच्या मार्गावर लागणारे पर्वत, नद्या, देश, नगरे,

ग्राम, वने व उपवनें यांचे रमणीय वर्णन आल्यामुळे हा भाग अत्यंत चित्ताकर्षक झाला आहे. यात ठिकठिकाणी कवीच्या कल्पनेचा रम्य विलास दृष्टीस पडतो. पण ही स्थले सर्वांच्या परिचयाची असल्यामुळे कवीला त्यांत आपल्या कल्पनाशक्तीला स्वैर सोडता येईना. म्हणून उत्तरार्धात अलका नगरीच्या व यक्षगृहाच्या वर्णनात त्याने आपल्या प्रतिभेने नूतन सृष्टि निर्माण करून कल्पनाशक्तीला यथेच्छ विहार करण्यास मोकळीक दिली आहे. उत्तरार्धाच्या आरंभी यक्षाने अलकेचे पुढीलप्रमाणे वर्णन केलें आहे : " बा मेघा ! अलका नगरीतील गगनचुंबी प्रासाद चित्रादिकांनी सुशोभित, मृदंगध्वनीने युक्त व रत्नखचित आहेत. तेथे राहणाऱ्या यक्षांना सदैव तारुण्याचा उपभोग घेता येतो. तेथील वृक्ष व कमलिनी नेहमी सपुष्प, मयूर आनंदित, व रात्री चंद्रप्रकाशयुक्त असतात. तेथील हर्म्यांच्या स्फटिकयुक्त पृष्ठभागावर बसून तुझ्याप्रमाणेच गंभीर अशा मृदङ्गाचे बोल ऐकत यक्ष स्वस्त्रियांसमवेत मद्यपान करीत असतात. त्या ठिकाणी चित्रविचित्र रंगांची वस्त्रे, मद्य, अलंकारार्थ पल्लव व पुष्पे, पायांना लावण्याचा लाक्षाराग, इत्यादि स्त्रियांना लागणारी सर्व प्रकारची वेशभूषा एकटा कल्पवृक्ष पुरवीत असतो. तेथे श्रीशंकरांचा साक्षात् वास असल्याने मदन आपल्या धनुष्याचा उपयोग करीत नाही ; पण त्याचे कार्य चतुर स्त्रियांच्या अमोघ कटाक्षांनीच होऊन जाते. अशा प्रकारच्या अलकेत कुबेराच्या गृहाच्या उत्तरेस माझे घर आहे, ते तुला इंद्रधनुष्याप्रमाणे रमणीय अशा तोरणामुळे दुरूनही सहज दिसेल. त्याच्या उद्यानात माझ्या पत्नीने वाढविलेला व सहज हाताला येतील अशा पुष्पांच्या भाराने लवलेला असा एक लहान मंदारवृक्ष आहे. जवळच पाचूच्या पायऱ्या असलेली व सुवर्णकमलांनी युक्त अशी एक विहीर आहे. तिच्या काठी सुंदर इंद्रनीलरत्नखचित शिखर असलेला व सुवर्णकदलींनी वेष्टिलेला असा क्रीडापर्वत आहे. त्या ठिकाणी माधवीमण्डपाच्या जवळ रक्ताशोक व बकुल हे वृक्षही तुला दिसतील. त्यांच्या मध्यभागी रत्नखचित अशा सुवर्णयष्टीवर स्फटिकाचा एक फलक आहे, त्यावर सायंकाळी माझी प्रिया कंकणनादाने मधुर झालेल्या करतलरवाने मोराला नाचवीत असते. या सर्व खुणा ध्यानात ठेवून तू माझे घर हुडकून काढ. मागे सांगितलेल्या क्रीडापर्वतावर बसून तू आपली विद्युद्दृष्टि माझ्या गृहात फेकल्यास पुढील

दृश्य तुझ्या दृष्टीस पडेल—

आलोके ते निपतति पुरा सा बलिव्याकुला वा
मत्सादृश्यं विरहतनु वा भावगम्यं लिखन्ती।
पृच्छन्ती वा मधुरवचनां सारिकां पञ्जरस्थां
कच्चिद्भर्तुः स्मरसि रसिके त्वं हि तस्य प्रियेति॥

मेघ० ९०.

'माझी प्रिय पत्नी देवतांच्या पूजेत निमग्न झालेली, विरहाने कृश असे माझे मनोगम्य चित्र काढीत असलेली, किंवा ज्याचे तुझ्यावर अत्यंत प्रेम होते, त्या आपल्या धन्याची तुला आठवण येते का ग ?' असे मधुर कंठाच्या सारिकेला विचारीत असलेली तुझ्या दृष्टीस पडेल.' कदाचित् माझ्या-विषयी एखादे गाणे रचून ते वीणा वाजवून म्हणण्याचा ती प्रयत्न करीत असेल, परंतु पुनः पुनः स्वतः रचलेले आलाप तिला आठवत नसतील ; किंवा विरहाचे किती दिवस राहिले, ते भूमीवर पुष्पे लावून ती मोजीत असेल. विरहाने अत्यंत कृश झालेली, अभ्यंगस्नान न केल्यामुळे जिचे केश अत्यंत रूक्ष होऊन कपोलांवर पडले आहेत, सर्व अलंकार वर्ज्य करून अत्यंत दुःखाने जिने बिछान्यावर अंग टाकले आहे, अशा माझ्या प्रियेला पाहून तुलाही नूतनजलरूपी अश्रु गाळावेसे वाटतील. त्या वेळी तिला निद्रा लागली असल्यास तू प्रहरभर गर्जना न करता ती जागृत होण्याची वाट पाहा. कारण महाप्रयासाने प्राप्त झालेल्या स्वप्नात ती माझे गाढ आलिंगनसुख अनुभवीत असेल, त्यामध्ये तुझ्या गर्जनेने व्यत्यय येऊ नये. ती तुझ्या जलबिंदूंनी शीतल झालेल्या वायूने जागृत झाल्यावर तिला माझे कुशल सांगून पुढील संदेश निवेदन कर—

श्यामास्वंगं चकितहरिणीप्रेक्षणे दृष्टिपातं
वक्त्रच्छायां शशिनि शिखिनां बर्हभारेषु केशान्।
उत्पश्यामि प्रतनुषु नदीवीचिषु भ्रूविलासान्
हन्तैकस्थं क्वचिदपि न ते चण्डि सादृश्यमस्ति॥

मेघ० १०९.

'प्रियंगुलतेत तुझे अंग, भयत्रस्त हरिणीच्या दृष्टिक्षेपांत तुझे कटाक्ष, चंद्रा-च्या ठिकाणी तुझी अंगकांति, मयूराच्या पिसाऱ्यात तुझा केशकलाप, नदी-च्या लहान लहान लहरीत तुझे भ्रूविलास असावेत असे मला प्रथम वाटले,

पण, हे कोपिष्ट स्त्रिये ! यांपैकी एकाही ठिकाणी मला तुझे सादृश्य दिसत नाही.'

त्वामालिख्य प्रणयकुपितां धातुरागैः शिलाया-
मात्मानं ते चरणपतितं यावदिच्छामि कर्तुम्।
अस्रैस्तावन्मुहुरुपचितैर्दृष्टिरालुप्यते मे
क्रूरस्तस्मिन्नपि न सहते संगमं नौ कृतान्तः ॥ मेघ० ११०.

'प्रेमातिशयामुळे मजवर रागावलेल्या तुझे चित्र शिलेवर गेरूने काढून मी तुझ्यापुढे नमस्कार घालतो आहे, असे दाखविण्याचा प्रयत्न करतो, पण तितक्यात शोकभराने माझी दृष्टि अश्रुपूर्ण होते. क्रूर कृतान्ताला अशा रीतीनेही होणारा आपला संगम सहन होत नाही'. स्वप्नात तुझे दर्शन झाल्यावर आलिंगनसुखार्थ मी आपले बाहू पसरतो, ते पाहून वनदेवतांच्या नेत्रांतून तरुकिसलयांवर मोत्यांसारखे स्थूल अश्रुबिंदु पडतात. विवेकाने मी आपले विरहदुःख सहन करतो, त्याप्रमाणेच तूही करावे ; कारण—

कस्यैकान्तं सुखमुपगतं दुःखमेकान्ततो वा
नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण। मेघ० ११०.

'कोणाला सदैव सुख किंवा दुःख प्राप्त झाले आहे ? चाकाच्या धावेप्रमाणे मनुष्यमात्राची अवस्थाही उच्च-नीच होत असते. भगवान् विष्णु आपल्या सर्पशयनावरून उठल्याबरोबर माझ्या शापाचा शेवट होणार आहे. तेव्हा आणखी चार महिने तू आपले दुःख सहन कर. नंतर आपण शरदृतूतील उत्कृष्ट चांदण्यात विविध प्रकारचे उपभोग घेऊ.' माझ्या प्रार्थनेस मान देऊन किंवा माझ्यावरच्या प्रेमामुळे अथवा अनुकंपेमुळे हे माझे काम केल्यावर, मेघा ! वर्षाकाळामुळे ज्याचे सौंदर्य वृद्धिगत झाले आहे, असा तू इष्टदेशाप्रत गमन कर. मजप्रमाणे तुला यापुढे क्षणभरही तुझी प्रिया विद्युल्लता हिचा वियोग न होवो ! "

एकशेवीस श्लोकांच्या या खण्डकाव्यात कवीने आपले शक्तिसर्वस्व वेचले आहे. यामध्ये त्याची सौंदर्यान्वेषिणी दृष्टि व कलाभिज्ञता स्पष्टपणे दिसून येते. एखादा कुशल चित्रकार आपल्या कलमाच्या चार-सहा फटकाऱ्यांनी एखादी रम्य आकृति निर्माण करतो, त्याप्रमाणे कालिदासाने यातील प्रत्येक श्लोकात मोजक्या शब्दांनी एक एक मनोहर चित्र काढले

आहे यातील शब्दरचना पैलू पाडलेल्या हिऱ्याप्रमाणे निर्दोष व उज्ज्वल झाली आहे. यातील अर्थरूपी रत्नांना उपमा, उत्प्रेक्षा, अर्थान्तरन्यास इत्यादि सुंदर अलंकारांचे कोंदण लाभल्यामुळे ती अधिकच खुलून दिसतात. कालिदासाने एवढेच काव्य रचले असते तरी त्याची जगातील अत्युत्कृष्ट कवींमध्ये गणना झाली असती, इतके हे काव्य सरस उतरले आहे. वर दिलेल्या सारांशात उद्धृत केलेल्या श्लोकांवरून वरील विधानाची प्रतीति वाचकांस पाहता येईल. तथापि आणखीही काही उदाहरणे देता येतील.

चर्मण्वती (चंबळा) नदीचे वर्णन करतांना यक्ष मेघास म्हणतो—

त्वय्यादातुं जलमवनते शार्ङ्गिणो वर्णचौरे
तस्याः सिन्धोः पृथुमपि तनुं दूरभावात्प्रवाहम् ।
प्रेक्षिष्यन्ते गगनगतयो नूनमावर्ज्य दृष्टी-
रेकं मुक्तागुणमिव भुवः स्थूलमध्येन्द्रनीलम् ॥

मेघ० ४८.

'त्या नदीचा प्रवाह मोठा आहे तरी आकाशातून पाहणाऱ्या लोकांस तो अरुंदच दिसतो; त्यामुळे कृष्णाच्या वर्णाची चोरी करणारा (म्हणजे तत्सदृशकृष्णवर्ण असा) तू त्या नदीचे जल प्राशन करण्याकरिता वाकला असता गगनचारी लोकांची दृष्टि तुजकडे आकर्षित होऊन आपण पृथ्वीचा, मध्ये इंद्रनील मणि घातलेला, मोत्यांचा एकसरच जणू काही पाहतो आहो, असे त्यास वाटेल'. यात नदीच्या शुभ्र जलप्रवाहावर मेघ वाकला असता त्यावर केलेली इन्द्रनिलमध्यमणियुक्त मुक्ताहाराची उत्प्रेक्षा किती हृदयंगम आहे बरे !

हिमालयावर वसलेल्या अलकेचे वर्णन पहा—

तस्योत्संगे प्रणयिन इव स्रस्तगंगादुकूलां
न त्वं दृष्ट्वा न पुनरलकां ज्ञास्यसे कामचारिन् ।
या वः काले वहति सलिलोद्गारमुच्चैर्विमाना
मुक्ताजालग्रथितमलकं कामिनीवाभ्रवृन्दम् ॥

मेघ० ६५.

'हे कामचारी मेघा ! जिच्या अंगावरचे शुभ्र वस्त्र बाजूला सरकले आहे, अशी एखादी स्त्री आपल्या प्रियकराच्या मांडीवर बसावी, त्याप्रमाणे हिमालयाच्या उत्संगावर वसलेली व जिच्या बाजूने गंगा नदी वाहत आहे,

अशी अलकानगरी दृष्टीस पडताच तिला तू ओळखल्याशिवाय राहणार नाहीस. वर्षाकाली उच्च हर्म्यांवर जल वर्षणाऱ्या मेघसमूहाच्या योगानें ती केशकलापात मोत्यांची जाळी घातलेल्या मुग्ध स्त्रीसारखी दिसत असते'. या श्लोकात श्लेष व उपमा यांचा सुंदर संयोग झाला आहे.

'कुमारसंभवा'प्रमाणे या काव्यातही कवीने ठिकठिकाणी उचित अर्थान्तरन्यासांचा उपयोग केला आहे. 'कामार्ता हि प्रकृतिकृपणाश्चेतनाचेतनेषु' [प्रेमविव्हल झालेले लोक सचेतन व अचेतन वस्तूंमधील भेद जाणण्यास असमर्थ असतात]; 'रिक्तः सर्वो भवति हि लघुः पूर्णता गौरवाय' [रिक्त (जलादिरहित, पक्षीं, दरिद्री) असलेल्या सर्वांना हलकेपणा प्राप्त होतो, पूर्णतेपासून (पक्षीं, श्रीमंतीमुळे) गौरव (जडपणा, पक्षीं, मान) मिळतो]; 'स्त्रीणामाद्यं प्रणयवचनं विभ्रमो हि प्रियेषु' [हावभाव हेच स्त्रियांच्या प्रियजनविषयक प्रेमाचे प्रथमोद्‌गार होत]; 'प्रायः सर्वो भवति करुणावृत्तिरार्द्रान्तरात्मा' [ज्याचे अंतःकरण (पक्षीं, अन्तर्भाग) आर्द्र आहे, असे प्रायः सर्व कनवाळू असतात]—इत्यादि सामान्य वचनांनी कवीच्या वर्णनाला ठिकठिकाणी उत्तम रंग आला आहे.

या काव्यात सर्वत्र विप्रलंभ शृंगाराचे साम्राज्य दृष्टीस पडते. विशेषतः उत्तर भागात यक्ष आपल्या पत्नीची व आपली विरहावस्था वर्णन करतो, ते श्लोक अत्यंत कारुण्योत्पादक उतरले आहेत. यक्षपत्नीच्या वर्णनात कालिदासाने आदर्श गृहिणीचे सुंदर चित्र काढले आहे. कालिदासाच्या इतर नायिकांप्रमाणे ती अत्यंत सुंदर तर आहेच; शिवाय ती विविधकलानिपुण, सहृदय व प्रेमळ अशी पतिव्रता आहे. अशा स्त्रीच्या विरहावस्थेचे चित्र कवीने मोठ्या कौशल्याने व हलक्या हाताने काढले आहे.

या काव्यात सर्वत्र कवीने मन्दाक्रान्ता वृत्ताचा उपयोग केला आहे. 'कुमारसंभवां'त कालिदासाने अनुष्टुभ्, उपेन्द्रवज्रा, वियोगिनी, रथोद्धता यांसारख्या आटोपशीर व रचण्यास सुलभ अशा वृत्तांची योजना केली होती. या वृत्तांपेक्षा मन्दाक्रान्ता हे मोठे व रचण्यास अवघड आहे; पण यात एखादी कल्पना पूर्णत्वाने मांडण्यास पुरेसा अवकाश सापडतो व त्याच्या नावाप्रमाणेच त्याची गतीही मंद असल्याने विप्रलंभ शृंगाराच्या

मंदसोर
(दशपुर)
उज्जयिनी
विदिशा
जबलपूर
अंबिकापुर
रामगढ
अमरकंटक
विंध्य पर्वत
सातपुडा पर्वत
महादेव
आम्रकूट
अमरवाडा (आम्रवाटक)
माल
रामटेक (रामगिरि)
१५०८ फूट
नागपूर
नर्मदा (रेवा) नदी
वेत्रवती नदी
२४°
२२°
७६°
७८°

'मेघदूता' तील मेघाचा रामगिरी पासून मंदसोर (दशपुर) पर्यंतचा मार्ग

वर्णनास योग्य असे ते आहे. कालिदासापूर्वीच्या कवींनी याचा फारसा उपयोग केलेला दिसत नाही. नाही म्हणावयास हरिषेणाच्या प्रयाग येथील प्रशस्तीच्या एका त्रुटित श्लोकात ते योजिलेले दिसते. तेव्हा हे वृत्त लोकप्रिय करण्याचे श्रेय कालिदासासच दिले पाहिजे. कालिदासाने 'मालविकाग्निमित्रा'त त्याचा प्रथम उपयोग केलेला दिसतो. परंतु त्या नाटकात 'मेघदूता'तल्याप्रमाणे ते सफाईदारपणाने योजिलेले दिसत नाही. 'मेघदूत' काव्यात मात्र आरंभापासून अखेरपर्यंत कालिदासाने त्याचा सारख्याच कौशल्याने उपयोग केलेला दृष्टीस पडतो.

'मेघदूत' काव्याचे विवेचन संपविण्यापूर्वी एक-दोन प्रश्नांचा विचार केला पाहिजे. यक्ष ज्या रामगिरीवर येऊन राहिला होता, तो कोणता पर्वत, यावद्दल विद्वानांत ऐकमत्य झालेले नाही. काहींच्या मते हा रामगिरि म्हणजे मध्यप्रांतातील सिरगुजा संस्थानातील रामगढ नामक डोंगर होय. येथे वनवासात असताना राम, सीता व लक्ष्मण यांनी स्नान केले, अशी परंपरागत समजूत प्रचलित आहे व 'मेघदूता'त (श्लोक १२) वर्णिल्याप्रमाणे येथील एका शिलेवर श्रीरामचंद्रांची पावले उमटलेली अद्यापि दाखवितात. येथे बरेच प्राचीन अवशेष विद्यमान आहेत. या डोंगरावरच्या सीतावेंगा व जोगिमारा या गुहांत ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकातील कोरीव लेख अद्यापि विद्यमान आहेत, त्यांवरून हा डोंगर फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे, यात संशय नाही. तथापि रामगढ हाच रामगिरि हे मत सर्वमान्य होण्यासारखे नाही. कारण हा पर्वत अमरकंटकच्या ईशान्येस आहे ; दक्षिणेस नाही. 'मेघदूता'त यक्षाने 'रामगिरीहून उत्तरेस जातांना प्रथम मालक्षेत्र व नंतर आम्रकूट पर्वत तुला लागेल,' असे मेघास सांगितले आहे. कालिदासाचे बिनचूक भौगोलिक ज्ञान लक्षात घेता त्याच्या हातून दिशाविपर्यासाची एवढी ढोबळ चूक झाली असेल, असे वाटत नाही. तेव्हा 'मेघदूता'तील रामगिरीचा शोध दुसरीकडे केला पाहिजे असा विचार करता नागपूरजवळचे 'रामटेक' हाच रामगिरि असावा असे वाटते. हे स्थानही पुरातन काळापासून फार प्रसिद्ध आहे. येथे वाकाटक नृपति द्वितीय प्रवरसेनाचा एक ताम्रपट सापडला आहे, व त्याच राजाच्या वऱ्हाडातील ऋद्धपूरच्या ताम्रपटात तर 'रामगिरिस्वामिनः पादमूलात्' असा

स्थलनिर्देश केला आहे. त्यावरूनही वरील बाबतीत संशयास जागा राहत नाही. या पर्वताच्या पायथ्याशी एक विशाल टेकाड उत्खननाची वाट पाहात आहे. तेथील प्राचीन विटांच्या आकारावरून ते स्थल गुप्तकाली प्रसिद्ध असावे, असा तज्ज्ञांचा तर्क आहे. मालक्षेत्र याच्या उत्तरेस सातपुड्याच्या पठारावर असावें, असे वाटते; कारण कल्याणीच्या चालुक्याच्या एका उत्कीर्ण लेखात* द्वितीय आचुगि या राजाने 'माल' देश काबीज केल्यावर जबलपूरजवळच्या त्रिपुरीच्या हैहयांचा पराभव केला, असे म्हटले आहे. असो.

'मेघदूता'त वर्णिलेला रामगिरि हा कोणता पर्वत हे दर्शविण्याकरिता त्या काव्यात सांगितलेला रामगिरीपासून विदिशेपर्यंतचा मेघाचा मार्ग ही अविवाद्य कसोटी आहे. तो मार्ग रामटेकासच जुळतो, अन्य कोणत्याही पर्वतास जुळत नाही.

रामगिरीहून उत्तरेस निघालेल्या मेघास प्रथम माल नावाचे पठार लागेल असे म्हटले आहे. रामटेकच्या उत्तरेस शिवनी-छपाऱ्याचे पठार आहे. त्यास हे वर्णन बरोबर जुळते. 'या माल पठारावर चढल्यावर थोडेसे पश्चिमेस वळून नंतर पुन: (भूय:) उत्तरेचा मार्ग आक्रमण कर' असे यक्ष मेघास सांगत आहे. नकाशात पाहिले असता विदिशा रामटेकच्या थेट उत्तरेस नसून त्या दिशेच्या किंचित् पश्चिमेस आहे, असे दिसेल. म्हणून कालिदासाने मेघाला 'किञ्चित्पश्चाद्व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण' असे सांगितले आहे. कालिदास स्वत: रामटेकजवळच्या नंदिवर्धन या वाकाटकांच्या राजधानीत काही काळ राहिला होता. त्याला या मार्गाची पूर्ण माहिती होती. म्हणून त्याच्या वर्णनात इतकी सूक्ष्मता आढळली तर त्यात आश्चर्य नाही.

माल देशाच्या किंचित् पश्चिमेस वळून पुन: उत्तरेस बरेच गेल्यावर मेघाला आम्रकूट पर्वत लागणार होता. त्याचे वर्णन श्लोक १७—१९ मध्ये आले आहे. हा आम्रकूट, काही लोक म्हणतात त्याप्रमाणे, अमरकंटक नव्हे. अमरकंटकचे प्राचीन नाव 'मेकल' होते. कोणत्याही संस्कृत कोशात किंवा पुराणात अमरकंटकला आम्रकूट म्हटले नाही. शिवनी-छपाऱ्याच्या पश्चिमोत्तर दिशेस अमरवाडा (प्राचीन आम्रवाटक)

---

**Ep. Ind.* Vol. XIX, p. 227.

गाव अद्यापि विद्यमान आहे. त्याच्या उत्तरेस असलेल्या सातपुडयाच्या शिखरास 'आम्रकूट' नाव असावे.

आम्रकूट पर्वतावर किंचित् काळ थांबून वृष्टि केल्यावर हलका झालेल्या मेघाने त्वरित गतीने त्यानंतरचा मार्ग आक्रमिल्यावर (द्रुततरगतिस्तत्परं वर्त्म तीर्णः। रेवां द्रक्ष्यस्युपलविषमां विन्ध्यपादे विशीर्णां भक्तिच्छेदैरिव विरचितां भूतिमङ्गे गजस्य ॥) मेघाला विन्ध्य पर्वताच्या पायथ्याशी खडकाळ भागात अनेक स्रोतांत विभागलेली नर्मदा नदी दिसणार होती. हे वर्णन अमरकंटकाला मुळीच लागू पडत नाही. कारण, अमरकंटकालाच नर्मदा नदीचा उगम आहे. पण हे वर्णन माळ देशाच्या पश्चिमोत्तर भागी होशंगाबाद-नरसिंगपूर या भागात उन्हाळयातील नर्मदा नदीस पूर्णपणे जुळते. त्यावरूनही रामगिरि म्हणजे रामटेक हे सिद्ध होते.

गेली दीड हजार वर्षे रामटेकची पुण्यक्षेत्र म्हणून प्रसिद्धि आहे. तेथे तेराव्या शतकातील रामदेवराव यादवाचा शिलालेख लक्ष्मणाच्या देवळात अद्यापि भग्नावस्थेत विद्यमान आहे. त्याच शतकातील महानुभावांच्या 'स्थानपोथी'त तेथील रामलक्ष्मणांच्या देवळांचा व सीतेच्या न्हाणीचा उल्लेख आहे. त्यावरूनही रामगिरि म्हणजे सध्याचे रामटेक हे निर्विवाद सिद्ध होते.

या समीकरणाला भारताच्या सर्व नामांकित प्राच्यविद्याविशारदांनी मान्यता दिली आहे. म्हणून महाराष्ट्र शासनाने तेथे कालिदासाचे सुंदर स्मारक १९७३ मध्ये उभारले आहे.*

द्वितीय चंद्रगुप्ताची कन्या व द्वितीय प्रवरसेनाची माता प्रभावतीगुप्ता ही आपल्या राजधानीजवळच्या रामगिरीस (रामटेकास) भगवान् रामचंद्राच्या दर्शनाकरिता जात असे, असे तिच्या ऋद्धपूरच्या ताम्रपटावरून दिसते. विदर्भात असताना कालिदासही तेथे गेला असता त्याला या काव्याची मूळ कल्पना सुचली असावी. या कल्पनेचा विस्तार करण्यात त्याला 'रामायणा'चे साहाय्य झाले असावे. वाल्मीकीच्या आदिकाव्यात संपातीने हनुमानादि वानरांस लंकेची वाट सांगितली, नंतर हनुमान् सागर ओलांडून लंकेत गेला. तेथे अशोकवनिकेत त्याला

* या विषयाची सविस्तर चर्चा आमच्या 'मेघदूतातील रामगिरि अर्थात् रामटेक' या पुस्तकात केली आहे.

सीता दिसली. तेव्हा तिची खात्री करण्यासाठी त्याने रामाच्या विरहावस्थेचे वर्णन केले व रामाने दिलेली अंगठी खूण म्हणून सीतेस दिली, असा कथाभाग आला आहे. 'रामायणा'त रामाच्या विरहावस्थेच्या वर्णनात खालील श्लोक आले आहेत—

अनिद्रः सततं रामः सुप्तोऽपि च नरोत्तमः।
सीतेति मधुरां वाणीं व्याहरन् प्रतिबुध्यते।
दृष्ट्वा फलं वा पुष्पं वा यच्चान्यत्स्त्रीमनोहरम्।
बहुशो हा प्रियेत्येवं श्वसंस्त्वामभिभाषते॥ सुंदरकांड, ४४–५.

यांतील व 'मेघदूता'तल्या कल्पनांतील साम्य वाचकांच्या लक्षात येईलच. 'मेघदूता'तही यक्षाने मेघास अलकेचा मार्ग सांगितला आहे व त्याच्याबरोबर अंगठीसारखी काही खूण पाठविणे शक्य नसल्याने त्याने मेघास आपल्या काही आठवणी सांगून त्यायोगे आपल्या पत्नीची खात्री पटविण्यास सांगितले आहे. शिवाय, "'मी तुझ्या पतीचा प्रियमित्र आहे व त्याचा संदेश घेऊन तुझ्याकडे आलो आहे' असे तू म्हटल्याबरोबर उत्कंठित होऊन माझी पत्नी सीतेने मारुतीचा सन्मान केला त्या प्रकारे तुझा सन्मान करील" असे यक्षाने मेघास म्हटले आहे (मेघ. १०५). त्यावरूनही 'रामायणा'तील वरील प्रसंग कवीच्या मनात घोळत होता, यांत संशय नाही. वर दाखविल्याप्रमाणे 'रामायण' व 'मेघदूत' यांत किंचित् प्रसंगसाम्य व कल्पनासाम्य दिसत असले तरी इतर ठिकाणी कालिदासाची प्रतिभा स्वतंत्रपणे मनोहर सृष्टि निर्माण करीत आहे. अलकेच्या मार्गावरची नगरे, ग्राम, पर्वत, नद्या वगैरेंच्या, तसेच अलकेच्या व यक्षगृहाच्या वर्णनात आणि यक्षपत्नीच्या विरहावस्थेचे शब्दचित्र रेखाटण्यात कालिदासाची प्रतिभा सर्वस्वी अनृणी होती, यांत संशय नाही.

## सेतुबंध

विदर्भात असताना कालिदासाने द्वितीय प्रवरसेनास 'सेतुबंध' काव्य रचण्यास मदत केली असावी. हे काव्य 'महाराष्ट्री' नामक प्राकृत भाषेत लिहिले असून त्याचे १५ आश्वास म्हणजे सर्ग आहेत. यांत श्रीरामचंद्रांनी सागरावर सेतु बांधून कपिसैन्यासह लंकेवर चाल केली व तेथे घनघोर युद्ध करून रावणाचा वध केला, इतका कथाभाग आला

आहे. म्हणून या काव्याला 'दहमुहवहो' (दशमुखवध) असेही म्हणतात. कालिदासाप्रमाणे प्रवरसेनही शिवोपासक होता, असे त्याच्या ताम्रपटांतील उल्लेखांवरून दिसते. तथापि कालिदासाने 'रघुवंशा'त जसे रामचरित गाईले आहे, तसेच प्रवरसेनानेही या काव्यात केले असल्यास आश्चर्य नाही. कदाचित् त्याने आपल्या विष्णुपासक मातेच्या आज्ञेवरूनही हे रचले असेल. काव्याचा विषय रामचरित असल्याने आरंभीचे चार श्लोक विष्णुस्तुतिपर आहेत, पण पुढील चार श्लोकांत कवीने आपल्या इष्टदेवतेची—शिवाची—स्तुति केली आहे.

या काव्यात ठिकठिकाणी सुंदर कल्पना, मनोहर अलंकार व हृदयंगम वर्णने आढळतात. म्हणून दण्डीने आपल्या 'काव्यादर्श' नामक अलंकारग्रंथात या काव्याला 'सूक्तिरत्नांचा सागर' असे म्हटले आहे व बाणकवीने या 'सेतूने' कपिसेनेप्रमाणे प्रवरसेनाची कीर्ति सागर पार करून गेली, अशी श्लेषगर्भ स्तुति केली आहे. या काव्यात काही ठिकाणी आपण कालिदासाच्या काव्यांतील कल्पना वाचीत आहो असे वाटते. उदाहरणार्थ, खालील श्लोक पाहा—

पढमं विअ मारुइणा हरिसभरिज्जन्तलोअणेण मुहेण।
जणअतणआपउत्ती पच्छा वाआइ णिरवसेसं सिठ्ठा॥

'मारुतीने आपल्या हर्षोत्फुल्लनयन मुखाने प्रथम सीतेची बातमी रामास कळविली व नंतर ती शब्दांनी निवेदन केली'. ही कल्पना कालिदासाच्या 'रघुवंशा'तही (सर्ग २, ६८) आली आहे. तथापि, एकंदरीत अशी साम्यस्थले थोडी आहेत. त्यावरून कालिदासाने हे काव्य स्वतः न रचता प्रवरसेनाकडून रचविले असावे किंवा ते तपासून दिले असावे. काव्य रचताना प्रवरसेनास पुष्कळच अडचणी येत होत्या, ठिकठिकाणी चुका होत होत्या, त्या दुरुस्त करून पुढे निर्दोष रचना करणे कठीण जात होते, हे त्याने स्वतःच खालील श्लोकात सांगितले आहे—

अहिणवराआरद्धा चुक्कक्खलिएसु विहडिअपरिट्ठविआ।
मेत्तिव्व पमुहरसिआ णिव्वोढुं होइ दुक्करं कव्वकहा॥

'ज्याप्रमाणे नूतन प्रेमभरात मैत्री उत्पन्न होते, पुढे अपराधाने तीत खंड पडतो ; पण मित्र रसिक असल्यास त्याचे परिमार्जन झाल्यावर ती पूर्ववत् होते, पण एकंदरीत ती शेवटपर्यंत टिकविणे कठीण जाते ; तद्वत् नुकत्याच

गादीवर आलेल्या राजाने आरंभिलेली व ठिकठिकाणी चुकांची दुरुस्ती करून निर्दोष झालेली व रसिकांना आकृष्ट करणारी अशी ही कथा अखेरपर्यंत रचणे कठीण जात आहे '. अशा अडचणीच्या वेळी प्रवरसेनाला कालिदासाची मदत झाली असावी. तथापि ही सर्व कृति कालिदासाची स्वतःची असण्याचा संभव नसल्याने हिचे जास्त वर्णन न करता आपण कालिदासाच्या यानंतरच्या काव्याकडे वळू.

## रघुवंश

हे काव्य कालिदासाच्या सर्व काव्यग्रंथांत उत्कृष्ट असे गणले जाते. यांत दृग्गोचर होणारे त्याचे परिणतप्रज्ञत्व व प्रतिभाशालित्व लक्षात घेता ते त्याने इतर काव्यांनंतर रचले असावे, याविषयी संशय राहत नाही. उपलब्ध प्रतींत याचे एकोणीस सर्ग आहेत व त्यांत एकंदर अठ्ठावीस राजांचे वर्णन आले आहे. त्यांपैकी रघु हा अत्यंत पराक्रमी व दानशूर राजा होऊन गेला. त्याच्या वंशातील राजांचे या काव्यात वर्णन आले असल्यामुळे त्याला कवीने 'रघुवंश' असे नाव दिले आहे.

प्रारंभी शब्दार्थांचे सम्यग्ज्ञान होण्याकरिता शब्दार्थांप्रमाणेच नित्य-संबद्ध अशा पार्वतीपरमेश्वरांना वंदन करून कवीने मोठ्या विनयाने आपल्या विषयाचे महत्त्व व त्या मानाने आपले मंदमतित्व निर्दिष्ट केले आहे. तो म्हणतो, "उंच मनुष्याच्या हाताला येईल असे फळ तोडण्याकरिता एखाद्या खुज्या माणसाने हात वर केला असता जसा तो उपहासास्पद होतो, त्याप्रमाणेच मंदबुद्धि असूनही कवियशःप्राप्तीची इच्छा करणाऱ्यासारखी माझी स्थिति होणार आहे. तथापि अगोदरच ज्यामध्ये छिद्र केले आहे अशा रत्नात सूत्राला जाण्याला प्रयास पडत नाही, त्याप्रमाणेच पूर्वसूरींनी वर्णिलेल्या या वंशात माझीही गति होणार आहे". नंतर 'रघुवंशा'तील राजांच्या उदात्त चरित्रांचे सामान्यतः वर्णन करून कवीने 'सुवर्णाची अग्नीमध्ये ज्या प्रकारे परीक्षा होते, त्या प्रकारेच सज्जनांनी माझ्या काव्याची परीक्षा करावी' असे म्हटले आहे. पहिल्या सर्गात मनुवंशातील दिलीप राजाचे वर्णन आले आहे. दिलीप हा महाकाय, विद्वान्, धार्मिक व शूर असा राजा होता; त्याचे राज्य समुद्रवलयांकित पृथ्वीवर पसरले होते ; तरी त्याला पुत्र नव्हता. म्हणून एके दिवशी अमात्यांवर राज्यकारभार सोपवून आपली सुदक्षिणा नामक

प्रिय पत्नी व थोडे अनुचर यांसह तो वसिष्ठाश्रमास गेला. तेथे पोचल्यावर त्याने आपले दु:ख ऋषीला निवेदन केले. तेव्हा वसिष्ठ म्हणाले, " राजा, पूर्वी एके दिवशी इंद्राला भेटून परत मर्त्य लोकाला येताना वाटेत कल्पतरूच्या छायेत कामधेनु उभी होती तिला प्रदक्षिणा करण्यास तू विसरलास. तेव्हा तिने, 'माझ्या संततीची सेवा केल्याशिवाय तुला अपत्य होणार नाही' असा तुला शाप दिला. त्यामुळे तुला मूल होत नाही. त्या सुरभीची कन्या नंदिनी माझ्या आश्रमात आहे, तिची सेवा कर. ती प्रसन्न झाल्यास तुझी इच्छा पूर्ण करील." दिलीपानेही तसे करण्याचा निश्चय केला (सर्ग १). दुसऱ्या दिवसापासून राजाने आपल्या सर्व अनुयायांस रजा दिली व गोड गवताचा चारा घालणे, पाणी पाजणे, खाजविणे, डास हाकविणे, पाहिजे तेथे जाऊ देणे, इत्यादि प्रकारे स्वत: नंदिनीची सेवा करण्यास आरंभ केला. याप्रकारे तीन आठवडे गेल्यावर एके दिवशी नंदिनीच्या मनात राजाची परीक्षा पाहण्याचे आले. म्हणून ती हिमालयाच्या गुहेत शिरली. त्या धेनूवर प्रहार करण्याचे हिंस्र पशूंच्या मनातही येणे शक्य नाही, असे वाटल्यावरून राजा हिमालयाची शोभा पाहण्यात गर्क झाला होता. इतक्यात गुहेतील सिंहाने नंदिनीवर झडप घातली. धेनूच्या आक्रंदनाने राजाचे लक्ष तिजकडे गेले व तो सिंहाला ठार मारण्यास भात्यातून बाण काढणार तोच त्याचा हात त्याला चिकटून राहिला. ते पाहून सिंह मनुष्यवाणीने राजास म्हणाला, " राजा ! मी निकुम्भाचा मित्र व शिवाचा एक किंकर आहे. माझे नाव कुम्भोदर. हा समोर देवदार वृक्ष दिसतो आहे ना ? तो पार्वतीने स्वत: पाणी घालून वाढविला आहे. एके दिवशी वन्य गजाने आपल्या गंडस्थलाच्या घर्षणाने याची साल काढली, तेव्हा पार्वतीला फार दु:ख झाले. म्हणून श्रीशंकरांनी मला सिंहाचे रूप देऊन, 'गुहेजवळ आलेल्या प्र[illegible]यास मारून आपली उपजीविका कर' अशी आज्ञा केली. मी सध्या उपोषित आहे व ही गाय माझे भक्ष्य झाली आहे. तेव्हा तुझे येथे काही चालणार नाही. परत जा." राजाने म्हटले, 'सर्व स्थावरजंगमात्मक सृष्टीची उत्पत्ति, पालन व लय करणाऱ्या भगवान् शंकरांची आज्ञा मला प्रमाण आहे. पण माझ्या गुरूचे हे गोधन माझ्या समक्ष नष्ट होत असता

त्याची उपेक्षा करणेही शक्य नाही. म्हणून मी तुला आपला देह अर्पण करतो. त्याचा स्वीकार करून तू हिला सोड'. 'एका गाईकरिता जगाचे साम्राज्य, आपले तारुण्य व सुंदर देह यांचा नाश करणे मूर्खपणाचे होणार आहे', वगैरे सांगून सिंहाने राजाला स्वनिश्चयापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला, पण राजा ऐकेना. तेव्हा त्याने त्याचे म्हणणे कबूल केले. राजाचा बाहु मुक्त झाला व तो सिंहापुढे मान खाली घालून बसला. आता आपल्यावर सिंहाची झडप पडणार, असे त्याला वाटले. पण त्याऐवजी आकाशातील विद्याधरांच्या हातांनी त्याच्यावर पुष्पवृष्टि झाली. तो सिंह नंदिनीने राजाची परीक्षा पाहण्यासाठी मायेने उत्पन्न केला होता. राजाच्या भक्तीने ती संतुष्ट झाली व पुत्रप्राप्तीकरिता आपले दुग्ध पिण्याविषयी तिने त्याला सांगितले. आश्रमास परत आल्यावर राजाने वनात घडलेला वृत्तान्त ऋषीस व स्वपत्नीस निवेदन केला. रात्री होम व वत्स यांना दिल्यावर अवशिष्ट राहिलेले दूध वसिष्ठाच्या अनुज्ञेने राजा व राणी यांनी घेतले. दुसऱ्या दिवशी व्रताचे उद्यापन करून ती उभयतां राजधानीस परत गेली (सर्ग २). लौकरच राणी गरोदर राहिली व यथाक्रम पाचही ग्रह उच्चीचे असता तिला मुलगा झाला. राजाने त्याचे नाव रघु असे ठेवले. तो सर्व शस्त्रास्त्रांत प्रवीण झाला असे पाहून राजाने त्याला युवराज केले व अश्वरक्षणार्थ त्याची योजना करून अश्वमेध यज्ञ करण्यास आरंभ केला. याप्रमाणे नव्याण्णव यज्ञ निर्विघ्नपणे समाप्त झाले. शंभराव्या यज्ञाच्या वेळी इंद्र अदृश्य रूपाने येऊन अश्व घेऊन गेला. नंदिनीच्या कृपेने रघूस त्याचे कपट दिसून आले, तेव्हा त्याने इंद्राला युद्धार्थ आव्हान केले. पुढे त्यांचे भयंकर युद्ध झाले. रघूच्या शौर्याने संतुष्ट झालेल्या इंद्राने 'अश्वाशिवाय दुसरा कोणताही वर माग' असे म्हटले, तेव्हा 'अश्वाशिवाय यथाविधि समाप्त केलेल्या यज्ञाचे पुण्य माझ्या पित्यास मिळावे', अशी इच्छा रघूने प्रदर्शित केली. इंद्राने ते कबूल केल्यावर रघु परत गेला. यज्ञ समाप्त झाल्यावर दिलीपाने रघूला राज्याभिषेक करून स्वतः सुदक्षिणेसह तपोवनाकडे प्रयाण केले (सर्ग ३). रघूने आपल्या सुराज्याने लोकांस दिलीपाचा विसर पाडला. लोकांच्या रंजनामुळे त्याची 'राजा' ही पदवी सार्थ झाली. शरदृतु प्राप्त झाल्यावर

तो षड्विध सैन्य घेऊन दिग्विजयार्थ निघाला. प्रथम त्याने पूर्व दिशेचे सुह्म, वंग इत्यादि देश जिंकून गंगेच्या प्रवाहांमधील प्रदेशात आपले जयस्तम्भ उभारले. नंतर तो दक्षिणेकडे वळला. कलिङ्ग देशाच्या राजाचा पराभव करून त्याने त्याला मुक्त केले व करभार देण्यास लावले, पण त्याचे राज्य काढून घेतले नाही. पुढे पूर्व किनाऱ्याने चाल करून त्याने कावेरी पार केली व पाण्डय राजांचा पराभव करून त्यांच्याकडून ताम्रपर्णी नदीच्या मुखाशी मिळणाऱ्या मोत्यांचा करभार घेतला. दक्षिण दिशेचे मलय व दर्दुर पर्वत आक्रमण केल्यावर त्याने सह्य पर्वत ओलांडून केरल व अपरान्त (कोंकण) येथील राजांचा पराजय केला. पुढे पारसीकांना जिंकण्यास तो स्थलमार्गानेच निघाला. नंतर झालेल्या घोर युद्धात त्याने आपल्या बाणांनी यवनांची लांब दाढी असलेली शिरे छाटून त्यांनी भूमि आच्छादून टाकिली. उत्तरेकडच्या दिग्विजयात हूण, काम्बोज वगैरे देशांच्या राजांचा पराजय करून व खंडणी घेऊन तो हिमालयाकडे वळला. तेथील उत्सवसंकेतादि गणांशी त्याचे युद्ध झाल्यावर त्यांनी त्याचे स्वामित्व कबूल करून त्याला नजराणा दिला. नंतर कामरूप (आसाम) च्या राजाने रत्नरूपी पुष्पांनी त्याच्या पद-कांतीची पूजा केली. याप्रमाणे भारतवर्षाच्या चारी दिशांची राज्ये जिंकून आणलेली व आपली स्वतःची सर्व संपत्ति हिचा त्याने विश्वजित् नामक यज्ञात व्यय केला (सर्ग ४). विश्वजित् यज्ञानंतर रघूच्या खजिन्यात अगदीच शिल्लक नव्हती. अशा वेळी वरतन्तु ऋषीचा शिष्य कौत्स हा गुरुदक्षिणेनिमित्त चौदा कोटी सुवर्ण मागण्यास रघूकडे आला. अशा विद्वान् ब्राह्मणास विमुख पाठविण्याने रघूची दुष्कीर्ति झाली असती. राजेलोकांनी अगोदरच शक्य तो करभार दिला असल्याने त्यांच्याकडून जास्त मिळणे शक्य नव्हते, म्हणून रघूने प्रत्यक्ष धनपति कुबेरावर चाल करण्याचा निश्चय केला. ते समजताच कुबेराने त्याच्या खजिन्यात सुवर्णाची वृष्टि केली. ती सर्वच सुवर्णाची रास रघूने कौत्सास देऊ केली. पण त्या निःस्पृह ब्राह्मणाने आपल्या गुरुदक्षिणेव्यतिरिक्त एक कवडीही घेतली नाही. पुढे कौत्साच्या आशीर्वादाने रघूस अज नावाचा पुत्र झाला. तो वयात आल्यावर विदर्भराजाने आपली भगिनी इंदुमती हिच्या स्वयंवरार्थ निमंत्रण

केल्यावरून रघूने त्यास सैन्यासह पाठविले. वाटेत नर्मदातीरी अजाने बाण मारल्यामुळे प्रियंवद नामक गन्धर्वाची हस्तियोनीतून मुक्तता झाली. त्याचा मोबदला म्हणून त्याने त्याला संमोहन नामक गान्धर्व अस्त्र दिले. कुण्डिनपुरास पोचल्यावर अजाचे मोठ्या थाटाने स्वागत झाले. नंतर तो आपल्या शिबिरात पोचला. त्या रात्री अजाला उशीरा निद्रा लागली. पहाटे त्याला जागृत करण्याकरिता वैतालिकांनी प्रभात-वर्णनपर श्लोक रचून म्हटले. हे सर्वच श्लोक अत्यंत उत्कृष्ट असल्याने स्वतः वाग्देवीने हे रचून कालिदासास दिले, अशी आख्यायिका प्रचलित आहे. उदाहरणार्थ त्यांतील दोन खाली दिले आहेत—

ताम्रोदरेषु पतितं तरुपल्लवेषु
निर्धौतहारगुलिकाविशदं हिमाम्भः।
आभाति लब्धपरभागतयाधरोष्ठे
लीलास्मितं सदशनार्चिरिव त्वदीयम्॥ रघु० ५, ७०.

'ज्यांचा आतील भाग तांबडा आहे अशा तरूंच्या (कोमल) पल्लवांवर धुवून स्वच्छ केलेल्या मौक्तिकांप्रमाणे शुभ्र असे दंव पडले आहे. त्यामुळे ते तुझ्या अधरोष्ठावर पडलेल्या दन्तकान्तियुक्त लीलास्मिताप्रमाणे खुलून दिसत आहे.'

भवति विरलभक्तिर्म्लानपुष्पोपहारः
स्वकिरणपरिवेषोद्भेदशून्याः प्रदीपाः।
अयमपि च गिरं नस्त्वत्प्रबोधप्रयुक्ता-
मनुवदति शुकस्ते मञ्जुवाक् पञ्जरस्थः॥ रघु० ५, ७४.

'रात्री केलेला पुष्पोपहार म्लान झाल्यामुळे त्याची रचना विरल झाली आहे. आता दिव्यांच्या प्रकाशाचे वलय दिसत नाही आणि हा पिंजऱ्यातील मधुरकंठाचा पोपट तुला जागृत करण्याकरिता आम्ही म्हटलेले श्लोक पुन्हा म्हणत आहे.'

नंतर अज जागृत होऊन व यथाविधि आपली नित्यकर्मे आटोपून स्वयंवरमंडपाकडे गेला (सर्ग ५). तेथे अनेक राजे जमले होते. काही वेळाने बंदी लोक राजांची स्तुति करीत असता व उपवनातील मयूरांना नाचविणारा शंखांचा ध्वनि होत असता, पालखीत बसून इंदुमती सखीसह मंडपात आली. तिला पाहताच राजेलोकांच्या शृंगारचेष्टा सुरू झाल्या.

त्यांचे मनोहर वर्णन कालिदासाने केले आहे. नंतर इंदुमतीची सखी सुनन्दा तिला घेऊन प्रत्येक राजाजवळ जाऊन त्याचे वर्णन करू लागली. या प्रसंगी निरनिराळ्या देशांच्या राजांचे वैयक्तिक गुण, त्यांची संपत्ति, त्यांच्या देशांतील सुंदर स्थळे इत्यादिकांचे अत्यंत रम्य व भौगोलिक-दृष्ट्या निर्दोष वर्णन कालिदासाने केले आहे, ते सर्वच मुळातून वाचण्यासारखे आहे. उदाहरणार्थ काही उतारे दिले आहेत—

अंगराजाचे वर्णन करताना सुनन्दा म्हणते—

अनेन पर्यासयताश्रुबिन्दून् मुक्ताफलस्थूलतमान् स्तनेषु।
प्रत्यर्पिताः शत्रुविलासिनीनामुन्मुच्य सूत्रेण विनैव हाराः॥ रघु० ६, २८.

'या राजाने शत्रुस्त्रियांना आपल्या स्तनांवर मोत्यांप्रमाणे स्थूल अश्रुबिंदु गाळावयास लावून (जणू काय) सूत्रविरहित त्यांचे हारच त्यांना परत केले आहेत'. या श्लोकात या राजाच्या शत्रूंच्या स्त्रिया आपले मोत्यांचे हार टाकून देऊन सदैव अश्रु गाळीत असतात, असे वर्णन करून अंगदेशच्या राजाने आपल्या शत्रूंचा पूरा निःपात केला, असे सुनन्देने मोठ्या खुबीने ध्वनित केले आहे. इंदुमती पांड्य राजाजवळ आली त्यावेळी सुनन्दा म्हणते—

पाण्ड्योऽयमंसार्पितलम्बहारः क्लृप्ताङ्गरागो हरिचन्दनेन।
आभाति बालातपरक्तसानुः सनिर्झरोद्गार इवाद्रिराजः॥ रघु० ६, ६०.

या श्लोकात द्रविडवंशीय बृहत्काय व कृष्णवर्ण, पण रक्तचंदनाची उटी लावलेल्या व गळ्यात लांब मौक्तिकहार घातलेल्या पांड्यराजास, जो प्रातःकाळच्या सूर्यकिरणांनी रक्तवर्ण झाला आहे व ज्याच्या तटावरून जलप्रवाह वाहत आहेत, अशा पर्वताची अनुरूप उपमा दिली आहे. मगध, अंग, अवन्ति, अनूप, शूरसेन, कलिंग इत्यादि देशांच्या राजांचे मोहक वर्णन सुनन्देने केले. तथापि, त्यांपैकी एकही इंदुमतीच्या मनास येईना. तेव्हा शेवटी ती अजाजवळ आली. त्यावेळी मात्र सर्वांगसुंदर अशा त्या राजपुत्रास पाहून इंदुमतीचे मन तत्काळ त्याजकडे आकृष्ट झाले. ते पाहून सुनन्देनेही त्याचे सविस्तर वर्णन केले व शेवटी 'कुल, रूप, यौवन, विनयादि गुण यांनी हाच तुला योग्य आहे. यालाच तू वर ; रत्नाला सुवर्णाचे कोंदण मिळू दे,' असा तिला उपदेश केला. इंदुमतीचे प्रेम त्याच्यावर बसलेले पाहून ती थट्टेने तिला म्हणाली, 'आर्ये, चला

आपण दुसऱ्या राजाकडे जाऊ.' पण ते आता इंदुमतीला थोडेच रुचणार! ती तिच्याकडे रागाने पाहू लागली. असो. अज-इंदुमतींच्या या अनुरूप संयोगामुळे सर्व पौरजनांना आनंद झाला (सर्ग ६). नंतर त्या दोघांना घेऊन विदर्भाधिपतीने आपल्या नगरात प्रवेश केला. त्या वेळी झालेल्या पौरस्त्रियांच्या धांदलीचे कालिदासाने फार सुंदर वर्णन केलेले मागे सांगितलेच आहे. पुढे अज-इंदुमतींचा यथाविधि विवाह झाला. नंतर विदर्भाधिपतीने अजाला इंदुमतीसह स्वदेशास परत जाण्याविषयी अनुज्ञा दिली. आपल्याला इंदुमती न मिळाल्यामुळे क्रुद्ध झालेल्या राजांनी अजाला वाटेत गाठून त्याजबरोबर भयंकर युद्ध केले. अजाचे सैन्य थोडे असल्यामुळे पराभव पावून पळू लागले. तरी अज रणभूमीवर शौर्याने लढत होता. शेवटी सर्व राजांनी आपली सैन्ये एकत्र करून सर्व प्रकारच्या आयुधांनी एकदम त्याजवर निकराचा हल्ला केला. तेव्हा अजाने प्रियंवद गंधर्वाने दिलेल्या संमोहनास्त्राचा प्रयोग करून त्या सर्वांना रणभूमीवर गाढ निद्रावश करविले व याप्रकारे त्यांचा पराभव करून तो इंदुमतीसह अयोध्येस जाऊन पोहोचला (सर्ग ७). नंतर रघूने त्याला गादीवर बसविले व आपण आपल्या पूर्वजांप्रमाणे तपश्चर्येकरिता अरण्यात जाण्याची तयारी केली. पण अजाला आपल्या पित्याच्या वियोगाची कल्पना दुःसह झाली. तेव्हा त्याच्या अत्याग्रहावरून नगराबाहेर एका स्थली तो राहू लागला. अजाकरिता काही वर्षे याप्रकारे घालविल्यावर रघु आपल्या योगाभ्यासाने सायुज्य मुक्ति मिळविता झाला. काही काळाने अजाला दशरथ नावाचा पुत्र झाला. एके दिवशी इंदुमतीसह तो नगरोपवनात विहार करीत असता भगवान् नारद आकाशमार्गाने गोकर्णस्थ शंकरांच्या दर्शनार्थ जात होते, त्यांच्या वीणेवरची दिव्य पुष्पांची माला वाऱ्याने निसटून इंदुमतीच्या वक्षःस्थलावर पडली. त्याबरोबर ती तत्काळ गतप्राण झाली. ते पाहून अजाला अत्यंत दुःख झाले. तो नाना प्रकारे तिचे गुण आठवून शोक करू लागला—

स्रगियं यदि जीवितापहा हृदये किं निहिता न हन्ति माम्।
विषमप्यमृतं क्वचिद्भवेदमृतं वा विषमीश्वरेच्छया॥

रघु० ८, ४६.

ह्या मालेने जर मृत्यु येत असेल तर मी ही स्वत: हृदयावर ठेवली असता मला का मारीत नाही ? अथवा ईश्वरेच्छेने विषाचे अमृत व अमृताचे विष होते हेच खरे.'

**गृहिणी सचिवः सखी मिथः प्रियशिष्या ललिते कलाविधौ।**

**करुणाविमुखेन मृत्युना हरता त्वां वद किं न मे हृतम्॥** रघु० ८, ६७.

तू माझी गृहिणी, मंत्री, एकांतातील सखी व ललितकलाप्रयोगाच्या वेळची प्रियशिष्या होतीस. निर्दय मृत्यूने तुला नेऊन माझे कोणते नुकसान केले नाही ?' राजाचा शोक कमी होईना असे पाहून त्याच्या गुरूने आपल्या शिष्याबरोबर त्यास संदेश पाठविला : "जन्मलेल्या सर्व प्राण्यांस मृत्यु हा ठेवलेलाच आहे. तू शोकाने देहत्याग केलास तरी तुला इंदुमती मिळणार नाही, कारण 'परलोकजुषां स्वकर्मभिर्गतयो भिन्नपथा हि देहिनाम्' (रघु. ८, ८५). [परलोकातील प्राण्यांची गति स्वकर्मानुसार भिन्न भिन्न असते.] स्वत:च्या आत्म्याचा व देहाचाही वियोग होणार आहे, तर मग बाह्य विषयांच्या वियोगाने शहाण्या मनुष्याचे चित्त का व्यथित व्हावे ? म्हणून तू शोकवश होऊ नको." पण या उपदेशाने राजाचे समाधान झाले नाही. तथापि, कुमार दशरथ अगदी अल्पवयस्क होता म्हणून त्याने आठ वर्षे कशीबशी घालविली व तो वयात आल्यावर त्याने सरयु व गंगा यांच्या पवित्र संगमावर प्रायोपवेशनाने देह ठेवला (सर्ग ८). दशरथाने गादीवर बसल्यावर अत्यंत न्यायाने राज्य केले. त्याच्या राज्यात रोगाचेही नाव नव्हते, मग शत्रूची स्वारी कशी व्हावी ? राजाला मृगया, द्यूत, सुरा व परस्त्री यांपैकी कसलेही व्यसन नव्हते. त्यामुळे त्याच्या राज्यातील प्रजा अतिशय सुखी होती. त्याला कौसल्या, सुमित्रा व कैकेयी अशा तीन स्त्रिया होत्या. एकदा वसंतसमय प्राप्त झाला असता राजाला मृगया करण्याची इच्छा झाली, तेव्हा सचिवांच्या अनुज्ञेने तो वनात गेला. त्याच्या मृगयेचे कालिदासाने फार सुंदर वर्णन केले आहे. मृगया करता करता अरण्यात रात्र झाली म्हणून राजा तेथेच राहिला. पहाटे तमसा नदीच्या तीरावर वृद्ध मातापितरांचा एकुलता एक मुलगा घट भरीत असता हत्तीची भ्रांति होऊन राजाने बाण मारला ; तो वर्मी लागून तो मुलगा खाली पडला. ते कळताच त्या वृद्ध पित्याने

'तुलाही माझ्याप्रमाणे वृद्धापकाळी पुत्रशोकाने मृत्यु येईल', असा शाप दिला व स्वत: अग्निकाष्ठें भक्षण केली (सर्ग ९).

यापुढच्या सहा सर्गांत कालिदासाने रामकथा वर्णिली आहे. ती सर्वश्रुत असल्याने सविस्तर देण्याची जरूरी नाही. दशरथाने पुष्कळ वर्षे राज्य केलें तरी त्याला पुत्र होईना, म्हणून ऋष्यशृंगादि ऋषींनी त्याच्याकरिता पुत्रकामेष्टि याग करण्यास आरंभ केला. त्याच वेळी रावणाच्या जाचास कंटाळून देव विष्णूस शरण गेले व त्यांनी त्याची स्तुति केली. विष्णूने अवतार घेऊन रावणाचा वध करण्याचे वचन दिले. त्यानंतर यज्ञातील चरु भक्षण केल्यावर कौसल्येस राम, सुमित्रेस लक्ष्मण व शत्रुघ्न आणि कैकेयीस भरत हे पुत्र झाले (सर्ग १०). ते कुमारावस्थेत असताना विश्वामित्र ऋषि यज्ञरक्षणार्थ रामलक्ष्मणांस स्वाश्रमास घेऊन गेला. वाटेत रामाने ताटकेचा वध केला. यज्ञ-समाप्तीनंतर विश्वामित्राबरोबर ते मिथिलानगरीस गेले. तेथे रामाने शिवधनुर्भंग केल्यावर त्या चारही भावांचा तेथे विवाह झाला. परत जाताना रामाने परशुरामाचा पराभव केला (सर्ग ११). कैकेयीने वर मागितल्यावरून राम, लक्ष्मण व सीता वनवासात गेले. पंचवटीत रहात असता रामाने खरादि राक्षसांचा वध केला. पुढे रावणाने मुनिवेषाने येऊन सीताहरण केले. नंतर सुग्रीवाशी सख्य करून व समुद्रावर सेतु बांधून रामाने कपिसैन्यासह लंकेवर चाल केली व रावणाचा वध केला. सीताशुद्धीनंतर बिभीषण, लक्ष्मण, सीता इत्यादिकांसह राम विमानमार्गे निघाला (सर्ग १२). विमानातून जाताना पूर्वी ज्या ज्या स्थली राम, लक्ष्मण व सीता यांनी वास केला होता, त्या सर्व स्थलांचे मनोहर वर्णन कवीने तेराव्या सर्गात केले आहे. पुढील सर्गात रामादि-कांचा अयोध्याप्रवेश, सीतेच्या चारित्र्याविषयी जनापवाद, रामाज्ञेने लक्ष्मणाने वाल्मिकीच्या आश्रमाजवळ केलेला तिचा त्याग व तिने लक्ष्मणाबरोबर रामास पाठविलेला संदेश इत्यादि विषय कवीने वर्णिले आहेत. सीतेच्या संदेशात तिचा कोमल स्वभाव, करुणावस्था व पातिव्रत्य ही उत्कृष्ट रीतीने प्रतिबिम्बित झाली आहेत. ती म्हणते—

**साहं तपः सूर्यनिविष्टदृष्टिरूर्ध्वं प्रसूतेश्चरितुं यतिष्ये।**
**भूयो यथा मे जननान्तरेऽपि त्वमेव भर्ता न च विप्रयोगः॥** रघु० १४, ६६.

निष्कारण आपला त्याग करणाऱ्या पतीविषयी असे उद्‌गार एका आर्य स्त्रीच्याच मुखातून निघतील ! पंधराव्या सर्गात शंबूकवध, कुशलवांचे रामाच्या सभेत रामचरितगायन, पुढे भूमीच्या उदरात सीता अदृश्य होणे, रामादिकांचे स्वर्गगमन इत्यादि विषय आले आहेत.

निर्याणापूर्वी रामाने आपल्या राज्याचे विभाग करून त्यांवर आपल्या व भावांच्या मुलांची योजना केली होती. त्याप्रमाणे कुश दक्षिण कोसलात कुशावती येथे राज्य करीत होता. रामानंतर अयोध्या-नगरीची वाताहात झाली. एके दिवशी मध्यरात्री कुश बिछान्यावर पडला असता त्याला एका प्रवासी तेज:पुंज स्त्रीची आकृति आपल्या खोलीत दिसली. ती अयोध्यानगरीची अधिदेवता होती. तिने रामराज्यात ती नगरी कशी सुसमृद्ध होती, पण रामनिर्याणानंतर तिची कशी शोचनीय अवस्था झाली, याचे अत्यंत हृदयस्पर्शी वर्णन केले व कुशाला परत अयोध्येस जाण्याविषयी आग्रह केला. त्याप्रमाणे कुश स्वजनांसह निघाला. अयोध्येस पोचल्यावर एके दिवशी अन्त:-पुरस्त्रियांसह जलविहार करीत असता अगस्त्यमुनीने रामास दिलेले व रामापासून कुशास प्राप्त झालेले दिव्य कंकण सरयू नदीत पडले. पाण-बुड्यांनी पुष्कळ प्रयत्न केला तरी ते सापडेना. तेव्हा कुमुद नावाच्या नागाने ते लपविले असावे असे वाटून कुशाने गरुडास्त्राची योजना केली. त्यामुळे त्रस्त होऊन तो नागराज त्या डोहातून वर आला व कुमुद्वती नामक आपल्या कन्येसह त्याने ते कुशास अर्पण केले (सर्ग १६). कुशाला कुमुद्वतीपासून अतिथि नामक पुत्र झाला. तो त्याच्यानंतर गादीवर बसला. तो अर्थशास्त्रात सांगितल्याप्रमाणे दिवसरात्रींचे विभाग करून आपली कर्तव्ये पार पाडीत असे. तारुण्य, रूप, संपत्ति इत्यादि सर्व अनुकूल असताही तो गर्विष्ठ झाला नाही. त्याचे वर्तन राजनीतीत सांगितल्याप्रमाणे असे (सर्ग १७). अठराव्या सर्गात बावीस राजांचे वर्णन आले आहे. त्यांपैकी पहिल्या एकवीस राजांच्या वर्णनास कवीने प्रत्येकी एक-दोन श्लोकच दिले आहेत. शेवटचा सुदर्शन राजा बाळ-पणातच गादीवर आला. तो अल्पवयस्क असला तरी अमात्यांच्या साहाय्याने त्याने राज्यकारभार कसा चालविला होता, याचे सुंदर वर्णन या सर्गाच्या शेवटी आले आहे. यानंतरच्या व उपलब्ध प्रतींतील

शेवटच्या सर्गात सुदर्शन राजाचा मुलगा अग्निवर्ण याचे वर्णन कवीने सविस्तरपणाने केले आहे. त्याच्या पित्याने सर्व शत्रूंचा मोड केला असल्याने राज्यरक्षणार्थ अग्निवर्णाला मुळीच प्रयास पडले नाहीत. त्याने काही वर्षे राज्यकारभार पाहिला ; पण पुढे ते काम सचिवांवर सोपवून तो स्त्रियांसह विषयोपभोगात रममाण झाला. रात्रंदिवस अन्तःपुरात विहार करताना त्याला आपल्या प्रजेची कधीच आठवण झाली नाही. मंत्र्यांनी विशेष आग्रह केला म्हणून खिडकीतून एक पाय बाहेर काढून त्याने तद्द्वारा प्रजेला दर्शन दिले ! या अत्यंत विषयासक्त व्यसनी राजाच्या विलासांचे कालिदासाने केलेले सविस्तर वर्णन वाचून अग्निवर्णाच्या वर्तनाची किळस येते, तथापि कवीच्या वर्णनशक्तीबद्दल आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाही. अग्निवर्ण स्वतः अत्यंत कलाकुशल होता. वेश्या नृत्य करीत असता तो स्वतः मृदङ्गवादनाने त्यांच्या नर्तनातील दोष दाखवून त्यांना लज्जित करीत असे. केवळ अन्तःपुरातील स्त्रियांचा उपभोग घेऊन संतुष्ट न झाल्यामुळे त्याची दृष्टि सुंदर दासी व वेश्या यांजकडेही जात असे. स्त्रीसंग व सुरापान यांनी त्याची प्रकृति खालावली व त्याला क्षयाचा विकार जडला. वैद्यांनी उपदेश केला तरी तो स्त्रीसंगापासून निवृत्त होईना, कारण 'स्वादुभिस्तु विषयैर्हृतस्ततो दुःखमिन्द्रियगणो निवर्तते।' (रघु. १९, ४९) [इंद्रियांना रम्य विषयांची एकदा चटक लागली की त्यांपासून त्यांना निवृत्त करणे कठीण जाते.] राजाचे दर्शन बरेच दिवस न झाल्यामुळे प्रजेला त्याच्या प्रकृतीविषयी काळजी लागली, तथापि सचिवांनी त्याच्या रोगाची वार्ता पसरू दिली नाही. शेवटी तो मृत्यु पावल्यावर त्याला नगरोपवनात त्यांनी गुप्तपणे अग्निसंस्कार दिला व त्याची राणी गर्भवती असल्याने तिलाच राज्याभिषेक करून तिच्या नावाने राज्यकारभार चालविला (सर्ग १९).

एकोणिसाव्या सर्गाचा शेवट आकस्मिकपणे झालेला दिसतो. काही वर्षांपूर्वी धारानगरीत 'रघुवंशा'चे सव्वीस सर्ग असल्याची बातमी एका शास्त्रीबुवांनी प्रसिद्ध केली होती व कै. रा. ब. शं. पां. पंडित यांनीही उज्जयिनीत 'रघुवंशा'चे वीस ते पंचवीस हे सर्ग विद्यमान असल्याचे ऐकले होते. तथापि ते अद्यापि प्रकाशित झाले नाहीत, त्यामुळे या

वार्तांवर विश्वास ठेवता येत नाही. कवीने यापुढील सर्ग लिहिले नसल्यास त्याचे कारण त्याचे आजारीपण अगर मृत्यु हे असावे. कारण काही असले तरी 'कुमारसंभवा'प्रमाणे हेही काव्य कवीच्या हातून अपूर्णच राहिले असावे, असे दिसते. 'विष्णुपुराणा'त अग्निवर्णा-नंतर आणखी आठ राजांचे वर्णन आले आहे. असो.

'रघुवंश' हे काव्य अत्यंत उत्कृष्ट असून इतर काव्यांच्या मानाने साध्या भाषेत लिहिले असल्याने आबालवृद्ध संस्कृततज्ज्ञांस सारखेच प्रिय झाले आहे. यावर लिहिलेल्या तेहेतीस टीकांची नावे प्रसिद्ध आहेत, त्यांवरूनही त्याची लोकप्रियता व्यक्त होते. कालिदासाने इतरही उत्कृष्ट काव्ये व नाटके लिहिली असली तरी संस्कृत ग्रंथकार व सुभाषित-कार त्याचा 'रघुकार' म्हणूनच उल्लेख करतात, यावरूनही या काव्याचे उत्कृष्टत्व प्रत्ययास येते.

'कुमारसंभव' व 'मेघदूत' ही यापूर्वीची काव्ये अधिक प्रमाणबद्ध व आटोपशीर आहेत. 'कुमारसंभवा'त एकाच नायकाच्या—भगवान् शंकराच्या—चरित्रातील एका विशिष्ट प्रसंगाचे वर्णन करावयाचे होते. तसेच 'मेघदूता'तही एकाच नायकाच्या व नायिकेच्या विरही अवस्थेचे शब्दचित्र रेखाटावयाचे होते. त्यामुळे ही दोन्ही काव्ये रचनेच्या दृष्टीने सुटसुटीत झाली आहेत. 'रघुवंशा'चे तसे नाही. त्यांत एकंदर तीस राजांचे वर्णन आले आहे व हे राजे सामान्यत: शूर, न्यायी, विद्वान्, संयमी व दातृत्वशाली असले तरी त्यांच्या चरित्रांतील भिन्न भिन्न प्रसंगांच्या वर्णनात एकसूत्रीपणा व प्रमाणबद्धता राहणे शक्य नाही. तथापि दुसऱ्या एका दृष्टीने पाहिल्यास ते इतर काव्यांपेक्षा सरस आहे यांत संशय नाही. 'कुमारसंभव' व 'मेघदूत' यांतील नायक दैवी किंवा अतिमानुष कोटीतले. त्यांच्या विचारविकारांच्या वर्णनात वाचकांस तितकासा आपलेपणा वाटणे शक्य नाही. याच्या उलट 'रघुवंशा'त काही ठिकाणी कवीने अद्भुतत्वाची जोड दिली असली, तरी यातील नायक या भूतलावर वावरणाऱ्या व्यक्ति होत्या. त्यांच्यापैकी बहुतेकांची चरित्रे उदात्त असली तरी केवळ अद्भुतरसपूर्ण नाहीत. त्यामुळे वाचकांस त्यांच्याविषयी कुतूहल, आदर व सहानु-भूति वाटल्याशिवाय राहत नाही. या काव्याच्या रचनेतही कवीची

कल्पकता दिसून येते. दिलीपापासून दशरथापर्यंत 'रघुवंशा 'तील राजे एक एक गुणात श्रेष्ठ असे दाखविले आहेत. दिलीप हा भक्तिमान्, रघु दानशूर, अज प्रेमळ व दशरथ राजगुणसंपन्न होता; पण रामाच्या स्वभावात या सर्वच गुणांचे मधुर मिश्रण झाले होते. रामाच्या चरित्रात सीतेला झालेल्या अन्यायामुळे, किंवा दुसऱ्या काही कारणामुळे, त्याच्या-नंतर रघुवंशाच्या ऐश्वर्याला ओहोटी लागली. पहिल्या एक दोन पिढ्यांत—कुश व अतिथि यांच्या राजवटीत—पूर्वजांच्या पुण्याईने व काही अंशी त्या राजांच्या वैयक्तिक गुणांमुळे तो ऱ्हास जाणवला नाही. पण त्यापुढे त्याची गति वाढत गेली. अतिथीनंतरच्या एकवीस राजांच्या आयुष्यात वर्णन करण्यासारखा प्रसंग कवीला दिसला नाही व त्यानंतर गादीवर आलेल्या अग्निवर्ण राजाने तर विषयोपभोगात निमग्न होऊन आपल्या पूर्वजांचे शुभ्र यश कलंकित केले. प्रजेच्या रक्षणाची, पोषणाची व शिक्षणाची पितृवत् काळजी घेणारा इंद्रियनिग्रही दिलीप राजा आणि रात्रंदिवस विषयोपभोगात मग्न असणारा व प्रजेने दर्शनार्थ धरणे धरल्यावर मंत्र्यांच्या आग्रहावरून खिडकीतून एक पाय बाहेर काढून 'याच्या दर्शनाने आपली तहानभूक भागवा' असे प्रजेस सांगणारा अग्निवर्ण राजा यांच्या चरित्रातील जमीन-अस्मानाचा फरक सर्वसाधारण वाचकांसही जाणवल्याशिवाय राहत नाही. कालिदासाने दोघांचीही चरित्रे सारख्याच कुशलतेने रंगविली असली, तरी समाजापुढे त्याला कोणता आदर्श ठेवावयाचा होता, हे समजणे कठीण नाही.

पहिल्या सर्गाच्या आरंभी 'पूर्वसूरींच्या ग्रंथांस अनुसरून मी रघु-वंशवर्णन करणार आहे' असे कवीने सूचित केले आहे. यांपैकी 'वाल्मीकिरामायणा'चा आधार त्याच्या नऊ ते पंधरा या सात सर्गांस होता, हे स्पष्ट आहे. पण इतर ग्रंथ कोणते असावे ते सध्या समजण्यास मार्ग नाही. पुराणांतही या राजांची नामावलि दिली आहे, पण तिच्यात व 'रघुवंशा'तील राजांच्या अनुक्रमांत बराच फरक दिसतो. उदाहरणार्थ, दिलीप व रघु यांच्यामध्ये 'वाल्मीकिरामायणा'त दोन, 'वायुपुराणा'त एकोणीस व 'विष्णुपुराणा'त अठरा राजांची नावे दिली आहेत. शिवाय या ग्रंथांत केवळ नावेच आहेत, त्यांच्या चरित्रांचे

काहीच वर्णन केलेले दिसत नाही*. त्यामुळे या ग्रंथकारांविषयी कवि इतके आदराचे उद्‌गार काढील, असे वाटत नाही. तेव्हा दुसरेच काही ग्रंथ कालिदासापुढे होते असे वाटते. भासाच्या 'प्रतिमा' नाटकातही दिलीपापासून दशरथापर्यंतचा राजक्रम 'रघुवंशा'तल्याप्रमाणेच दिला आहे, त्यावरूनही दोघांही कवींनी समान ग्रंथांचा उपयोग केला होता, हे स्पष्ट आहे. 'रघुवंशा'च्या अठराव्या सर्गात एकवीस राजांची पुराणातल्याप्रमाणे केवळ नामावलि आली आहे, त्यावरून त्यांच्याविषयी कालिदासपूर्वकालीन ग्रंथांत काही विशेष माहिती नसावी असे वाटते. दिलीप, रघु व अज यांच्या बाबतीतही बऱ्याच अंशी तीच स्थिति असण्याचा संभव आहे. तसे असल्यास अशा अपूर्ण सामग्रीचा उपयोग करून 'रघुवंशा'तील उदात्त चरित्रांचे उत्तुंग प्रासाद निर्माण करणाऱ्या कवीच्या प्रतिभेचे कौतुक करावे तेवढे थोडे आहे.

अकराव्या शतकातल्या सोड्ढल कवीने आपल्या 'उदयसुंदरीकथा' नामक चम्पू ग्रंथात निरनिराळ्या कवींचे विशेष सांगताना कालिदासाला 'रसेश्वर' अशी संज्ञा दिली आहे व त्याचे रसवर्णननैपुण्य लक्षात घेता ती अन्वर्थ आहे यांत संशय नाही. कालिदासाच्या इतर ग्रंथांत एखाद्-दुसऱ्या रसाचा परिपोष केलेला आढळतो. पण प्रायः सर्वच प्रमुख रसांचा परिपोष 'रघुवंशा'शिवाय दुसऱ्या कोणत्याही एका ग्रंथात दिसत नाही. 'रघुवंशा'त मात्र अग्निवर्ण राजाच्या विलासाच्या वर्णनात शृंगार, रघु, अज व राम इत्यादिकांच्या युद्धांच्या वर्णनात वीर, अजविलापात करुण, वसिष्ठ व वाल्मीकि यांच्या आश्रमांच्या आणि संसारनिवृत्त रघूच्या वर्णनात शांत हे रस प्रमुखत्वाने आले आहेत. यांशिवाय ताटकावधासारख्या प्रसंगांच्या वर्णनात बीभत्सादि रसांच्या किंचित् छटा दृष्टीस पडतात. कवीची भाषा सर्वत्र मधुर व प्रसादयुक्त आहे. ठिकठिकाणी उपमा, उत्प्रेक्षा, अर्थान्तरन्यास इत्यादि अर्थालंकारांनी

* 'पद्मपुराणां'त दिलीपापासून दशरथापर्यंतच्या राजांचे वर्णन 'रघुवंशा'तल्याप्रमाणेच केले आहे व त्यात अनेक ठिकाणी शब्दसाम्य व कल्पनासाम्यही आढळते. म्हणून कालिदासाने आपले काव्य रचताना 'पद्मपुराणा'चा आधार घेतला होता, असे डॉ. विंटर्निट्झसारखे कित्येक विद्वान् अनुमान करतात. पण ते सयुक्तिक दिसत नाही. 'पद्मपुराणा'ने कालिदासाच्या ग्रंथांचा उपयोग केल्यामुळे हे साम्य आले आहे, हे आम्ही पुढे दाखविले आहे.

तिला नटविले आहे. कालिदासाचा शब्दालंकारांवर कोठेही फारसा भर दिसत नाही. तथापि नवव्या सर्गात ग्रीष्म ऋतु व दशरथ राजाची मृगया यांचे वर्णन करताना 'यमवतामवतां च धुरि स्थित:', 'रणरेणवो रुरुधिरे रुधिरेण सुरद्विषाम्' इत्यादि ठिकाणी यमक व अनुप्रास या शब्दालंकारांची हौसही त्याने फेडून घेतली आहे. तथापि, एकंदरीत कवीने अलंकारांचा अगर वर्णनाचा अतिरेक न होऊ देण्याविषयी अत्यंत काळजी घेतली आहे. सर्वत्र वाच्यार्थापेक्षा व्यंग्यार्थावरच भर दिला आहे व वृत्तांचा यथोचित उपयोग केला आहे. सुबोध रचना, रम्य अलंकार, मधुर भावतरंग, मनोहर सृष्टिवर्णन इत्यादिकांमुळे 'रघुवंशा'तील राजर्षींच्या उदात्त चरित्रांचे हे सर्वांगसुंदर काव्य संस्कृत भाषेत अद्वितीय म्हणून गणले गेले आहे.



## प्रकरण सहावे

# कालिदासाची नाटके

वासन्तं कुसुमं फलं च युगपद् ग्रीष्मस्य सर्वं च यद्
यच्चान्यन्मनसो रसायनमतः सन्तर्पणं मोहनम् ।
एकीभूतमभूतपूर्वमथवा स्वर्लोकभूलोकयो –
रैश्वर्यं यदि वाञ्छसि प्रिय सखे ! शाकुन्तलं सेव्यताम् ।।

—जर्मन कवि गटे

'मालविकाग्निमित्र' नाटकाच्या प्रस्तावनेत सूत्रधाराने "या वसन्तोत्सवात कालिदासाचे 'मालविकाग्निमित्र' नामक नाटक करावे, अशी विद्वत्परिषदेची मला आज्ञा झाली आहे" असे म्हणताच पारिपार्श्वक विचारतो, 'प्रथितयश अशा भास, सौमिल्ल, कविपुत्र इत्यादिकांची नाटके टाकून या आधुनिक कालिदास नामक कवीच्या नाटकाविषयी विद्वानांना इतका आदर का बरे असावा ?' त्यावर सूत्रधार म्हणतो—

पुराणमित्येव न साधु सर्वं न चापि काव्यं नवमित्यवद्यम् ।
सन्तः परीक्ष्यान्यतरद्भजन्ते मूढः परप्रत्ययनेयबुद्धिः ।।

माल० १, २.

'जुनी काव्ये तेवढी चांगली, नवे काव्य मात्र सदोष, असा काही नियम नाही. सज्जन लोक परीक्षा करून त्यांतील चांगले असेल तेच स्वीकारतात ; मूर्ख माणसे मात्र दुसऱ्याच्या मताप्रमाणे चालणारी असतात.' या संभाषणात कवीने आपले नाटक भासादि प्राचीन व प्रसिद्ध कवींच्या नाटकांपेक्षा गुणाने श्रेष्ठ आहे, असे रसिकांस आत्मप्रत्ययाने सांगितले आहे.

त्यात किती तथ्य आहे, ते पाहण्यासाठी कालिदासपूर्वकालीन कवींच्या नाट्यवाङ्मयाचा थोडक्यात परामर्श घेतला पाहिजे.

इतर भारतीय शास्त्रे व कला यांप्रमाणेच नाट्यकलाही अत्यंत प्राचीन काळी यज्ञकर्माच्या अनुषंगाने हिंदुस्थानात अस्तित्वात आली व उत्क्रांत झाली असे वाटते. अश्वमेधादि यज्ञप्रसंगी अवान्तर कर्मांमधील फुरसतीच्या वेळी शुनःशेपादि प्राचीन आख्याने म्हटली जात असत, असे वैदिक वाङ्मयातील उल्लेखांवरून दिसते. अशा प्रसंगी वैदिक देवतांच्या चरित्रविषयक नाटकांचा प्रयोग होत असावा. ही नाटके अर्थातच उत्तरकालीन नाटकांप्रमाणे सर्वांगपरिपूर्ण नसतील. तथापि त्यांमध्ये संस्कृत नाट्यकलेचे बीज सापडते, यात संशय नाही. ऋग्वेदादि वेदांचे अध्ययन शूद्रादिकांना निषिद्ध असल्यामुळे त्रेतायुगात सर्व वर्णांना ज्याचे सारखे अध्ययन करता येईल असा एखादा वेद उत्पन्न करावा, अशी इंद्रादि देवांनी प्रार्थना केल्यावरून ब्रह्मदेवाने नाट्यवेद नावाचा पाचवा वेद निर्माण केला, अशी प्राचीन आख्यायिका भरतमुनींच्या 'नाट्यशास्त्रा'त दिली आहे. त्यावरून वेदबाह्य वर्णांस धार्मिक शिक्षण देणे हाही त्या वेळच्या नाट्यकलेचा एक उद्देश असावा, असे वाटते. 'तैत्तिरीय ब्राह्मणा'तील पुरुषमेधप्रसंगी दिल्या जाणाऱ्या बलींच्या यादीत शैलूषाचा अन्तर्भाव केला आहे. शैलूष म्हणजे नट. तेव्हा वैदिक व ब्राह्मण काळांत नटांचे व त्यांवरून नाट्यकलेचे अस्तित्व सिद्ध होते. प्रसिद्ध संस्कृत व्याकरणकार पाणिनि हा पुष्कळांच्या मते खिस्तपूर्व ६०० च्या सुमारास होऊन गेला. त्याच्या 'अष्टाध्यायी'त 'पाराशर्यशिलालिभ्यां भिक्षुनटसूत्रयोः' (४, ३, ११०) व 'कर्मन्दकृशाश्वादिनिः' (४, ३, १११) या दोन सूत्रांत शिलालि व कृशाश्व यांनी केलेल्या नटसूत्रांचा उल्लेख आहे. खिस्तपूर्व १५० च्या सुमारास होऊन गेलेल्या पतंजलीच्या 'महाभाष्या'त तर नाटकांचा रंगभूमीवर प्रयोग होत होता, याबद्दल साक्षात् पुरावा सापडतो. त्या ग्रंथात 'कंसवध' व 'बलिबंध' ही नाटके शोभिक किंवा नट करून दाखवीत, असे म्हटले आहे.

भरताच्या 'नाट्यशास्त्रा'त 'अमृतमंथन' व 'त्रिपुरदाह' या नाटकांचा व 'हरिवंशा'त 'कंसवध', 'प्रलंबवध' व 'चाणूरमर्दन' यांचा उल्लेख आला आहे. तथापि, ही प्राचीन नाटके आता नामशेष

झाली आहेत. काव्यांप्रमाणे नाटचवाङमयातही अत्यंत प्राचीन उपलब्ध ग्रंथ बौद्धांचेच आहेत. बौद्धधर्मात प्रथम प्रथम नाटचकलेवर बहिष्कार घातला होता. तथापि, या कलेने समाजाचे मन आकर्षित केले आहे, त्यामुळे तिचा धर्मप्रसारार्थ चांगला उपयोग करता येईल, असे ध्यानात आल्यावर बौद्ध लेखक नाटचकलेचा आदरपूर्वक उल्लेख करू लागले व स्वत:ही नाटके लिहू लागले. अशा प्रकारच्या तीन नाटकांच्या हस्तलिखित ताडपत्रांचे काही लहानमोठे तुकडे सन १९१० मध्ये मध्य आशियात सापडले. त्यांपैकी एकाचे नाव 'शारिपुत्रप्रकरण' किंवा 'शारद्वतीपुत्रप्रकरण' असे होते. ते अश्वघोषाने रचले होते, असा स्पष्ट उल्लेख त्या नाटकाच्या शेवटच्या पत्रावर केलेला आढळतो. यात शारिपुत्र व मौद्गल्यायन यांनी बुद्धाचा उपदेश ग्रहण करून बौद्ध धर्म स्वीकारला, हा विषय आला आहे. दुसऱ्या दोन नाटकांपैकी एक 'प्रबोधचंद्रोदय' नाटकाच्या धर्तीचे आहे. त्यात बुद्धि, धृति, कीर्ति व बुद्ध ही पात्रे आली आहेत. तिसरे नाटक 'मृच्छकटिका'सारखे असून त्यात मगधवती नामक वेश्या, कौमुदगन्ध नावाचा विदूषक, नायक, दुष्ट (किंवा खलपुरुष) इत्यादि पात्रे दिसतात. उपलब्ध झालेले ताडपत्रांचे खंड अत्यंत लहान असल्यामुळे या नाटकांत कथानकरचना, स्वभावपरिपोष इत्यादिकांत अश्वघोषाने किती प्रगति केली होती, हे समजण्यास मार्ग नाही.

कालिदासपूर्वकालीन नाटककारांमध्ये अश्वघोषाप्रमाणेच भासाचाही प्रामुख्याने उल्लेख केला पाहिजे. इ. स. १९१० मध्ये कै. वा. महामहोपाध्याय पंडित गणपति शास्त्री यांनी मलबारमध्ये सापडलेली तेरा नाटके प्रकाशित केली, तोपर्यंत भासाचे नाव कालिदास, बाण, वाक्पतिराज, राजशेखर, अभिनवगुप्त इत्यादिकांच्या ग्रंथांतील उल्लेखांवरूनच ज्ञात होते. सध्या उपलब्ध झालेल्या तेरा नाटकांपैकी 'प्रतिमा' व 'अभिषेक' या नाटकांत रामचरित्र वर्णिले असल्यामुळे त्यांची कथानके 'रामायणा'तून घेतली आहेत. यांपैकी 'प्रतिमे'चे सहा अंक असून त्यांत रामाच्या यौवराज्याभिषेकापासून वनवास संपल्यावर दशमुखवधानंतर तो सीतालक्ष्मणादिकांसह अयोध्येस परत आला तेथपर्यंतचा कथाभाग आला आहे. 'मध्यमव्यायोग', 'पंचरात्र', 'दूतवाक्य', 'दूतघटोत्कच', 'कर्णभार' व 'ऊरुभंग' या सहा नाटकांची कथानके 'महाभारता'तून घेतली आहेत.

यांपैकी ' पंचरात्रा 'चे तीन अंक असून त्यात, दुर्योधनाने एका यज्ञप्रसंगी द्रोणाचार्यांस पांडवांची बातमी पाच दिवसात लागल्यास त्यांस अर्धे राज्य देण्याचे वचन दिले होते, त्याप्रमाणे उत्तरगोग्रहणात ते प्रगट झाल्यावर त्याने ते दिले, असे कथानक घातले आहे. बाकीची पाच नाटके एकांकी आहेत. ' मध्यमव्यायोगा 'त भीमाने एका ब्राह्मणाच्या मुलास घटोत्कचाच्या तावडीतून सोडविले तो प्रसंग, ' दूतवाक्या 'त श्रीकृष्णाची शिष्टाई, ' दूतघटोत्कचा 'त अभिमन्युवधानंतर श्रीकृष्णाने कौरवांस पाठविलेला निरोप, ' कर्णभारा 'त कर्णाने ब्राह्मणवेषधारी इंद्रास दिलेले आपल्या कवचकुण्डलांचे दान, ' ऊरुभंगा 'त भीमदुर्योधनयुद्ध व दुर्योधनाचा ऊरुभंग हे विषय वर्णिले आहेत. ' बालचरिता 'चे पाच अंक असून त्यात कृष्णाच्या जन्मापासून कंसवधापर्यंतची कथा आली आहे, ती हरिवंशातून घेतली असावी. ' प्रतिज्ञायौगंधरायण ' व ' स्वप्नवासवदत्त ' यांचे अनुक्रमे चार व सहा अंक आहेत व त्यांत उदयनकथा वर्णिली असल्याने त्यांस पैशाची भाषेतल्या ' बृहत्कथे 'चा आधार होता, असे दिसते. राहिलेल्या ' अविमारक ' व ' चारुदत्त ' या नाटकांचे अनुक्रमे सहा व चार अंक असून त्यांची कथानके कवीने आपल्या कल्पनाशक्तीने निर्मिली असतील किंवा प्राचीन ' बृहत्कथे 'तूनच घेतली असतील.

या तेरा नाटकांपैकी एकाचे ' स्वप्नवासवदत्त ' हे नाव हस्तलिखित प्रतीत आढळते. जल्हणाने ' सूक्तिमुक्तावली 'त उद्धृत केलेल्या राजशेखराच्या श्लोकावरून भासाने ' स्वप्नवासवदत्त ' नामक नाटक लिहिले होते असे दिसते. त्यावरून, उपलब्ध झालेले ' स्वप्नवासवदत्त ' व तत्सदृश इतर बाराही नाटके भासाची असावी, असा पंडित गणपति शास्त्री यांनी तर्क केला व तो बहुतेक युरोपीय व बऱ्याच हिंदी विद्वानांनी मान्य केला आहे.

अश्वघोष, भास व कालिदास यांच्या नाटकांतील प्राकृत रूपांचा विचार करून भास हा अश्वघोषानंतर व कालिदासापूर्वी होऊन गेला असावा, असे विद्वानांनी ठरविले आहे. शिवाय अश्वघोषाच्या ' बुद्धचरिता 'तल्यासारखा (१३,६०) एक श्लोक भासाच्या 'प्रतिज्ञायौगंधरायणा 'त आढळतो. कालिदासाच्या वेळी भास हा बराच प्राचीन होता, हे ' मालविकाग्निमित्रा-' च्या प्रस्तावनेवरून दिसते. तेव्हा त्याचा काळ इ. स. चे तिसरे शतक हा मानावा लागतो.

भासाच्या नाटकांत विशेष रचनाकौशल्य दिसत नाही. 'अभिषेक', 'बालचरित', 'दूतवाक्य' इत्यादि नाटकांत रामायण व महाभारत यांतील प्रसंग बहुतेक जसेच्या तसे घेतले आहेत. 'प्रतिमा', 'पंचरात्र', 'प्रतिज्ञा-यौगंधरायण', 'स्वप्नवासवदत्त' वगैरे नाटकांत कथानकाच्या सोयीकरिता व वैचित्र्यार्थ मूळ गोष्टींत कवीने बरेच फरक केलेले दिसतात; तथापि गुंतागुंतीचे कथानक घेऊन त्याचे धागेदोरे शेवटल्या अंकात उकलण्याकडे त्याची प्रवृत्ति दिसत नाही. त्याच्या पात्रांची संभाषणे चटकदार असून त्यांत त्यांच्या स्वभावांचे प्रतिबिंब स्पष्टपणे पडलेले दिसते. या सर्व नाटकांची भाषा साधी, प्रसादयुक्त व थोडक्यात पुष्कळ अर्थ व्यक्त करणारी आहे. तीत उपमा, उत्प्रेक्षा, अर्थान्तरन्यास, यथासंख्य यांसारखे कवीला अगदी सहज सुचलेले असेच अलंकार योजिलेले दिसतात. त्यांत कोठेही क्लिष्टता, कृत्रिमता व ओढाताण दिसत नाही. भासाने 'महाभारत', 'रामायण' व 'बृहत्कथा' यांचा चांगलाच अभ्यास केला असल्याने त्यांतील अनेक कल्पना व शब्दप्रयोग त्याच्या नाटकांत दिसतात यात आश्चर्य नाही. या ग्रंथांच्या अभ्यासामुळे त्याच्या नाटकांतल्या पद्यांत व क्वचित् गद्यातही 'स्मराम्यवन्त्याधिपतेः सुतायाः' (स्वप्न०) व 'ज्ञायतां कस्य पुत्रेति' (बालचरित) अशा संधीच्या, 'स्त्रीगतां पृच्छसे कथाम्' (पंचरात्र) 'आपृच्छ पुत्रकृतकान्' (प्रतिमा) अशा क्रियापदांच्या व 'रुदन्तीम्' (दूतवाक्य) 'गृह्य' (दूतघटोत्कच) 'समाश्वासितुम्' (अभिषेक) या प्रकारच्या धातुसाधितांच्या रूपांच्या चुका आढळतात. तसेच वरील कारणांमुळेच त्याची कथानके कृतिमय ( full of action ) झालेली दिसतात. भासाची कल्पनाशक्ति दाडगी होती, तरी विवेचकशक्ति कमी प्रतीची होती, असे दिसते. नाही तर 'पंचरात्रा'च्या प्रथमांकाच्या विष्कंभकातील अग्नीचे पाल्हाळाने केलेले वर्णन कथानकास अनावश्यक असल्याने त्याने संक्षेपिले असते. तसेच 'द्वावेव दोर्भ्यां समरे प्रयातौ हलायुधश्चैव वृकोदरश्च' (पंचरात्र) यातील अर्थाकडे नजर दिल्यावर 'हलायुध' या बलरामाच्या नावाचे अनौचित्य त्याच्या लक्षात आले असते. अशा प्रकारची अनेक स्थळे त्याच्या नाटकांतून दाखविता येतील. शब्दयोजनेकडे त्याने विशेष लक्ष न दिल्यामुळे त्याच्या नाटकांत नादमाधुर्य कमी आढळते. तथापि त्याच्या नाट्यकृतींची विविधता,

विशालता व सहजरम्यता लक्षात घेता कालिदासापूर्वीच्या काळात त्याचे नाव सर्वांमुखी झाले असल्यास त्यात नवल नाही.

अश्वघोषाच्या काव्यांप्रमाणे भासाच्या नाटकांचाही कालिदासाने मार्मिकपणे अभ्यास केलेला दिसतो. त्यामुळे त्यांतील काही रम्य कल्पना कालिदासाच्या प्रतिभेने व नादमधुर शब्दयोजनेने रम्यतर झालेल्या त्याच्या ग्रंथांत दृष्टीस पडतात. अशी कल्पनासादृश्याची एकवीस स्थळे कै. शि. म. परांजपे यांनी 'साहित्यसंग्रहा'तील (भाग १) एका लेखात दिली आहेत. त्यांखेरीज आपणही उदाहरणार्थ दोन-तीन येथे घेऊ—

१. भास—अथवा सर्वमलंकारो भवति सुरूपाणाम्। प्रतिमा १.
कालिदास—किमिव हि मधुराणां मण्डनं नाकृतीनाम्। शाकु० १.
२. भास—वाचानुवृत्तिः खलु अतिथिसत्कारः। प्रतिमा ५.
कालिदास—भवतीनां सूनृतयैव गिरा कृतमातिथ्यम्॥ शाकु० १.
३. भास—अल्पं तुल्यशीलानि द्वन्द्वानि सृज्यन्ते। प्रतिमा १.
कालिदास—समानयंस्तुल्यगुणं वधूवरं
चिरस्य वाच्यं न गतः प्रजापतिः॥ शाकु० ५.

वरील अत्यंत साम्य असलेली स्थळे लक्षपूर्वक पाहिली असता कालिदासाचे शब्दयोजनेतील कौशल्य लक्षात येते. त्याच्या पहिल्या नाटकातील—'मालविकाग्निमित्रा'तील—काही प्रसंग त्याला 'स्वप्नवासवदत्ता'वरून सुचले असावेत. तथापि कालिदास जास्त कल्पक, कलाभिज्ञ व सौंदर्यान्वेषी असल्याने त्याचे ग्रंथ भासाच्या ग्रंथांपेक्षा अधिक निर्दोष व रमणीय झाले आहेत. आपल्या नाटकांत अनावश्यक असा एकही प्रसंग, किंबहुना एकही पद्य किंवा वाक्य न घालण्याची त्याने काळजी घेतली आहे. शिवाय देवांच्या आयुधांनी मनुष्यरूपाने अवतीर्ण होणे यासारखे अद्भुत प्रसंग, रंगभूमीवर प्रत्यक्ष युद्धाचा धांगडधिंगा, एकाच पद्याचे भाग निरनिराळ्या पात्रांनी म्हणून ते पुरे करणे, यांसारख्या कृत्रिम वाटणाऱ्या गोष्टी व अपाणिनीय व्याकरणप्रयोग त्याने मुद्दाम टाळलेले दिसतात. याप्रमाणे भासाच्या ग्रंथांतील काही रम्य कल्पना व प्रसंग घेऊन व त्याचे दोष टाकून कालिदासाने आपली काव्ये व नाटके रचली असल्याने ती रसिकांस तत्काली भासाच्या नाटकांपेक्षा जास्त प्रिय झाली होती, असे दिसते.

'मालविकाग्निमित्रा'च्या प्रस्तावनेत सौमिल्ल व कविपुत्र यांचाही

प्रसिद्ध प्राचीन नाटककार म्हणून कालिदासाने उल्लेख केला आहे, पण त्यांविषयी निश्चित माहिती मिळत नाही. राजशेखराच्या एका श्लोकात रामिल व सोमिल यांनी मिळून 'शूद्रककथा' लिहिली होती, असे म्हटले आहे. पण तो सोमिल व कालिदासाने उल्लेखिलेला सौमिल्ल एकच की काय ते समजत नाही. शिवाय ती 'शूद्रककथा' कोणत्या प्रकारची होती, हे समजण्यास मार्ग नाही. 'मृच्छकटिक' हे नाटक या दोन कवींनी मिळून लिहिले व शूद्रकाच्या नावावर प्रसिद्ध केले, असे काही लोक समजतात. त्या नाटकातील ऐतिहासिक परिस्थिति ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकाच्या उत्तरार्धातील दिसते*. तेव्हा ते नाटकही कालिदास-पूर्वकालीन असावे. तथापि त्याचा परिणाम कालिदासाच्या कृतींवर फारसा झालेला दिसत नाही. राहिलेल्या तिसऱ्या कविमित्र नामक नाटककाराबद्दल तर काहीच माहिती मिळत नाही.

### मालविकाग्निमित्र

विदर्भाधिपति वाकाटकांच्या साहाय्याने माळवा व काठेवाड येथे राज्य करणाऱ्या क्षत्रपांचा उच्छेद केल्यावर द्वितीय चंद्रगुप्ताने उज्जयिनी ही आपली दुसरी राजधानी केली व पुढे लौकरच वाकाटकांशी जमलेला स्नेहसंबंध दृढ करण्याकरिता राजपुत्र द्वितीय रुद्रसेन यास आपली कन्या प्रभावतीगुप्ता दिली. हा विवाह उज्जयिनीतच मोठ्या थाटाने झाला असावा. अशा प्रसंगी एखाद्या नाटकाचा प्रयोग केला जात असे. राजशेखराची 'विद्धशालभञ्जिका', बिल्हणाची 'कर्णसुंदरी' वगैरे संस्कृत नाटके अशाच प्रसंगी प्रथम रंगभूमीवर आलेली दिसतात. तेव्हा प्रभावतीगुप्तेच्या विवाहप्रसंगी एखाद्या चांगल्या नाटकाची निवड करावी, असे चंद्रगुप्ताने विद्वत्परिषदेस सांगितले असावे. त्या वेळी भासाची अनेक नाटके विद्वानांसमोर होती. विशेषतः त्याचे 'स्वप्नवासवदत्त' त्यातील संविधानकाची प्रमाणबद्धता, पात्रांच्या स्वभावांचे मार्मिक पृथक्करण इत्यादि गुणांनी गाजलेले होते. शिवाय त्याचा प्रेमळ व स्त्रीदाक्षिण्ययुक्त नायक उदयन आणि पतीवर निस्सीम प्रेम करणारी, त्याचे राज्य वृद्धिंगत व्हावे म्हणून राजनीतिज्ञ मंत्र्याच्या आग्रहावरून स्वतःच्या मृत्यूची खोटी

* याविषयी विवेचन आमच्या 'संशोधनमुक्तावलि : सर दुसरा' (पृ. १-२३) या ग्रंथात सापडेल.

बातमी पसरवू देऊन अज्ञातवासात स्वेच्छेने राहणारी व प्रत्यक्ष आपल्या सवतीबद्दल मत्सर न बाळगता तिला स्वकौशल्याने अलंकृत करणारी नायिका वासवदत्ता यांच्याविषयी उज्जयिनीच्या लोकांस कौतुक व अभिमान वाटत असे. त्यांच्या कथा तेथील लोकांच्या तोंडी होत्या. पूर्वी उदयनाने जेथून वासवदत्तेस पळवून नेले ती जागा ते मोठ्या प्रेमाने दाखवीत असत, असे कालिदासाच्याच ' मेघदूता 'वरून दिसते. तेव्हा प्राचीन भासाचे ' स्वप्नवासवदत्त ' की उदयोन्मुख तरुण कवि कालिदासाने लिहिलेले ' मालविकाग्निमित्र ' पसंत करावे, हा प्रश्न विद्वत्सभेपुढे होता. कालिदासाच्या ' मालविकाग्निमित्रा 'चे संविधानकही त्या प्रसंगी लोकांस प्रिय होण्यासारखेच होते. चंद्रगुप्ताने जसा परकीय क्षत्रपांचा पराभव करून उत्तर हिंदुस्थानात हिंदूंचे एकछत्री साम्राज्य स्थापिले व हिंदुधर्माचे पुनरुज्जीवन केले, त्याप्रमाणेच पुष्यमित्र शुंगाने बौद्धधर्माचा पाडाव करून हिंदुधर्माला त्याच्या कचाट्यातून सोडविले होते व त्याच्या अल्पवयस्क नातवाने—वसुमित्राने—अश्वमेधप्रसंगी अश्वाचे संरक्षण करून बलाढ्य ग्रीकांच्या सैन्याचा पुरा मोड केला होता. शिवाय कालिदासकाली जसा माळवा व विदर्भ येथील राजघराण्यांचा विवाहाने संबंध जडला होता, तसाच शुंगांच्या काळी अग्निमित्राने विदर्भ राजकन्या मालविका हिच्याशी विवाह करून घडवून आणला होता. संविधानकवैचित्र्य व पात्रस्वभाव-रेखन, यांत कालिदासाचे नवे नाटक ' स्वप्नवासवदत्ता 'स हार जाणारे नव्हते व काव्यगुण, सृष्टिवर्णन इत्यादि गुणांत तर ते वरचढ होते. तेव्हा इतर नाटकांपेक्षा तेच विद्वानांस पसंत पडले असावे. तथापि, काही लोकांस ही निवड पसंत पडली नसावी ; म्हणून कालिदासाने आपल्या नाटकाच्या प्रस्तावनेत, ' माझ्या नाटकाची प्राचीन नाटककारांच्या कृतींशी तुलना करून श्रेष्ठ ठरेल त्याचा स्वीकार करा. केवळ जुने ते सोने म्हणून त्याची अवहेलना करू नका ', असे प्रेक्षकांस सांगितले आहे.

' मालविकाग्निमित्र ' कालिदासाचे की दुसऱ्या कोणा उत्तरकालीन कवीचे याविषयी पूर्वी काही लोकांना संशय होता, पण अनेक प्रमाणांवरून आता त्याचे निरसन झाले आहे. इतर नाटकांप्रमाणे यातील मंगल श्लोक शिवस्तुतिपर आहे ; यातील प्रस्तावना इतर नाटकांप्रमाणे लहानशी असून तीत कवीचे नाव स्पष्टपणे दिले आहे ; कालिदासाचे मार्मिक

निरीक्षण व सृष्टिवर्णनाची आवड ही यात उत्कटपणे दिसून येतात ; कित्येक स्थळी त्याच्या इतर ग्रंथांतील कल्पना निराळ्या शब्दांनी व्यक्त केलेल्या यात दिसून येतात. या सर्व प्रमाणांवरून त्याच्या या नाटकाच्या कर्तृत्वाविषयी संशय राहत नाही.

'मालविकाग्निमित्रा'चे पाच अंक असून त्यातील संविधानक बरेंच गुंतागुंतीचे आहे. पहिल्या अंकात प्रस्तावनेनंतर एक 'विष्कंभक' नामक छोटा प्रवेश घातला आहे. त्यात कौमुदिका व बकुलावलिका या दासींच्या व गणदास नामक नाट्याचार्याच्या संभाषणात धारिणी राणीने स्वतः-करिता करविलेल्या सर्पमुद्रांकित अंगठीचा उल्लेख करून कवीने प्रेक्षकांस नायिकेविषयी थोडी प्रास्ताविक माहिती सांगितली आहे. धारिणी राणीचा खालच्या जातीचा वीरसेन नामक भाऊ नर्मदातीरी सरहद्दीवरच्या किल्ल्यावर नेमला होता. त्याने मालविका ही शिल्पकलेत निपुण होऊन धारिणी राणीची चांगली सेवा करील, असे वाटून तिला दासी म्हणून पाठविले होते. राणीने तिला संगीत शिकविण्याकरिता गणदासाची योजना केली होती. तिच्या हुशारीवरून त्याला ती कोणा थोर कुलातील असावी, असा संशय आला होता. एके दिवशी राणी एका चित्रकाराने परिजनासमवेत काढलेले आपले चित्र पाहत असता तिचा पति राजा अग्निमित्र तेथे आला व त्याने मालविकेच्या रूपाने आकृष्ट होऊन, ती कोण, कोठली, म्हणून चौकशी सुरू केली. त्यावरून धारिणीला संशय येऊन मालविका राजाच्या दृष्टीस पडू नये म्हणून ती अतिशय जपू लागली. इतकी माहिती अगदी थोडक्या शब्दांत सांगून कवीने वाचकांचे कुतूहल जागृत केले आहे. यानंतर मुख्य प्रवेशास सुरवात होते. प्रथम राजा व अमात्य हे प्रवेश करितात. त्यांच्या संभाषणावरून प्रेक्षकांस कळते की, मगधात नुकतीच राज्यक्रांति झाली असून मौर्य राजास पदच्युत करून व त्याच्या सचिवास कारागृहात टाकून अग्निमित्राच्या बापाने–पुष्यमित्राने–गादी बळकाविली आहे. याच वेळेस विदर्भाच्या गादीविषयीही दोघा चुलत भावांत कलह उद्भवला होता. त्यांपैकी एक–माधवसेन–आपली बहीण अग्निमित्रास देऊ करून त्याची मदत मागण्याकरिता विदिशेस जात असता त्याच्या चुलत भावाने इकडे गादी बळकावून त्याला आपल्या सीमे-वरच्या अधिकाऱ्यांकडून कैद करविले. अग्निमित्राने त्याच्या व त्याच्या

बहिणीच्या सुटकेविषयी त्याला लिहिले, तेव्हा त्याने 'माझा मेहुणा व मौर्य-राजाचा सचिव यास आपण कैद केले आहे; त्यास आपण सोडून दिले तर मीही माधवसेनाची सुटका करीन. माधवसेनाला पकडण्याच्या गडबडीत त्याची बहीण कोठे नाहीशी झाली आहे, तिच्याही शोधार्थ यत्न करीन', असे उत्तर पाठविले आहे. अग्निमित्राला विदर्भाचे राज्य पादाक्रान्त करावयाचे होते, त्याला हे आयतेच निमित्त सापडते. तेव्हा तो विदर्भावर चाल करून जाण्यास आपल्या सेनापतीस आज्ञा करतो. हे राजकारण संपल्यावर अमात्य जातो व नंतर विदूषक प्रवेश करतो. त्याच्या व राजाच्या संभाषणावरून त्याने राजाला मालविका प्राप्त करून देण्याकरिता काही युक्ति योजली आहे, असे प्रेक्षकांस समजते. इतक्यात गणदास व हरदत्त या दोन नाट्याचार्यांत विदूषकाच्या चिथावणीवरून भांडण उद्‌भवून ते दोघेही त्याचा निर्णय करून घेण्याकरिता राजाकडे येतात. धारिणीचा गणदासाला आश्रय असल्यामुळे आपण काही निकाल दिला तर राणी रागावेल, या सबबीवर राजा राणीसमक्ष पण्डितकौशिकी नामक परिव्राजिकेने निकाल द्यावा, असे सुचवितो. ते दोघांस मान्य झाल्यावर कंचुकी त्यांस बोलावून आणतो. राणीस हा त्यांचा कलह आवडत नाही व 'जो स्वतः अत्यंत निपुण असून दुसऱ्यास शिकविण्यातही तरबेज असतो तोच श्रेष्ठ शिक्षक; तेव्हा तुम्ही आपापल्या शिष्यांकरवी परीक्षा द्या व अंगसौष्ठव स्पष्टपणे दिसण्याकरिता पात्रे नेपथ्यविरहित असू द्या' असे परिव्राजिका म्हणते, तेव्हा तर तिचा संशय दृढतर होतो. कारण, या निमित्ताने मालविकेला डोळे भरून पाहता यावे, असे राजाचे कारस्थान या कलहाच्या मुळाशी असावे, असे तिला वाटते व ती 'राजकार्यांत आपण याप्रमाणेच निपुणता दाखवाल तर किती चांगले होईल?' असा राजास टोमणा मारते. तथापि गणदासाच्या आग्रहावरून ती या नाट्यपरीक्षेला कबूल होते. पडद्यामागील मृदंगध्वनि ऐकू येऊ लागल्यावर तिची तयारी झाली असे समजून सर्वजण तिकडे जातात (अंक १). याप्रमाणे पहिल्या अंकात कथानकाला आरंभ होतो, त्या वेळची राजकीय परिस्थिति थोडक्यात सांगून कवीने नायिकेबद्दल प्रेक्षकांच्या मनात कुतूहल उत्पन्न केले आहे. मुख्य प्रवेशात गणदास व हरदत्त यांचा कलह, मालविका राजाच्या दृष्टीस पडू नये म्हणून राणीची धडपड, तिला पाहण्याविषयी

राजाची आतुरता, धूर्त परिव्राजिकेचा नि:पक्षपातीपणाचा आव व विदूषकाची गणदासास चिथावणी, त्याचा उपहास व विनोद ही उत्तम साधली आहेत. यांत थोडक्यात कथानक रंगविण्याची कालिदासाची कला उत्तम प्रकारे दिसून येते. सर्वच पात्रांची भाषणे चटकदार झाली आहेत. त्यांत पाल्हाळ अगर अनावश्यक भाग कोठेही नाही. दुसऱ्या अंकाचे स्थळ राजवाड्यातील संगीतशाला हे आहे. राजा, विदूषक, धारिणी व परिव्राजिका यांच्यासमोर 'छलिक' नावाच्या नाट्याचा प्रयोग व्हावयाचा आहे. हरदत्तापेक्षा गणदास वयोवृद्ध असल्याने त्याला आपल्या शिष्येकरवी शिक्षणनैपुण्य प्रथम दाखविण्याची परिव्राजिका आज्ञा करते, तेव्हा मालविका प्रवेश करते. विदूषकाला व राजाला ती चित्रातल्यापेक्षाही सुंदर दिसते. राजा तिच्या सौंदर्याचे खालीलप्रमाणे वर्णन करतो—

दीर्घाक्षं शरदिन्दुकान्ति वदनं बाहू नतावंसयोः
संक्षिप्तं निबिडोन्नतस्तनमुरः पार्श्वे प्रमृष्टे इव ।
मध्यः पाणिमितो नितम्बि जघनं पादावरालाङ्गुली
छन्दो नर्तयितुर्यथैव मनसः श्लिष्टं तथास्या वपुः ॥ माल० २, ३.

'हिचे नयन विशाल आहेत ; मुखाची कांति शरदृतूतील चंद्राच्या सारखी आहे ; भुज स्कंधभागी (किंचित्) लवलेले दिसतात; अशिथिल व उन्नत अशा स्तनांनी वक्षःस्थल व्यापिले आहे ; पार्श्वभाग रेखीव दिसतो ; कमर तर फक्त वीतभर रुंद आहे ; नितंबभाग स्थूल व पायांची बोटे किंचित वक्र आहेत. (सारांश) नृत्याचार्याला पसंत पडेल असेच हिचे शरीर बनले आहे'. नंतर मालविका साभिनय पद गाऊन दाखविते. ते झाल्यावर मालविका परत जावयाची, पण राजाला तिला स्वस्थपणे डोळे भरून पाहता यावे म्हणून विदूषक म्हणतो, 'थांब जरा. यात थोडा क्रमभंग झाला आहे, तो मला विचारावयाचा आहे'. धारिणीला मालविका तेथे असणे आवडत नाही, पण गणदासाच्या आग्रहावरून ती गप्प बसते. 'यात तुम्हाला कोणता दोष दिसला ?' असे गणदासाने विचारताच विदूषक म्हणतो, 'परीक्षा घेणाऱ्यांना विचारा. नंतर मी सांगेन !' परिव्राजिका व राजाही तिच्या अभिनयादिकांची स्तुति करतात. तेव्हा विदूषक म्हणतो, 'अहो, प्रथम प्रयोग दाखविण्यापूर्वी ब्राह्मणाची पूजा करावी

लागते, ती तुम्ही विसरला'. विदूषक नाट्यातील काही दोष काढील असे सर्वांस वाटले होते. त्याचे हे अनपेक्षित उत्तर ऐकून सर्वच हसू लागतात व मालविकाही मंदस्मित करते. ते पाहून राजाला तर आपल्या नेत्रांचे पारणे फिटले असे वाटते. तो म्हणतो—

स्मयमानमायताक्ष्याः किञ्चिदभिव्यक्तदशनशोभि मुखम्।
असमग्रलक्ष्यकेसरमुच्छ्वसदिव पंकजं दृष्टम् ॥ माल० २,१०.

यात कालिदासाने स्मितामुळे जिचे दंत किंचित् दिसत आहेत अशा मालविकेच्या मुखाला उमलू लागलेल्या कमळाची सुंदर उपमा दिली आहे. विदूषकाच्या वरील टीकेवर गणदास म्हणतो, 'रंगभूमीवर नेपथ्यसहित संगीताचा प्रयोग असता तर आपणांसारख्या महाब्राह्मणाला आम्ही कसे विसरलो असतो ?' नंतर मालविका परत जाते. आता हरदत्ताची शिष्या व राजाची तरुण स्त्री इरावती हिचे नाट्य पाहावयाचे; पण राजाला त्याबद्दल मुळीच उत्सुकता नसते. इतक्यात वैतालिक पडद्यात माध्याह्नकाळाचे सुंदर वर्णन करतो. ते ऐकून विदूषक म्हणतो, 'अहो, आता तर भोजनाची वेळ झाली. ती टळली तर दोष उत्पन्न होतो, असे वैद्य म्हणतात'. तेव्हा हरदत्ताचा प्रयोग पाहण्याचे दुसऱ्या दिवसावर टाकून सर्वजण माध्याह्न कृत्याकरिता जातात (अंक २). या अंकातही मालविकेचे नाट्य, ती रंगभूमीवर जास्त वेळ राहावी म्हणून विदूषकाने योजिलेली युक्ति, ते पाहून झालेला राणीचा जळफळाट वगैरे गोष्टी उत्तम साधल्या आहेत. इरावतीच्या नाट्याचे प्रदर्शन कथानकाला आवश्यक नसल्याने कवीने मुद्दाम मोठ्या खुबीने टाळले आहे. यावरून याबाबतीतील त्याचा संयम उत्कृष्टपणे दिसून येतो. मालविकेचे सौंदर्य, नाट्य व उभे राहण्याची ऐट यांचे वर्णन करताना कालिदासाची सूक्ष्म निरीक्षणशक्ति व वैतालिकाच्या पद्यात त्याची सृष्टिवर्णनाची आवड स्पष्टपणे दिसून येते. विदूषकाचा विनोद केवळ हास्योत्पादक नसून कथानकाला पोषक आहे, तिसऱ्या अंकाच्या आरंभी एक लहान प्रवेश घातला आहे, त्यातील संभाषणे दुसऱ्या अंकातील प्रयोगदर्शनानंतर दोनचार दिवसांनी झालेली दिसतात. पण्डितकौशिकेची परिचारिका काही निमित्ताने प्रमदवन नामक उद्यानात जाते. तेथे तिला उद्यानपालिका भेटते. त्यांच्या संभाषणावरून आपल्याला तीन गोष्टी कळतात : (१) इरावतीचा नाट्यप्रयोग

पाहिल्यावर परिव्राजिकेने निकाल दिला की दोन्ही आचार्य आपल्या कलेत सारखेच निपुण आहेत, पण गणदासाला चांगली शिष्या लाभल्यामुळे त्याची सरशी झाली ; (२) राजाने मालविकेला पाहिली त्या दिवसापासून त्याचे मन तिच्यावर फार बसले आहे. मालविकेचीही तशीच स्थिति झाल्यामुळे ती वापरलेल्या मालतीमालेप्रमाणे म्लान झाली आहे ; (३) उद्यानात वसंत ऋतु सुरू झाला तरी सुवर्णाशोक वृक्षाला फुले येईनात, हे धारिणीला कळविण्याकरिता उद्यानपालिका राजवाड्याकडे जाण्यास निघते. यानंतरच्या मुख्य प्रवेशात राजा व विदूषक यांच्या संभाषणावरून समजते की, इरावती राणीने आपली सखी निपुणिका पाठवून राजास विनंती केली होती की, वसंत ऋतु सुरू झाला आहे, तरी आपणांबरोबर झोपाळ्यावर बसून झोके घ्यावे, अशी माझी इच्छा आहे. राजानेही तिला प्रथम हो म्हटले होते. मागाहून आपले मन मालविकेवर बसले आहे, असे राणीच्या ध्यानात येईल असे वाटून तो तिकडे जाण्याचे टाळीत होता, पण विदूषकाच्या आग्रहावरून ते दोघेही प्रमदवनाकडे जातात. उद्यानात गेल्यावर राजा वसन्त ऋतूची शोभा वर्णन करतो. हे वर्णन फार बहारीचे उतरले आहे. इतक्यात मालविकाही तेथे येते. तिच्या स्वगत भाषणावरून समजते की, विदूषकाने काही खोडी केल्यामुळे धारिणी झोपाळ्यावरून खाली पडली व तिचा पाय दुखावला. त्यामुळे सुवर्णाशोकाला फुले येण्याला जरूर तो लत्ताप्रहार देण्यासाठी तिने मालविकेला पाठविले आहे व पाच रात्रींच्या आत त्याला फुले आली तर मी तुझी इच्छा पूर्ण करीन असे वचनही दिले आहे. नंतर ती एका शिलेवर बसते. तिला दुरून पाहताच राजा व विदूषक दोघेही तिच्या नकळत तिजजवळ येऊन उभे राहतात. तितक्यात मालविकेच्या पायांना अलक्तक लावण्याकरिता व नूपुर घालण्याकरिता तिची सखी बकुलावलिका तेथे येते. राजा उद्यानात गेला असे समजल्यामुळे इरावती व तिची दासी निपुणिका ह्याही तेथे येतात व संभाषणे ऐकत उभ्या राहतात. विदूषकाने प्रथमच 'राजावर प्रेम करण्यात मालविकेला प्रोत्साहन दे', असे बकुलावलिकेला सांगून ठेवले होते. त्याप्रमाणे मालविकेच्या पायाला अलक्तक लावताना व नूपुर घालताना ती मोठ्या चातुर्याने ते काम करते. मालविकेला धारिणीची फार भीति वाटते. तेव्हा ती म्हणते, 'अग,

भ्रमराचा त्रास सोसावा लागेल म्हणून का कोणी वसन्त ऋतूचे सर्वस्व असा आंब्याचा मोहोर कर्णावर अलंकार म्हणून ठेवत नाही !'. तिचे पाय अलंकृत झाल्यावर त्यांच्यात पुढील संभाषण होते—

बकुलावलिका—एष उपारूढराग उपभोगक्षमः पुरतस्ते वर्तते।

मालविका (सहर्षम्)—किं भर्ता।

बकुलावलिका (सस्मितम्)—न तावद्भर्ता। एषोऽशोकशाखावलम्बी पल्लवगुच्छः। अवतंसयैनम्।

यात राजा व अशोकपल्लव यांस सारखेच लागू पडणारे 'राग' व 'उपभोग' हे श्लेषयुक्त शब्द योजून बकुलावलिकेने मोठ्या चातुर्याने मालविकेच्या तोंडून तिचे प्रेम व्यक्त करविले आहे. राजा ते आडून ऐकतच असतो. त्यामुळे त्याला अत्यंत आनंद होतो, हे सांगावयास नकोच. नंतर राजाला प्रगट होण्याला काही निमित्त पाहिजे होते, म्हणून विदूषक प्रथम पुढे होऊन म्हणतो, 'अग, आमच्या महाराजांचा प्रियवयस्य अशा या अशोकाला लाथ मारणे बरे का ?' त्यावर 'राणीच्या आज्ञेने हिने असे केले, हिला क्षमा करावी' असे बोलून बकुलावलिका मालविकेकडून राजाला नमस्कार करविते. नंतर 'आनंदरूपी पुष्प पुष्कळ दिवस मला लाभले नाही, तेव्हा तुझ्या स्पर्शामृताने माझी ही इच्छा पूर्ण कर' असे राजाने म्हणताच इरावती पुढे होऊन रंगाचा बेरंग करते. 'तू येईपर्यंत हिच्याशी बोलून मी मनोरंजन करीत होतो' असे बोलून राजा आपल्या वर्तनावर सारवासारव करण्याचा प्रयत्न करतो. पण इरावतीचे त्याने थोडेच समाधान होणार ? तितक्यात कमरेतून गळून पडणारा कमरपट्टा घेऊन ती राजाला मारायला धावते व राजा तिच्या पायां पडतो तरी त्याकडे लक्ष न देता आपल्या दासीसह निघून जाते (अंक ३). चौथ्या अंकाच्या आरंभी राजा व विदूषक यांच्या भाषणावरून आपणांस कळते की, इरावतीने तक्रार केल्यावरून धारिणीने मालविका व बकुलावलिका यांना तळघरात कोंडून ठेवले आहे व 'माझी मुद्रेची अंगठी पाहिल्याशिवाय त्यांना सोडू नको' म्हणून पहारेकरणीला ताकीद दिली आहे.

नंतर राजाच्या विनंतीवरून तिला सोडविण्याची युक्ति योजून विदूषक राजाला धारिणीदेवीच्या समाचाराकरिता पाठवितो व आपणही

रिक्त हस्ताने तिला भेटू नये म्हणून उद्यानातून फुले आणण्याच्या मिषाने मागे राहतो. प्रतिहारीलाही तो आपल्या कटात सामील करून घेतो. नंतर धारिणी व परिव्राजिका हवाशीर जागी बोलत बसल्या होत्या, तेथे राजा जातो. त्यांचे थोडे संभाषण होते तोच विदूषक यज्ञोपवीताने आंगठ्याला घट्ट बांधून घाबऱ्या घाबऱ्या प्रवेश करतो व म्हणतो, 'राणीसाहेबांच्या दर्शनाकरिता फुले घेऊन यावे म्हणून मी प्रमदवनात गेलो होतो. तेथे अशोकाची फुले खुडण्यासाठी मी उजवा हात पुढे केला तोच त्याच्या ढोलीतून निघून एका सापाने हा पहा येथे दंश केला.' ते ऐकून राणीला फार वाईट वाटते. नंतर त्याला ध्रुवसिद्धि नामक राजवैद्याकडे पाठवितात. त्याच्याकडून निरोप येतो की, सर्पाची मुद्रा जिच्यावर आहे अशी एखादी वस्तु घेऊन पाणी मंतरावयाचे आहे. तशी काही वस्तु असल्यास पाठवा. राणी आपल्याजवळची सर्पमुद्रांकित अंगठी त्या कार्याकरिता देते व काम झाल्याबरोबर परत करण्याबद्दल बजावते. नंतर 'राजाला ग्रहाची बाधा आहे, तेव्हा सर्व बंदिवानांची मुक्तता करावी असे ज्योतिष्यांनी सांगितल्यावरून इरावतीला वाईट वाटू नये म्हणून धारिणी राजाकडून मालविका व बकुलावलिका यांची मुक्तता करीत आहे. ही तिची अंगठी पहा!' असे म्हणून व ती सर्पमुद्रांकित अंगठी दाखवून विदूषक त्यांची मुक्तता करतो व त्यांना प्रमदवनात पाठवितो. राजाही जरूरीचे काम पाहण्याच्या निमित्ताने राणीजवळून निसटून गूढ मार्गाने तेथे जातो. तेथे विदूषकही त्याला भेटतो. राजाची व मालविकेची गाठ घालून दिल्यावर विदूषक व बकुलावलिका तेथून जातात. विदूषक बाहेर एका शिलातलावर बसतो. तेथे त्याला झोप लागते. ते इरावतीची दासी पाहते व आपल्या स्वामिनीला कळविते. तेव्हा त्याची प्रकृति आता कशी आहे हे पाहण्यासाठी इरावती दासीसह तेथे येते, तो विदूषक 'मालविके, तू इरावतीलाही मागे टाक', असे स्वप्नात बरळतो. ते ऐकून इरावतीला राग येतो. तेव्हा त्याला भिवविण्यासाठी तिची दासी सापासारखी वाकडी असलेली काठी विदूषकाच्या अंगावर टाकते. तो घाबरून ओरडतो. ते ऐकून राजा, मालविका व बकुलावलिका तेथे येतात, ते पाहून इरावतीचा क्रोध अनिवार होतो. ती ते सर्व धारिणीला

कळविण्यासाठी दासीला पाठविते. आता या प्रसंगातून आपली कशी सुटका करून घ्यावी असा पेच राजाला पडला असता धारिणीची लहान मुलगी वसुमती पिंगट रंगाच्या वानराने घाबरविली असल्याचे समजते, तेव्हा स्वतः इरावतीच तिला उगी करण्याकरिता राजाला तिकडे पाठविते. ते पाहून विदूषक आपल्याशी म्हणतो, 'शाबास ! पिंगलवानरा ! शाबास ! तू वेळेवर आपल्या सोबत्याच्या रक्षणार्थ आलास ! ' इतक्यात पडद्यात 'अहो काय हे आश्चर्य ! पाच रात्री व्हावयाच्या अगोदरच सुवर्णाशोकाला कळ्या आल्या ! हे मला राणीला कळविले पाहिजे ! ' असे उद्यानपालिकेचे शब्द ऐकू येतात. तेव्हा, 'तुझे मनोरथ पूर्ण करून राणी आपले वचन पाळील', असे बोलून बकुलावलिका मालविकेला धीर देते व त्याही उद्यानपालिकेबरोबर राणीकडे जातात.

तिसऱ्या व चौथ्या अंकांत अनेक प्रसंग घातल्यामुळे त्यात कथानकाची गति शीघ्र झालेली दिसते. त्यात इरावतीने अगदी आयत्या वेळी येऊन राजाला व मालविकेला एकांतात पकडणे या प्रसंगाची पुनरुक्ति झाली आहे ; तथापि, एकंदरीत त्यात वैचित्र्य पुष्कळ आहे. विदूषकाची मालविकेला सोडविण्याची युक्ति अत्यंत नामी आहे. सर्पमुद्रांकित अंगठीचा पुढे असा उपयोग करावा लागेल हे जाणून कालिदासाने पहिल्याच अंकात तिचा उल्लेख केला आहे. त्यावरून त्याचे रचनाकौशल्य प्रत्ययास येते. विदूषक शिलातलावर बसल्याबरोबर त्याला झोप लागून तो स्वप्नात बरळूही लागतो हे थोडे अस्वाभाविक वाटते. पण 'स्वप्नवासवदत्त' नाटकातही या प्रकारचाच एक प्रसंग भासाने घातला आहे, त्यावरून केवळ कालिदासच याबाबतीत दोषी ठरत नाही. विदूषकाच्या भाषणांत नेहमीप्रमाणे विनोद आला आहे. आपल्यासमोर मालविकेची स्तुति केलेली ऐकताच इरावतीचे तोंड पाहण्यासारखे होत असेल ! (अंक ४).

पाचव्या अंकाच्या पहिल्या छोट्या प्रवेशातील उद्यानपालिका व धारिणीचा सेवक सारसक यांच्या संभाषणावरून असे कळते की धारिणीचा मुलगा वसुमित्र याची अश्वमेधतुरगाचे रक्षण करण्याच्या कामी योजना झाल्यामुळे त्याला दीर्घायुष्य प्राप्त व्हावे म्हणून राणी ब्राह्मणांस सुवर्णदक्षिणा देत असते. राणीच्या भावाने—वीरसेनाने—विदर्भनृपतीवर

विजय मिळविला असून माधवसेनाची मुक्तता केली आहे. त्याने मौल्यवान् रत्ने व शिल्पकारिका दासी नजराणा म्हणून पाठविल्या आहेत. नंतरच्या मुख्य प्रवेशात नुकत्याच फुललेल्या सुवर्णाशोकाला पाहण्यासाठी सालंकृत मालविका व परिव्राजिका यांसह धारिणी प्रमद-वनाकडे जाते व राजालाही तेथे बोलावते. ते सर्व तेथे जमल्यावर कंचुकी माधवसेनाकडून आलेल्या दोघा संगीतनिपुण दासींना घेऊन येतो. त्या तेथे आल्यावरोबर मालविकेला आपल्या धन्याची बहीण म्हणून ओळखतात. माधवसेनाला पकडल्यावर त्याच्या सुमति नामक सचि-वाने हिला गुप्तपणे तेथून नेले होते असे त्या सांगतात. नंतरची हकीकत परिव्राजिका पुढीलप्रमाणे सांगते, 'आर्य सुमति हा माझा वडील भाऊ. हिला घेऊन तो एका व्यापाऱ्याच्या तांड्यास जाऊन मिळाला. अरण्यातून जात असता त्यांच्यावर चोरांनी हल्ला केला, त्यावेळी त्यांच्याशी शौर्याने लढून माझ्या भावाने देह ठेविला. ते पाहून मला मूर्च्छा आली. पुढे मी भानावर येऊन पाहिले तो ही कोठे दिसेना. तेव्हा भावाच्या शरीराला अग्निसंस्कार देऊन मी आपल्या देशात आले व काषाय वस्त्रे धारण केली. या मालविकेला वीरसेनाने सोडविले व नंतर दासी म्हणून धारिणीदेवीकडे पाठविले. हिचे वडील असताना एका भविष्य जाणणाऱ्या साधूने सांगितले होते की हिला वर्षभर दासी होऊन राहावे लागेल. ते घडून येत आहे असे पाहून मी याविषयी कोणाजवळ बोलले नाही'. मालविका ही यःकश्चित् दासी नसून राजकन्या आहे, तिला आपण उगीच वाईट रीतीने वागविले याबद्दल राणीला पश्चात्ताप होतो व तिचे राजाशी लग्न लावण्याचा ती निश्चय करते. अमात्यपरिषदेच्या संमतीने राजा विदर्भाचे राज्य यज्ञसेन व माधवसेन यांमध्ये वाटून देतो व वर्धा नदी ही त्यांच्या राज्याची मर्यादा ठरवितो. इतक्यात पाटली-पुत्राहून सेनापति पुष्यमित्राचे खालील मजकुराचे पत्र येते. 'यज्ञाचा घोडा सिंधु नदीच्या दक्षिण तीरावर यवनांनी पकडला होता; पण कुमार वसुमित्राने त्यांचा पाडाव करून तो सोडविला. करिता राग टाकून सर्व राण्यांसह तुम्ही यज्ञसमारंभार्थ इकडे निघून यावे.' आपल्या पुत्राचा पराक्रम ऐकून धारिणीला अत्यंत आनंद होतो व ती इरावतीच्या संमतीने राजाला मालविका अर्पण करते. राजा तिचा स्वीकार

करण्यास लाजतो, तेव्हा राणी किंचित् हसून विचारते, 'मग काय माझी अवज्ञा करावयाची ?' त्यावर विदूषक म्हणतो, 'राणीसाहेब, हा लोकाचार आहे ! विवाहाच्या वेळी प्रत्येक नवरा लाजत असतो.' नंतर परिव्राजिका माधवसेनाकडे जाण्यास परवानगी मागते, पण राजा व राणी तिला आपल्याजवळच राहण्याविषयी आग्रह करतात. शेवटी भरतवाक्याने अंक समाप्त होतो (अंक ५).

या अंकात एकामागून एक इतक्या गोष्टी घडून येतात की त्यांमुळे मालविकेचा राजाशी विवाह लावण्याशिवाय गत्यंतर नाही असे धारिणीला होऊन जाते. ठराविक मुदतीत आपल्या प्रिय सुवर्णाशोकाला कळ्या आल्यामुळे राणीला आपले वचन पाळणे भाग होते. तशात, मालविका कोणी हीन कुळातील नसून राजकन्या आहे व तिला आपण बटकीसारखी वागवून व तळघरात कोंडून भयंकर अन्याय केला आहे, हे धारिणीच्या मनाला लागून राहते. तितक्यात तिच्या अल्पवयस्क मुलाने मोठमोठ्या योद्ध्यांनाही ज्याचा अभिमान वाटावा असा पराक्रम गाजविला अशी वार्ता कळल्यामुळे त्या आनंदात ती स्त्रीस्वभावसुलभ मत्सर विसरून राजाला मालविका देण्यास तयार होते यात आश्चर्य नाही.

'मालविकाग्निमित्रा'चे संविधानक गुंतागुंतीचे असले तरी त्यात वैचित्र्यपूर्ण प्रसंगांची वाण नाही. विदूषकाने मालविका राजाच्या दृष्टीस पाडण्याकरिता व पुढे ती कैदेत पडल्यावर तिची सुटका करण्या-करिता योजिलेल्या युक्त्याही नामी आहेत. या नाटकात त्याचा विनोद केवळ खाद्यपेयांवर अधिष्ठित नसून कथानकाशी सुसंबद्ध व मनोहर असा झाला आहे. कालिदासाने या नाटकाचे संविधानक कोठून घेतले ते समजत नाही. तथापि, त्यातील पुष्यमित्राचा अश्वमेध, वसुमित्राने यवनांवर मिळविलेला विजय, विदर्भाधिपतीचा पराभव, त्याच्या राज्याची वाटणी व त्याच्या घराण्यातील राजकन्येशी अग्निमित्राचा विवाह, इतक्या गोष्टी ऐतिहासिक दिसतात. पुष्यमित्राची सेनापति ही पदवी व त्याने केलेला अश्वमेध यांच्या ऐतिहासिकत्वाबद्दल तर संशय घेण्यास जागाच नाही, कारण त्यांचा उल्लेख अयोध्येच्या शुंगकालीन शिलालेखात स्पष्टपणे आलेला मागे (पृ. ९१) दाखविला आहे. कालिदासकाळी अग्निमित्राची विलासप्रियता ही परंपरागत गोष्टींवरून लोकांस माहीत

असावी. या नाटकाचे संविधानक रचण्यात त्याला कदाचित् गुणाढ्याच्या 'बृहत्कथे'चा उपयोग झाला असेल. ही 'बृहत्कथा' मूळ पैशाची भाषेत होती. ती सध्या उपलब्ध नाही. पण तिची सारांश रूपाने दोन रूपांतरे—सोमदेवाचा 'कथासरित्सागर' व क्षेमेंद्राची 'बृहत्कथामंजरी' ही सध्या उपलब्ध आहेत. त्यांत पुढील गोष्ट आली आहे.

'उज्जयिनी येथील राजा महासेन याच्या वासवदत्ता नामक मुलीचा विवाह वत्सदेशाचा राजा उदयन याच्याशी झाला होता. वासवदत्तेच्या पालक नावाच्या भावाने आपण स्वतः जिंकून आणलेली एक बंधुमती नावाची राजकन्या आपल्या बहिणीस भेट म्हणून पाठविली. ती रूपवती असल्याने वासवदत्तेने तिचे नाव मञ्जुलिका असे ठेवून तिला गुप्त ठेवले. पुढे एके दिवशी उद्यानलतागृहात वसंतक नावाचा आपला प्रियमित्र विदूषक यास घेऊन फिरत असता उदयनाने तिला पाहिली व तिच्याशी गुप्तपणे गांधर्व विवाह केला. हे तेथेच लपून असलेल्या वासवदत्तेने पाहिले. त्यामुळे तिला क्रोध येऊन ती वसंतकाला बांधून घेऊन गेली. तेव्हा राजा तिच्या माहेरच्या सांकृत्यायनी नामक परिव्राजिका मैत्रिणीला शरण गेला व तिच्या साहाय्याने त्याने वसंतकास सोडवून आणले. राणीच्या अनुमतीने परिव्राजिकेने बन्धमती राजास अर्पण केली'. (कथासरित्सागर, पृ० ५६).

'मालविकाग्निमित्रा'च्या संविधानकात व वरील कथानकात असणारे साम्य वाचकांच्या लक्षात येईल. दोहोंतही नायिका प्रथम गुप्तरूपाने असणे, विदूषकाच्या साहाय्याने उद्यानलतागृहात भेटणे, नंतर बंदीवास व शेवटी परिव्राजिकेच्या साहाय्याने नायिकेशी राजाचा विवाह, या गोष्टी समान आहेत. दोन्ही कथानकांत फरकही अर्थात् पुष्कळच आहे. तथापि कथानक कोठून तरी घेऊन त्यात जरूर ते फरक करण्याची कालिदासाची सवय लक्षात घेता 'मालविकाग्निमित्रा'चे संविधानक 'बृहत्कथे'तून घेतले असणे असंभवनीय नाही. पाच रात्रीत अशोकाला फुले आली पाहिजेत या अटीची कल्पना भासाच्या 'पंचरात्र' नाटकावरून कवीला सुचली असेल. तसे असले तरी पहिल्या व दुसऱ्या अंकांतील नाट्याचार्यांचा कलह व मालविकेचा नाट्यप्रयोग, मालविकेस

सोडविण्याकरिता विदूषकाने योजिलेली युक्ति वगैरे गोष्टी कवीच्या कल्पनाशक्तीनेच निर्मिलेल्या दिसतात.

या नाटकाचे कथानक एकंदर आठ-दहा दिवसातच आटपत असल्याने कालिदासाच्या इतर नाटकांतल्याप्रमाणे यात स्वभावविकासाला अवकाश नाही. यांतील सर्व पात्रे आरंभापासून अखेरपर्यंत एकाच प्रकारची राहतात. तसेच ही कवीची प्रथम नाटचकृति असल्यामुळे यातील पात्रांच्या निरनिराळ्या मनोविकारांचे आविष्करण करण्याचा प्रयत्नही कवीने केलेला दिसत नाही. या नाटकात अग्निमित्र व विदूषक ही पुरुषपात्रे व मालविका, धारिणी, इरावती व परिव्राजिका ही स्त्रीपात्रे मुख्य आहेत. हरदत्त, गणदास, बकुलावलिका, निपुणिका इत्यादि गौणपात्रे होत. कालिदासाच्या सर्व नायकांत अग्निमित्र हा कनिष्ठ प्रतीचा दिसतो. संस्कृत आलंकारिकांच्या वर्गीकरणाप्रमाणे पाहता तो धीरललित प्रकारचा आहे. 'रघुवंशा'तील अग्निवर्णाप्रमाणे तो राजकारणाकडे अगदीच दुर्लक्ष करीत नाही, हे खरे ; तथापि त्याच्या अंगी शौर्य, धैर्य इत्यादि उदात्त गुण मुळीच दिसत नाहीत. या नाटकातील त्याचे उद्दिष्ट म्हणजे कसेही करून मालविकेशी संबंध घडवून आणावयाचा हे दिसते. वाकी स्वारी बोलण्यात मोठी मिठ्ठास ! स्त्रीदाक्षिण्य याच्या रोमरोमांत भिनलेले ! मालविकेबरोबर एकांतात पकडला गेल्यावर इरावतीसारख्या चण्डिकेला प्रसन्न करण्याकरिता तो तिच्या पायांही पडतो. आपल्या प्रेमाभिलाषाच्या पूर्तीकरिता हा सदैव विदूषकावर अवलंबून राहिलेला दिसतो. मालविका याच्या दृष्टीस पडावी म्हणून युक्ति योजिली विदूषकाने ; पुढे एकांतात पकडल्यावर तेथून निसटावे कसे हे सुचविले विदूषकानेच ; मालविकेला तळघरात कोंडल्यावर तेथून तिची सुटका करवून तिची व याची प्रमदवनात गाठ घातली तीही विदूषकानेच. तेव्हा हरघडी उपयोगी पडणारा हा 'कामतंत्रसचिव' याच्याजवळ नसता तर याची अवस्था मोठी कठीण झाली असती असे वाटल्याशिवाय राहत नाही. अग्निमित्र हा तत्कालीन राजनीतीच्या व कालिदासाच्याही दृष्टीने आदर्शभूत राजा होता, असे डॉ. केतकरांनी म्हटले आहे. पण ते सयुक्तिक दिसत नाही. कर्त्यासवरत्या मुलाचा हा बाप अन्तःपुरात अनेक स्त्रिया असता आणखी

एका—तारुण्यात जिने नुकतेच पदार्पण केले आहे अशा—दासीवर अनुरक्त होतो, तिच्याशी चोरून लगट करताना पकडला गेल्यावर आपल्या स्त्रीच्या पायां पडतो, पण पुन: आपला नाद सोडीत नाही. बापाने अश्वमेध यज्ञ आरंभिला असून दिग्विजय करण्याकरिता अश्व सोडला असता त्याच्या मागे स्वत: जाऊन त्याचे रक्षण करण्याचे स्वत:चे कर्तव्य सोडून आपल्या अल्पवयस्क कुमारास ते करण्यास पाठवितो. विदर्भदेशावरही स्वत: स्वारी करीत नाही, तर त्यावेळी अन्त:पुरात प्रेमचेष्टा करण्यात दंग असतो. अशा विलासी व कर्तव्यशून्य राजाला आपल्या इतर ग्रंथांत दिलीप, रघु, राम इत्यादि राजर्षींची उदात्त चरित्रे रसाळ वाणीने वर्णन करणारा कालिदास आदर्श मानील, असे वाटत नाही. तेव्हा या नाटकात कवीने स्वकालीन सामान्य राजेलोकांची अंत:पुरातील कारस्थाने वर्णिली असावी, असे वाटते.

कालिदासाच्या सर्व नायकांत अग्निमित्र कनिष्ठ, तर त्याच्या सर्व विदूषकांत 'मालविकाग्निमित्रा'तील गौतम नामक विदूषक अत्यंत हुशार आहे. इतर विदूषकांप्रमाणे हा खाद्यपेयांचा भोक्ता व झोपाळू आहेच, पण त्यांसारखा विसराळू व सांगकाम्या नाही, उलट कारस्थाने रचण्यात अतिशय निपुण आहे. राजाशी त्याचा अत्यंत स्नेह आहे. त्याला मालविकेची प्राप्ति व्हावी म्हणून तो नाना प्रकारच्या युक्त्या योजितो ; दोन नाट्याचार्यांत कलह घडवून आणतो ; मालविकेला प्रमदवनात पाठवावे म्हणून काही खोडी करून राणीचा पाय दुखवितो ; शेवटी राणीकडून अंगठी मिळविण्याकरिता आपणास विषबाधा झालेली दाखवितो. यावरून कारस्थानाचे जाळे विणण्याप्रमाणे अभिनयकलेतही तो अत्यंत तरबेज दिसतो. इरावती त्याचे नैपुण्य पाहून त्याला 'कामतंत्रसचिव' ही पदवी बहाल करते, तेव्हा तो म्हणतो, 'राणीसाहेब! कामनीतीचे एक अक्षरही मला येत असेल तर मी गायत्रीमंत्रही विसरेन ! ' अशा बुद्धिमान् मनुष्याला परंपरेस अनुसरून कालिदासाने खादाड व झोपाळू दाखविले आहे. तथापि, त्यांतील विसंगतपणा लौकरच त्याच्या लक्षात आलेला दिसतो. शिवाय इतका हुशार मित्र दाखविण्याने नायक हा अगदीच मेषपात्र ठरतो. त्यामुळे आपल्या इतर नाटकांत त्याने विदूषकास प्राचीन परंपरेप्रमाणेच रंगविले आहे.

मालविका ही विदर्भराजकन्या ; पण दैवदुर्विलासाने तिला दासी म्हणून राबावे लागते. ती अत्यंत सुस्वरूप व नाटचकलेत निपुण अशी दाखविली आहे. पूर्वी आपला अग्निमित्राशी विवाह होण्याचे घाटत होते हे तिला माहीत असावे. तथापि, दैववशात् दास्य प्राप्त झाल्यावर ते उच्च पद प्राप्त होणे अशक्य आहे, याचीं तिला जाणीव आहे. राजाचे मन आपल्यावर बसले आहे व तो आपल्या संगमासाठी आतुर आहे, असे समजल्यावर मागचापुढचा विचार न करता व आढेवेढे न घेता ती कबूल होते ; त्यामुळे या बाबतीत पार्वती व शकुंतला या कालिदासाच्या इतर नायिकांइतकी ती धीरप्रकृति दिसत नाही. शिवाय, अज्ञातवासातील कष्ट अनुभवीत असता तिला आपल्या पूर्वीच्या वैभवाची स्मृति कधी झाली होती, असे तिच्या भाषणांवरून दिसत नाही, हेही जरा अस्वाभाविक दिसते. धारिणी व इरावती यांच्या स्वभावांतील विरोध कालिदासाने उत्तम प्रकारे दाखविला आहे. धारिणी ही मध्यम वयाची असून पट्टराणी आहे. अन्तःपुरात सर्वांनाच तिचा वचक आहे. आपल्या पतीने फुलपाखरूवृत्तीने नित्य नव्या नव्या स्त्रियांवर आशक व्हावे, हे तिला मुळीच आवडत नाही. मालविका ही तर यःकश्चित् दासी. तेव्हा राजाचे तिजकडे लक्ष गेले आहे, असे समजताच सावध होऊन ती त्याच्या दृष्टीस पडू नये म्हणून प्रयत्न करते. तथापि, ती प्राप्त झाल्याशिवाय आपला पति सुखी होणार नाही, हे ध्यानात आल्यावर ती त्याला अर्पण करण्याइतकी उदार होते. आपल्या पुत्राला दीर्घायुष्य लाभून विजय प्राप्त व्हावा एतदर्थ ती दररोज नियमाने दान देते. आपल्या भेटीकरिता फुले खुडीत असताना विदूषकास सर्पदंश झाला, हे समजताच तिला अत्यंत वाईट वाटते. यांसारख्या प्रसंगांनी तिच्या स्वभावांतील कोमल छटा कवीने व्यक्त केल्या आहेत. याच्या उलट इरावती तरुण, नृत्यगायनादि शिकणारी व राजाचे मन आपल्यावरून उडून जाऊ नये म्हणून थोरल्या राणीला सांगून मालविकेला बंदिवासात टाकणारी मत्सरी व मानी स्त्री दिसते. या दोन राण्यांच्या वयांतील व स्वभावांतील फरक दिसून येण्याकरिता कालिदासाने मद्यप्राशन केलेल्या इरावतीस रंगभूमीवर आणले आहे. ज्यांचे तारुण्य उलटून गेले आहे त्या स्त्रिया मद्यप्राशन करीत असत, असा कोठेही उल्लेख नाही. तेव्हा या प्रसंगाने

कालिदासास स्वकालीन राणीवर टीका करावयाची होती, हे मागे (पृ. ११) उल्लेखिलेले डॉ. केतकरांचे म्हणणे पटण्यासारखे नाही.

पण्डितकौशिकी ही माधवसेनाच्या सचिवाची बहीण. बिचारीवर अकाली वैधव्यप्रसंग आला होता. पुढे भावाच्या मृत्यूने तर तिचा राहिलेला आधारही तुटला. तेव्हा विषण्ण होऊन तिने संन्यासाश्रमाचा स्वीकार केला. तत्कालीन परिस्थितीत राजकुलात प्रवेश करून घेण्यास तिला फार प्रयास पडले नसावेत. तेथे मालविकेला पाहताच पूर्वी संकल्पिल्याप्रमाणे व एका सिद्धाने भविष्य वर्तविल्याप्रमाणे अग्निमित्राशी तिचा विवाह घडून येणे शक्य आहे, असे तिला वाटते व त्यासाठी ती विदूषकास मदत करते. सबंध नाटकांत मालविकेने तिला ओळखल्याचे दिसत नाही, हे मात्र आश्चर्य आहे. कालिदासाने गौणपात्रेही थोडक्यात उत्तम रीतीने रंगविली आहेत. हरदत्त व गणदास या नाट्याचार्यांचा आपल्या कलेविषयी अभिमान व परस्परांविषयीचा मत्सर, बकुलावलिकेचे आपल्या सखीवरचे निष्कपट प्रेम व तिच्याकरिता संकटे सोसण्याची तयारी, निपुणिकेचे मालविकादिकांच्या अर्धवट व आडून ऐकलेल्या संभाषणावरून अनुमान काढण्यात दिसून येणारे नैपुण्य, हीही कालिदासाने उत्तम रीतीने दाखविली आहेत. 'मालविकाग्निमित्रा'ची भाषा प्रसादपूर्ण व मनोहर आहे. तीत कोठेही क्लिष्टपणा व कृत्रिमता दिसत नाही. या नाटकात कालिदासाने अलंकारांचा अतिरेक न होऊ देण्याची काळजी घेतली आहे. कवीचे हे प्रथमचेच नाटक असल्याने त्याने त्यांत 'मायूरी मदयति मार्जना मनांसि' इत्यादि ठिकाणी तरुण कवींना विशेष आवडणाऱ्या अनुप्रासादि शब्दालंकारांचा उपयोग केला आहे. दोन-तीन प्रसंगी श्लेषाचाही खुबीने प्रयोग केलेला दिसतो. तथापि, त्याच्या इतर ग्रंथांप्रमाणे यातही उपमादि अर्थालंकारांचे प्राचुर्य दिसून येते. एकंदरीत या नाटकाने त्याचे नाव सर्वमुखी होऊन त्याला चंद्रगुप्त–विक्रमादित्याचा कायमचा आश्रय मिळाला असावा. पुढे मागील प्रकरणात सांगितल्याप्रमाणे चंद्रगुप्ताला कुमारगुप्त नामक पुत्र झाला, त्या प्रसंगी कालिदासाने आपले 'कुमारसंभव' काव्य रचले. नंतर काही वर्षांनी राजपुत्राला यौवराज्याभिषेक झाला त्यावेळी त्याचे दुसरे नाटक 'विक्रमोर्वशीय' रंगभूमीवर आले असावे. कारण या नाटकाच्या शेवटी पुरूरव्याच्या

आयु नामक पुत्रास यौवराज्याभिषेक केल्याचा प्रसंग वर्णिला आहे. त्या नाटकाकडे आता आपण वळू.

## विक्रमोर्वशीय

या नाटकाचे पाच अंक आहेत. आरंभीच्या नांदीत कालिदासाने आपल्या इतर नाटकांतल्याप्रमाणे श्रीशंकराची स्तुति केली आहे. नंतर सूत्रधार पुढे येतो व प्रेक्षकांस उद्देशून म्हणतो, 'आमच्या प्रार्थनेस मान देण्याकरिता किंवा या नाटकाच्या उदात्त नायकाचा गौरव करण्याकरिता कालिदासाची ही कृति आपण लक्षपूर्वक पहावी'. यावेळी कवीची चांगलीच प्रसिद्धि झाली असल्यामुळे त्याला या नाटकाच्या गुणवर्णनपर काही सांगावे लागले नाही, असे दिसते. नंतर आगामी पात्रांच्या प्रवेशाची सूचना देऊन सूत्रधार निघून जातो व मुख्य प्रवेशास सुरवात होते. प्रथम रम्भा, मेनका इत्यादि अप्सरा प्रवेश करतात व मदतीकरिता ओरडतात. ते ऐकून सूर्यपूजा करून परत येत असलेला पुरूरवा राजा त्यांच्याजवळ जाऊन चौकशी करतो. त्यांच्याकडून त्याला असे कळते की, कुबेरभवनाहून परत येत असता उर्वशी नामक सुंदर अप्सरेला व तिच्या चित्रलेखा नावाच्या सखीला केशि नामक दैत्याने पकडले आहे. ते ऐकताच त्यांना हेमकूट शिखरावर थांबावयास सांगून राजा त्याच्या पारिपत्यार्थ जातो व थोड्याच वेळाने चित्रलेखेने सावरलेल्या मूर्च्छित उर्वशीला घेऊन परत येतो. नंतर काही वेळाने उर्वशी भानावर येते. त्यावेळचे तिचे सौंदर्य पाहून राजा अगदी मोहित होऊन जातो. तो म्हणतो—

अस्याः सर्गविधौ प्रजापतिरभूच्चन्द्रो नु कान्तप्रभः
शृंगारैकरसः स्वयं नु मदनो मासो नु पुष्पाकरः ।
वेदाभ्यासजडः कथं नु विषयव्यावृत्तकौतूहलो
निर्मातुं प्रभवेन्मनोहरमिदं रूपं पुराणो मुनिः ॥ विक्र० १, ८.

'ह्या सुंदरीला निर्माण करणारा विधाता रम्य कांतीचा चंद्र, शृंगाररसपर मदन की कुसुमाकर वसंत असावा बरे ? कारण वेदाभ्यासाने अरसिक झालेल्या व उपभोग्य विषयांविषयी ज्याला मुळीच औत्सुक्य नाही अशा ब्रह्मदेवरूपी जरठ ऋषीला इतके मनोहर रूप कसे निर्माण करता येणार !' उर्वशीचेही मन राजाच्या शौर्याने व गोड भाषणाने आकृष्ट होते. नंतर ते सर्व एके ठिकाणी जमून बोलत असतात, तो

चित्ररथ गंधर्व तेथे येतो व राजास म्हणतो, 'महाराज, नारद ऋषींकडून उर्वशीहरणाची बातमी समजल्याबरोबर इंद्राने तिला परत मिळविण्यासाठी गंधर्वसेनेला आज्ञा केली, पण मार्गात आम्ही भाटांकडून आपल्या विजयाचे वर्णन ऐकून येथे आलो आहो. तरी आपण हिला घेऊन इंद्राकडे चलावे. आपण इंद्राचे मोठेच प्रिय केले आहे.' 'इंद्राच्या प्रभावाने त्याच्या पक्षाचे मजसारखे लोक विजयी होतात', असे राजाने म्हणताच चित्ररथ उत्तर करतो, 'अनुत्सेक: खलु विक्रमालंकार:।' [निगर्वीपणा हे शौर्याला भूषणच आहे]. या भाषणात कालिदासाने आपला आश्रयदाता विक्रमादित्य हा गर्वरहित आहे, असे श्लेषद्वारा सूचित केले आहे. प्रेक्षकांत बसलेल्या विक्रमादित्याला ही गर्भित स्तुति आवडली असेल, हे सांगावयास नकोच. नंतर अप्सरा व गंधर्व आकाशमार्गे जातात, पण वेलीत अडकलेली मोत्यांची एकावली सोडविण्याच्या मिषाने राजाला पुन: एकदा पाहण्याकरिता उर्वशी जरा मागे राहते. नंतर राजाही स्वनगरी परत जातो (अंक १). यानंतर सुमारे एका पंधरवड्याने दुसऱ्या अंकातील गोष्टी घडलेल्या दिसतात. आरंभी एक छोटा प्रवेश घातला आहे. त्यावरून आपणांस असे कळते की, राजाने आपले मन उर्वशीवर बसले आहे ही गोष्ट विदूषकाला कळविली होती व त्याला ती गुप्त ठेवण्याबद्दल बजावले होते. पण काशीराजाची मुलगी व पुरूरव्याची राणी औशीनरी हिला राजाचे मन दुसऱ्या कोणा स्त्रीवर बसल्याचा संशय आल्यावरून तिने आपल्या निपुणिका नामक दासीला पाठविले आहे. ती मोठ्या युक्तीने विदूषकाकडून ते रहस्य काढून घेते. नंतर राजकार्य पाहून झाल्यावर राजा विदूषकासह प्रवेश करतो. मनोविनोदनार्थ कोठे जावे, असे राजाने विचारताच विदूषक उत्तर करतो, 'चला, आपण स्वयंपाकघरात जाऊ. तेथे पंचपक्वान्ने तयार करण्याकरिता जमविलेली सामग्री पाहून आपले मन रमविणे शक्य आहे'. राजाला अर्थातच ही सूचना पसंत पडत नाही. तेव्हा ते प्रमदवनात जातात. तेथे वसंतागमनामुळे आलेल्या आम्रमंजरी पाहून राजाचे मन जास्तच अस्वस्थ होते. तेव्हा उर्वशीसमागमाचा एखादा उपाय शोधण्यासाठी राजाने सांगितल्यावर विदूषक विचार करीत बसतो. राजाला भावी समागमाचे सूचक असे शुभ शकुन होतात. त्यांमुळे तोही आशेने वाट पाहत बसतो. इतक्यात विमानात बसून उर्वशी

व चित्रलेखा तेथे येतात. विदूषक व राजा यांस विचारमग्न पाहून ते काय बोलतात ते ऐकण्यासाठी त्या तिरस्करिणी विद्येने अदृश्य होऊन जवळच उभ्या राहतात. इतक्यात विदूषक म्हणतो, 'राजा ! सापडला मला उपाय ! स्वप्नात समागम करून देणारी निद्रा सेवन कर किंवा उर्वशीचे चित्र काढून ते सारखे पाहत रहा'. राजा म्हणतो, 'हे दोन्ही उपाय शक्य नाहीत. माझे हृदय मदनशरांच्या शल्यांनी युक्त असल्यामुळे मला प्रियेचा समागम करविणारी निद्रा प्राप्त होणे शक्य नाही. बरे, तिचे चित्र काढावे तर ते पूर्ण व्हावयाच्या अगोदरच माझ्या नेत्रांत अश्रु उभे राहिल्याशिवाय राहणार नाहीत. मला होत असलेला हा दारुण मदनसंताप उर्वशीला समजत नाही असे दिसते.' ते ऐकताच उर्वशी आपली मदनबाधा वर्णन करणारे दोन श्लोक रचून ते एका भूर्जपत्रावर लिहिते व ते राजापुढे टाकते. राजाला ते वाचून प्रत्यक्ष उर्वशी भेटल्याइतका आनंद होतो. त्याच्या अंगुलींना घाम सुटतो. तेव्हा अक्षरे खराब होऊ नयेत म्हणून तो ते भूर्जपत्र विदूषकाजवळ देतो. नंतर उर्वशी व चित्रलेखा प्रकट होतात, त्यांचे थोडे संभाषण होते तोच 'भरताने अप्सरांस शिकविलेल्या अष्टरसयुक्त नाटकाचा प्रयोग पाहण्याची इंद्राला इच्छा आहे, तरी उर्वशीला घेऊन तू लौकर ये', असे एक देवदूत चित्रलेखेस सांगतो. तेव्हा राजाची अनुज्ञा घेऊन मोठ्या कष्टाने उर्वशी सखीसह परत जाते. नंतर मनोविनोदाकरिता राजा विदूषकाकडे ते भूर्जपत्र मागतो. त्याच्या हातून ते पूर्वीच गळून वाऱ्याने दुसरीकडे गेले होते. तेव्हा तो म्हणतो—'इथे ते कुठेही दिसत नाही. उर्वशीच्या मार्गाने गेले असे दिसते.' या हलगर्जीपणाबद्दल राजा त्याची कानउघाडणी करतो. नंतर ते दोघेही त्याचा शोध करू लागतात. तोच निपुणिका दासीसह औशीनरी राणी तेथे येते. तिच्या नूपुरात ते भूर्जपत्र जाऊन अडकते. निपुणिका ते राणीला वाचून दाखविते व हा उर्वशीचा प्रेमलेख असावा, असे अनुमान करते. नंतर राणी पुढे होऊन म्हणते, 'महाराज ! आपण शोधीत आहा ते हे भूर्जपत्र घ्या !' 'मी दुसरेच काही पहात होतो', अशी राजा बतावणी करतो. पण तिने राणीचे थोडेच समाधान होणार ! तेव्हा तिला प्रसन्न करण्याकरिता राजा तिच्या पायां पडतो. त्याकडे लक्ष न देता ती दासीसह निघून जाते. तेव्हा विदूषक म्हणतो, 'ही निघून गेली हे आपणांस बरेच झाले. ज्याचे

डोळे आले आहेत, अशा माणसाला दिव्याची ज्योत समोर असलेली सहन होत नाही.' त्यावर राजा उत्तर करतो, 'मित्रा, असे नाही. उर्वशीवर माझे प्रेम बसले असले तरी राणीविषयी माझ्या मनात पूर्वीप्रमाणेच आदर आहे.' नंतर मध्याह्नसमय झाल्यामुळे दोघेही स्नानभोजनार्थ जातात (अंक २). तिसऱ्या अंकाच्या आरंभीही एक लहान प्रवेश घातला आहे. त्यातील पल्लव व गालव या भरतमुनींच्या शिष्यांच्या संभाषणावरून आपल्याला असे समजते की, उर्वशी स्वर्गास परत गेल्यावर इंद्रसभेसमोर सरस्वतीने रचलेल्या 'लक्ष्मीस्वयंवर' नामक नाटकाचा प्रयोग झाला. त्यात मेनकेने वारुणीची व उर्वशीने लक्ष्मीची भूमिका घेतली होती. स्वयंवरप्रसंगी वारुणीने लक्ष्मीला विचारले, 'सखे ! हे विष्णूसह सर्व लोकपाल येथे आले आहेत. यांपैकी कोणावर तुझे मन बसले आहे ?' त्यावर तिने 'पुरुषोत्तमावर' असे उत्तर द्यावयाचे, पण 'बुद्धिः कर्मानुसारिणी' या न्यायाने लक्ष्मीवेषधारी उर्वशीच्या मुखातून 'पूरूरव्यावर' असे शब्द चुकून बाहेर पडले व सर्वांचा विरस झाला. तेव्हा भरतमुनींनी रागावून 'तुझे स्वर्गातील स्थान नष्ट होईल' असा शाप दिला. पण इंद्राने नाटकप्रयोग संपल्यावर खाली मान घालून बसलेल्या उर्वशीला म्हटले, 'पुरूरवा राजा मला युद्धात साहाय्य करतो, तेव्हा त्याला इष्ट ते मला केले पाहिजे ; करिता तू त्याकडे जा व तुझ्या मुलाचे त्याला दर्शन होईपर्यंत त्याच्याजवळ रहा.' मागील अंकातील गोष्टी घडल्या त्याच दिवशी तिसऱ्या प्रहरी वरील प्रकार झाला असावा. त्या दिवशी रात्री घडलेला वृत्तांत यानंतरच्या मुख्य प्रवेशात वर्णिला आहे. आरंभी कंचुकी प्रवेश करतो व पुढील-प्रमाणे सायंकाळचे वर्णन करतो—

उत्कीर्णा इव वासयष्टिषु निशानिद्रालसा बर्हिणो
धूपैर्जालविनिःसृतैर्वलभयः संदिग्धपारावताः।
आचारप्रयतः सपुष्पबलिषु स्थानेषु चार्चिष्मतीः
सन्ध्यामंगलदीपिका विभजते शुद्धान्तवृद्धाजनः॥ विक्र० ३, २.

या श्लोकात संध्यासमयाचे सुंदर वर्णन केले आहे. नंतर राजा व विदूषक प्रवेश करतात. तेव्हा 'मणिहर्म्याच्या गच्चीवरून आज रात्री चंद्र चांगला दिसेल. तरी त्याचा रोहिणीशी संयोग होईपर्यंत महाराजां-

समवेत पाहत बसावे, अशी माझी इच्छा आहे ' असा राणीचा निरोप कंचुकी राजास कळवितो. तेव्हा ते सर्व गच्चीवर जातात. तेथे उदयोन्मुख चंद्राच्या किरणांनी अंधकार नाहीसा होत आहे, असे पाहून राजा त्या दृश्याचे खालीलप्रमाणे वर्णन करतो—

**उदयगूढशशाङ्कमरीचिभिस्तमसि दूरमितः प्रतिसारिते।**
**अलकसंयमनादिव लोचने हरति मे हरिवाहनदिङ्मुखम् ॥** विक्र० ३, ६.

' उदयपर्वताआड असलेल्या चंद्राच्या किरणांनी अंधकार दूर सारला असता पूर्वदिशेचे मुख जणू काय वेणीफणी केल्यासारखे दिसत आहे व माझ्या नेत्रांना आनंदवीत आहे .' या वर्णनात समासोक्ति व उत्प्रेक्षा या अर्थालंकारांचा मधुर संयोग झाला आहे. चंद्र हा पूर्व दिशेचा पति. तो क्षितिजावर आला नव्हता तेव्हा विरहिणी स्त्रीचे केश तैलादिसंस्कार नसल्यामुळे तिच्या मुखावर पसरतात, तसा अंधकार पूर्वदिशा व्यापून राहिला होता. पण उदयोन्मुख चंद्राच्या किरणांनी अंधकार दूर सारल्यामुळे पूर्व दिशेचे मुख वेणीफणी करून पतीच्या आगमनाची प्रतीक्षा करणाऱ्या स्त्रीच्या मुखासारखे दृष्टीस आनंद देत आहे, असा राजाचा आशय आहे. तितक्यात चंद्र उगवतो. ते पाहून विदूषक म्हणतो, ' हा पहा मोडक्या मोदकासारखा दिसणारा चंद्र उगवला आहे !' विदूषक हा मोठा अधाशी ; तेव्हा त्याच्या उपमा खाद्यपेयादिकांतूनच घेतलेल्या असणार ! ते याप्रमाणे बोलत बसले आहेत, तो अभिसारिकेचा वेश केलेली उर्वशी व चित्रलेखा ह्या विमानातून तेथे येतात. आपल्या विरहाने झुरत असलेल्या राजाचे भाषण ऐकून उर्वशी प्रकट होणार, तोच उपहाराचे सामान घेतलेल्या दासीसह औशीनरी राणी तेथे येते. तिने शुभ्रवस्त्र नेसले होते, सौभाग्यदर्शक असेच अलंकार अंगावर घातले होते व व्रतस्थ असल्यामुळे अभिमान टाकला होता. तिला पाहून उर्वशीलाही तिच्याबद्दल आदर वाटतो. राजा तिला देवी म्हणून संबोधितो. ते पाहून ती म्हणते, ' खरोखर हिला देवी ही पदवी चांगली शोभते. तेजस्वीपणात इंद्राणीपेक्षा ही कोणत्याही प्रकारे कमी नाही.' नंतर चंद्रकिरणांचे गंधपुष्पादिकांनी अर्चन करून व विदूषकाला उपायन देऊन राणी राजाचीही पूजा करते व हात जोडून म्हणते—' या रोहिणीचंद्राच्या जोडप्याला साक्षी ठेवून मी सांगते की,

जिच्यावर आपले प्रेम आहे व जी आपल्या समागमाला उत्सुक आहे, तिच्याशी आजपासून मी प्रेमाने वागेन.' त्यावर विदूषक आपल्याशीच म्हणतो, 'हातातून मासा निसटल्यावर धीवर म्हणतो, बरे झाले, मला पुण्य लागेल.' नंतर राणी गेल्यावर उर्वशी व चित्रलेखा प्रकट होतात. प्रथमचे स्वागत-कुशलप्रश्नादि झाल्यावर चित्रलेखा राजाला विनंती करते की,वसंत ऋतु संपल्यावर उष्णकाळी मला सूर्याची सेवा करावयाची आहे, तरी माझ्या सखीला स्वर्गाची आठवण न होईल असे करावे. त्यावर विदूषक म्हणतो, 'अहो तुमच्या स्वर्गात ना खाणे ना पिणे! केवळ माशासारखे डोळ्यांची उघडझाप न करता राहावे लागते!' नंतर चित्रलेखा गेल्यावर रात्र बरीच झाली असे पाहून ते सर्व आत जातात (अंक ३). यानंतर चौदा-पंधरा वर्षांनी घडलेल्या गोष्टी चौथ्या अंकात वर्णिल्या आहेत. मध्यंतरी झालेला वृत्तांत चित्रलेखा व सहजन्या या अप्सरांच्या संभाषणातून आपणांस कळतो. मागील अंकात वर्णिल्याप्रमाणे राजा व उर्वशी यांचा समागम झाल्यावर काही काळाने राज्यकारभार अमात्यांवर सोपवून राजा उर्वशीसह गन्धमादन-पर्वतावर विहार करण्यास गेला. तेथे एकदा मन्दाकिनीच्या तीरावर वाळूच्या टेकडया करून खेळत असलेल्या विद्याधरकुमारीकडे राजा निरखून पाहत होता. त्यावरून उर्वशीला राग येऊन ती तेथून निघून गेली व कार्त्तिकस्वामीच्या वनात शिरली. कार्त्तिकस्वामी हा आजन्म ब्रह्मचारी व स्त्रीदर्शन अनिष्ट मानणारा. त्याने 'या अरण्यात कोणा स्त्रीने प्रवेश केल्यास ती लता होईल' असा नियम केला होता. त्याप्रमाणे उर्वशीचेही रूपांतर झाले. इकडे उर्वशीचा विरह सहन न होऊन राजा रानोमाळ भटकू लागला आहे व वर्षा ऋतूचे मेघ दिसू लागल्यामुळे त्याची अवस्था जास्तच कठीण होणार आहे, असे त्यांच्या संभाषणावरून आपणास कळते. नंतर मुख्य प्रवेशात उर्वशीवियोगाने वेडा झालेला राजा प्रवेश करतो व मेघ, लता, वृक्ष, पशु-पक्षी इत्यादिकांस आपल्या स्त्रीची बातमी विचारीत भटकत राहतो. आकाशातून जलवर्षाव करणाऱ्या मेघालाच उर्वशीहरण करणारा राक्षस समजून राजा म्हणतो--'अरे दुरात्म्या! थांब. माझ्या प्रियतमेला घेऊन कोठे चाललास? अरे हा पर्वत शिखरावरून आकाशात उडी मारून

माझ्यावरच बाणांची वृष्टि करतो आहे !' थोडा विचार केल्यावर हा राक्षस नसून मेघ आहे, असे राजाला वाटते—

नवजलधरः संनद्धोऽयं न दृप्तनिशाचरः
सुरधनुरिदं दूराकृष्टं न नाम शरासनम्।
अयमपि पटुर्धारासारो न बाणपरम्परा
कनकनिकषस्निग्धा विद्युत् प्रिया न ममोर्वशी॥ विक्र० ४, १.

थोडे पुढे गेल्यावर त्याला भूमीवर पडलेले व ओष्ठरागाने रक्तवर्ण झालेल्या अश्रुबिंदूंनी अंकित असे उर्वशीचे हिरवे स्तनांशुक सापडले असे वाटते, पण निरखून पाहतो तो इंद्रगोप नावाचे तांबडे किडे जिच्यावर पसरले आहेत, अशी नव्या गवताची हरळी. असे हिंडता हिंडता त्याला एक रक्तवर्ण मणि दिसतो. 'जिच्या वेणीत हा घालण्यासाठी द्यावयाचा ती माझी प्रियाच आता दुर्लभ झाल्यामुळे याला घेऊन काय करावयाचे ?' असे राजाला वाटते. पण इतक्यात, 'पार्वतीच्या पायाच्या अलक्तकापासून झालेला हा मणि लौकरच प्रियजनांचा संगम घडवून आणतो; तेव्हा तू तो अवश्य घे', असे एका ऋषीचे शब्द ऐकून राजा तो उचलून घेतो व जवळच पुष्परहित असताही मनोरम दिसणाऱ्या लतेस आलिंगितो तो उर्वशी प्रकट होते. नंतर 'आपण राज्य सोडून आल्यास फार काळ झाला, प्रजा मला दोष देत असतील' असे म्हणून उर्वशी परत जावे, असे सुचविते. त्याप्रमाणे ती दोघे राजधानीस जातात (अंक ४). यानंतर लौकरच पाचव्या अंकातील गोष्टी घडल्या आहेत. परत आल्यावर एके दिवशी गंगायमुनांच्या संगमावर राण्यांसह स्नान करून राजा वस्त्रालंकार धारण करीत असता एका गृध्राने तो संगमनीय मणि मांसखंड समजून उचलून नेल्याचे त्यास समजते. तेव्हा तो तसाच उठून बाहेर येतो व त्यास मारण्याकरिता धनुष्यबाण मागतो. ते आणण्यापूर्वीच तो गृध्र दृष्टीच्या टप्प्याच्या पलीकडे जातो. ते पाहून 'सायंकाळी तो एखाद्या वृक्षावर बसेल, तेव्हा त्यावर नजर ठेवावी', अशी आपली आज्ञा नगराध्यक्षास कळविण्यास राजा कंचुकीस सांगतो. नंतर विदूषकाबरोबर त्याविषयी बोलत असता कंचुकी तो मणि व एक बाण घेऊन परत येतो. बाणावरील अक्षरे वाचताच तो आपणापासून उर्वशीस झालेल्या आयु नावाच्या कुमाराचा आहे, असे राजास समजते.

तेव्हा त्याला फार आश्चर्य वाटते. तो म्हणतो, 'माझा व उर्वशीचा फक्त नैमिषेय सत्राच्या वेळी वियोग झाला होता, त्यावेळीसुद्धा ती गर्भवतीही असल्याचे दिसले नाही मग प्रसूति कोठली ?' यावर विदूषक उत्तर करतो, 'अरे ! उर्वशी ही दिव्यांगना ! दिव्य स्त्रिया मानुषी स्त्रियांप्रमाणेच सर्व बाबतीत असतात, असे समजू नको.' याप्रमाणे ते बोलत बसले आहेत, तो कंचुकी प्रवेश करतो व च्यवनाश्रमातून एक तापसी कुमाराला घेऊन आली असल्याचे राजाला कळवितो. कुमाराला पाहताच त्याच्या व राजाच्या चेहऱ्यांतील सादृश्य विदूषकाच्या लक्षात येते. राजालाही वात्सल्यप्रेमाचे भरते येते. तो म्हणतो—

बाष्पायते निपतिता मम दृष्टिरस्मिन्
वात्सल्यबन्धि हृदयं मनसः प्रसादः ।
सञ्जातवेपथुभिरुज्झितधैर्यवृत्ति-
रिच्छामि चैनमदयं परिरब्धुमङ्गैः ॥ विक्र० ५, ९.

'याला पाहिल्याबरोबर माझ्या नेत्रांत अश्रु उभे राहिले आहेत, हृदय वात्सल्यपूर्ण व मन प्रसन्न झाले आहे. स्वतःचा धीरस्वभाव टाकून कंपित अशा अंगांनी याला कवटाळावे, अशी मला इच्छा होत आहे.' कुमारालाही तत्सदृश प्रेमाचा अनुभव येतो. नंतर तापसी म्हणते, 'जन्मल्याबरोबर या कुमाराला उर्वशीने माझ्या स्वाधीन केले. भगवान् च्यवनांनी याचे जातकर्मादि संस्कार करून याला धनुर्विद्या शिकविली. आज पुष्पे, समिधा वगैरे आणण्याकरिता ऋषिकुमारांबरोबर बाहेर गेला असता याने मांसखंड तोंडात धरलेल्या व झाडावर बसलेल्या एका गृध्राला मारले. तेव्हा च्यवनऋषींनी मला बोलावून याला परत करावयास सांगितले आहे.' नंतर कुमार राजाला नमस्कार करतो. तेव्हा राजा म्हणतो, 'हा तुझ्या पित्याचा प्रियमित्र ब्राह्मण बसला आहे, याला निःशंकपणे वंदन कर'. त्यावर विदूषक म्हणतो, 'याला भीति का वाटावी ? आश्रमात वास केल्यामुळे याने माकडे पाहिलीच असतील !' नंतर उर्वशी प्रवेश करते. कुमाराला पाहताच तिच्या हृदयातही अपत्यस्नेहाचा उमाळा येतो ; पण पतीला आपल्या पुत्राचे दर्शन झाल्यामुळे इंद्राच्या आज्ञेप्रमाणे आता त्याचा व आपला वियोग होणार, हा विचार मनात येताच तिच्या नेत्रांतून अश्रु वाहू लागतात.

राजाला त्याचे कारण समजताच तो कुमाराला राज्याभिषेक करून आश्रमात जाण्याचा निश्चय करतो. पण तितक्यात नारद ऋषि तेथे येतात व इंद्राचा पुढील निरोप राजाला कळवितात : ' राजा, त्रिकालदर्शी मुनींनी पुढे सुरासुरांचा संग्राम होणार आहे, असे सांगितले आहे. तू आमचा युद्धातील साहाय्यक, म्हणून तू आताच शस्त्रसंन्यास करू नको. ही उर्वशी जन्मभर तुझी सहधर्मचारिणी म्हणून राहील.' नंतर इंद्राने पाठविलेल्या जलादिकांनी अप्सरा आयूला यौवराज्याभिषेक करतात. नारदादिकांस कुमाराने नमस्कार केल्यावर त्याला सर्व-जण घेऊन जातात व भरतवाक्याने नाटक समाप्त होते (अंक ५).

'मालविकाग्निमित्र' व 'अभिज्ञानशाकुंतल' या कालिदासाच्या इतर नाटकांच्या नावाप्रमाणे प्रस्तुत नाटकाचे 'विक्रमोर्वशीय' हे नाव अनुरूप भासत नाही. पुरूरव्याचे विक्रम हे नाव होते, असा कोठेही उल्लेख आलेला नाही. तेव्हा विक्रमाने म्हणजे पराक्रमाने प्राप्त करून घेतलेल्या उर्वशीविषयी हे नाटक असल्याने त्याला 'विक्रमोर्वशीय' हे नाव कवीने दिले, अशी उपपत्ति लावावी लागते. असे नाव देण्यात कवीचा आपल्या आश्रयदात्याचे नाव आपल्या कृतीशी संलग्न करण्याचा हेतु असावा. वरील हेतूनेच त्याने 'विक्रम' हा शब्द या नाटकात दोन ठिकाणी योजिला आहे, हे मागे दाखविलेच आहे.*

कालिदासाने या नाटकाचे कथानक कोठून घेतले, ते निश्चयपूर्वक सांगता येत नाही. पुरूरवा व उर्वशी यांची प्रेमकथा अत्यंत प्राचीन आहे, हे ऋ. १०.९५ या सूक्तावरून दिसून येते. या सूक्तात पुरूरवा व उर्वशी यांचा संवाद दिला आहे. सूक्ताची भाषा काही ठिकाणी दुर्बोध आहे, तथापि, त्याचा सामान्यतः अर्थ समजण्यास फारशी अडचण येत नाही. शिवाय त्या सूक्ताचा संदर्भ व काही ऋचांचे स्पष्टीकरण 'शतपथब्राह्मणा'त (५, १–२) आढळते. त्यावरून पुढील गोष्ट दिली आहे : " उर्वशी नावाच्या अप्सरेचे पुरूरव्यावर प्रेम बसून ती त्याच्या सहवासात काही काल राहत होती. प्रथमतःच तिने पुढील

* राजशेखराने आपल्या 'प्रचण्डपाण्डव' नाटकाच्या व आर्यक्षेमीश्वराने आपल्या 'चण्डकौशिक' नाटकाच्या नावात आपल्या आश्रयदात्या राजाच्या नावाचा गर्भित उल्लेख केला आहे, हे आम्ही अन्यत्र दाखविले आहे. शारदाश्रम वार्षिक, १९३३, पृ. २६.

अटी घातल्या होत्या : 'माझे दोन मेंढे नेहमी माझ्या शयनागारात बांधले पाहिजेत व तू नग्न असताना कधीही माझ्या दृष्टीस पडू नये.' राजाने त्या दोन्ही अटी कबूल केल्या होत्या. कालांतराने उर्वशी गरोदर झाली. इकडे उर्वशी गेल्यामुळे स्वर्ग शून्यवत् भासू लागला, म्हणून तिला परत आणण्यासाठी गंधर्वांनी एक युक्ति योजिली. त्यांनी एका रात्री मेंढ्यांना उचलून नेऊन मारण्यास सुरुवात केली. त्यांचे ओरडणे ऐकून उर्वशी म्हणाली, 'माझ्या या लाडक्यांचे रक्षण करण्यास येथे कोणीच नाही काय ?' तेव्हा राजा नग्नावस्थेत तसाच लगबगीने त्यांच्या रक्षणार्थ धावला. तो उर्वशीच्या दृष्टीस पडावा म्हणून गंधर्वांनी तितक्यात विजेचा लख्ख उजेड पाडला. आपल्या अटीप्रमाणे उर्वशी सोडून जाऊ लागली तेव्हा राजाने तिला परोपरीने विनविले, त्यावेळचा त्यांचा संवाद 'ऋग्वेदा'च्या वरील सूक्तात दिला आहे. 'तुझ्या प्रेमाने वेडावून मी भटकत राहीन. कडेलोटाने प्राणत्याग करीन व आपले शरीर कोल्ह्याकुत्र्यांकडून खाववीन', असे राजा म्हणाला. तेव्हा उर्वशी उत्तर करते, 'पुरूरवा ! आपला कडेलोट करून घेऊ नको किंवा प्राणही टाकू नको ! तुझ्या शरीराला कोल्हेकुत्रे इजा न करोत ! तू परत जा ! स्त्रियांचे प्रेम स्थिर नसते. त्यांची हृदये लांडग्याच्या हृदयासारखी असतात.' शेवटी तिला दया येऊन वर्षाच्या शेवटी एक रात्रभर त्याच्याबरोबर राहण्याचे तिने कबूल केले. नंतर त्याने गंधर्वांना संतुष्ट केले व त्यांनी सांगितल्याप्रमाणे मनुष्यलोकी स्वर्गीय अग्नि आणून व यज्ञ करून गंधर्वरूप प्राप्त करून घेतले."

'शतपथब्राह्मणा'तील वरील गोष्ट थोड्या फार फरकाने 'विष्णु' व 'भागवत' या पुराणांतही आली आहे. उर्वशीला मित्रावरुणांचा शाप झाल्यामुळे मनुष्यलोकी वास्तव्य करावे लागले, ही अधिक माहिती त्या पुराणांत आढळते. याशिवाय या गोष्टीचे एक निराळेच स्वरूप 'कथासरित्सागरा'त दिसून येते, तेही स्वकालीन 'बृहत्कथे'वरून कालिदासाला परिचित असावे. 'कथासरित्सागरा'त म्हटले आहे की, पुरूरवा हा विष्णुभक्त असल्याने विष्णूने उर्वशी त्याला देण्याविषयी इंद्राला आज्ञा केली ; एके दिवशी तो तिच्यासह इंद्रसभेत बसला असता रंभेने नृत्यात काही चूक केल्यावरून राजा हसला ; तेव्हा नृत्याचार्य

तुम्बरु याला राग येऊन त्याने 'उर्वशीचा व तुझा वियोग होईल' असा शाप दिला ; पुढे तपश्चर्येने विष्णूला संतुष्ट करून राजाने उर्वशीची प्राप्ति करून घेतली.

पुरूरवा व उर्वशी यांच्या प्रेमकथांची वरील कालिदासकालीन स्वरूपे लक्षात घेतल्यास कवीची कल्पकता या नाटकात उत्तम रीतीने दिसून येईल. उर्वशीला काही शाप झाल्यामुळे थोडे दिवस मृत्युलोकी वास्तव्य करावे लागले होते व तिने घातलेल्या अटी राजाने मोडल्यामुळे ती परत स्वर्गास गेली, असे 'शतपथब्राह्मण' व पुराणे यात वर्णिले होते, तर 'बृहत्कथे'त तुम्बरूच्या शापाने राजाचा व तिचा वियोग झाला, असे दाखविले होते. या सर्व घटनांचा कालिदासाने आपले संविधानक रचताना मार्मिकपणे उपयोग करून घेतला आहे. पहिल्या अंकातील उर्वशीहरणाचा व तदनंतर पुरूरवा व उर्वशी यांच्या प्रथमदर्शनाचा रम्य प्रसंग कवीच्या प्रतिभेने नवीनच निर्माण केलेला दिसतो. तिसऱ्या अंकात उल्लेखिलेला भरतमुनीचा शाप बृहत्कथेतील तुम्बरूच्या शापावरून कवीला सुचला असावा. 'शतपथब्राह्मण' व पुराणे यात वर्णिलेल्या उर्वशीच्या अटी कलेच्या दृष्टीने रम्य नसल्याने त्या जागी कवीने पुत्रदर्शनाची अट घातली आहे. चौथ्या अंकातील कार्त्तिकस्वामीचा नियम, त्यामुळे उर्वशीचे रूपपरिवर्तन, पुरूरव्याचा शोक इत्यादि प्रसंग व संबंध पाचवा अंक ही कालिदासाच्याच कल्पकतेची फळे होत. कुमाराचे दर्शन झाल्याबरोबर उर्वशीस स्वर्गास परत जावे लागले असते, तर राजाही तपश्चर्येकरिता आश्रमात जाता व त्यायोगे नाटकाचा अंत दुःखपर्यवसायी झाला असता. संस्कृत नाटयशास्त्राच्या नियमाप्रमाणे असे करणे शक्य नव्हते, म्हणून शेवटल्या अंकात नारदाकडून इंद्राचा निरोप राजाला कळवून कालिदासाने नाटकाचा शेवट गोड केला आहे. या नाटकाच्या पहिल्या तीन अंकांतल्या संविधानकासारखी कथा 'मत्स्यपुराणा'त दिलेली आढळते, त्यावरून कालिदासाने ती तेथून घेतली असावी, असे कित्येक विद्वानांनी म्हटले आहे. पण सध्याच्या पुराणांच्या प्रती विश्वसनीय नाहीत. त्यांत वेळोवेळी नव्या नव्या कथा घुसडलेल्या आहेत, हे आता सिद्ध झाले आहे. म्हणून 'मत्स्यपुराणा'नेच पुरूरवा व उर्वशी यांच्या प्रेमकथेचे इतर पुराणांत दिसणारे

स्वरूप टाकून देऊन त्याच्या जागी ‘ विक्रमोर्वशीया ’तील रम्य कथानक संक्षिप्त रूपाने दिले आहे, असे म्हणता येते.*

‘ विक्रमोर्वशीया ’चे संविधानक कालिदासाच्या पहिल्या नाटकातल्या इतके गुंतागुंतीचे नाही. कथानकाच्या नागमोडी वळणात प्रेक्षकांचे चित्त रोधण्यापेक्षा स्वभावरेखनाच्या रम्य दर्शनाने ते आकृष्ट करणे बरे, असे कवीला वाटले असावे. कारण काही असले तरी ‘ मालविकाग्निमित्रा ’च्या मानाने यात संविधानकचातुर्य बरेच कमी दिसते. दुसऱ्या व तिसऱ्या अंकांतील काही घटनांची कथानकाच्या गतीला आवश्यकता भासत नाही. उदाहरणार्थ, त्या अंकांतील औशीनरी राणीचे प्रवेश विरोधदर्शनाने उर्वशीच्या स्वभावाला जास्त उठाव मिळावा याकरिताच घातलेले दिसतात. यांतील भाषा मात्र पहिल्या नाटकातल्याप्रमाणेच प्रासादिक, सौष्ठवयुक्त व सालंकृत आहे. यात संभोग व विप्रलंभ या द्विविध शृंगारांचा उत्तम परिपोष झाला आहे. तथापि चौथ्या अंकात आरंभापासून अखेरपर्यंत राजा जवळ जवळ एकाच पद्धतीने शोक करीत असलेला दाखविला आहे. शोक रसाचा उठाव होण्याकरिता इतर रसांची योजना केली नाही, त्यामुळे तो अंक कंटाळवाणा होतो.

‘ मालविकाग्निमित्रा ’च्या मानाने या नाटकात पात्रे संख्येने कमी असली, तरी जास्त काळजीपूर्वक रंगविलेली आहेत. यात पुरूरवा, विदूषक व आयु ही पुरुषपात्रे आणि उर्वशी व औशीनरी ही स्त्रीपात्रे प्रमुख आहेत. पुरूरवा हा नायक धीरोदात्त आहे. हा अत्यंत शूर, प्रेमी व दाक्षिण्यसंपन्न असा दाखविला आहे. नाटकाच्या आरंभी केशि दैत्यावर त्याने मिळविलेल्या विजयाने तो उर्वशीप्रमाणेच प्रेक्षकांचेही मन आकृष्ट करून घेतो. त्याच्या शौर्यामुळे प्रत्यक्ष इंद्रालाही त्याच्या मदतीची जरूरी लागते. विनयाने तर त्याचे शौर्य जास्तच खुलून दिसते. उर्वशीवर त्याचे निस्सीम प्रेम असल्यामुळे तिचा विरह होताच तो अगदी वेडावून

* ‘ मत्स्यपुराणा ’तील कथेत ‘ बृहत्कथा ’ व ‘ विक्रमोर्वशीय ’ यांतील वर्णनांचे मिश्रण झालेले दिसते. कारण त्यांत ‘ लक्ष्मीस्वयंवरप्रसंगी मेनका व रंभा यांच्याबरोबर लक्ष्मीरूपधारिणी उर्वशी नाचत असता भरताने शिकविलेला अभिनय विसरली ’ असे म्हटले आहे. स्वयंवरप्रसंगी प्रत्यक्ष वधूला नाचावयाला लावल्याने होणारे अनौचित्य ही कथा ‘ मत्स्यपुराणा ’त घुसडणाऱ्याच्या लक्षात आलेले दिसत नाही.

जातो आणि लतावृक्षांस व पशुपक्ष्यांस तिची बातमी विचारीत भटकत राहतो. कालिदासाच्या इतर नाटकांतील नायकांप्रमाणे हाही बहुपत्नीक आहे. तथापि याला आपल्या ज्येष्ठ राज्ञीच्या गुणांबद्दल आदर आहे. अन्य स्त्रीवर आपले प्रेम गेले आहे, हे लक्षात आल्यास तिला अत्यंत वाईट वाटेल म्हणून शक्य तो ही गोष्ट तिजपासून लपवून ठेवण्याचा तो प्रयत्न करतो. अग्निमित्राच्या मानाने याचा स्वभाव बरा दाखविला असला, तरी दुष्यंताचे प्रजावात्सल्यादि गुण याच्यामध्ये दिसत नसल्याने हा त्याच्यापेक्षा कमी प्रतीचा ठरतो. या नाटकातील माणवक नामक विदूषक 'मालविकाग्निमित्रा'तील गौतमाप्रमाणेच खाद्यलोलुप आहे, पण बुद्धीने मात्र त्याच्यापेक्षा फारच कमी प्रतीचा दिसतो. राजाला मालविकेचे प्रथम दर्शन व पुढे समागम होण्याकरिता गौतम नाना प्रकारच्या युक्त्या योजतो, पण हा माणवक राजाचे उर्वशीवर प्रेम बसले आहे एवढीही गुप्त गोष्ट औशीनरीच्या चतुर दासीपासून लपवू शकत नाही. त्याच्या भोळसरपणामुळेच औशीनरी राणीच्या प्रवेशांना अवसर मिळतो. खाद्यपेयादिकांतून घेतलेल्या उपमादि अलंकारांनी व स्वतःच्या कुरूपतेने इतर पात्रांचे व प्रेक्षकांचे मनोरंजन करणे एवढेच याचे काम आहे. कथानकाला वळण देण्यात याचा फारसा उपयोग होत नाही. तिसरे पुरुषपात्र राजकुमार आयूचे. 'मालविकाग्निमित्रा'तील कुमार वसुमित्र रंगभूमीवर येत नाही. त्याच्या शौर्याविषयीचे वर्णन ऐकून प्रेक्षकांस त्यास पाहण्याची इच्छा होते, पण ती अतृप्त राहते. कालिदासाने या नाटकात प्रथमच एका अल्पवयस्क कुमारास रंगभूमीवर आणले आहे. वसुमित्रापेक्षा आयु हा वयाने लहान आहे. तथापि त्याचा स्वभावपरिपोष चांगला झाला आहे. त्याचे धनुर्विद्येतील नैपुण्य, आपल्या पित्याविषयी वाटणारे सहजप्रेम व च्यवनाश्रमातील प्राण्यांवरील त्याची ममता ही थोडक्यात पण उत्तम रीतीने दाखविली आहेत. स्त्रीपात्रांत उर्वशी ही प्रमुख आहे. ही अप्सरा असल्याने स्वरूपाने अप्रतिम आहे, हे सांगावयास नकोच. संस्कृत नाटयशास्त्रकारांच्या वर्गीकरणाप्रमाणे ही 'साधारणा' व 'प्रगल्भा' आहे. हिचे पुरूरव्यावर निस्सीम प्रेम आहे. आपली उपभोगलालसा तृप्त झाल्यावर पतीविषयी बेपर्वाई दाखविणारी व त्याच्या विनवणीस 'स्त्रियांची मैत्री शाश्वत नसते. त्यांची हृदये लांडग्यांच्या

हृदयासारखी असतात', असे निर्लज्जपणाने उत्तर देणारी अत्यंत स्वार्थी स्त्री असे तिचे स्वरूप ऋग्वेदादि प्राचीन ग्रंथांत दिसते, पण कालिदासाच्या प्रतिभेच्या मुशीतून बाहेर पडल्यावर तिचा स्वभाव बराच बदललेला दिसतो. राजाला पुत्रदर्शन झाल्यावर इंद्राने घातलेल्या अटीप्रमाणे आपणास पतीचा वियोग होणार, या कल्पनेने तिला अत्यंत दुःख होते. तथापि तिचा स्वार्थीपणा समूळ नष्ट झालेला दिसत नाही. स्वतःच्या उपभोगा-करिता पोटच्या गोळ्याला जन्मदिनापासून दुसऱ्याच्या स्वाधीन करण्यात तिला यत्किंचित्‌ही वाईट वाटलेले दिसत नाही. तिच्या स्वभावात स्त्रीजनसुलभ मत्सर आहेच. तथापि औशीनरी राणीची गंभीर आकृति दृष्टीस पडताच तिला तिच्याबद्दल आदर वाटल्याशिवाय राहत नाही. पुत्राला यौवराज्याभिषेक झाल्यावर ती त्याला ज्येष्ठ मातेला—औशीनरी राणीला—नमस्कार करण्यास घेऊन जाते. यावरून तिजविषयीचा तिचा आदर व्यक्त होतो. कालिदासकाळी श्रीमंत, चैनी व रंगेल नायक विदुषी व विविधकलाभिज्ञ वेश्यांच्या संगतीत कसे रममाण होत असत, याचे उत्तम चित्र वात्स्यायनाच्या 'कामसूत्रा'त दृष्टीस पडते. अशा नागरकां-च्या पत्नी मात्र आपल्या पतीच्या बाहेरख्यालीपणाकडे दुर्लक्ष करून त्याच्याशी प्रेमाने वागत, गृहव्यवस्था पाहत व सदैव विविध कर्तव्यांत निमग्न असत, असे त्याच ग्रंथावरून दिसते. अशा प्रेमळ पण मानी व गंभीर स्वभावाच्या गृहिणींचे चित्र कालिदासाने औशीनरी राणीच्या रूपाने रंगविलेले दिसते. उर्वशीवर प्रेम बसले तरी पुरूरवा औशीनरी राणीला आदराने वागवितो, हे पाहून चित्रलेखा 'अन्यसंक्रान्तप्रेमाणो नागरका अधिकं दक्षिणा भवन्ति' असे म्हणून उर्वशीचे समाधान करते. त्यावरून हे नाटक लिहिताना स्वकालीन नागरकांचे व त्यांच्या सुशील व सद्‌गुणी पतिव्रता गृहिणींचे चित्र कवीच्या मनश्चक्षूपुढे होते यात संशय नाही. औशीनरीला राजाचे अप्सरःकामुकत्व आवडत नाही व ती प्रथम त्याच्या बाह्यात्कारी प्रेमळ पण निःसार भाषणाला तुच्छ लेखून निघून जाते. पण पुढे पश्चात्ताप पावून ती प्रियानुप्रसादन व्रताच्या मिषाने राजाची गाठ घेते व त्याला प्रिय असलेल्या स्त्रीबरोबर आपण प्रेमाने वागण्यास तयार असल्याचे स्पष्ट सांगून त्याचा मार्ग निष्कंटक करते. केवढा हा स्वार्थत्याग ! 'मालविकाग्निमित्रा'तील धारिणीही स्वार्थत्यागी व

उदार होते, पण ती आपल्या वचनात सापडल्यावर व पुत्रविजयाच्या महोत्सवात ! तिच्यापेक्षा औशीनरीचा स्वार्थत्याग जास्त निरपेक्ष व म्हणून सरस आहे. उर्वशी व औशीनरी या दोघींचेही राजावर निस्सीम प्रेम आहे. पण उर्वशीचे प्रेम भोगमूलक तर औशीनरीचे त्यागमूलक, हा त्यांतील महत्त्वाचा फरक कवीनें दाखविला आहे. संसारातील हाल-अपेष्टांनी, किंबहुना प्रियजनांच्या उपेक्षेनेही जे प्रेम कमी होत नाही व ज्याची परिणति अखेर आत्मत्यागात होते, तेच खरे प्रेम, हे आपले मत आपल्या इतर ग्रंथांप्रमाणे या नाटकातही कवीने औशीनरी राणीचे पात्र रंगवून व्यक्त केले आहे.

### शाकुंतल

'मालविकाग्निमित्र' व 'विक्रमोर्वशीय' ही आपापल्या परीने रम्य असलेली नाटके कालिदासाने लिहिली असली तरी नाटककार म्हणून त्याची कीर्ति त्याच्या शेवटच्या सर्वांगसुंदर व निर्दोष अशा 'अभिज्ञान-शाकुंतला 'वरच अवलंबून राहील. यातील संविधानकचातुर्य, स्वभाव-रेखाटन, रसपरिपोष, भाषासौष्ठव इत्यादि गुणांवर लुब्ध होऊन प्राचीन रसिकांनी यास सर्व संस्कृत नाटकांत श्रेष्ठ गणले होते. इ. स. १७८९ मध्ये सर वुइल्यम जोन्स या विद्वानाने एका संस्कृत पंडिताच्या साहाय्याने याचे इंग्रजीत भाषांतर केले, ते पुष्कळ ठिकाणी सदोष होते तरी त्याने युरोपीय विद्वानांना वेड लावले. त्याची निरनिराळ्या युरोपीय भाषांत भाषांतरे झाली व सध्या जगातील अशी एकही प्रमुख भाषा नाही की, जीत 'शाकुंतला 'चे एखादे तरी भाषांतर सापडणार नाही. या नाटकाच्या शेवटच्या अंकातील लहान बालकाच्या निरागस हास्याचे व बोबड्या बोलांचे मनोहर वर्णन वाचून शेझी या फ्रेंच विद्वानास आनंदाच्या उकळ्या फुटून तो नाचू लागला. गटे ह्या जगत्प्रसिद्ध जर्मन कवीने तर या नाटकाचे भाषांतर वाचून त्याची खालीलप्रमाणे प्रशंसा केली—

**चित्ती वांछिसि तू वसंतकुसुमे शीतर्तुची वा फळे**
**आत्मा मोहित हृष्ट, तुष्टहि तसा, हो पुष्ट ज्याच्या बळे।**
**पृथ्वी स्वर्गहि इच्छिशी उभय ते एकया पदी बोधिले**
**घे तू नाम 'शकुंतला' मग तुला ते सर्वही लाधले ॥***

* भाषांतरकार—कै. ग. ज. आगाशे ( वि. ज्ञा. वि., मार्च १९१९ ).

कालिदासाच्या सर्व ग्रंथांत हे नाटक उत्कृष्ट असल्याने 'कालिदासस्य सर्वस्वमभिज्ञानशकुन्तलम्' ही उक्ति सर्वमान्य झाली आहे. असो. प्राचीन कालापासून 'शाकुंतल' लोकप्रिय झाल्याने त्याच्या हस्तलिखित प्रती हिंदुस्थानातील सर्व प्रांतांत सापडतात, पण त्यांमध्ये अनेक फरक आढळतात. त्या सर्वांचा विचार करून विद्वानांनी काश्मिरी, बंगाली, देवनागरी व मद्रासी अशा चार पाठपरंपरा निश्चित केल्या आहेत. तथापि या सर्वांची सूक्ष्म परीक्षा करून कालिदासाच्या सर्वोत्कृष्ट नाटकाचे मूळ स्वरूप ठरविले जाणे अत्यावश्यक आहे. ते होईपर्यंत देवनागरी प्रतीतील पाठ त्यातल्या त्यात बरे वाटल्यामुळे ती प्रत खालील विवेचनाकरिता घेतली आहे.

याही नाटकाच्या आरंभी कवीने शिवस्तुतिपर नान्दी घातली आहे व तीत श्रीशंकराच्या प्रत्यक्ष दिसणाऱ्या अष्टविध स्वरूपाचे वर्णन केले आहे. नंतर सूत्रधार नटीस बोलावतो व "या विद्वत्परिषदेपुढे कालिदासाच्या 'अभिज्ञान-शाकुंतल' नामक नवीन नाटकाचा प्रयोग करावयाचा आहे. तेव्हा प्रत्येक पात्राच्या कामाबद्दल काळजी घ्यावी" असे तिला सुचवितो. 'आपण नाटक चांगले बसविले असल्यामुळे त्यात काही कमी पडणार नाही' असे नटीने सांगताच तो म्हणतो—

आ परितोषाद्विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम्।
बलवदपि शिक्षितानामात्मन्यप्रत्ययं चेतः॥ शाकु० १, २.

या श्लोकात कालिदास सूत्रधारमुखाने, आपण नाटकरचनेत कुशल असलो तरी आपल्या कृतीने विद्वज्जनांना संतोष झाला असे समजेपर्यंत आपले समाधान होणार नाही, असे मोठ्या विनयाने सुचवीत आहे. नंतर नटी ग्रीष्मसमयवर्णनपर एक गीत गाते. त्याची स्तुति करण्याच्या मिषाने दुष्यंताच्या प्रवेशाची सूचना करून सूत्रधार नटीसह निघून जातो व मुख्य अंकास आरंभ होतो. प्रथम हरणाचा पाठलाग करणारा रथस्थ राजा दुष्यंत व सूत प्रवेश करतात. नेम धरून राजा त्याला बाण मारणार तोच 'राजा! हा आश्रममृग आहे, याला मारू नको' असे ओरडत एक वैखानस दोन शिष्यांसह त्याच्या आड येतो. त्याच्या विनंतीला मान देऊन राजा आपला बाण परत घेतो. ते पाहून संतुष्ट होऊन तो 'तुला चक्रवर्ती पुत्र होवो!' असा त्याला आशीर्वाद देतो व

जवळच मालिनी नदीतीरावर असलेल्या आश्रमात जाऊन तेथील आतिथ्याचा स्वीकार करण्याविषयी सांगतो. तेथील कुलपति कण्व ऋषि शकुंतला नामक आपल्या कन्येला अतिथींचा सत्कार करण्यास सांगून तिच्या प्रतिकूल दैवाची शांति करण्यासाठी सोमतीर्थी नुकतेच गेले आहेत, असे वैखानसाकडून राजाला कळते. वैखानस शिष्यांसह निघून गेल्यावर राजा तपोवनाकडे रथ हाकण्यास सारथ्यास सांगतो. तपोवनाजवळ पोहोचल्यावर तेथील जनांस उपसर्ग होऊ नये म्हणून तो रथातून उतरतो व आपले धनुष्य व अलंकार सारथ्याच्या स्वाधीन करून विनीत वेषाने तपोवनात शिरतो. त्यावेळी त्याला वाहुस्पंदनाचा शुभ शकुन होतो. थोडा पुढे जातो तो जवळच झाडांच्या राईत कोणी बोलल्यासारखे त्याला ऐकू येते, म्हणून तो तिकडे जाऊ लागतो, तो तीन तापसकन्यका कळश्या घेऊन लहान झाडांना पाणी घालण्याकरिता आपल्याकडेच येत असलेल्या त्याला दिसतात. तेव्हा तो एका झाडाच्या छायेत त्यांची वाट पाहत राहतो. त्यांच्या संभाषणावरून त्यांपैकी एक कण्वाची मुलगी शकुंतला व दुसऱ्या दोन अनसूया व प्रियंवदा नामक तिच्या सख्या आहेत, असे त्याला कळते. वल्कल नेसलेल्या शकुंतलेला पाहून तो आपल्याशीच म्हणतो : "हिच्या सुंदर शरीराला वल्कल योग्य नाही हे खरे ; तथापि त्याने तिला शोभा येत नाही असे नाही. कारण 'जातीच्या सुंदरांना काहीही शोभते ! '" इकडे शकुंतला व तिच्या सख्या यांच्यात थट्टामस्करी चालते. कोमल पालवी आलेल्या आम्रवृक्षाला बिलगून असलेल्या वनज्योत्स्ना नामक बहरलेल्या मोगरीच्या वेलीला पाहत शकुंतला उभी राहते, ते पाहून प्रियंवदा म्हणते 'अनसूये, शकुंतला वनज्योत्स्नेला इतकी न्याहाळून पाहते आहे याचे कारण आले का ध्यानात ? वनज्योत्स्नेचा जसा अनुरूप वृक्षाशी संयोग झाला आहे तसा माझाही योग्य पतीशी होईल काय, असे तिला वाटत आहे.' यावर 'तुझ्या मनचेच काहीतरी !' असे शकुंतला उत्तर करते. तथापि, त्यावरून शकुंतला अविवाहित आहे असे राजाला कळते ; तेव्हा प्रतिलोम विवाह निषिद्ध असल्यामुळे 'ही कण्वमुनीची असवर्ण स्त्रीपासून झालेली कन्या असेल काय ? किंवा संदेह कशाला ? ज्याअर्थी माझे थोर मन हिच्यावर बसले आहे त्याअर्थी माझ्यासारख्या क्षत्रियाने विवाह करण्या-

सारखीच ही असली पाहिजे', असे विचार त्याच्या मनात येतात. इतक्यात मोगरीला पाणी घातल्यामुळे बिचकून उडालेला भ्रमर शकुंतलेच्या मुखाभोवती घिरट्या घालू लागतो, ते पाहून राजाला त्याचा हेवा वाटतो. तो म्हणतो—

चलापाङ्गां दृष्टिं स्पृशसि बहुशो वेपथुमतीं
रहस्याख्यायीव स्वनसि मृदु कर्णान्तिकचरः।
करं व्याधुन्वत्याः पिबसि रतिसर्वस्वमधरं
वयं तत्त्वान्वेषान्मधुकर! हतास्त्वं खलु कृती॥ शाकु० १, २३.

यात राजाने भ्रमराचे कामुकरूपाने वर्णन केले आहे व शेवटी 'आम्ही सत्यान्वेषणात गुंग झाल्यामुळे फसलो आहो, भ्रमरा! तू मात्र कृतकृत्य झाला आहेस!' असे उद्गार काढले आहेत. या श्लोकात समासोक्ति व व्यतिरेक या अलंकारांचा मधुर संयोग झाला आहे. भ्रमराने फारच त्रास दिल्यामुळे शकुंतला आपल्या सख्यांना मदतीकरिता बोलाविते. तेव्हा त्या थट्टेने म्हणतात, 'आम्ही कोण तुझे रक्षण करणार! दुष्यंताला हाक मार! तपोवनाचे रक्षण राजानेच केले पाहिजे.' ही वेळ प्रकट होण्यास चांगली आहे, असे वाटून राजा पुढे होतो व म्हणतो, 'दुर्विनीतांचे शासन करणारा पौरव राजा पृथ्वीवर राज्य करीत असता मुग्ध अशा तपस्विकन्यांना कोण हा त्रास देत आहे?' अनपेक्षितपणे पर पुरुष तेथे उपस्थित झालेला पाहून त्या सर्व प्रथम थोड्या गडबडतात. पण पुढे त्याचे मनःपूर्वक स्वागत करतात. राजाला पाहताच शकुंतलेच्या मनात प्रेमविकार उद्भवतो. आपण राजा आहो, हे कळले तर या मनमोकळेपणाने आपणाशी बोलणार नाहीत, असे वाटून 'राजाने धर्मखात्यावर मला अधिकारी नेमले आहे. या तपोवनातील धर्मकृत्ये निर्विघ्नपणे चालली आहेत की नाही, हे पाहण्यासाठी मी येथे आलो आहे' असे तो त्यांस सांगतो. त्यांच्याकडून त्याला शकुंतलेविषयी पुढील हकीकत कळते: 'विश्वामित्र ऋषीच्या उग्र तपश्चर्येला भिऊन देवांनी त्याला मोह पाडण्याकरिता मेनका नामक अप्सरा पाठविली होती, तिच्यापासून त्याला ही शकुंतला कन्या झाली. मातेने टाकल्यावर कण्व ऋषींनी हिचे संगोपन केले म्हणून ते हिचे वडील. योग्यसा वर मिळाल्यास हिचे लग्न करण्याचा त्यांचा विचार आहे.' आपल्या

विवाहाविषयीची ही चर्चा ऐकून शकुंतला रागाने गौतमी आत्याबाईकडे तक्रार करण्याकरिता जावयास निघते. तेव्हा तिला परत फिरविण्या-करिता प्रियंवदा म्हणते, 'मी तुझ्याकरिता दोन झाडांना पाणी घातले आहे. ते माझे ऋण प्रथम फेड, मग जा हवे तर!' त्यावर 'वृक्ष-सिंचनानेच ही अत्यंत श्रमली आहे. म्हणून मीच तिला ऋणमुक्त करतो', असे म्हणून राजा प्रियंवदेला आपली अंगठी देतो. तिच्यावरील त्याच्या नावाची अक्षरे वाचताच त्या आश्चर्यचकित होतात. ते पाहून राजा म्हणतो, 'मी दुसरा कोणी आहे असे समजू नका; ही अंगठी राजाने दिलेली आहे.' त्यावर प्रियंवदा म्हणते: 'तर मग ही आपल्याच अंगुलीत असू द्या! आपल्या शब्दानेच ही ऋणमुक्त झाली आहे.' याप्रमाणे त्यांचे संभाषण चालू असता, 'मृगयाविहारी दुष्यंत राजा तपोवनाजवळ आला आहे. त्याच्या रथाला बुजून हा हत्ती हरणांची दाणादाण करीत तपोवनात शिरत आहे. तरी त्यातील प्राण्यांचे रक्षण करा' असे शब्द त्यांच्या कानावर येतात. तेव्हा राजाच्या अनुज्ञेने त्या आपल्या पर्णकुटिकेकडे जातात. जाताना शकुंतला मात्र आपल्या पायाला बोचलेले दर्भांकुर काढण्याच्या व कोरांटीच्या फांदीला अडकलेले वल्कल सोडविण्याच्या मिषाने थोडा वेळ मागे राहून राजाकडे पुन: एकदा पाहते व नंतर त्यांच्याबरोबर निघून जाते (अंक १).
यानंतर दुसऱ्याच दिवशी घडलेल्या गोष्टी दुसऱ्या अंकात वर्णिल्या आहेत. तपोवनाजवळच राजाने आपल्या सैनिकांसह तळ दिला होता, तेच या अंकाचे स्थळ. प्रथम विदूषक प्रवेश करतो व म्हणतो, 'या मृगयाशील राजाच्या संगतीने मी अगदी त्रासलो आहे! हा येथे हरिण, हा पहा वराह, हा इकडे वाघ, असे ओरडत या ग्रीष्म ऋतूत रानावनांतून हिंडावे, झाडांची पाने आत पडून कडवट झालेले पाणी प्यावे, वेळी-अवेळी सळईवर भाजलेले मांस खावे, या प्रकारे आमचे दिवस चालले आहेत. रात्री सुखाची झोपही भरपूर घेऊ देत नाहीत. काल माझ्या दुर्दैवाने राजाला तापसकन्यका शकुंतला दिसली. आता तर परत जाण्याची तो गोष्टही काढीत नाही.' याप्रमाणे विदूषक आपणाशीच कुरकुरत असता राजा प्रवेश करतो. शकुंतलेवर मन बसल्यामुळे राजालाही मृगयेविषयी औत्सुक्य राहिले नव्हते. तेव्हा ती थांबविण्याविषयी विदूषकाने केलेली

विनंती तो मान्य करतो व त्याप्रमाणे सेनापतीस आज्ञा करतो. नंतर एका झाडाच्या छायेत ते वसले असता विदूषकाने विचारल्यावरून राजा त्याला शकुंतलेच्या जन्माविषयीची हकीकत सांगतो. नंतर कोणत्या मिषाने पुन: आश्रमात जावे, याचा विचार राजा करीत असता दोन ऋषिकुमार प्रवेश करतात व 'कण्वमुनि येथे नसल्यामुळे राक्षस यज्ञकर्मात विघ्ने आणतात, तरी आपण काही दिवस आश्रमात राहावे', अशी आश्रमवासी जनांची प्रार्थना राजाला कळवतात. राजा ती आनंदाने मान्य करतो. ते गेल्यावर 'शकुंतला पाहण्याची तुला उत्सुकता आहे काय ?' असे तो विदूषकाला विचारतो. त्यावर तो उत्तर करतो, 'प्रथम तुडुंब भरून वाहत होती ; पण राक्षसांच्या वृत्तान्ताने आता तिचा थेंबही उरला नाही.' इतक्यात राजधानीहून एक दूत येतो व 'आजपासून चौथ्या दिवशी पुत्रपिण्डपालन नामक व्रताचे पारणे आहे, त्यावेळी चिरंजीवाने जरूर परत यावे', असा राजमातेचा निरोप कळवितो. तेव्हा काय करावे, असा राजाला पेच पडतो. शेवटी, 'माझ्या मातेने तुला पुत्रवत् मानले आहे, म्हणून तू परत जा व मी तपस्विकार्यात गुंतलो आहे, हे तिला सांगून तिचे पुत्रकृत्य पार पाड', असे तो विदूषकास सांगतो. घरी गेल्यावर हा कदाचित् शकुंतलेची वार्ता अन्त:पुरातील स्त्रियांस सांगेल, असे वाटून राजा विदूषकास म्हणतो, 'ऋषींच्या शब्दाला मान देण्याकरिता मी आश्रमात जात आहे. त्या तापसकन्येविषयी मला मुळीच अभिलाषा नाही. मी मागे थट्टेने बोललो ते खरे समजू नको हो !' (अंक २). यानंतर महिना-पंधरा दिवसांनी तिसऱ्या अंकातील वृत्तान्त घडलेला दिसतो. प्रथम एक लहान प्रवेश घातला आहे, त्यातील शिष्याच्या भाषणावरून राजाच्या सांनिध्याने यज्ञकर्मे निर्विघ्नपणे पार पडली आहेत, असे आपणांस समजते. नंतर राजा प्रवेश करतो आणि मदन व चंद्र यांच्याकडून आपणास होणारा त्रास वर्णन करतो. या मध्याह्नाच्या वेळी बहुतकरून शकुंतला मालिनी नदीच्या तीरी सखींबरोबर बोलत बसली असेल, असे वाटून तो तिकडे जातो. तो लतागृहाजवळ तिची पावले उमटलेली त्याला दिसतात. पुढे जाऊन पाहतो तो त्याला पुष्पांनी आच्छादिलेल्या एका शिळेवर बसलेली व सखींबरोबर बोलत असलेली शकुंतला दिसते. तेव्हा त्यांचे

विश्रंभालाप ऐकण्यासाठी तो तेथेच झाडाआड उभा राहतो. दुष्यंताला पाहिल्या दिवसापासून शकुंतला खंगत चालली होती, तेव्हा तिचा विकार प्रेममूलकच असावा, असे वाटून अनसूया तिला म्हणते, 'शकुंतले ! आम्हांला प्रेमविषयक गोष्टी कळत नाहीत, तरी इतिहासग्रंथांत मदनार्त जनांची जशी अवस्था वर्णिली आहे, तशी तुझी स्थिति दिसते. सांग बरे, तुला कशामुळे हा ताप होत आहे ? विकाराची चिकित्सा केल्याशिवाय उपाय योजणे बरे नव्हे.' तरीही लज्जेने शकुंतला काही बोलत नाही. प्रियंवदाही तिला आपले मनोगत सांगण्याविषयी आग्रह करते. तेव्हा शकुंतला म्हणते, 'सख्यांनो ! तो तपोवनाचे रक्षण करणारा राजा मला दिसला तेव्हापासून तद्विषयक अभिलाषाने माझी अशी अवस्था झाली आहे. तेव्हा तुमचीही या गोष्टीस संमति असल्यास त्यांना माझी दया येईल असे करा. नाही तर मला तिलोदक द्यावयास तयार व्हा !' तिच्या सख्यांना, पौरवश्रेष्ठ राजर्षीवर तिचे प्रेम बसले आहे, हे समजल्यावर आनंद होतो. राजाचीही प्रेमाने तिच्यासारखीच अवस्था झाली आहे, हे प्रियंवदेने पाहिले होते. म्हणून ती शकुंतलेला म्हणते, 'तू एक मदनलेख रचून या कमलपत्रावर नखांनी कोरून लिही. मी तो देवाच्या प्रसादाच्या रूपाने फुलांत लपवून त्याच्या हाती पोचवीन.' नंतर शकुंतला आपला मदनताप व्यक्त करणारी एक प्राकृत गाथा रचून कमलपत्रावर कोरते व ती सख्यांस वाचून दाखविते. ती ऐकून राजा पुढे होतो व मदनाने आपली स्थिति जास्तच वाईट केल्याचे वर्णन करतो. नंतर प्रियंवदा त्याला शकुंतलेचा स्वीकार करण्याविषयी विनंती करते. त्यावर शकुंतला म्हणते, 'प्रियंवदे ! अन्त:पुरातील स्त्रियांच्या विरहाने उत्कंठित झालेल्या राजर्षीला का उगीच अडवतेस ?' अनसूयाही म्हणते, 'मित्रा ! राजेलोकांना अनेक स्त्रिया असतात. म्हणून आमच्या प्रियसखीच्या आप्तांना दु:ख होणार नाही अशा रीतीने तू तिला वागवावे.' यावर राजा उत्तर करतो, 'मला स्त्रिया अनेक असल्या तरी समुद्रवलयांकित पृथ्वी व ही तुमची सखी यांवरच माझ्या कुलाची प्रतिष्ठा अवलंबून राहील.' या आश्वासनाने त्या दोघींस समाधान वाटते व एका हरिणबालकाला त्याच्या मातेकडे पोचविण्याच्या मिषाने त्या तेथून निघून जातात. त्यांच्या मागून शकुंतलाही जाऊ लागते, पण

राजा तिला अडवितो व 'गान्धर्व विधीने पुष्कळ क्षत्रियकन्यांचे विवाह झाले आहेत, तेव्हा तुला आपल्या वडील माणसांची भीति बाळगण्याचे कारण नाही', असे सांगून तिची समजूत घालू लागतो. तितक्यात 'हे चक्रवाकवधू, आपल्या सहचराचा निरोप घे. रात्र जवळ आली', असे शब्द ऐकू येतात. तेव्हा शकुंतला राजाला 'गौतमी आत्या माझ्या समाचारार्थ येत आहे, तरी आपण झाडाआड लपावे', असे सुचविते. नंतर प्रियंवदा व अनसूया यांसह गौतमी प्रवेश करते व शकुंतलेच्या प्रकृतीबद्दल विचारपूस करून तिच्या मस्तकावर दर्भोदक शिंपडते. त्यावेळी सायंकाळ झाली असल्याने ती शकुंतलेलाही आपल्या-बरोबर घेऊन जाते. जाताना शकुंतला 'हे संतापहारक लताकुंजा ! पुनरपि उपभोग घेता यावा म्हणून मी आता तुझा निरोप घेते', असे म्हणून दुष्यंताला पुन: आपली गाठ घेण्याविषयी सुचविते. तितक्यात 'राजा ! सायंकाळच्या यज्ञकर्माच्या वेळी वेदीच्या सभोवार आकाशस्थ राक्षसांच्या भयंकर छाया दिसत आहेत', असे शब्द राजाला ऐकू आल्यामुळे तोही यज्ञरक्षणार्थ निघून जातो (अंक ३). चौथ्या अंकाच्या आरंभी एक विष्कंभक घातला आहे. त्यात शकुंतलेच्या सौभाग्यदेवतेच्या पूजेकरिता अनसूया व प्रियंवदा फुले वेचीत असलेल्या दृष्टीस पडतात. त्यांच्या भाषणावरून आपणांस असे कळते की, यज्ञ समाप्त झाल्यामुळे ऋषींच्या अनुज्ञेने राजा आपल्या राजधानीस परत गेला आहे. इतक्यात 'हा मी आलो आहे हो !' असे आश्रमाजवळ एका अतिथीने उच्चारलेले शब्द त्यांस ऐकू येतात. शकुंतला आश्रमात असली तरी शून्यमनस्क आहे, म्हणून अतिथीच्या सत्काराकरिता त्या जावयास निघतात, तोच 'ज्याच्याविषयी एकाग्रतेने विचार करीत असल्यामुळे माझ्यासारख्या तपोधनाचे आगमन तुझ्या लक्षात येत नाही, तो तुझा प्रियकर तू आठवण करून दिलीस तरी तुला ओळखणार नाही', असा त्याचा भयंकर शाप ऐकू येतो. पुढे जाऊन पाहतात, तो तो कोपिष्ठ ऋषि दुर्वास ! तेव्हा त्याला प्रसन्न करण्याकरिता प्रियंवदा जाते. 'माझा शाप अन्यथा होणार नाही, पण खुणेची वस्तु दाखविल्यावर त्याची निवृत्ति होईल', असे त्याने सांगितल्यावर त्यांचे मन थोडे स्वस्थ होते. कारण शकुंतलेजवळ दुष्यंताची अंगठी होतीच. तिच्या

योगे शापाची बाधा होणार नाही, असे त्यांस वाटते. शकुंतला जात्याच कोमल मनाची असल्यामुळे ह्या शापवृत्तान्ताने तिच्या मनाला मोठा धक्का बसेल, असे वाटून त्याविषयी त्या तिच्याजवळ काही बोलत नाहीत. यानंतर काही महिने झाल्यावर मुख्य अंकातील प्रसंग घडलेला आहे. 'माझ्या अंगठीवरचे एक एक अक्षर तू मोजीत जा सर्व अक्षरे संपण्याच्या आत तुला घेऊन जाण्यास मी माणसे पाठवीन', असे वचन राजाने शकुंतलेस दिले होते. पण कित्येक महिने गेले तरी तो चिठ्ठीही पाठवीत नाही ; त्यामुळे काय करावे या विवंचनेत अनसूया असता प्रियंवदा प्रवेश करून म्हणते, "प्रवासाहून परत आल्यावर कण्वबाबा अग्निगृहात गेले तोच आकाशवाणीने त्यांना शकुंतलेला दुष्यंतापासून गर्भ राहिल्याचे कळविले. तेव्हा 'वत्से ! सच्छिष्याला दिलेल्या विद्येप्रमाणे तुझ्याविषयी आता मला काळजी राहिली नाही' असे बोलून त्यांनी आपला आनंद व्यक्त केला. ते आजच ऋषींबरोबर तिला सासरी पाठविणार आहेत. तर चल तिच्या पाठवणीची तयारी करावयाला." नंतर त्या शकुंतलेला तापसी आशीर्वाद देत होत्या तेथे जातात व बकुलमालेसारखे आश्रमात मिळणारे साधे अलंकार तिच्या अंगावर घालू लागतात. तिच्या सौंदर्याला ते अनुरूप नाहीत, हे ध्यानात येऊन त्यांना वाईट वाटते, तो तपोवनातील वनदेवतांनी दिलेले रेशमी वस्त्र, लाक्षाराग व विविध प्रकारची भूषणे दोन ऋषिकुमार त्यांस आणून देतात. 'आम्ही स्वत: असे अलंकार घातले नाहीत ; तथापि चित्रकलेचे आम्हांस ज्ञान असल्याने तदनुरोधाने आम्ही हे तुझ्या अंगावर घालतो', असे त्या शकुंतलेस म्हणतात. इतक्यात स्नान करून कण्व महर्षि तेथे येतात. शकुंतला आज सासरी जाणार, या विचाराने त्यांस अत्यंत वाईट वाटते. ते म्हणतात—

यास्यत्यद्य शकुन्तलेति हृदयं संस्पृष्टमुत्कण्ठया
कण्ठः स्तम्भितबाष्पवृत्तिकलुषश्चिन्ताजडं दर्शनम्।
वैक्लव्यं मम तावदीदृशमहो स्नेहादरण्यौकसः
पीडयन्ते गृहिणः कथं नु तनयाविश्लेषदुःखैर्नवैः॥ शाकु०. ४, ६.

'आज शकुंतला जाणार आहे, या विचाराने माझे हृदय दु:खाने भरून आले आहे, कंठ सद्गदित झाला आहे, चिंतेने दृष्टि जड झाली आहे.

अरण्यवासी मी जर कन्याप्रेमाने इतका व्याकुळ होत आहे, तर संसारी लोकांची प्रथम कन्याविरहाने कशी बरे अवस्था होत असेल!' शकुंतला त्यांच्या पायां पडते तेव्हा 'तू भर्त्याला अत्यंत प्रिय हो व तुला चक्रवर्ती पुत्र होवो!' असा ते तिला आशीर्वाद देतात. अग्नींना प्रदक्षिणा केल्यावर ते सर्व मार्ग चालू लागतात. तेव्हा तपोवनतरूंना उद्देशून कण्व ऋषि म्हणतात—

पातुं न प्रथमं व्यवस्यति जलं युष्मास्वपीतेषु या
नादत्ते प्रियमण्डनापि भवतां स्नेहेन या पल्लवम्।
आद्ये वः कुसुमप्रसूतिसमये यस्या भवत्युत्सवः
सेयं याति शकुन्तला पतिगृहं सर्वैरनुज्ञायताम्॥ शाकु० ४, ९.

'तुम्हांला पाणी पाजल्याशिवाय जी स्वतः पाणी पिण्याचे मनात आणीत नाही, भूषणांची आवड असूनही जी तुमच्या प्रेमास्तव पल्लव खुडीत नाही, तुम्हांला प्रथम बहर येतो तेव्हा जिला अत्यानंद होतो, अशी ही शकुंतला पतिगृही जात आहे. सर्वांनी तिला अनुज्ञा द्यावी.' तेव्हा प्रत्यक्ष तपोवनदेवता तिला आशीर्वाद देतात. ती चालली असता सर्व तपोवन दुःखाने व्याकुळ होते. हरणांच्या मुखातून दर्भाचे घास गळून पडतात, मोर आपले नृत्य थांबवितात, लताही शुष्कपर्णांच्या मिषाने अश्रु गाळताहेत असे दिसते. शकुंतला आपल्या वनज्योत्स्ना नामक लताभगिनीस भेटते, गर्भिणी मृगी प्रसूत होईल तेव्हा आपणास कळविण्याबद्दल कण्व ऋषींस सांगून ठेवते आणि आपल्या वस्त्रास बिलगणाऱ्या व स्वतः वाढविलेल्या पोरक्या हरिण शावकाची समजूत घालते. नंतर ते सर्व क्षीरवृक्षाच्या छायेखाली जातात. तेव्हा कण्व आपला पुढील संदेश सांगतात—

अस्मान् साधु विचिन्त्य संयमधनानुच्चैःकुलं चात्मनः
त्वय्यस्याः कथमप्यबान्धवकृतां स्नेहप्रवृत्तिं च ताम्।
सामान्यप्रतिपत्तिपूर्वकमियं दारेषु दृश्या त्वया
भाग्यायत्तमतः परं न खलु तद्वाच्यं वधूबन्धुभिः॥ शाकु० ४, १७.

'आम्ही संयमधन आहो, तुझे कुळ उच्च आहे व बांधवांच्या प्रोत्साहनाशिवाय हिने स्वतःच आपले हृदय तुला अर्पण केले आहे, ह्या गोष्टी ध्यानात घेऊन इतर स्त्रियांप्रमाणे तू हिला वागवावे. याच्या पलीकडच्या

गोष्टी दैवावर अवलंबून आहेत. त्यांचा वधूच्या बांधवांनी उच्चार करू नये.' नंतर शकुंतलेसही ते एका श्लोकात सुंदर उपदेश करतात. तो श्लोक मागे पहिल्या प्रकरणात दिला आहे (पृ. ३६ पहा). 'कदाचित् पतीला तुझी ओळख पटली नाही तर ही अंगठी दाखव,' असे तिच्या सख्यांनी सांगताच शकुंतलेच्या हृदयात धस्स होते. तेव्हा, 'भिण्याचे काही कारण नाही, अतिस्नेहः पापशङ्की', असे बोलून त्या तिची काळजी दूर करतात. 'सूर्य वर आला आहे; आता पित्याला परत जाण्याला सांग,' असे गौतमी सुचविते. तेव्हा शकुंतलेला पितृवियोग दुःसह होऊन ती विचारते, 'बाबा, पुनः केव्हा मला हे तपोवन दृष्टीस पडेल ?' त्यावर कण्व ऋषि म्हणतात—

भूत्वा चिराय चतुरन्तमहीसपत्नी
दौष्यन्तिमप्रतिरथं तनयं निवेश्य।
भर्त्रा तदर्पितकुटुम्बभरेण सार्धं
शान्ते करिष्यसि पदं पुनराश्रमेऽस्मिन् ॥

शाकु० ४, २०.

'पुष्कळ काळ समुद्रवलयांकित पृथ्वीची सपत्नी (सम्राज्ञी) झाल्यावर ज्याला कोणीही प्रतिस्पर्धी उरला नाही, अशा आपल्या पुत्राला गादीवर बसवून व त्यावर कुटुंबाचा भार सोपवून मग तू आपल्या पतिसमागमे या शांत आश्रमात परत येशील.' तेव्हा शकुंतला म्हणते, 'बाबा, तपश्चर्या करून तुमचे शरीर कृश झाले आहे. तेव्हा माझ्याकरिता कष्टी होऊ नका.' शकुंतला व गौतमी शिष्यांबरोबर निघून जातात, तेव्हा कण्व ऋषि म्हणतात—

अर्थो हि कन्या परकीय एव तामद्य संप्रेष्य परिग्रहीतुः।
जातो ममायं विशदः प्रकामं प्रत्यर्पितन्यास इवान्तरात्मा ॥

शाकु० ४, २.

'कन्या हे परक्याचे धन होय, म्हणून तिला पतीकडे पाठविल्यावर एखादी ठेव मालकाला परत केल्याप्रमाणे माझे मन स्वस्थ झाले आहे' (अंक ४). कन्येला पतिगृही पाठविताना कण्वांना झालेला शोक, त्यांनी तिला केलेला बहुमूल्य उपदेश, तिच्या भावी ऐश्वर्याचे रम्य चित्र व ती गेल्यावर त्यांना वाटलेले समाधान ही ज्यांत वर्णन केलेली आहेत, ते वर

उद्धृत केलेले चार श्लोक सर्व 'शाकुंतला'त उत्कृष्ट गणले जातात. पाचव्या अंकाचे स्थळ दुष्यंताचा राजवाडा हे आहे. राजा व विदूषक बोलत बसले असता हंसपदिका पुढील आशयाचे एक गीत गाते: 'भ्रमरा! तू नव्या नव्या मधाचा लोभी आहेस. आम्रमंजरीचे तसे चुंबन घेऊन आता केवळ कमलनिवासाने संतुष्ट होणारा तू तिला कसा अगदी विसरलास बरे?' आपण हंसपदिकेवर एकदा प्रेम केले होते, म्हणून आता वसुमती राणीचा उल्लेख करून ती आपणास टोचून बोलत आहे, असे राजाच्या ध्यानात येते. तेव्हा 'आम्हांला चांगला टोमणा मारलास', असे तिला कळविण्यास राजा विदूषकास तिजकडे पाठवितो. त्या गीताच्या अर्थाचा विचार करीत असता राजाच्या मनाला कसली तरी हुरहुर लागून राहते, पण तिचे कारण त्याला समजत नाही. याप्रमाणे तो सचिंत बसला असता कंचुकी 'कण्व ऋषींचा निरोप घेऊन स्त्रियांसहित काही तपस्वी आले आहेत', अशी वर्दी देतो. तेव्हा राजा आपल्या उपाध्यायास त्यांचा सत्कार करून अग्निगृहात घेऊन येण्यास सांगतो व स्वतः तेथे जाऊन त्यांची वाट पाहत राहतो. ऋषींबरोबर आलेल्या अवगुण्ठित शकुंतलेच्या रम्य आकृतीने राजाची दृष्टि आकर्षित होते; तथापि 'परस्त्रीकडे निरखून पाहणे योग्य नाही' असे म्हणून तो मनःसंयम करतो. त्याने नमस्कार केल्यावर त्यास आशीर्वाद देऊन शार्ङ्गरव कण्वांचा पुढील निरोप सांगतो: 'एकांती तू माझ्या मुलीचे पाणिग्रहण केलेस, त्याला मी संमति दिली व त्यामुळे मला आनंदही झाला आहे; कारण तुम्ही दोघेही परस्परानुरूप आहा. तेव्हा आता या आपल्या गर्भवती पत्नीचा स्वीकार कर.' राजाचे मन दुर्वासशापाने ग्रस्त झाल्यामुळे त्याला शकुंतलेची मुळीच आठवण होत नाही; म्हणून तो म्हणतो, 'काय? हिचे मी पूर्वीच पाणिग्रहण केले आहे?' त्यावर 'कृतकर्माचा पश्चात्ताप झाल्यामुळे तू धर्माची अवहेलना करीत आहेस काय? कारण बहुधा ऐश्वर्याने उन्मत्त झालेल्या लोकांत अशा तऱ्हेचे विकार दृष्टीस पडतात', असे शार्ङ्गरव टोचून बोलतो. गौतमीही त्याला ओळख पटण्याकरिता शकुंतलेचे अवगुंठन दूर करते. शकुंतलेचे सौंदर्य पाहून राजा चकित होतो, तरी अधर्मभीतीने तो तिचा स्वीकार करण्यास तयार होत नाही. तेव्हा शार्ङ्गरव रागावून म्हणतो,

'एखाद्या चोराला त्याने चोरलेले धन बक्षीस द्यावे, त्याप्रमाणे तू भ्रष्टविलेली आपली कन्या मुनींनी तुला अर्पण केली आहे. तू त्यांचे चांगलेच उपकार फेडीत आहेस!' तरी राजा कबूल होत नाही. तेव्हा त्याची खात्री करण्याकरिता अंगठी दाखवावी म्हणून शकुंतला पाहू लागते, पण ती बोटात दिसत नाही. तेव्हा सहजच गौतमी म्हणते, 'शक्रघाटावर शचीतीर्थाला नमस्कार करताना तुझ्या बोटातून ती गळून पडली असावी.' त्यावर राजा 'हाच तो स्त्रियांचा हजरजबाबीपणा!' असा टोमणा मारतो. नंतर आश्रमात घडलेल्या गोष्टी याला सांगितल्या तर याची खात्री पटेल, असे वाटून शकुंतला भोळेपणाने तसे करते, पण त्याला ते सर्व कारस्थान असावे, असे वाटते. 'तपोवनात वाढलेल्या या शकुंतलेला लबाडी कशी ती मुळीच माहीत नाही', असा गौतमीने निर्वाळा देताच राजा म्हणतो, 'हे तापसवृद्धे!

स्त्रीणामशिक्षितपटुत्वममानुषीषु
सन्दृश्यते किमुत याः प्रतिबोधवत्यः।
प्रागन्तरिक्षगमनात्स्वमपत्यजात–
मन्यैर्द्विजैः परभृताः खलु पोषयन्ति॥

शाकु० ५, २२.

'मानवेतर प्राण्यांमध्येही स्त्रियांचा नैसर्गिक धूर्तपणा दिसून येतो. मग ज्ञात्या स्त्रियांविषयी तर विचारावयासच नको! आकाशात उडून जाण्यापूर्वी कोकिळा दुसऱ्या पक्ष्यांकडून आपल्या पिलांचे पोषण करवितात.' राजाने कोकिळांचा दृष्टांत आपल्या विधानाला पोषक म्हणून सहज दिला होता. पण त्याच्या श्लोकातील अन्तरिक्षगमन, द्विज व परभृत हे शब्द द्व्यर्थी असल्यामुळे 'परोपजीवी अप्सरा आपली मुले अन्य ब्राह्मणांकडून पोसवितात,' असाही ध्वनि निघत होता. राजा अशा रीतीने आपल्या मातेची निंदा करीत आहे, असे साहजिकच वाटून शकुंतलेचा क्रोध अनावर होतो. ती उसळून म्हणते, 'अनार्या! तू आपल्यावरून दुसऱ्याची पारख करीत आहेस. गवताने आच्छादिलेल्या कूपासारखा धर्माचे पांघरूण घेतलेला तू! तुझी बरोबरी कोण करील?' तिचा अकृत्रिम कोप पाहून राजाच्या मनात संदेह उत्पन्न होतो, पण खात्री होत नाही. तेव्हा 'ही तुझी पत्नी आहे. हिला स्वीकार, नाही तर

टाकून दे ; आम्ही चाललो' असे म्हणून ते तापसकुमार चालू लागतात. तेव्हा शकुंतलाही त्यांच्याबरोबर जाऊ लागते. तेव्हा शार्ङ्गरव तिच्या अंगावर ओरडतो, 'ए ढालगज पोरी ! हवे तसे वागतेस होय ?' शकुंतला भीतीने कापू लागते, तेव्हा पुरोहित एक तोड सुचवितो. तो म्हणतो, 'महाराज ! आपणांस प्रथमच चक्रवर्ती पुत्र होईल, असा साधुपुरुषांनी आशीर्वाद दिला आहे ; तेव्हा हिला प्रसूतीपर्यंत माझ्या घरी राहू द्या. हिचा मुलगा चक्रवर्तिचिन्हांनी युक्त असल्यास आदरपूर्वक हिचा स्वीकार करावा, नाही तर हिला पित्याकडे पाठवावे.' राजा त्याला कबूल होतो. नंतर ते सर्व जातात. थोड्या वेळाने पुरोहित प्रवेश करून म्हणतो, 'महाराज, कण्वशिष्य गेल्यावर ती आपल्या दैवाला दोष देत रडू लागली. इतक्यात अप्सरस्तीर्थाजवळ एक स्त्रीरूपी तेजस्वी मूर्ति आली व तिला घेऊन अदृश्य झाली.' 'पूर्वीच आम्ही त्या वस्तूचा त्याग केला आहे. आता त्याबद्दल व्यर्थ तर्क कशाला?' असे म्हणून राजा विश्रांतीकरिता निघून जातो (अं. ५). यानंतर थोड्याच दिवसांनी घडलेल्या गोष्टी सहाव्या अंकात दाखविल्या आहेत. आरंभीच्या प्रवेशकात नगराधिकारी राजश्यालक व दोन शिपाई एका कोळ्याला राजाची अंगठी चोरण्याच्या आरोपावरून मुसक्या बांधून आणतात. 'तुला ही कोठे सापडली', असे विचारताच—

कोळी : मी शक्रघाटाजवळ राहणारा कोळी आहे.

शिपाई : अरे चोरा, आम्ही काय तुझी जात विचारली होती ?

राज्यश्यालक : सूचका, याला सर्व क्रमाने सांगू दे. मध्येच अडथळा आणू नको.

दोन्ही शिपाई : जशी साहेबांची आज्ञा.

कोळी : जाळे, गळ वगैरे टाकून मी मासे पकडतो व कुटुंबाचे पोट भरतो.

श्यालक : फारच चांगला धंदा !

कोळी : महाराज ! असे म्हणू नका. निंद्य असले तरी जातिप्राप्त कर्म टाकू नये. ब्राह्मण स्वभावाने दयार्द्र असला तरी यज्ञकर्मात पशुहिंसा करण्यापुरता निष्ठुर बनतो.

नंतर, 'मी एके दिवशी पकडलेला तांबडा मासा चिरला तो आत ही अंगठी सापडली. ती विकण्याकरिता मी लोकांना दाखविली, तो आपण

मला पकडले ', असे तो त्यास सांगतो. त्यावर श्यालक ती अंगठी घेऊन राजाकडे जातो. ती पाहून राजाला शकुंतलेची आठवण होते, म्हणून तो त्या अंगठीच्या मूल्याइतके पैसे कोळचाला देण्याची आज्ञा करतो. घटकेपूर्वी कोळचाला वधस्तंभाकडे नेण्याची तयारी करणारे शिपाई त्याला बक्षीस मिळालेले पाहताच त्याचे जिवलग दोस्त बनतात व आपली मैत्री मद्यपानाने दृढ करण्याकरिता गुत्त्याकडे जातात. नंतर मेनकेची मैत्रीण सानुमती नामक अप्सरा राजकुलात काय चालले आहे, हे पाहण्यासाठी राजवाडचाच्या प्रमदवनात प्रवेश करते. तिला वसंत ऋतु सुरू झाला तरी राजवाडचात कोठेही उत्सवाचे चिन्ह दिसत नाही म्हणून आश्चर्य वाटते. इतक्यात दोन उद्यानपालिका प्रवेश करतात व नवीन आलेला आंब्याचा मोहोर खुडून कामदेवाला अर्पण करतात, तोच कंचुकी प्रवेश करून त्याबद्दल त्यांना रागे भरतो. 'आम्ही नुकत्याच परगावाहून आलो आहो, त्यामुळे महाराजांनी वसंतोत्सवाला मनाई केल्याचे माहीत नव्हते. पण तिचे कारण काय ?' असे त्यांनी विचारताच कंचुकी म्हणतो, 'महाराजांना अंगठी दिसल्याबरोबर शकुंतलेशी आपण पूर्वी विवाह केला होता याची आठवण झाली व मोहाने आपण तिचा त्याग केला, याबद्दल त्यांना पश्चात्ताप झाला. तेव्हापासून त्यांना रम्य वस्तु दृष्टिसमोर नकोशा झाल्या आहेत व रात्रभर त्यांचा डोळचाला डोळा लागत नाही. मनाच्या अस्वस्थतेमुळे त्यांनी उत्सवाला बंदी केली आहे.' नंतर त्या आपल्या कामाला निघून जातात व राजा विदूषकासह प्रवेश करतो. 'गेल्या रात्री फार जाग्रण झाल्यामुळे आज न्यायासनावर वसून काम पाहण्याचे आमच्या मनात नाही ; तरी पौरजनांचे काही काम तुम्ही पाहिले असल्यास लिहून पाठवावे ', असा निरोप अमात्यास सांगावयास राजा प्रतिहारीला पाठवितो व कंचुकीलाही आपल्या कामासाठी जावयास सांगतो. नंतर तो विदूषकासह मनोविनोदनार्थ माधवीमंडपात जातो. 'मित्रा, आता मला शकुंतलेविषयी सर्व स्मरते. ती आली त्या दिवशी तू मजजवळ नव्हतास ; पण पूर्वी कधीही तिच्याबद्दल तू चकारशब्द काढला नाहीस हे कसे ? माझ्यासारखी तुलाही भूल पडली काय ?', असे राजाने विचारताच विदूषक म्हणतो, " मला सर्व आठवत होते. पण सर्व सांगून झाल्यावर

'ही सर्व थट्टा बरे ! यातले काहीही खरे नाही', असे आपणच म्हणालां. मीही मठ्ठ बुद्धीचा ! तेव्हा आपले बोलणे मला खरे वाटले. अथवा होणार ते चुकत नाही हेच खरे." शकुंतलेला तिच्या मातेच्या--मेनकेच्या--सखींनी उचलून नेले असावे, असे राजास वाटते. शकुंतलेच्या अंगुलीवर राहण्याचे भाग्य अंगठीला लाभले असताही ती गळून पडली यावरून तिचीही पुण्याई संपुष्टात आली असावी, असे त्यास वाटते. इतक्यात शकुंतलेचे चित्र काढलेला फलक घेऊन एक दासी येते. राजाचे चित्र-कलानैपुण्य पाहून जवळच अदृश्यपणे उभी असलेल्या सानुमतीला आश्चर्य वाटते. राजाने त्या फलकावर तीन स्त्रियांची चित्रे काढली होती. त्यातली कोणती शकुंतला, असे विचारताच विदूषक उत्तर करतो, 'मला वाटते जलसेकामुळे ज्याचे कोमल पल्लव टवटवीत दिसत आहेत, अशा आम्रवृक्षाजवळ वेणीची गाठ सैल झाल्यामुळे जिच्या केशातून फुले गळली आहेत, जिच्या मुखावर घर्मबिंदु दिसत आहेत, जिचे भुज विशेषेकरून गळलेले दिसत आहेत, अशी किंचित थकलेली ही शकुंतला व दुसऱ्या तिच्या सख्या.' त्या चित्रात शकुंतलेच्या मुखाभोवती घिरट्या घालून भ्रमर तिला त्रास देत होता, असे दाखविले होते. तो खरो-खरचाच भ्रमर आहे, असे वाटून राजा त्याला उद्देशून बोलू लागतो. तेव्हा विदूषक म्हणतो, 'महाराज, हे चित्र आहे चित्र !' तेव्हा सानुमती म्हणते, 'खरेच ! हे चित्र आहे हे मलाही आताच समजले. मग चित्रित केलेला प्रसंग स्वतः अनुभविलेल्याची स्थिति काय वर्णावी !' इतक्यात दासी प्रवेश करून म्हणते, "मी रंगांची पेटी आणीत होते, तो वाटेत वसुमती राणीसाहेबांनी मला पाहिले आणि माझ्या हातून पेटी काढून घेऊन, 'मी स्वतः ही नेऊन देते' असे म्हणाल्या. त्या इकडेच येत आहेत." ते ऐकताच राजा विदूषकाजवळ चित्र फलक देऊन त्याला मेघप्रतिच्छन्द प्रासादात पाठवितो. इतक्यात प्रतिहारी अमात्याकडून कागदपत्र घेऊन येतो, त्यात 'जलमार्गाने व्यापार करणारा धनमित्र नावाचा व्यापारी जहाज फुटल्यामुळे बुडून मेला. तो निपुत्रिक असल्यामुळे त्याची सर्व संपत्ति सरकारजमा व्हावी', असे अमात्याने लिहून पाठविले होते. त्यावर, त्याची एखादी स्त्री गरोदर आहे काय, याची चौकशी करण्यास राजा सांगतो. तसे असल्याचे प्रतिहारीकडून समजल्यावर

तो त्या गर्भाला पित्याची सर्व संपत्ति द्यावी, अशी आज्ञा करतो व 'प्रजेमध्ये कोणाचा संबंधी मृत झाला असल्यास त्याच्या जागी पापकर्माखेरीज इतर बाबतीत दुष्यंताला मानावे' अशी द्वाही फिरविण्यास सांगतो. आपण स्वतः निपुत्रिक असल्याने आपल्या मृत्यूनंतर पितरांना पिंड मिळणार नाहीत, या कल्पनेने त्याला अत्यंत शोक होतो. इतक्यात मेघच्छन्द प्रासादाच्या गच्चीवरून मदतीकरिता ओरडणाऱ्या विदूषकाचा स्वर ऐकू येतो. कोणी राक्षसाने त्याला पकडले असावे, असे वाटून राजा बाण मारणार, तोच इंद्राचा सारथि मातलि प्रवेश करून म्हणतो, 'महाराज ! मला इंद्राने असुरयुद्धात साहाय्यार्थ आपणांकडे पाठविले आहे. मी येथे आलो तेव्हा आपण शोकमग्न दिसलां; म्हणून आपणांस राग आणण्यासाठी मी विदूषकाला मार दिला.' नंतर अमात्यास राज्यकारभार पाहण्यास सांगून राजा मातलिबरोबर निघून जातो (अंक ६). सातव्या अंकाच्या आरंभी रथस्थ राजा व मातलि स्वर्गातून खाली उतरत आहेत, असा प्रवेश घातला आहे. इंद्राने जाण्याविषयी मला परवानगी दिली त्या वेळी त्याने माझा अतिशय गौरव केला, असे राजाने म्हणताच मातलि म्हणतो, 'पूर्वी नरसिंहाच्या नखांनी व आता आपल्या बाणांनी सुखोपभोगात रत असलेल्या इंद्राचे सर्व शत्रु नष्ट केले. तेव्हा इंद्राच्या कोणत्या सन्मानाला आपण पात्र नाही?' मातलीकडून आपण हेमकूट पर्वतावर सुरासुरांच्या पित्याच्या—मारीच ऋषींच्या—आश्रमाजवळ आलो आहो, असे समजल्यावर त्यांना नमस्कार करण्यास राजा तेथे उतरतो. नंतर राजाच्या आगमनाची वार्ता कळविण्याकरिता मातलि पुढे जातो व राजा तेथेच झाडाखाली बसतो. तेथे त्याला बाहुस्पंदनाचा शुभ शकुन होतो. इतक्यात सिंहिणीचे दूध अर्धवट प्यालेल्या सिंहशावकाला खेळण्याकरिता त्याच्या मातेपासून बलात्काराने ओढणारा एक बालक व त्याचे निवारण करणाऱ्या दोन तापसी त्याच्या दृष्टीस पडतात. त्यांच्या भाषणावरून ऋषींनी त्याचे 'सर्वदमन' असे सार्थ नाव ठेवले असल्याचे राजाला कळते. बालकाला पाहताच राजाच्या मनात पुत्रप्रेम उत्पन्न होते. त्याने सिंहाच्या छाव्याला सोडावे म्हणून तापसी त्याला दुसरे खेळणे देऊ करते. त्याबरोबर 'दे, कुठे आहे ते?' असे म्हणून तो हात पसरतो. त्यावरची चक्रवर्तिचिन्हें राजाला दिसतात.

विशेषत: त्याचा खोडकर स्वभाव पाहून त्याला जवळ घ्यावे, असे राजाला वाटते. तो म्हणतो—

आलक्ष्यदन्तमुकुलाननिमित्तहासै-
रव्यक्तवर्णरमणीयवच:प्रवृत्तीन्।
अङ्काश्रयप्रणयिनस्तनयान्वहन्तो
धन्यास्तदङ्गरजसा मलिनीभवन्ति॥ शाकु० ७, १७

'काही कारण नसता हसल्यामुळे ज्यांचे कळ्यांसारखे दांत किंचित् दिसत आहेत, ज्यांचे बोबडे बोल चित्ताकर्षक वाटतात, पित्याच्या मांडीवर बसण्यासाठी जें अतिशय उत्सुक असतात, अशा धुळीने माखलेल्या बालकांना घेऊन जे मलिन होतात ते धन्य होत!' सर्वदमन आपले ऐकत नाही, असे पाहून तापसी दुष्यंताची मदत मागते. राजाने हाक मारताच सर्वदमन त्याच्याकडे जातो. त्या दोघांच्या चेहऱ्यांतील विलक्षण साम्य पाहून तापसीला आश्चर्य वाटते. तिच्याकडून राजाला कळते की, तो बालक पुरुवंशोत्पन्न आहे व त्याच्या मातेचे अप्सरांशी नाते असल्याने ती त्या आश्रमातच प्रसूत झाली होती. इतक्यात दुसरी तापसी मातीचा रंगीत मोर आणण्यास गेली होती ती परत येऊन म्हणते, 'सर्वदमन, हे शकुंतलावण्य पहा!' सर्वदमन वर्णसादृश्या-मुळे 'शकुंतलेला पहा' असा अर्थ समजतो, तेव्हा तो म्हणतो: 'कुठे आहे माझी आई?' या प्रसंगावरून त्याच्या मातेचे नावही शकुंतलाच आहे, असे राजाला कळते. तथापि नावासारखी नावे पुष्कळ असतात आणि इतरही सादृश्य दिसत असले तरी कदाचित् शेवटी हे सर्व मृग-जलवत् मिथ्या ठरेल, अशी राजाला शंका येते. इतक्यात 'याच्या मनगटावरचा राखीचा ताईत कोठे दिसत नाही', असे तापसी म्हणते; तोच 'सिंहाबरोबर हा दंगामस्ती करीत असता त्याचा ताईत येथे पडला पहा' असे म्हणून तापसी नको म्हणत असता दुष्यंत तो उचलूनही घेतो. दुष्यंताने निषेधाचे कारण विचारल्यावरून ती पुढील हकीकत सांगते: 'भगवान् मारीच ऋषींनी या बालकाच्या जातकर्मसमयी अपराजिता नामक औषधि घालून हा ताईत मनगटावर बांधला होता. याचे मातापिता किंवा आपण स्वत: यांच्याखेरीज दुसऱ्या कोणीही हा भूमीवर पडला असता त्यास हात लावू नये. हात लावल्यास तो सर्प

होऊन डसेल, असे त्यांनी सांगितले होते. याचा प्रत्ययही आम्हांस अनेकदा आला आहे.' या प्रसंगाने तर दुष्यंताचा संशय पूर्णपणे नाहीसा होतो. झालेला वृत्तान्त शकुंतलेला सांगण्यास तापसी निघून जाते. तिच्याबरोबर बालकही जाऊ लागतो, तेव्हा दुष्यंत म्हणतो, 'पुत्रा, थांब, माझ्याबरोबर आईकडे जाशील'. त्यावर 'दुष्यंत माझे बाबा, तुम्ही नव्हे', असे सर्वदमनाचे उत्तर ऐकून राजाची जास्तच खात्री होते. इतक्यात मळके वस्त्र नेसलेली व एकपेडाची वेणी घातलेली शकुंतला प्रवेश करते. पश्चात्तापाने फिकट झालेल्या राजाला ती एकदम ओळखत नाही; पण लौकरच तिची खात्री पटते व ती त्याचा जयजयकार करते. 'कोण ग हा?' असे सर्वदमनाने विचारताच 'वत्सा, तुझ्या दैवाला विचार!' असे म्हणून ती रडू लागते. 'प्रिये, मी तुला टाकून दिले, हे तुझ्या मनाला लागून राहू नये; कारण त्या वेळी माझ्या मनाला काही विलक्षण मोह पडला होता', असे बोलून राजा तिच्या पायां पडतो. शकुंतला त्याला उठविते व ते सर्व मारीच मुनींच्या दर्शनार्थ जातात. मारीच ऋषि व त्यांची पत्नी अदिति त्या दोघांस आशीर्वाद देतात. मारीच ऋषींकडून दुर्वासशापाचा वृत्तान्त कळल्यावर दुष्यंताला आपण दोषमुक्त झाल्याबद्दल आनंद होतो. शकुंतलेसही पतीने आपणास विनाकारण टाकले नव्हते, हे समजल्यावर बरे वाटते. नंतर राजाच्या विनंतीवरून मारीच ऋषि कण्वमुनींना हा सर्व वृत्तान्त कळविण्याकरिता एका ऋषिकुमाराला पाठवितात व दुष्यंताला पत्नी व पुत्र यांसह राजधानीस जाण्यास अनुज्ञा देतात. नंतर भरतवाक्याने नाटक समाप्त होते.

कालिदासाने या नाटकाचे कथानक कोठून घेतले, याविषयी सुदैवाने वादविवाद करण्यास फारशी जागा नाही. अनंत कथारत्नांचा सागर असा जो आपला प्राचीन 'महाभारत' ग्रंथ त्याच्या आदिपर्वात सुमारे तीनशे श्लोकांत शकुंतलेची गोष्ट वर्णिली आहे. तिची व 'शाकुंतला'ची तुलना केल्यास कालिदासाचे अनुपम रचनाकौशल्य व कलाभिज्ञत्व ध्यानात येईल. यास्तव महाभारतातील गोष्ट प्रथम संक्षेपाने दिली आहे.*

* या सारांशाकरिता भांडारकर ओरिएंटल रीसर्च इन्स्टिटयूटने अत्यंत परिश्रमाने संशोधन करून प्रकाशित केलेल्या आदिपर्वाच्या आवृत्तीचा उपयोग केला आहे.

एके दिवशी पुरुकुलोत्पन्न दुष्यंत राजा बरोबर मोठे सैन्य, अमात्य, पुरोहित वगैरे घेऊन शिकारीस गेला. बराच वेळ शिकार केल्यानंतर ते काश्यपाश्रमी पोचले. तपोवनाबाहेर सैन्यास ठेवून व राजचिन्हे अंगावरून उतरून त्याने पुरोहित व अमात्य यांसह आश्रमात प्रवेश केला. थोडे पुढे गेल्यावर अमात्यादिकांस एके जागी सोडून तो एकटाच कण्वाच्या पर्णकुटिकेकडे वळला. त्यावेळी कण्व ऋषि फळे आणण्याकरिता बाहेर गेले होते ; तथापि त्यांची सुंदर कन्या शकुंतला पर्णकुटिकेत होती. तिने त्याचे स्वागत केले. तिला पाहताच राजाच्या मनात कामविकार उत्पन्न झाला. त्याने विचारल्यावरून शकुंतलेने आपला जन्मवृत्तान्त त्याला सविस्तरपणे सांगितला. तेव्हा नानाप्रकारच्या वस्त्रालंकारांचे आमिष दाखवून त्याने तिला आपली पत्नी होण्याबद्दल विनंती केली. 'माझे बाबा फळे आणण्याकरिता बाहेर गेले आहेत, ते घटकाभराने येतील व नंतर मला अर्पण करतील', असे शकुंतलेने सांगून पाहिले. पण राजाने 'गांधर्वविवाह क्षत्रियांस विहित आहे. तू स्वतःचे दान करण्यास समर्थ आहेस', इत्यादि बोलून तिचे मन वळविले ; पण आपली संमति देण्यापूर्वी, 'माझ्यापासून होणाऱ्या मुलाला आपल्या पश्चात् गादी मिळाली पाहिजे', अशी शकुंतलेने अट घातली व ती राजाने मान्य केली. नंतर राजाने तिच्याशी गांधर्वविधीने विवाह केला व थोडा वेळ तिच्या-बरोबर घालविला. शकुंतलेला स्वनगरी नेण्यासाठी मोठे सैन्य पाठ-विण्याचे वचन देऊन (कण्व ऋषि परत आल्यावर आपल्याला शाप देतील या भीतीने) तो तेथून निघून गेला. ऋषि परत आल्यावर शकुंतला लज्जेने त्यांच्यासमोर येईना. तेव्हा त्यांनी अन्तर्ज्ञानाने सर्व गोष्टी जाणून तिचे अभिनंदन केले व तिने मागितलेले वर दिले. वचन दिल्याप्रमाणे दुष्यंताने सैन्य तर पाठविले नाहीच, पण तिच्याबद्दल विचारपूसही केली नाही. कालांतराने शकुंतला आश्रमातच प्रसूत झाली. तिच्या मुलाचे जातकर्मादि संस्कार कण्वांनी केले. तो सहा वर्षांचा झाला नाही तोच व्याघ्रसिंहादि क्रूर पशूंस पकडून आणून त्यांच्याशी खेळत असे. आश्रमस्थ लोकांनी त्याचे नाव सर्वदमन असे ठेवले. बल व पराक्रम यांनी युक्त असल्यामुळे तो युवराज होण्यास योग्य झाला, असे पाहून कण्वांनी शकुंतला व सर्वदमन यांस हस्तिनापुरास पोचविण्यास

शिष्यांस आज्ञा केली. राजदरबारी पोचल्यावर शकुंतलेने मागील प्रसंगाची राजाला आठवण देऊन पुत्राचा स्वीकार करण्याबद्दल विनंती केली. 'तुझ्याबरोबर विवाह केल्याचे मला स्मरत नाही. पाहिजे तर रहा किंवा जा', असे राजाने म्हणताच शकुंतलेला त्याचा अत्यंत संताप आला. ती म्हणाली, "राजा, एखाद्या हलकट माणसासारखा तू काय खोटे बोलत आहेस ! मी म्हणते ते खरे की खोटे, हे तुझ्या मनाला माहीत आहे. पाप करताना आपणाला कोणी पाहत नाही असे पापी मनुष्याला वाटते, पण देव व त्याचा अन्तरात्मा हे सर्व पाहत असतात. भार्येला पुरुषाची अर्धाङ्गी म्हणतात. तिच्या ठिकाणी पुत्ररूपाने तिच्या पतीचा पुन: जन्म होतो. पुत्रापेक्षा अधिक आनंददायक अशी कोणती वस्तु या जगात आहे ?' इत्यादि बोलून त्याचे मन वळविण्याचा तिने यत्न करून पाहिला, पण तो ऐकेना. तेव्हा 'असत्यावर तुझी इतकी प्रीति आहे तर तुझी संगति मला नको. तू याचा स्वीकार केला नाहीस तरी माझा मुलगा अखिल पृथ्वी पादाक्रान्त करील', असे म्हणून ती पुत्रासह चालू लागली. त्याबरोबर आकाशवाणी झाली की, 'दुष्यंता! हा तुझाच मुलगा आहे. याचा स्वीकार कर.' तेव्हा राजा आनंदित होऊन पुरोहित, अमात्य इत्यादिकांस म्हणाला, 'ऐका हे देव-दूताचे भाषण ! मी या मुलाचा पूर्वीच स्वीकार केला असता तर हा जन्माने शुद्ध आहे किंवा नाही, याचा तुम्हांस संशय आला असता.' नंतर तो शकुंतलेला म्हणाला, 'मी असे केले नसते तर कामुकत्वामुळे मी याचा स्वीकार केला असे लोक म्हणाले असते. रागाने तू जे मला अपशब्द बोललीस त्याबद्दल मी तुला क्षमा केली आहे.' नंतर त्याने शकुंतलेला आपली पट्टराणी केली व भरताला युवराजपद दिले.

'महाभारता'तील वरील साधी व वैचित्र्यहीन गोष्ट वाचल्यावर तीतून जगातील एका अत्युत्कृष्ट नाटकाची उत्पत्ति झाली, असे कोणास सांगितले तर खरेही वाटणार नाही. खाणीतून काढलेला ओबडधोबड दगड पाहताच त्यातून पुढे एक अत्यंत रम्य आकृति निर्माण होणार आहे, अशी कल्पना कोणास येते काय ? पण सामान्य जनाच्या चर्मचक्षूंना जे दिसत नाही, ते कलावानाच्या प्रतिभात्मक दिव्यदृष्टिपुढे लपत नाही. व्यासांच्या साध्या साधनसामग्रीत आपल्या प्रतिभेने निर्मिलेला वैचित्र्य-

पूर्ण प्रसंगांचा मालमसाला घातला असता त्यात उत्कृष्ट रसपरिपाक उतरेल, असे कालिदासाला वाटले असावे.* दुसरे असे की, 'महाभारता'तील कथानक फार प्राचीन काळी घडलेले. समाजाच्या प्राथमिक अवस्थेत त्यातील काही प्रसंग व विचार असंभाव्य व अनुचित वाटले नसले तरी कालिदासकालीन सुसंस्कृत समाजाला ते पटले व आवडले नसते. शिवाय, व्यासांच्या पुराणकथेत नायक दुष्यंत व नायिका शकुंतला ही केवळ स्वार्थाने प्रेरित झालेली दिसत होती. नाटकातील त्यांची चित्रे रम्य व आकर्षक होण्यास त्यांच्या स्वभावांत विविध छटांचे रंग उचित प्रमाणात मिसळणे जरूर होते. या कारणास्तव कालिदासाने मूळ गोष्टीत अनेक फरक केले आहेत. 'शाकुंतलोपाख्यान' व 'शाकुंतल' यातील कथानकांची तुलना केल्यास दुर्वास ऋषीचा शाप व त्याची निवृत्ति होण्यास जरूर असलेली मुद्रिका या दोन महत्त्वाच्या गोष्टी कवीने कल्पिल्या आहेत, हे सकृद्दर्शनीच ध्यानात येते. यांपैकी पहिलीचा त्याने दोन प्रकारे उपयोग केला आहे. 'महाभारता'तील दुष्यंत केवळ विषयासक्त, भ्याड व स्वार्थी दिसतो. कण्व एक-दोन तासांनी परत येण्याचा संभव असता त्यांची वाट न पाहता त्यांच्या पश्चात् तो त्यांच्या कन्येचा उपभोग घेतो. विषयोपभोगाची तात्कालिक ऊर्मि शमल्यावर आपणावर ऋषि रागावतील, या भीतीने तो लागलीच राजधानीस निघून जातो. पुढे शकुंतलेला दिलेल्या वचनाला जागत नाही, इतकेच नव्हे तर ती स्वतः पुत्रासह राजसभेत उपस्थित झाली असता जनापवादाच्या भयाने स्व-कर्तव्य करण्याचे टाळतो. आकाशवाणी झाली नसती तर स्वतःच्या निरपराधी पत्नीचा व पुत्राचा त्याग करण्यास त्याने मागे-पुढे पाहिले नसते. अशा निकृष्ट कोटीतील नायकाचे पराक्रमी, प्रेमळ, पापभीरु व कर्तव्यतत्पर पुरुषात रूपांतर करण्याकरिता कवीने योजिलेल्या किमयेचे दुर्वासाचा शाप हे एक प्रमुख साधन आहे. त्या शापाने राजाचा स्मृतिभ्रंश होतो व म्हणूनच एरव्ही आपली कर्तव्ये कसोशीने करणारा राजा 'शाकुंतल' नाटकात परस्त्रीस्पर्शभयाने स्वपत्नीचा त्याग करताना दिसतो.

---

* हेच आनंदवर्धनानेही 'ध्वन्यालोका'त ( पृ. १४८ ) म्हटले आहे— इतिवृत्तवशायातां कथञ्चिद्रसाननुगुणां स्थितिं त्यक्त्वा पुनरुत्प्रेक्ष्याप्यन्तराभीष्टरसोचितकथोन्नयो विधेयः यथा कालिदासप्रबन्धेषु ।

पाचव्या अंकातील दोन सत्पक्षांच्या झगड्याचा हृदयंगम प्रसंग या शापानेच शक्य झाला आहे. सहाव्या अंकातील दुष्यंताचा शोक व सातव्यातील शकुंतलेचे अत्यंत कारुण्योत्पादक दृश्य यांची उभारणीही शापप्रसंगाच्या पायावरच झाली आहे. सारांश, या शापाने नायकनायिकांस काही काळ कष्ट दिले तरी अखेरीस त्यांच्या स्वभावांतील उदात्तपणा व्यक्त करून त्याने त्यांस उपकृतच केले आहे. कथानकालाही वैचित्र्यपूर्ण व रम्य प्रसंग पुरवून त्याने चित्ताकर्षक बनविले आहे. याशिवाय हा शापप्रसंग घालण्यात कालिदासाचा दुसराही एक हेतु असावा. केवळ बाह्य रूपामुळे उत्पन्न झालेले प्रेम वैषयिक अतएव निकृष्ट दर्जाचे असते. संकटाच्या भट्टीतून तावून-सुलाखून बाहेर पडल्यावर त्यातील स्वार्थीपणा नष्ट झाल्यामुळे त्याचे कर्तव्यात रूपांतर होते. अशा निरपेक्ष उदात्त प्रेमाची समाजाच्या धारणेला व अभ्युदयाला अत्यंत आवश्यकता असल्याने कालिदासाने आपल्या इतर ग्रंथांतही त्याची चित्रे रेखाटली आहेत. 'कुमारसंभवा'तील पार्वती, 'मेघदूता'तील यक्षपत्नी व 'विक्रमोर्वशीया'तील राणी औशीनरी या अशा दिव्य प्रेमाच्या मूर्ति होत. 'विक्रमोर्वशीया'त औशीनरी राणीचे पात्र उदात्त स्वरूपाचे असले तरी प्रधान नाही, त्यामुळे कवीचा हा अभिप्राय त्यात स्पष्टपणे प्रतीत होत नाही. ती उणीव या नाटकात कवीने भरून काढली आहे. शकुंतलेच्या प्रेमाची परीक्षा करण्याकरिता त्याने दुर्वासशापाचा कुशलतेने उपयोग केला आहे. त्याच्या इतर नाटकांतही एखाद्या दैवी घटनेने नायक-नायिकांवर संकटांचे प्रसंग आलेले दिसतात. असे प्रसंग एखाद्या ऋषीच्या शापाने यावे, हे अगदी साहजिक आहे. शकुंतलेसारख्या प्रेमळ व पतिचिंतामग्न नायिकेला शाप देण्यास दुर्वासासारख्या निष्ठुर व कोपिष्ठ ऋषिशिवाय दुसरा कोण प्रवृत्त होणार ? अनसूयेने म्हटल्याप्रमाणे 'अग्नीशिवाय दुसरा कोण दग्ध करू शकेल ?' शापामागून उःशाप हा आलाच ! शापाने राजाला शकुंतलेची विस्मृति पडली होती, म्हणून उःशापाने त्याला तिची ओळख पटेल, असे काही करणे अवश्य होते. अशा वेळी मुद्रिकेसारख्या पूर्वपरिचित साधनाची सहजच आठवण होणार. सीतेला आपली ओळख पटावी म्हणून हनुमानाने श्रीरामचंद्राची मुद्रिका आपल्याबरोबर घेतली असल्याचे कवीला माहीत होते; किंबहुना,

'मेघदूत' रचताना तो प्रसंग त्याच्या डोक्यात घोळत होता, हे आपण मागे पाहिलेच आहे. तेव्हा दुष्यंतालाही शकुंतलेची मुद्रिकादर्शनाने ओळख पटविण्याची कल्पना कवीला सुचावी, यात आश्चर्य नाही. बौद्धांच्या पालि भाषेतील जातक ग्रंथांत गौतमबुद्धाच्या पूर्व जन्मांतील गोष्टींची वर्णने आली आहेत, त्यातील 'कठ्ठहारि' जातकात 'शाकुंतला'च्या संविधानकासारखी एक गोष्ट आढळते : "वाराणसी नगरातील ब्रह्मदत्त राजा अरण्यात एका सुंदर स्त्रीला पाहतो ; तिच्याशी काही वेळ रममाण होऊन नंतर तो स्वनगरीस परत जातो ; पण जाते वेळी तिच्या बोटात खुणेकरिता मुद्रिका घालतो. पुढे ती स्त्री अरण्यात प्रसूत होऊन तिला बोधिसत्त्व हा मुलगा होतो. तो मोठा झाल्यावर त्याला घेऊन ती राजाकडे जाते व खुणेची अंगठी दाखविते. राजा मुद्दामच आपण तिला ओळखत नाही, असे दाखवितो. तेव्हा सत्यक्रियेशिवाय दुसरा उपाय नाही, असे जाणून ती आपल्या मुलाचा पाय धरून त्याला आकाशात फेकते व राजाला म्हणते, 'राजा, जर हा खरोखरीच तुझा मुलगा असेल तर तो अंतराळी सुरक्षित राहील, नाही तर जमिनीवर पडून त्याच्या शरीराच्या ठिकऱ्या होतील'. बोधिसत्त्व अंतराळी मांडी घालून राहतो, ते पाहून कोणासही त्याच्या जन्माविषयी संशय राहत नाही ; तेव्हा राजाही त्याचा स्वीकार करून त्याला यौवराज्याभिषेक करतो." वरील गोष्टीवरून कालिदासाला मुद्रिकेची कल्पना सुचली असावी, असे काही युरोपीय विद्वानांचे मत आहे, पण ते मान्य होण्यासारखे नाही. वरील जातकात व 'महाभारता'तील शकुंतलेच्या कथेत बरेच साम्य आहे, त्यावरून बौद्ध लोकांनीच ती हिंदुग्रंथातून घेऊन तीत थोडा फरक करून गौतमबुद्धाच्या पूर्वजन्माशी तिचा संबंध जोडून दिलेला दिसतो. जातकग्रंथांतील इतरही अनेक कथांत त्यांनी असे केल्याचे दिसून येते. कालिदासाच्या नाटकात दुर्वासशापाचा व मुद्रिकेचा घनिष्ठ संबंध आहे, पण वरील गोष्टीत शापाचा उल्लेखही नाही. 'शाकुंतला'तील मुद्रिका प्रकरणाची कल्पना कालिदासाला स्वाभाविकपणेच कशी सुचली असावी, ते वर दाखविलेच आहे. 'मालविकाग्निमित्रा'तही कवीने मुद्रिकेचा ओळख पटण्यासाठी उपयोग केला होता, हे लक्षात घेण्यासारखे आहे.

मुद्रिकादर्शनाने राजाची स्मृति जागृत व्हावयाची तर शकुंतला प्रथम राजासमोर जाते त्यापूर्वी ती तिच्या बोटातून गळणे व पुढे तिचा त्याग केल्यावर त्याला ती दिसणे हे ओघानेच आले. हे कसे घडले ते दाखविण्याकरिता कालिदासाने धीवर व शिपाई यांचा प्रवेश घातला आहे. त्यात त्याची अलौकिक कल्पकता उत्कृष्टपणे दिसून येते. ख्रिस्तपूर्व पाचव्या शतकात होऊन गेलेल्या हिरोडोटस नामक ग्रीक इतिहासकाराच्या ग्रंथात असाच एक प्रसंग वर्णिला आहे. त्यावरून ही कल्पना कालिदासाला सुचली असावी, असे एका विद्वानाने प्रतिपादिले आहे *: "पॉलिक्रेटस् नामक ग्रीक राजाने एके दिवशी आपल्या नशिबाची परीक्षा पाहण्यासाठी अत्यंत मौल्यवान पाचूचा खडा वर बसविलेली मुद्रिका समुद्रात टाकली. पुढे पाच-सहा दिवसांनी एका धीवराने आणून दिलेल्या माशाच्या पोटात ती त्याला सापडली." उपरिनिर्दिष्ट विद्वानाच्या मते ही गोष्ट कालिदासाला माहीत असावी. "कारण इ. स. च्या पहिल्या शतकात भडोच या बंदरातून माळवा व काठेवाड या प्रांतांचा पश्चिम देशांशी व्यापार चालत असे. या देशांतून हिंदुस्थानातील राजांच्या उपभोगाकरिता अनेक सुंदर ग्रीक तरुणीही आणल्या जात. कालिदासाने आपल्या प्रांतातील राजदरबारी या यवनी पाहिल्या असाव्यात; म्हणूनच त्याने 'शाकुंतला'त दुष्यंत राजाबरोबर शिकारीच्या वेळीही यवनी होत्या, असे दाखविले आहे. या यवनींच्या तोंडून ही ग्रीक कथा कवीला माहीत झाली असावी." या मतात अनेक गोष्टी गृहीत धरल्या असल्यामुळे ते निश्चितपणे मान्य करता येत नाही. हिरोडोटसने वर्णिलेली गोष्ट त्याच्यानंतर जवळ जवळ आठनऊशे वर्षे ग्रीक लोकांच्या स्त्रियांच्याही तोंडी होती; अशा स्त्रियांचा व कालिदासाचा संबंध आला व त्यांच्या संभाषणात ती गोष्ट आल्यामुळे कवीला तिजवरून 'शाकुंतला'तील प्रसंग सुचला, असे मानावे लागते. यात फार दूरान्वय दिसतो. कालिदासाने इतर ठिकाणी कोठेही ग्रीक कथांचा उपयोग केलेला दिसत नाही. तेव्हा या कल्पनेचे श्रेय कवीसच देणे योग्य होईल. ग्रीक व भारतीय तत्त्वज्ञानांतही अनेक ठिकाणी आश्चर्यकारक साम्य आढळते. त्यासारखाच वरील प्रसंग आहे व त्याची

* *J. B., O. R. S.*, Vol. VII, p. 97.

उपपत्ति 'मानवी मन सर्वत्र सारखेच असते' असे म्हणूनच लावली पाहिजे.

दुर्वासशाप व मुद्रिका या दोन महत्त्वाच्या गोष्टी कवीला कशा सुचल्या असाव्या, हे आपण येथवर पाहिले. मूळ कथेत त्याने केलेल्या इतर फरकांचीही कारणे समजणे सोपे आहे. दुष्यंत आश्रमात गेला त्यावेळी कण्व ऋषि फलपुष्पादिकांकरिता अरण्यात गेला होता. तो येण्यापूर्वी राजा शकुंतलेच्या जन्मासंबंधी कथा ऐकतो, स्वतः लांबलचक भाषण करून तिचे मन वळवितो, तिच्याशी रममाण होतो व निघूनही जातो, असे 'महाभारता'त वर्णिले आहे. दोन-तीन तासांच्या अवधीत या सर्व गोष्टी घडून येणे असंभवनीय व कलादृष्टीने असमर्थनीय ठरते. शिवाय त्यांवरून राजाचा उल्लूपणा व शकुंतलेचा स्वार्थी स्वभाव व्यक्त होतात, हे वेगळेच. कलाविकास व औचित्य यांकरिता या ठिकाणी फरक करणे जरूर होते; म्हणून कालिदासाने कण्व ऋषीला शकुंतलेच्या प्रतिकूल दैवाची शांति करण्याकरिता दूर सोमतीर्थी पाठविले आहे. तेथून येण्यास त्यास सहजच चार-सहा महिने लागले असावेत. या अवधीत यज्ञरक्षणार्थ आश्रमवासीयांच्या विनंतीवरून दुष्यंत आश्रमात राहिला, त्याचा व शकुंतलेचाही मदनसंताप उत्तरोत्तर वाढत गेला व तो अगदी असह्य झाला त्यावेळी त्यांनी गांधर्व विवाह केला, असे कवीने दाखविले आहे. यात अस्वाभाविक असे काहीही दिसत नाही. शकुंतलेचा अनुरूप पतीशी गांधर्वविधीने विवाह झाला व ती गर्भवती आहे हे समजताच कण्वाने तिला पतिगृही पाठविण्याचा निश्चय केला, यांत कालिदासकालीन लोकांच्या स्त्रीविषयक समजुतींचे प्रतिबिंब पडलेले दिसते. त्या काळी स्त्रियांच्या शालीनतेविषयीच्या कल्पनाही 'महाभारत' काळापेक्षा अगदी निराळ्या होत्या. त्यामुळे कालिदासाने आपल्या नाटकात शकुंतलेच्या जन्माची हकीकत तिच्या तोंडी न घालता ती तिच्या मैत्रिणींकडून राजाला कळविली किंवा सुचविली आहे. 'महाभारता'तील शकुंतला स्वपुत्राला गादी मिळावी, अशी अट स्वतः घालते व ती राजाने कबूल केल्यावरच त्याला वश होते. यात तिचा व्यावहारिकपणा दिसून आला तरी त्याबरोबर तिच्या हृदयात सकृद्दर्शनी उत्पन्न होणाऱ्या प्रेमाचा प्रादुर्भाव झाला नव्हता, हेही सिद्ध होते.

कालिदासाची शकुंतला प्रेमपरवश झाली होती ; तिला अशा अटी कशा सुचणार ? तिच्या मैत्रिणी साहजिकच जास्त समयज्ञ होत्या ; तथापि त्यांनीही 'राजांना अनेक स्त्रिया असतात, म्हणून ही आमची प्रियसखी तिच्या बांधवांच्या दुःखाला कारण होणार नाही, असे आपण वागावे' एवढेच सुचविले आहे. अशा प्रसंगी सर्व गोष्टी नायिकेकडून वदविणे उचित होणार नाही, हे जाणून कवीने प्रियंवदा व अनसूया या शकुंतलेच्या प्रेमळ सख्यांची जोडी निर्माण केली आहे. याशिवाय शारद्वत व शार्ङ्गरव हे कण्वशिष्य, गौतमी ही शकुंतलेचे संगोपन करणारी वृद्ध तापसी, राजपुरोहित, माढव्य नामक विदूषक, वैखानस, सेनापति इत्यादि कथानकाच्या विकासाकरिता जरूर लागणारी अनेक पात्रे कवीच्या कल्पकतेची अपत्ये होत. यांपैकी काही पात्रें—शारद्वत, शार्ङ्गरव, पुरोहित, प्रियंवदा व गौतमी—ही 'पद्मपुराणा'तील शकुंतलोपाख्यानातही आढळतात. शिवाय त्यातील कथा 'शाकुंतल' नाटकाच्या संविधानकाशी बहुतांशी जुळणारी आहे. म्हणून कालिदासाने 'पद्मपुराणा'तून आपल्या नाटकाची गोष्ट व काही पात्रेही घेतली असावी, असे डॉ. विंटरनिटझ्सारखे संशोधक म्हणतात. त्यांच्या मतांचा येथे थोडक्यात विचार करणे जरूर आहे.

'पद्मपुराण' व 'रघुवंश' यांत दिलीपापासून दशरथापर्यंतच्या राजांच्या वर्णनात अनेक ठिकाणी आश्चर्यकारक शब्दसाम्य व कल्पनासाम्य आढळते याचा मागे उल्लेख आला आहेच. त्यासारखेच याही ठिकाणचे साम्य आहे. दुष्यंत मृगाला मारू लागला असता वैखानसाने त्याचे निवारण करणे, पुढे आश्रमात प्रवेश केल्यावर शकुंतलेस व तिच्या सख्यांस वृक्षांस पाणी घालताना पाहणे, त्याने विचारल्यावरून शकुंतलेच्या सखीने तिच्या जन्माचा वृत्तांत कथन करणे, दुष्यंतगमनानंतर दुर्वासाचा शाप होणे, हस्तिनापुराच्या मार्गावर एका तीर्थात मुद्रिका पडून अदृश्य होणे, पुढे दुष्यंताचा स्मृतिभ्रंश, शकुंतला-प्रत्यादेश, धीवराकडून मुद्रिकेची प्राप्ति व तदनंतर राजाचा पश्चात्ताप व शोक, शेवटी स्वर्गातून परत येत असता मारीचाश्रमात शकुंतला व सर्वदमन यांची भेट, इत्यादि प्रसंग 'शाकुंतल' नाटकात व 'पद्मपुराणा'त समान आहेत व त्यांचे वर्णनही बहुतांशी त्याच शब्दांत केले आहे. काही ठिकाणी महत्त्वाचे फरकही

आढळतात. 'महाभारता'प्रमाणे 'पद्मपुराणा'तही कण्व ऋषि परगावी गेला नसून फळे व पुष्पे आणण्याकरिता वनात गेला होता व तो परत येण्यापूर्वी दुष्यंत नगरास परत गेला, असे वर्णिले आहे. हस्तिनापुरास जाताना शारद्वत, शार्ङ्गरव व गौतमी याप्रमाणे प्रियंवदाही शकुंतलेबरोबर होती. तीर्थात स्नान करताना शकुंतलेने तिच्याजवळ अंगठी दिली, ती तिने वस्त्रात ठेवली नाही तोच ती गडगडत जाऊन पाण्यात पडली. त्या वेळी प्रियंवदेने शकुंतलेला तो वृत्तांत कळविला नाही व शकुंतलेलाही तिची आठवण झाली नाही. पण राजासमोर मुद्रिकेची जरूरी लागली, तेव्हा तिने ती प्रियंवदेजवळ मागितली, असे वर्णन 'पद्मपुराणा'त आले आहे. 'शाकुंतला'प्रमाणेच 'महाभारता'शीही 'पद्मपुराणा'चे काही ठिकाणी अत्यंत सादृश्य आढळते. शकुंतलेला वश करण्याकरिता दुष्यंताचे प्रलोभनात्मक भाषण, कण्व ऋषींनी वनातून परत आल्यावर केलेले शकुंतलेचे अभिनंदन, नंतर शकुंतलेने मागितलेले वर, राजाने स्वीकार न केल्यामुळे अत्यंत संतप्त होऊन शकुंतलेने त्याला केलेले वाक्ताडन यांचे वर्णन 'महाभारता'त व 'पद्मपुराणा'त अगदी त्याच शब्दांत केले आहे. असे सुमारे शंभर श्लोक या दोन ग्रंथांत समान आहेत. या साम्याचा विचार करता (१) व्यास व कालिदास यांनी 'पद्मपुराणा'तील कथा व कल्पना घेऊन त्या आपल्या ग्रंथांत घुसडून दिल्या ; किंवा (२) 'पद्मपुराण'कर्त्याने 'शाकुंतला'तून काही प्रसंग व 'महाभारता'तून काही भाषणे घेऊन व काही स्वतःचे पदरचे घालून आपली गोष्ट सजविली, असे दोन पक्ष संभवतात. यांतून दुसराच पक्ष अधिक संभवनीय आहे, असे आम्हांस वाटते. 'हरिवंशा'त व 'भागवता'सारख्या इतर पुराणांत 'महाभारता'तल्यासारखीच शकुंतलेची कथा दिली आहे. 'पद्मपुराणा-'ची कथा जुनी असती तर ती त्याही पुराणांत आली असती. पुराणांतील गोष्टींत बहुधा शारद्वत, शार्ङ्गरव, गौतमी, प्रियंवदा यांसारख्या विशेष जरूर नसलेल्या पात्रांचा निर्देश आढळत नाही. 'पद्मपुराणा'तही शार्ङ्गरव व शारद्वत या दोन्ही मुनिशिष्यांचा नामनिर्देश असला तरी त्यांना स्वतंत्र भाषणे दिली नसल्याने तो अनावश्यक वाटतो. तेव्हा 'पद्मपुराणा'तील शाकुंतलोपाख्यानात ही पात्रे आढळतात, याचे कारण लेखकाने ते कथानक कालिदासाच्या 'शाकुंतल' नाटकावरून संक्षेपाने

घेतले आहे हे असावे, असे वाटते. मागे ‘ मत्स्यपुराणा ’त कालिदासाच्या ‘ विक्रमोर्वशीया ’तील काही प्रसंगांचा उल्लेख आला आहे असे दाखविले आहे, त्याप्रमाणेच ‘ पद्मपुराण ’कर्त्यानेही ‘ शाकुंतला ’तील प्रसंग व ‘ महाभारता ’तील ओजस्वी भाषणे ही जोडून आपली शाकुंतलोपाख्यानाची कंथा बनविलेली दिसते.

‘ शाकुंतला ’चे संविधानक ‘ मालविकाग्निमित्रा ’तल्याप्रमाणे गुंतागुंतीचे नाही, तथापि त्यातील प्रसंगांची जुळणी इतक्या कौशल्याने केली आहे की, प्रेक्षकांचे औत्सुक्य शेवटपर्यंत टिकून राहते. त्यातील विविध घटना एकातून एक अशा अगदी स्वाभाविकपणे उद्भूत झालेल्या दिसतात. त्या सर्व मुख्य साध्याशी कमीजास्त प्रमाणात संलग्न झाल्या आहेत. एक-दोन ठिकाणी आकाशवाणीसारख्या अद्भुत गोष्टींचा कथानकाच्या प्रगतीकरिता कवीने उपयोग केला आहे ; तथापि, तत्कालीन लोकांस त्या असंभवनीय वाटत नव्हत्या, हे आपण लक्षात घेतले पाहिजे. या नाटकातील प्रत्येक प्रवेश, किंबहुना त्यातील प्रत्येक प्रसंग, सहेतुक घातलेला आहे. उदाहरणार्थ, पाचव्या अंकातील हंसपदिकेचे गीत घ्या. त्यायोगे आगामी शकुंतलाप्रत्यादेशाची प्रेक्षकांस सूचना मिळते. त्यामुळे राजाला मागील वृत्तांत स्पष्टपणे आठवत नाही, तथापि त्याच्या मनाला हुरहुर लागून राहते. शिवाय, ते गीत ऐकल्यावरच आपला संदेश कळविण्याकरिता राजा विदूषकाला हंसपदिकेकडे पाठवितो. तो गेल्यावर शकुंतलेचा वृत्तांत माहीत असलेले व राजाच्या विश्वासातले असे कोणीही जवळ नसल्याने पाचव्या अंकातील शकुंतलाप्रत्यादेशाचा प्रसंग अस्वाभाविक वाटत नाही. या सर्व कारणांस्तव त्या प्रसंगाची योजना कवीने पाचव्या अंकाच्या आरंभी केली आहे. शेवटल्या अंकात दुष्यंताला सर्वदमनाची ओळख हळूहळू पण एकापेक्षा एक बलवत्तर अशा कारणांनी पटते, तो प्रसंगही उत्तम वठला आहे.

‘ शाकुंतल ’ नाटकातील भाषा अत्यंत प्रसादयुक्त व रम्य आहे. त्यात उपमा, उत्प्रेक्षा, स्वभावोक्ति, अर्थांतरन्यास यांसारखे अनेक मनोरम अलंकार आले आहेत. त्यांत कोठेही क्लिष्टता, कल्पनांची ओढाताण, दूरान्वय, वगैरे दोष दिसत नाहीत. प्रत्येक पात्राच्या तोंडी त्याला शोभेल अशी भाषा व सुचतील असेच अलंकार घालण्याची कवीने काळजी घेतली

आहे. शकुंतला व तिच्या सख्या सदैव लतावृक्षादिकांच्या सहवासात खेळणाऱ्या, तेव्हा त्यांच्या भाषणांत 'क इदानीं सहकारमन्तरेणातिमुक्तां पल्लवितां सहते','को नामोष्णोदकेन नवमालिकां सिञ्चति' यांसारखे लता-वृक्षांवरून सुचणारे अलंकार घातले आहेत. कण्व ऋषि सदैव यज्ञयागांत व अध्यापनकार्यांत निमग्न. तेव्हा त्यांना 'दिष्टया धूमाकुलितदृष्टेरपि यजमानस्य पावक एवाहुतिः पतिता', 'वत्से सुशिष्यपरिदत्तेव विद्याऽशोचनीयासि संवृत्ता' यांसारखे दृष्टांत व उपमा सुचाव्यात, यात आश्चर्य नाही. सदैव खाद्यलोलुप व विनोदी विदूषकाच्या स्वभावाचे प्रतिबिंब 'यथा कस्यापि पिण्डखर्जूरैरुद्वेजितस्य तिन्तिण्यामभिलाषो भवेत् तथा स्त्रीरत्नपरिभोगिणो भवत इयमभ्यर्थना' या उपमेत स्पष्टपणे पडलेले दिसते. या नाटकातील भाषणे लहान लहान व चटकदार असल्याने ती वाचताना व ऐकताना वाचक-प्रेक्षकांचे चित्त रमून जाते व आपण नाटक पाहत नसून खरोखरीच आपल्यासमोर घडलेले प्रसंग पाहत आहो, असे प्रेक्षकांस वाटते, यातच कालिदासाच्या कलेचा उत्कर्ष आहे.

'शाकुंतला'त संभोग व विप्रलंभ असा द्विविध शृंगार, करुण व शांत हे प्रमुख रस आहेत. पहिल्या तीन अंकांत शृंगाराचे साम्राज्य आहे. तथापि, प्रसंगाने इतरही अनेक रसांचा त्यांत आविर्भाव झालेला दिसतो. पहिल्या अंकाच्या आरंभी दुष्यंतापुढे जीवरक्षणार्थ पळणाऱ्या हरिणाच्या व त्याच अंकाच्या शेवटी हत्तीने केलेल्या दाणादाणीच्या वर्णनात भयानक, दुसऱ्या अंकात विदूषकाच्या विनोदी भाषणात हास्य, तिसऱ्या अंकाच्या शेवटी राक्षसांच्या आगमनाने पुनः भयानक, याप्रमाणे इतर रसांचे शृंगाराशी मिश्रण झाले आहे. चौथ्या अंकात आकाशवाणीच्या व वनदेवतांनी दिलेल्या वस्त्रालंकारांच्या वर्णनात अद्‌भुत रसाची छटा आहे. पण त्या अंकातील मुख्य रस करुण हाच होय. या अंकाला सबंध संस्कृत वाङ्‌मयात तोड नाही, असे एका सुभाषितकाराने म्हटले आहे व ते सर्वसंमत झाले आहे. पाचव्या अंकात दुष्यंत व शकुंतला यांच्या वाक्‌कलहाचा प्रसंगही मनोरम साधला आहे. राजाने टाकल्यामुळे संतप्त झालेल्या शकुंतलेच्या भाषणाने रौद्र, पुढे तिची असहाय स्थिति पाहून करुण व शेवटी अप्सरस्तीर्थाजवळ ती अदृश्य झाल्यामुळे अद्‌भुत अशा अनेक रसांचा अनुभव प्रेक्षकांस येतो. सहाव्यात करुण-शृंगाराचा

परिपोष चांगला झाला आहे. 'विक्रमोर्वशीया'तल्याप्रमाणे सबंध अंकात एकच पात्र शोक करीत बसल्यास प्रेक्षकांस कंटाळा येतो व त्या रसाचाही उत्तम रीतीने उठाव होत नाही, याचा अनुभव आल्याने या अंकात राजाच्या करुणशृंगाराला विदूषकाच्या हास्यरसाची जोड दिली आहे. शेवटच्या अंकात सर्वदमन व दुष्यंत यांच्या भेटीच्या प्रसंगी अद्भुत व वत्सल आणि शेवटी मारीच ऋषींच्या सानिध्यात शांत या रसांचा आविर्भाव होतो. नाटकाच्या शेवटी प्रेक्षकांच्या चित्तवृत्ति अनेक रस अनुभविल्यावर शांतरसमग्न होतात.

आकर्षक संविधानक, मधुर भाषा, उत्कृष्ट वर्णनशैली, उत्कट रस-परिपोष इत्यादि गुण 'शाकुंतला'त आहेत ; पण या सर्वांपेक्षा त्यातील अत्यंत कुशलतेने रेखाटलेल्या स्वभावचित्रांनीच रसिकांचे चित्त आकृष्ट केले आहे. यात दुष्यंत, कण्व व विदूषक ही पुरुष पात्रे व शकुंतला, अनसूया, प्रियंवदा ही महत्त्वाची स्त्रीपात्रे आली आहेत. यांशिवाय संविधानकाच्या विकासाला अवश्य असे दुर्वास व मारीच हे ऋषि, गौतमी व अदिति या ऋषिपत्नी, सानुमती ही अप्सरा, शारद्वत व शार्ङ्गरव हे कण्वशिष्य, वैखानस, सेनापति, कंचुकी, राजश्यालक, धीवर, शिपाई इत्यादि अनेक गौण पात्रे कवीने योजिली आहेत. या सर्वांत नायक दुष्यंत व नायिका शकुंतला यांच्या स्वभावरेखनात त्याने आपले शक्तिसर्वस्व खर्च केले आहे.

कालिदासाच्या सर्व नायकांत दुष्यंत हा श्रेष्ठ आहे. हा आकाराने भव्य, पण मनाने मृदु आहे. गंभीर आकृति व गोड भाषण यांनी तो इतरांचे मन एकदम आकृष्ट करून घेतो. पुरुरव्याप्रमाणे हाही अत्यंत पराक्रमी आहे. यज्ञाचे रक्षण करण्यास त्याला धनुष्यावर बाण लावण्याचीही जरूरी भासत नाही. त्याच्या मौर्वीच्या टणत्कारानेच सर्व विघ्ने दूर होतात. तेव्हा विदूषकाबरोबर सर्व सैनिक पाठवून तो राक्षसनिवारणार्थ एकटाच आश्रमात राहतो यात नवल नाही. राक्षसांशी युद्ध करण्यास प्रत्यक्ष इंद्रही त्याला स्वर्गात बोलावितो व त्याच्या विजयानंतर आपल्या पुत्रालाही हेवा वाटेल अशा रीतीने अर्धासन देऊन व स्वतःची मन्दारमाला त्याच्या गळ्यात घालून त्याचा सन्मान करतो. राज्यात त्याचा विलक्षण दरारा आहे. त्याच्या प्रजेतील

अत्यंत निकृष्ट लोकही कुमार्गगामी नाहीत, असे शाङ्र्गरव म्हणतो. शकुंतलेची अंगठी मिळाल्यावर त्याला पश्चात्ताप होतो; म्हणून दुःखाने तो वसंतोत्सव बंद ठेवतो. तेव्हा लता, वृक्ष व त्यांवर वास करणारे पक्षीही त्याची आज्ञा पाळीत आहेत, असे कंचुकी वर्णन करतो, त्यात यत्किंचितही अतिशयोक्ति सानुमतीला दिसत नाही. 'हा महाप्रभावी राजर्षि आहे' असे ती उद्‌गार काढते. दुष्यंताचा पराक्रम त्याच्या विनयाने अधिकच शोभून दिसतो. असुरांवर मिळविलेल्या विजयाने त्याला मुळीच गर्व होत नाही. 'हे सर्व इंद्राच्या पुरस्काराचे फल', असे तो मोठ्या विनयाने म्हणतो. कण्वाश्रमात प्रवेश करताना 'तपोवनात विनीत वेषाने गेले पाहिजे', असे म्हणून तो आपली उंची वस्त्रे व रत्नखचित अलंकार सारथ्याजवळ काढून ठेवतो. तो आपल्या पराक्रमाचा उपयोग दुष्टांचे शासन व आर्त जनांचे रक्षण करण्याकरिताच करीत असतो. तो अत्यंत धार्मिक, पापभीरु व प्रजापालनतत्पर आहे. कण्व ऋषींचे शिष्य आपणाकडे आले आहेत, असे कंचुकीने कळविताच, ऋषींच्या तपश्चर्येत विघ्ने आली असतील काय, तपोवनातील प्राण्यांना कोणी त्रास दिला असेल काय, माझ्या दुष्कृत्यांमुळे तेथील लतांच्या बहरात खंड पडला असेल काय, असे नानाप्रकारचे विकल्प त्याच्या मनात येतात. आपण ऋषींचे रक्षण करतो, याबद्दल ते आपल्या तपश्चर्येचा अंश देऊन पुरी भरपाई करतात, असे त्यास वाटते. तो सदैव प्रजेची काळजी वाहतो. लोकांना कुमार्गापासून परावृत्त करून, त्यांची भांडणे तोडून व रक्षण करून तो आपले कर्तव्य उत्तम रीतीने पाळीत आहे, असे दिसते. 'माझ्या प्रजेत कोणाचा संबंधी मृत झाल्यास दुष्कृत्यांखेरीज इतर बाबतीत त्याच्या ठिकाणी मला मानावे', अशी तो दवंडी पिटवितो. त्याला संपत्तीचा मुळीच लोभ नाही, हे सांगणे नकोच. जलमार्गाने व्यापार करणारा श्रीमंत व्यापारी मृत झाल्यावर तत्कालीन कायद्याप्रमाणे त्याची सर्व मिळकत मिळत होती तरी ती न स्वीकारता तो त्याच्या गर्भस्थ अपत्यास ती देऊन टाकतो. कालिदासाच्या नाटकातील इतर नायकांप्रमाणे दुष्यंतही बहुपत्नीक आहे. त्याच्या अन्तःपुरात अनेक स्त्रिया असल्याने एकीवर प्रेम केले की दुसरीला वैषम्य वाटणारच! तेव्हा आपल्याकडे दुर्लक्ष केल्याबद्दल

हंसपदिका त्याला टोमणा मारते यात आश्चर्य नाही. तथापि, दिसेल त्या सुंदर स्त्रीवर आषक होण्याइतका तो मधुकरवृत्तीचा नाही. नाही तर शकुंतलेसारखी अत्यंत सुस्वरूप स्त्री चालून आली असता त्याने जास्त खोलात न जाता तिचा स्वीकार केला असता. परस्त्रीकडे निरखून पाहणे अयोग्य, असे म्हणून तो प्रथम तिच्याकडे नीट पाहातही नाही. कण्वाश्रमात गेल्यावर त्याला सुंदर कन्यका दिसतात व त्यांतही सौंदर्याची पुतळी अशी शकुंतला त्याचे मन आकृष्ट करते. प्रथम ही ब्राह्मणकन्यका असेल काय, असा त्याला संशय येतो. तसे शेवटी ठरते तर इंद्रियनिग्रह करून त्याने आपले मन परावृत्त केले असते, यात संशय नाही. पण स्वतःच्या सद्सद्विवेकबुद्धीला विचारता ती स्वतःला विवाह्य असावी असे त्याला वाटते. शकुंतला व तिच्या सख्या यांच्या भाषणांवरून त्याच्या अनुमानाला बळकटी येते व त्यांनी शकुंतलेचा जन्मवृत्तांत सांगितल्यावर तर मुळीच संशय राहत नाही. शकुंतलेचीही आपल्यासारखीच अवस्था झाली आहे, असे पाहून त्याचा मदनविकार वाढत जातो. कण्व ऋषि लौकरच परत येण्यासारखे असते तर तोपर्यंत त्याने अवश्य इंद्रियनिग्रह केला असता. पण तिकडे शकुंतलेची अतिशय वाईट अवस्था झाली होती. 'त्या राजर्षीकडून लौकर माझा स्वीकार झाला नाही तर मला तिलोदक द्यावयास तयार व्हा' असे तिचे निर्वाणीचे उद्‌गार त्याने ऐकले होते. तेव्हा तिच्या सख्यांनी तिचा स्वीकार करण्याविषयी विनंती केल्यावर तो ती आनंदाने मान्य करतो, यात आश्चर्य नाही.

"कण्वाश्रमरूपी स्वर्गात लपून छपून पापाने प्रवेश केला, त्याबरोबर कीटदष्ट कुसुमाप्रमाणे तेथील दिव्य सौंदर्य विशीर्ण व नष्ट होऊन गेले. त्यानंतर लज्जा, संशय, दुःख, वियोग व पश्चात्ताप ही आली. अखेरीस विशुद्धतर व उन्नततर अशा स्वर्गलोकात क्षमा, प्रीति व शांति ही दृग्गोचर होऊ लागली. 'शाकुंतला'स Paradise Lost प्रमाणे Paradise Regained ही म्हणता येईल' असे डॉ. रवींद्रनाथ टागोरांनी 'शाकुंतला'चे सार काढले आहे. यात दुष्यंताला स्वर्गात चोरून प्रवेश करणाऱ्या पापाची आणि कुसुमाचा नाश करणाऱ्या किडयाची अशा दोन उपमा दिल्या आहेत. ह्या उपमा कालिदासाच्या

दुष्यंतापेक्षा 'महाभारता'तील दुष्यंतालाच लागू पडतात. दुर्वासाच्या शापामुळे दुष्यंताला भूल पडली व म्हणून त्याने शकुंतलेचा त्याग केला, असे दाखवून कालिदासाने आपल्या नायकास या बाबतीत दोषमुक्त केले आहे. सातव्या अंकात मारीच ऋषींनी शापवृत्तान्त सांगितल्यावर राजा, 'सुदैवाने मी या दोषातून मुक्त झालो', असे म्हणून समाधानाचा सुस्कारा टाकतो, त्यावरूनही वरील विधान कविसंमत आहे, हे दिसून येईल.

कालिदासाचा दुष्यंत मनाचा अत्यंत कोमल आहे. निरपराधी पत्नीचा आपण त्याग केला, ही गोष्ट त्याच्या मनाला लागून राहते. पश्चात्तापाने तो इतका वाळून जातो की, शकुंतलाही प्रथम त्याला ओळखत नाही. तिची गाठ पडल्यावर 'महाभारता'तील दुष्यंताप्रमाणे 'तू मला दुरुत्तरे बोललीस, त्याबद्दल मी तुला क्षमा करतो', असे तो आढ्यतेने म्हणत नाही ; इतकेच नव्हे तर तिच्या पायां पडून प्रांजलपणे तिची माफी मागतो. मातृभक्ति व पुत्रप्रेम या त्याच्या स्वभावातील इतर कोमल छटाही कवीने प्रसंगाने दाखविल्या आहेत. सारांश, पराक्रमी, विनयशील, धार्मिक, प्रेमळ, कर्तव्यतत्पर अशा या धीरोदात्त नायकाचे चित्र काढून कालिदासाने आपल्यापुढे आदर्श पुरुष उभा केला आहे.

ह्या नाटकात नायिकेच्याही स्वभावाचा परिपोष उत्तम प्रकारे झाला आहे. नाटकाच्या आरंभी शकुंतला ही लतावृक्षांवर स्वतःच्या भावंडांप्रमाणे प्रेम करणारी, आरंभापासून त्यांची काळजी घेऊन, त्यांना नावे देऊन, वाढल्यावर त्यांचा विवाह करण्यात आनंद मानणारी, स्वतःही यौवनाने मुसमुसल्यामुळे प्रियसख्यांच्या विवाहविषयक परिहासाचा विषय होणारी अशी मुग्धा तरुणी दिसते. तिचेच शेवटल्या अंकात पतिवियोगामुळे मलिन वस्त्रे व एक पेडाची वेणी धारण करणाऱ्या व व्रतोपवासादिकांनी शरीर शोषविणाऱ्या पतिव्रता व अपत्यवत्सल अशा प्रौढ स्त्रीत रूपांतर झालेले दृष्टीस पडते. प्रातःकाळी सृष्टिसतीने दवबिंदूंनी न्हाऊ घातलेल्या कोमल कलिकेचा हळूहळू सुंदर पुष्पात विकास होऊन सूर्याच्या प्रखर तापाने सायंकाळी ते सुकूनही जावे, तसे शकुंतलेच्या स्वभावातील हे परिवर्तन आपल्या डोळ्यांसमोर घडून येते.

यातच कालिदासाच्या कलेचा परमोत्कर्ष दिसून येतो. लहानपणीच तिला मातापित्यांनी टाकले तरी कण्व व गौतमी यांनी आपल्या प्रेमाची पाखर तिजवर घालून तिला कोणत्याही बाबतीत कमी पडू दिले नाही. सुदैवाने तिला प्रियंवदा व अनसूया या समवयस्क व प्रेमळ सख्या लाभल्या. त्यांच्या सहवासात तिला लेखन, वाचन, काव्य, इतिहास इत्यादि विषयांबरोबर चित्रकलेसारख्या ललितकलांचेही शिक्षण मिळालेले दिसते. आश्रमातील लतावृक्ष व पशुपक्षी यांच्या सानिध्यात वाढल्यामुळे तिचे त्यांच्यावर व त्यांचेही तिच्यावर निस्सीम प्रेम होते. 'शकुंतले, तुझ्यापेक्षा कण्वबाबांना आश्रमातील वृक्ष जास्त प्रिय आहेत, असे मला वाटते. कारण तू नवमालिकेसारखी कोमल असताही त्यांनी तुला वृक्षांना पाणी घालण्यास लावले आहे', असे अनसूयेने थट्टेने म्हणताच ती उत्तर करते, 'बाबांनी सांगितले म्हणूनच मी यांना पाणी घालते असे नाही. माझे यांच्यावर सख्ख्या भावंडांप्रमाणे प्रेम आहे'. या प्रेमामुळेच स्वभूषणाकरिता त्यांची पाने खुडणे तिच्या जिवावर येई. त्यांना प्रथम बहर येई तेव्हा ती उत्सव करी. पतिगृही जातांना वनज्योत्स्ना नामक लताभगिनीला प्रेमाचे आलिंगन देण्यास ती विसरली नाही. आश्रमातील पशुपक्ष्यांवरही तिचे तितकेच प्रेम होते. 'गर्भिणी असल्यामुळे पर्णकुटिकेच्या आसपास मंद मंद चालणारी हरिणी प्रसूत होईल, तेव्हा ती आनंदाची बातमी मला कळविण्याकरिता कोणाला तरी पाठवा', असे ती कण्व ऋषींस सांगते. लहाणपणीच आपल्याप्रमाणे पोरका झालेल्या हरिणबालकाचे तिने मातृवत् पालन केलेले. तेव्हा आश्रमातून निघताना तो तिचे वस्त्र ओढतो, त्यावेळी तिला साहजिकच गहिवर येतो. अशा प्रेमळ शकुंतलेवर तपोवनातील चराचर सृष्टिही प्रेम करते, यात आश्चर्य नाही. तिच्या जिवाभावाच्या मैत्रिणी अनसूया व प्रियंवदा यांस सोडून जाताना तिला झालेल्या दु:खाची कल्पनाही करवत नाही. कण्व ऋषि तर तिचा अत्यंत वत्सल पिता. त्यांच्या अंकावर ती लहानपणापासून खेळलेली. 'मलयपर्वतावरून काढलेल्या चंदनलतेप्रमाणे बाबांच्या अंकापासून परिभ्रष्ट झालेली मी दुसऱ्या ठिकाणी कशी जिवंत राहू शकेन ?' असे ती विचारते. निघण्याला उशीर होत होता, शार्ङ्गरव पुढे चलण्याची सूचना देत होता ; तरी 'बाबा, मला पुन: कधी हे तपोवन दिसेल का हो !' असे

ती विचारीत राहते. 'बाळे, अनुष्ठानाची वेळ होऊन गेली', असे कण्वाने म्हणताच तपश्चर्येने आधीच कृश झालेल्या आपल्या पित्याला आपल्या वियोगाचे दु:ख सहन करवणार नाही, असे तिच्या लक्षात येते. तेव्हा 'बाबा, तुम्ही तपश्चर्येने कृश झाला आहा, माझ्याकरिता फार वाईट वाटून घेऊ नका', असे ती त्यास विनविते.

राजाला पाहताच शकुंतलेच्या मनात पूर्वी अननुभूत असा प्रेमविकार उत्पन्न होतो. त्याची धीरगंभीर आकृति, मधुर भाषण व असामान्य पराक्रम यांनी तिचे हृदय आकर्षित होते. ती कामवश झाली होती तरी स्वाभाविक शालीनतेने आपला प्रेमविकार सख्यांजवळसुद्धा बोलून दाखवीत नाही. राजाशी बोलणे तर राहोच, पण त्याच्यासमोर ती उभीही राहत नाही. विदूषकाने विचारल्यावरून शकुंतला आपल्यासमोर कशी वागली, याचे राजाने पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे—

अभिमुखे मयि संहृतमीक्षितं हसितमन्यनिमित्तकृतोदयम्।
विनयवारितवृत्तिरतस्तया न विवृतो मदनो न च संवृतः॥ शाकु. २, ११.

'महाभारता'तील शकुंतला आपली जन्मकथा सविस्तर वर्णन करते, राजाने भार्या होण्याविषयी विनंती केल्यावर आपल्या अटी घालते व त्या कबूल झाल्यावर वश होते. राजाला पाहून ती कामवश झाल्याचे दिसत नाही. अशा धीट, व्यवहारदक्ष पण निष्प्रेम तरुणीचे कवीने आपल्या प्रतिभेने शालीन, मुग्ध व प्रेमपरवश बालिकेत रूपांतर केले आहे. कालिदासाची शकुंतला मदनविकार अगदी असह्य झाल्यावर व प्रेमळ सख्यांनी अतिशय आग्रह केल्यावरच अनुराग व्यक्त करते. त्यांनी संमति दिली तरी वडिलांच्या अनुज्ञेशिवाय राजाशी समागम करण्याचे तिच्या मनात येत नाही. 'क्षत्रियांना गांधर्वविवाह विहित आहे, तेव्हा तुझे वडील रागावणार नाहीत', अशी राजाने खात्री केल्यावरच ती त्याच्या म्हणण्यास कबूल होते. शेवटल्या अंकात ओळख पटल्यावर 'पुत्राचा हात धर, तुझ्यासह भगवान् मारीच ऋषींच्या दर्शनास जाण्याची माझी इच्छा आहे', असे राजा म्हणतो, तेव्हा 'आपणांबरोबर गुरुजनांसमोर जाण्याची मला लाज वाटते', असे ती म्हणते. यासारख्या प्रसंगांनी तिची विनयशीलता कवीने दाखविली आहे.

शकुंतलेचा स्वभाव अत्यंत सरळ, किंबहुना भोळा आहे. पाचव्या

अंकात शापाने स्मृतिविभ्रम झालेल्या राजाला ओळख पटविण्याचे सर्व उपाय हरले. अंगठीही आयत्या वेळी कोठे दिसेना. तेव्हा "मी वाढविलेला दीर्घापाङ्ग नामक हरिण आपल्या हातून पाणी पिईना. नंतर मी तेच पाणी त्याला दाखविले तेव्हा तो प्याला. त्यावेळी आपण हसून म्हणाला, 'प्रत्येकाचा स्वजातीयांवर विश्वास असतो, दोघेही तुम्ही अरण्यवासी !'" ही घडलेली गोष्ट सांगून ती त्याची खात्री करण्याचा प्रयत्न करते. याने का त्याची खात्री होणार ! पण भोळ्या शकुंतलेला तेही शक्य वाटते. अशा ऋजुस्वभावी व प्रेमळ शकुंतलेवर प्रत्यादेशाचा वज्राघात होतो. गौतमी व शार्ङ्गरव यांनी परोपरीने सांगितले तरी ते राजाला पटत नाही. म्हणून 'तूच त्याची खात्री कर' असे शारद्वत तिला सांगतो. तेव्हा 'आर्यपुत्रा' असे त्याला उद्देशून ती पुढे बोलणार तोच पतिपत्नीचे नाते राजा कबूल करीत नसल्याने या नावाने त्याला संबोधणे योग्य नाही, असे तिच्या लक्षात येते. म्हणून 'पौरवा' अशा साध्या नावानेच ती त्याला हाक मारते. त्याची खात्री करण्याच्या प्रयत्नात तिला यश येत नाही. उलट कोकिळेचा दृष्टांत देऊन स्त्रिया जात्याच लबाड असतात, असे तो म्हणतो. त्याच्या भाषणातील द्व्यर्थी शब्दांच्या प्रयोगावरून तो आपल्या मातेचीच निंदा करीत आहे, असे शकुंतलला वाटते. तेव्हा तिचा संताप अनावर होतो व ती त्याला 'अनार्या !' असे संबोधून त्याच्या ढोंगीपणाबद्दल टाकून बोलते.

सीतेप्रमाणेच शकुंतलाही महान् पतिव्रता आहे. नवऱ्याने काही कारण नसता टाकली असताही ती सदैव त्याचे चिंतन करते व विरही स्त्रियांना विहित अशा रीतीने दिवस कंठते. सानुमतीच्या सांगण्यावरून राजाला पश्चाताप झाला आहे, असे तिला कळते व अदितीच्या आश्वासनावरून काही काळाने पति आपला स्वीकार करील, अशी तिला आशाही वाटते. त्या आशेवर ती अवलंबून राहते. शेवटी राजाची भेट होते, तेव्हा ती आपल्या प्रत्यादेशाबद्दल त्याच्यावर रागावत तर नाहीच; उलट तो पश्चातापाने स्वतःस दूषण देऊ लागला असता 'माझ्या कृतकर्मांमुळेच एरव्ही दयार्द्र असणारे आपण माझ्या बाबतीत निष्ठुर झाला', असे बोलून त्याचे समाधान करते. सारांश, कवीने शकुंतलेच्या रूपाने

ऋजुस्वभावी, गुणी व कर्तव्यनिष्ठ अशा आदर्श हिंदु गृहिणीचे चित्र रेखाटले आहे.

नायक व नायिका यांच्या स्वभावाचे शब्दचित्र काढण्यात कालिदासाने आपले शक्तिसर्वस्व खर्च केले असले तरी इतर पात्रेही त्याने थोडक्यात पण मोठ्या कुशलतेने रंगविली आहेत. साम्यविरोधांनी परस्परांच्या स्वभावाचा उठाव व्हावा म्हणून त्याने काही पात्रांच्या जोड्या योजिल्या आहेत. मारीच–दुर्वास–कण्व, प्रियंवदा–अनसूया, शार्ङ्गरव–शारद्वत यांच्या स्वभावाचे पृथक्करण केल्यास ही गोष्ट स्पष्ट होईल. दुर्वास हा अतिशय मानी, कोपिष्ठ व निष्ठुर ऋषि दिसतो. नुकत्याच परत गेलेल्या पतीच्या वियोगाने शून्यहृदय होऊन शकुंतला तच्चितनात मग्न झाली आहे, असे त्याला दिव्य दृष्टीने दिसते. तथापि हिने माझा अपमान केला, अशी त्याची समजूत होऊन तो तिला पतिवियोगाचा दारुण शाप देतो. किती लहान अपराध व केवढी भयंकर शिक्षा !

दुर्वासाप्रमाणेच कण्वही तपोनिष्ठ, महाप्रभावी व अंतर्ज्ञानी आहे. पण इतर बाबतीत याचे त्याच्याशी अत्यंत वैषम्य आहे. दुर्वास कोपिष्ठ, तर हा शांत; तो निष्ठुर तर हा अत्यंत मृदुहृदय व प्रेमळ. शकुंतला ही त्याला यदृच्छेने वनात सापडलेली मुलगी. तथापि, त्याने स्वतःच्या मुलीप्रमाणे तिचे संगोपन करून तिला विविध प्रकारचे शिक्षण दिले. 'शकुंतला म्हणजे आमच्या कुलपतींचा जीव की प्राण' ['सा कुलपते-रुच्छ्वसितमिव ।'] असे त्याचा शिष्य म्हणतो, ते खोटे नाही. तिच्या दैवाची शांति करण्याकरिता तो अतिशय लांबचा प्रवास करतो. आपल्या पश्चात् तिने विवाह केला याबद्दल तिच्यावर रागावत तर नाहीच, उलट दुष्यंतासारखा गुणी मनुष्य आपल्या डोळ्यांसमोर असता त्यास शकुंतला देण्याचे आपणास कसे सुचले नाही, याचे त्याला आश्चर्य वाटते व सुदैवाने तिने योग्य पतीची निवड केली, याबद्दल त्याला आनंद होतो. हा आपला आशय त्याने 'दिष्टचा धूमाकुलितदृष्टेरपि यजमानस्य पावक एवाहुतिः पतिता' या दृष्टांताने व्यक्त केला आहे. ती सासरी जाऊ लागली असता त्याचे हृदय दुःखाने भरून येते, कंठ दाटून येतो, नेत्रांत अश्रु उभे राहतात. याप्रसंगी 'माझ्यासारख्या अरण्यवासी मनुष्याची कन्या-प्रेमाने जर अशी अवस्था होते, तर सांसारिक जनांची काय अवस्था

होत असेल बरे', असे तो स्वत:लाच विचारतो. तो सदैव अरण्यात राहत असला तरी त्याला व्यवहाराचे उत्तम ज्ञान आहे. शकुंतलेने सासरी कसे वागावे, याविषयी त्याने केलेला उपदेश बहुमोल आहे. 'बाबा, माझ्यासाठी शोक करू नका', असे शकुंतलेने विनविताच तो म्हणतो, 'तुझ्या प्रेमाची चिन्हे इतस्तत: दिसत असता माझा शोक कसा बरे शांत होईल?' तथापि ती निघून गेल्यावर 'कन्या हे परक्याचे धन ! ते मी आज ज्याचे त्यास परत केले', असा विवेक करून तो आपले दु:ख गिळून टाकतो. कण्वाच्या रूपाने कालिदासाने प्रेमळ पित्याचे हृदयस्पर्शी चित्र काढले आहे.

तिसरा ऋषि मारीच हा दिव्य कोटीतील आहे. त्याच्या आश्रमात स्वर्गातील सर्व सुखसाधने आहेत. पण त्यांमध्ये रममाण न होता तेथील ऋषि तपश्चर्या करीत असतात. तेथे जाताच 'हे स्वर्गापेक्षा अधिक आनंदाचे स्थान!' असे उद्‌गार दुष्यंत काढतो. मारीच ऋषि हा इंद्रादि देवांचा पिता. भगवान् विष्णूनेही वामनावतारी त्याचा पुत्र होऊन त्याच्यावर अनुग्रह केलेला. तो स्वत: आप्तकाम झाला तरी सदैव लोकहिताकरिता तपश्चर्येत मग्न असतो. त्याच्या आश्रमात शकुंतलेला आश्रय मिळाला. त्याच्या पतिव्रताधर्माच्या विवरणाने शकुंतलेला मानसिक शांति लाभली. ती प्रसूत झाली तेव्हा त्यानेच तिच्या मुलाचे जातकर्मादि संस्कार केले. अशा ज्ञाननिष्ठ व लोकहितैषी महात्म्याच्या आशीर्वादाने नाटकाची समाप्ति करण्यात कवीने मोठे औचित्य दाखविले आहे.

प्रियंवदा व अनसूया या दोन्ही शकुंतलेच्या अत्यंत प्रेमळ मैत्रिणी. दोघीही तिच्यासारख्याच विविधकलांत निष्णात. दोघींचेही शकुंतलेवर निरतिशय प्रेम. तथापि, त्यांच्या स्वभावांत पुष्कळ फरक आहे. अनसूया ही गंभीर, विवेकी, दूरदर्शी व व्यवहारज्ञ, तर प्रियंवदा स्वत:च्या नावाप्रमाणेच मधुर भाषण करणारी, सदैव आनंदी व विनोदी आहे. राजाचे स्वागत करण्यात, शकुंतलेचा जन्मवृत्तांत सांगण्यात व शेवटी तिला चांगल्या रीतीने वागवावे, अशी दुष्यंताला विनंती करण्यात अनसूया पुढाकार घेते. तिचा गंभीर स्वभाव पाहून कण्व नेहमी तिलाच उद्देशून बोलतात. याच्या उलट प्रियंवदेचा स्वभाव. शकुंतलेची

ती नेहमी थट्टा करीत असते. 'प्रियंवदेने माझे वल्कल घट्ट बांधले आहे ते जरा सैल कर' असे शकुंतलेने अनसूयेला सांगताच ती म्हणते, 'आपले स्तन विशाल करणाऱ्या यौवनाला दोष दे ! मला का देतेस ?'. शकुंतला बकुल वृक्षाजवळ उभी आहे, असे पाहून प्रियंवदा तिला म्हणते 'शकुंतले ! थोडा वेळ तू तेथेच रहा. तू जवळ असलीस की या लहानशा केसर वृक्षाशी लतेचा संयोग झाला आहे, असे वाटते.' शकुंतलेलाही हे भाषण इतके आवडते की, 'म्हणूनच तुला प्रियंवदा म्हणतात !' असे ती म्हणते. दुर्वासासारखा निष्ठुर ऋषि शाप देऊन त्वरित गतीने जाऊ लागला असता प्रियंवदाच पुढे जाऊन आपल्या मधुर वाणीने त्याच्या मनात शकुंतलेविषयी किंचित् अनुकंपा उत्पन्न करते. ती सासरी जाऊ लागली असता या दोघीनाही अतिशय दुःख होते; तथापि आम्ही आपले दुःख कसेही करून विसरू, त्या बिचारीला सुख होवो, अशा विचाराने त्या तिच्या भूषणादिकांची तयारी करतात. जाताना शकुंतला आपली लाडकी वनज्योत्स्ना नामक लता ठेव म्हणून त्यांच्या स्वाधीन करते, तेव्हा 'आम्हांला कोणाच्या स्वाधीन करतेस ?' असे म्हणून त्या अश्रु गाळतात. शकुंतला गेल्यावर तिच्यावरील प्रेमामुळे त्यांना तपोवन शून्यवत् भासते. अशा निरागस व प्रेमळ मैत्रिणींची जोडी सबंध संस्कृत वाङ्मयात आढळत नाही.

'शाकुंतला'तील माढव्य नामक विदूषक अगदीच सांगकाम्या आहे. 'विक्रमोर्वशीया'तील माणवक भोळसटपणाने राजाच्या रहस्याचा स्फोट करतो, तर हा माढव्य राजाने सांगितलेले सर्व खरे मानून तोंडाला कुलूप घालतो. एक बोलून घाण करतो, तर दुसरा न बोलून करतो. बाकी इतर बाबतीत—आधाशीपणात व विनोदी भाषणात—दोघेही सारखेच ! शार्ङ्गरव व शारद्वत या दोघां ऋषिकुमारांच्या स्वभावांतही भेद आहे. शार्ङ्गरव तापट व स्पष्टवक्ता आहे. शकुंतलेबरोबर पाठविलेल्या मंडळीत तोच मुख्य आहे. तो प्रथम कण्व-संदेश राजाला कळवून शकुंतलेचा स्वीकार करण्याविषयी विनंती करतो. राजा एकदम स्वीकार करीत नाही, असे पाहून तो युक्तिवादाने त्याचे मन वळविण्याचा प्रयत्न करतो ; तरीही राजा ऐकत नाही, असे पाहून संतप्त होऊन तो त्याला ऐश्वर्योन्मत्त म्हणण्यास व त्याची चोराशी तुलना करण्यास

अनमान करीत नाही. त्याचे व राजाचे भांडण उत्तरोत्तर वाढत जाते, असे पाहून शारद्वत मध्ये पडतो व 'आपण गुरूंचा संदेश कळविला आहे; आता परत जाऊ या' असे सुचवितो. तो स्वभावाने जास्त सौम्य व विवेकी दिसतो.

शकुंतलेच्या मातृस्थानी असलेली गौतमी, सिंहशावकाला त्याच्या मातेपासून काढून घेऊन त्याचे दांत मोजणारा निर्भय सर्वदमन, धन्याची मर्जी पाहून वागणारा सेनापति, गरीब पण स्वाभिमानी धीवर, सिद्ध-साधक बनून प्रथम अपराध्यास तंबी देणारे, पण त्याच्याजवळ पैसे दिसताच दारूच्या आशेने घटकेत पगडी फिरविणारे पोलीस शिपाई व त्यांचा अधिकारी यांची चित्रेही मनोवेधक उतरली आहेत. त्यांच्यासारखी माणसे आपल्या नेहमीच्या व्यवहारात दिसतात, त्यांवरून कालिदासाच्या मार्मिक निरीक्षणाचे कौतुक वाटते.



प्रकरण सातवे

# कालिदासीय ग्रंथांचे विशेष

**निर्गतासु न वा कस्य कालिदासस्य सूक्तिषु ।**
**प्रीतिर्मधुरसान्द्रासु मञ्जरीष्विव जायते ॥**

बाण–' हर्षचरित '.

मम्मटाने आपल्या 'काव्यप्रकाशा'त यश:प्राप्ति हे काव्यनिर्मितीचे प्रमुख प्रयोजन सांगितले आहे व त्याच्या उदाहरणार्थ कालिदासाचा प्रामुख्याने उल्लेख केला आहे. 'ध्वन्यालोक' हा साहित्यशास्त्रावरील सर्वमान्य ग्रंथ लिहिणारा मार्मिक व सहृदय टीकाकार आनंदवर्धन याने एके ठिकाणी 'अस्मिन्नतिविचित्रकविपरम्परावाहिनि संसारे कालिदास-प्रभृतयो द्वित्रा: पञ्चषा वा महाकवय इति गण्यन्ते' [या जगतात विविध प्रकारचे कवि उत्पन्न होत असले तरी त्यांपैकी कालिदासासारख्या दोघा-तिघांना, फार तर पाच-सहांनाच, महाकवि ही पदवी देता येईल] असे म्हटले आहे. जयदेव कवीने कालिदासाला 'कविकुलगुरु' ही अत्यंत श्रेष्ठ पदवी अर्पण केली आहे. एका सुभाषितकाराने तर 'पुरा कवीनां गणनाप्रसंगे कनिष्ठिकाऽधिष्ठितकालिदासा । अद्यापि तत्तुल्यकवेर-भावादनामिका सार्थवती बभूव ॥' [पूर्वी हाताच्या बोटांवर कवींची गणना करण्याचा प्रसंग आला असता कालिदासाच्या नावाने करंगळी घातली ; पण त्याच्या तोडीचा कवि त्या वेळी उत्पन्न झाला नसल्याने

तिच्या जवळच्या बोटाला अनामिका म्हणू लागले. अद्यापि तीच स्थिति असल्यामुळे त्या बोटाचे ते नाव सार्थ झाले आहे] असे म्हणून कालिदासाचे अनन्यसामान्य स्थान दर्शविले आहे. अर्वाचीन पाश्चात्य पंडितांनीही 'कालिदास हाच हिंदुस्थानचा शेक्सपीयर' इत्यादि वचनांनी त्याची मक्तकंठाने स्तुति केली आहे व जगाच्या सर्वश्रेष्ठ कवींच्या मालिकेत त्याचे नाव गोविले आहे. कालिदासाने प्राचीन व अर्वाचीन, पौरस्त्य व पाश्चिमात्य विद्वानांवर जी ही मोहिनी घातली, तिचे बीज कशात आहे, याचा आपणांस या प्रकरणात विचार करावयाचा आहे.

उत्कृष्ट काव्य वाचले असता प्रत्येक सहृदय वाचकास आनंद होतो, पण तो का व कसा झाला, याचे विवेचन मात्र त्याला करता येत नाही. एका कवीने म्हटल्याप्रमाणे 'घृतक्षीरद्राक्षामधुमधुरिमा कैरपि पदैर्विशिष्यानाख्येयो भवति रसनामात्रविषयः।' [तूप, दूध, द्राक्षे, मध यांची गोडी सर्वांच्या जिव्हेला तेवढी कळते, पण ती कोणत्याही शब्दांनी वर्णन करता येत नाही]. केवळ सामान्य वाचकांनाच या बाबतीत आपले दौर्बल्य जाणवते, असे मात्र नव्हे. प्राचीन काळापासून आजपर्यंत अनेक साहित्यकोविदांनी काव्यघटकांची छाननी करून काव्याची व्याख्या करण्याचा प्रयत्न केला आहे; पण कोणतेही लक्षण अद्यापि सर्वसंमत झाले नाही. आपल्या भरतखंडातही भरतादि अनेक साहित्यशास्त्रज्ञांनी काव्याच्या व्याख्या केल्या आहेत; पण त्यांच्यामध्येही अत्यंत मतवैचित्र्य दृष्टीस पडते. 'ध्वन्यालोक'कार आनंदवर्धन ध्वनि किंवा व्यंग्यार्थ याला प्राधान्य देऊन तो काव्याचा आत्मा असे म्हणतो, तर 'साहित्यदर्पण'कार विश्वनाथ 'वाक्यं रसात्मकं काव्यम्' असे काव्याचे लक्षण करून रसाला श्रेष्ठ ठरवितो. 'काव्यालङ्कारसूत्रवृत्ति'कार वामन याने रीति किंवा विशिष्ट पदरचना हिलाच काव्याचा आत्मा मानले आहे. याच्या उलट भामहादि आलंकारिक अलंकारासच महत्त्व देतात. याशिवाय कुन्तकादि इतर ग्रंथकारांनीही आपापल्या मतांचा आग्रहाने पुरस्कार केला आहे. तथापि ध्वनि, रस, रीति व अलंकार हे या विषयातील चार प्रमुख पक्ष होत. यांपैकी कोणता पक्ष सयुक्तिक आहे, याचे येथे विवेचन करणे शक्य नाही. तथापि यांपैकी कोणताही पक्ष घेतला तरी कालिदासाचे ग्रंथ काव्यलक्षणाच्या कसोटीला पूर्णपणे उतरतात, हे दाखविता येईल.

१. ध्वनि : उत्कृष्ट काव्यात शब्दांचा वरवर दिसणारा वाच्यार्थ व क्वचित् तो गैरलागू झाल्यामुळे ध्यानात येणारा लक्ष्यार्थ, यांव्यतिरिक्त ध्वनि किंवा व्यंग्यार्थ हा एक निराळाच सहृदयहृदयाल्हादक असा अर्थ विवक्षित असतो व त्यामुळे त्याला रमणीयत्व येते, असे मत प्रथम आनन्दवर्धनाने आपल्या 'ध्वन्यालोका'त सविस्तर प्रतिपादिले व त्याचा पुढे मम्मटादि साहित्यशास्त्रज्ञांनी पुरस्कार केला. ज्या काव्यात वाच्यार्थापेक्षा व्यंग्यार्थ जास्त मनोहर असेल ते उत्कृष्ट काव्य, ज्यात तो वाच्यार्थाइतकाच किंवा कमी प्रतीचा असेल, ते मध्यम काव्य, व ज्यात व्यंग्यार्थ मुळीच नसून किंवा अत्यंत अस्पष्ट व दुर्बोध असून अलंकारादिकांवरच जास्त भर दिला असेल ते अधम काव्य, अशी काव्यांची वर्गवारीही या ग्रंथकारांनी लाविली आहे. या दृष्टीने पाहता कालिदासाची काव्यें उत्कृष्ट प्रतीची ठरतील, यात संशय नाही. कोणताही भाव स्पष्ट शब्दांनी न सांगता खुबीने सूचित करण्यात कालिदासाचा हातखंडा आहे. उदाहरणार्थ, हिमालयाजवळ अंगिरा ऋषीने श्रीशंकराकरिता पार्वतीची मागणी केली असता जवळच वसलेल्या पार्वतीचे कालिदासाने 'कुमारसंभवा'त केलेले वर्णन पाहा—

**एवंवादिनि देवर्षौ पार्श्वे पितुरधोमुखी।**
**लीलाकमलपत्राणि गणयामास पार्वती॥** कुमार० ६, ८४.

'याप्रमाणे देवर्षि बोलत असता पित्याजवळ मान खाली घालून वसलेली पार्वती (हातातल्या) लीलाकमलाची पाने मोजित होती'. या श्लोकात एकही अलंकार नाही, तथापि त्यातील कमलपत्रगणनाच्या वर्णनाने पार्वतीची लज्जा, आपल्या मनातील प्रेम व आनंद ही बाहेर दिसू नयेत म्हणून तिने केलेला प्रयत्न ही उत्कृष्ट रीतीने सूचित झाली आहेत. हा श्लोक उत्कृष्ट काव्याचे उदाहरण म्हणून साहित्यशास्त्रज्ञांनी उदाहृत केला आहे. दुसरे 'मेघदूता'तील गंगेचे वर्णन घ्या—

**तस्माद्गच्छेरनुकनखलं शैलराजावतीर्णां**
**जह्नोः कन्यां सगरतनयस्वर्गसोपानपङ्क्तिम्।**
**गौरीवक्त्रभ्रुकुटिरचनां या विहस्येव फेनैः**
**शम्भोः केशग्रहणमकरोदिन्दुलग्नोर्मिहस्ता॥** मेघ० ५२.

'नंतर कनखलगिरीजवळ हिमालयावरून खाली पडणाऱ्या व सगरपुत्रांना स्वर्गारोहण करण्याकरिता सोपानपंक्ति झालेल्या जह्नुकन्ये

(भागीरथी)कडे तू जा. तिने पार्वतीच्या कपाळावरील आठ्या पाहून जणू काय फेनरूपी हास्य करीत चंद्रापर्यंत आपले तरंगरूपी हात उंच करून श्रीशंकराचे केशग्रहण केले आहे.'

या श्लोकात रूपक, उत्प्रेक्षा, समासोक्ति इत्यादि अलंकारांची गर्दी झाली आहे. तथापि सगरपुत्रांना स्वर्गप्राप्तीचे साधन झाल्यामुळे गंगेची पवित्रता व पार्वतीच्या मत्सरास न जुमानता श्रीशंकरांनी तिला आपल्या शिरावर स्थान दिले आहे, त्यामुळे तिचे महत्त्वही सूचित झाल्यामुळेच त्याला हृद्यता आली आहे. कालिदासाने योजिलेले प्रत्येक पद, किंबहुना लिंग, विभक्ति, वचन इत्यादि त्याचे अवयवही कसे रमणीयार्थव्यंजक असतात हे आनंदवर्धन, मम्मट इत्यादिकांनी अनेक उदाहरणांनी दाखविले आहे. विस्तारभयास्तव ती उदाहरणे येथे देता येत नाहीत.

भवभूति, बाण इत्यादि इतर कवि व कालिदास यांच्या ग्रंथांत सकृद्दर्शनीच एक मोठा फरक साधारण वाचकांच्याही ध्यानात येतो, त्याचा येथे उल्लेख करणे जरूर आहे. एखादी रम्य कल्पना मनात आली की हे इतर कवि तिचे पाल्हाळिक वर्णन करीत सुटतात, पण कालिदास मोजक्या शब्दांनी तिचे रेखाचित्र काढून त्यांत रंग भरण्याचे काम वाचकांच्या सहृदयतेवर सोपवून देतो. त्यामुळे कालिदासाची काव्ये 'क्षणे क्षणे यन्नवतामुपैति' या रमणीयतेच्या कसोटीस पूर्णपणे उतरतात व ती वाचताना केव्हाही कंटाळा येत नाही. उदाहरणार्थ, मदनदाहानंतर वसंताला पाहून रतीचे दु:ख दुणावले, हा अर्थ व्यक्त करण्याकरिता कालिदासाने 'स्वजनस्य हि दु:खमग्रतो विवृतद्वारमिवोपजायते' या पंक्तीत 'विवृतद्वारमिव' ह्या चिमुकल्या उत्प्रेक्षेने बांध काढून घेतल्यामुळे धो धो वाहणाऱ्या पाण्याप्रमाणे दु:खाचा अनावर होणारा ओघ सूचित केला आहे. पण तशाच एका प्रसंगी भवभूतीने एक सबंध श्लोक खर्ची घालून त्या अर्थाला नटविले आहे—

> सन्तानवाहीन्यपि मानुषाणां दुःखानि सद्बन्धुवियोगजानि।
> दृष्टे जने प्रेयसि दुःसहानि स्रोतःसहस्रैरिव संप्लवन्ते॥
>
> उत्तररामचरित, ४, ८.

मागे 'मालविकाग्निमित्रा'चे संविधानक देताना कवीने इरावतीच्या नृत्याचा प्रसंग अनावश्यक म्हणून कसा खुबीने टाळला आहे, याचे आम्ही

विवेचन केलें आहे. यासारख्या प्रसंगांनी कवीचा संयम व कलाभिज्ञता ही उत्कृष्ट रीतीने प्रत्ययास येतात.

२. रस : वर वर्णिलेल्या ध्वनीचेच विषयभेदाने वस्तुध्वनि, अलंकारध्वनि व रसध्वनि असे तीन भेद आलंकारिकांनी मानले आहेत. यांपैकी रसध्वनि हा सर्वांत श्रेष्ठ होय. व्यंग्यव्यंजकभाव अनेक प्रकारे संभवत असला तरी काव्य-नाटकादि प्रबंधांत रसालाच प्राधान्य देऊन तदनुगुण अलंकारादिकांची योजना करावी, असे आनंदवर्धनानेही म्हटले आहे. यामुळे रसपक्षाला महत्त्व येऊन विश्वनाथाने आपल्या 'साहित्य-दर्पणा'त रस हाच काव्याचा आत्मा, असे प्रतिपादिले आहे. साहित्य-शास्त्रात शृंगार, वीर, करुण, हास्य, रौद्र, भयानक, बीभत्स, अद्भुत व शांत असे नऊ रस मानतात. यांपैकी संभोग व विप्रलंभ असा दोन्ही प्रकारचा शृंगार आणि करुण या रसांचा कालिदासाच्या काव्यांत उत्तम परिपोष झाला आहे. विशेषत: शृंगाररसातील त्याचे नैपुण्य पाहून जयदेवाने त्याला 'कविताकामिनीचा विलास' अशी संज्ञा दिली आहे. एका सुभाषितकाराने तर शृंगाररसात व ललितपदयोजनेत त्याच्याहून वरचढ कवि अद्यापि झाला नाही, असे म्हटले आहे. कालिदासाची तिन्ही नाटके व 'कुमारसंभव' व 'मेघदूत' ही काव्ये शृंगाररसप्रधान असल्याने त्यांत इतर रसांचा फारसा परिपोष होण्यास अवकाश नाही. तथापि प्रसंगवशात् हास्य, करुण, भयानक इत्यादि अन्य रसांच्या छटाही त्यांत आल्या आहेत. 'रघुवंशा'त मात्र शृंगाराप्रमाणेच इतरही प्रमुख रसांचा परिपोष उत्तम रीतीने झालेला आढळतो, हे मागे (पृ. १४३) दाखविलेच आहे.

कोणत्याही रसाचा पूर्ण परिपोष होण्याला विभावानुभावादि तद्घटकांचे सम्यग्वर्णन करणे आवश्यक असते. त्यामुळे रसाची उदाहरणे मूळ ग्रंथातूनच वाचली पाहिजेत. तथापि याही बाबतीत कालिदासाचे कौशल्य दाखविण्याकरिता एकदोन उदाहरणे येथे दिली आहेत—

नूनं तस्याः प्रबलरुदितोच्छूननेत्रं बहूनां
निःश्वासानामशिशिरतया भिन्नवर्णाधरोष्ठम् ।
हस्तन्यस्तं मुखमसकलव्यक्ति लम्बालकत्वा–
दिन्दोर्दैन्यं त्वदुपसरणक्लिष्टकान्तेर्बिभर्ति ॥ मेघ० ८५.

या श्लोकात यक्षाने कल्पनेने आपल्या विरहिणी पत्नीचे सुंदर वर्णन केले आहे. रात्रंदिवस अश्रु गाळीत राहिल्याने सुजलेले तिचे डोळे, उष्ण निःश्वासामुळे विवर्ण झालेला तिचा अधरोष्ठ, हातावर टेकलेले व लांब सडक केसांनी झाकल्यामुळे अर्धवट दिसणारे तिचे मुख यांच्या वर्णनाने यक्षपत्नीचे विरहदुःख आणि विषाद, चिन्ता इत्यादि मनोविकार उत्कृष्ट रीतीने व्यंजित झाले आहेत. शेवटच्या पंक्तीतील निदर्शनेने तिच्या मुखाची निस्तेजता सुचविली आहे. एकंदर वर्णनाने वाचकास विप्रलंभ शृंगाराची उत्तम प्रतीति होते.

हरस्तु किञ्चित्परिलुप्तधैर्यश्चन्द्रोदयारम्भ इवाम्बुराशिः।
उमामुखे बिम्बफलाधरोष्ठे व्यापारयामास विलोचनानि॥ कुमार० ६, ६७.

या 'कुमारसंभवा'तील श्लोकात शंकराच्या मनात आकस्मिकपणे उद्भूत होणाऱ्या रतिभावाचे सुंदर वर्णन आले आहे.

३. **रीति** : इ. स. च्या आठव्या शतकात होऊन गेलेल्या वामनाने आपल्या 'काव्यालंकारसूत्रवृत्ति' नामक ग्रंथात 'रीति हाच काव्याचा आत्मा', हे मत प्रतिपादिले. पुढे 'ध्वन्यालोक'कारांचा ध्वनिवाद रसिकांस जास्त मान्य झाल्यामुळे वामनाचा रीतिवाद मागे पडला. तथापि त्यामुळे रीतीचे काव्यातील महत्त्व कमी होत नाही. विशिष्ट पदरचनेला वामनाने रीति ही संज्ञा लावली आहे. त्याने वैदर्भी, गौडी व पांचाली अशा तीन रीति मानल्या आहेत. त्यांपैकी वैदर्भी ही सर्वांत श्रेष्ठ ; कारण तीत सर्व गुणांचा समुच्चय असतो, असे त्याने म्हटले आहे. वामनाने श्लेषादि दहा गुण मानले होते, पण त्यानंतरच्या मम्मटादि आलंकारिकांनी त्यांची छाननी करून माधुर्य, ओजस् व प्रसाद ह्या तीनच गुणांना मान्यता दिली आहे.

कालिदासाने आपले सर्व ग्रंथ या सर्वोत्कृष्ट वैदर्भी रीतीतच लिहिले आहेत. वैदर्भी रीतीचे विशेष म्हणजे माधुर्यव्यंजक कोमलवर्णांचा उपयोग व दीर्घ समासांचा अभाव हे होत. संस्कृत भाषा जात्याच श्रुतिमनोहर आहे. तशात कालिदासाने आपल्या सर्व ग्रंथांत टवर्गीय परुष वर्ण, संयुक्ताक्षरे व लांबलचक समास हे बुद्धया टाळलेले आहेत. त्यामुळे त्याचे ग्रंथ एका ग्रंथकाराने म्हटल्याप्रमाणे मधाची पुटे दिल्यासारखे गोड झाले आहेत. कालिदासाच्या ग्रंथांत शृंगार व करुण हेच रस प्रमुख असल्यामुळे त्यांना

अनुरूप अशीच त्याची भाषाशैली झाली आहे. कारण शृंगार—विशेषत: विप्रलंभ शृंगार—व करुण यांमध्ये वाचकांचे मन अतिशय विरघळून जाते. त्यामुळे त्या रसांच्या वर्णनात कोमलवर्णयुक्त रचनाच योग्य असते. आंग्ल कवि टेनिसनप्रमाणे नादमधुर शब्दयोजनेकडे कालिदासाने अतिशय लक्ष दिलेले दिसते. त्याने आपली काव्ये पुन: पुन: तपासून अनेक कल्पना व शब्द बदलले असावेत. 'रघुवंशा'च्या अकराव्या सर्गातील ४७ व ४८ हे समानार्थक श्लोक कालिदासाचे असल्यास त्यांपैकी एक रचून झाल्यावर त्यातील कल्पना व रचना मनाजोगी न झाल्यामुळे त्याने दुसरा रचला असावा. इतके परिश्रम घेऊन रचलेल्या काव्यात क्लिष्टता व कृत्रिमता कोठेही आढळत नाही, ती नवोन्मीलित पुष्पांप्रमाणे ताजी व रसपूर्ण दिसतात, यातच त्याच्या कलेचा परमोत्कर्ष आहे. ललितपदयोजनेवर कालिदासाचा अतिशय भर असल्यामुळे संस्कृतानभिज्ञ वाचकांचेही मन त्याच्या श्रुतिमनोहर कृतींनी आकृष्ट केले जाते. तसेच कालिदासाने आपल्या ग्रंथांत समासांचा यथोचित उपयोग केल्यामुळे त्याच्या रचनेत सर्वत्र सरलता, सुबोधता व प्रसाद हे गुण दृष्टीस पडतात. लांबलचक समासांनी रचनेस कशी क्लिष्टता व कृत्रिमता येते ते बाणाच्या 'हर्षचरित' व 'कादंबरी' या ग्रंथांवरून दिसते. त्याच्या पल्लेदार समासांचा अर्थ लावताना वाचकवर्ग इतका त्रासून जातो की, त्यांतील रम्य कल्पनांकडे त्याचे सहजच दुर्लक्ष होते. प्रदीर्घ समासयोजना नाटकात तर विशेषच रसहानि करते. उदाहरणार्थ, भवभूतीचे 'मालतीमाधव' नाटक घ्या. त्यात स्त्रीपात्रांच्याही तोंडी समासप्रचुर क्लिष्ट भाषा घातल्याने वाचकांचा अत्यंत विरस होतो. याच्या उलट कालिदासाच्या नाटकांतील संभाषणे सुटसुटीत व म्हणून स्वाभाविक व सहजसुंदर झाली आहेत.

४. **अलंकार :** उत्कृष्ट काव्यात बहुधा ध्वनि किंवा रस प्रतीत होत असला तरी सर्वत्र त्याची अपेक्षा करणे युक्त किंवा इष्टही होणार नाही. काव्याचा प्रधान उद्देश आनंदप्राप्ति असल्याने ती भावनोद्रेकाप्रमाणेच कल्पनाविलासाने होणे शक्य असते. म्हणून भामहादि आलंकारिकांनी कल्पनेच्या विलासास—अलंकारांस—काव्यघटकांमध्ये मुख्य मानून त्यांचे सविस्तर वर्गीकरण व विवेचन केले आहे. शिवाय अलंकारांच्या समुचित योजनेने रसोत्कर्षासही मदत होते, हे वर दिलेल्या उदाहरणां-

वरून दिसून येईल. त्यामुळे महाकवींनी आपल्या काव्यांत त्यांचा उपयोग केला आहे.

अलंकारांचे शब्दालंकार, अर्थालंकार व शब्दार्थालंकार असे तीन भेद मानतात. अर्थालंकारांपेक्षा शब्दालंकार जास्त कृत्रिम व म्हणून रसिकांस कमी हृद्य वाटतात. कलाभिज्ञ कालिदासाने त्यांचा फारसा कोठे उपयोग केला नाही. रचनेच्या ओघात जेथे ते सहज स्फूर्तीने आले तेथेच ते योजिले आहेत. उदाहरणार्थ, 'भुजे भुजगेन्द्रसमानसारे भूयः स भूमेर्धुरमाससञ्ज' (रघु. २, ७४), 'सम्बन्धिनः सद्म समाससाद,' (रघु. ७, १६), 'प्रजाः प्रजानाथ पितेव पासि।' (रघु. २, ४८) इत्यादि पंक्तींतील अनुप्रास पाहावे. क्वचित् स्थली विवक्षित अर्थाचा प्रतिध्वनिही त्यांत दिसून येतो. उदाहरणार्थ, 'मायूरी मदयति मार्जना मनांसि' यातील मकारानुवृत्तीने कवीने मृदंगाच्या तालाचे सुंदर अनुकरण केलेले दिसते.

**यमक**—या अलंकारात कवीला मोठ्या प्रयत्नाने विशिष्ट शब्द हुडकून काढून योजावे लागतात. त्यामुळे त्याच्या रचनेत कृत्रिमता येते व रसभंग होतो. म्हणून शृंगाररसाच्या—विशेषतः विप्रलंभ शृंगाराच्या—वर्णनात यमकांचा उपयोग करू नये, असा ध्वनिकारांनी दंडक घालून दिला आहे. कालिदासानेही आपल्या शृंगाररसप्रधान ग्रंथांत कोठेही यमकांचा विशेष उपयोग केलेला दिसत नाही. पात्रांच्या संभाषणात तर तो त्याने काळजीपूर्वक टाळलेला आहे. इतरत्र—ज्या ठिकाणी त्यांचा उपयोग दोषार्ह होणार नाही तेथे—त्याने त्यांचा क्वचित् उपयोग केला आहे. उदाहरणार्थ, 'वधाय वध्यस्य शरं शरण्यः' (रघु. २, ३०), 'मनुष्यवाचा मनुवंशकेतुम्' (रघु. २, ३३) इत्यादि पाहा. नवव्या सर्गातील पहिल्या ५४ श्लोकांत दशरथाची राज्यव्यवस्था, वसंत ऋतु, मृगया इत्यादिकांचे वर्णन करताना त्याने चतुर्थपादाच्या आरंभी 'यमवतामवतां च धुरि स्थितः' (रघु. ९, १), 'सनगरं नगरन्ध्रकरौजसः' (रघु. ९, २) इत्यादि यमके योजिली आहेत. पण यांत शृंगारादिरसांचा संबंध येत नसल्यामुळे रसहानि हा दोष संभवत नाही. उलट, कवीने योजिलेल्या यमकांच्या नादमाधुर्याने वाचकांचे मन आनंदित होते व त्याच्या भाषाप्रभुत्वाबद्दल कौतुक वाटते.

श्लेष—द्वयर्थी शब्दांच्या योजनेने या अलंकाराची उत्पत्ति होत असल्यामुळे त्याची गोडी चाखावयास रसिकतेपेक्षा विद्वत्ताच जास्त आवश्यक असते. त्याची हाक हृदयाला नसून बुद्धीलाच उद्देशून असते. कालिदासोत्तर काळात वाङ्मयातही रसिकतेपेक्षा विद्वतेलाच जास्त मान मिळत गेल्याने कवींनी या अलंकाराचा सढळ हाताने उपयोग केला आहे. पण त्यामुळे त्यांची काव्ये दुर्बोध, बोजड व क्लिष्ट झाली आहेत. कालिदासाने क्वचित् स्थलीच—जेथे त्यायोगे विशेष रम्यता येत असेल किंवा एकंदर वर्णनास तो आवश्यक असेल तेथेच—श्लेषाचा उपयोग केला आहे. मागे 'मालविकाग्निमित्रा'चे संविधानक देताना मालविकेच्या तोंडून राजावर बसलेले तिचे प्रेम व्यक्त करण्याकरिता कालिदासाने श्लेषाचा कसा खुबीने उपयोग केला आहे, ते आम्ही दाखविले आहे. त्याच नाटकाच्या पाचव्या अंकात पुढील भाषणे घातली आहेत—

विदू०—भो विश्रब्धो भूत्वा त्वमिमां यौवनवतीं पश्य।

देवी०—काम्।

विदू०—तपनीयाशोकस्य कुसुमशोभाम्।

विदूषकाला सालंकृत व यौवनाने मुसमुसलेल्या मालविकेकडे राजाचे लक्ष वेधावयाचे होते, पण त्याचे शब्द राणीने ऐकल्यामुळे तिच्या प्रश्नास उत्तर देताना 'यौवनवतीम्' या शब्दाचा श्लेषाने दुसरा अर्थ घेऊन व अशोक वृक्षाच्या पुष्पशोभेकडे त्याचा संबंध जोडून त्याने आपली सुटका करून घेतली आहे. या ठिकाणी छेकापह्नुति हा सुंदर अलंकार श्लेष-योजनेने साधला आहे.

तस्मिन् काले नयनसलिलं योषितां खण्डितानां
शान्तिं नेयं प्रणयिभिरतो वर्त्म भानोस्त्यजाशु।
प्रालेयास्रं कमलवदनात्सोऽपि हर्तुं नलिन्याः
प्रत्यावृत्तस्त्वयि कररुधि स्यादनल्पाभ्यसूयः॥ मेघ० ४१.

या श्लोकात 'मेघा! प्रातःकाळी आपल्या कमलिनीरूपी खण्डित स्त्रीच्या कमलमुखावरील दंवरूपी अश्रु पुसण्यास सूर्य प्रवृत्त झाला असता तू त्याचा कर धरू लागल्यास (म्हणजे किरण अडवू लागल्यास) तो तुजवर अतिशय रागावेल' ही अत्यंत रम्य कल्पना सजविण्यास 'कर' शब्दावरील श्लेष आवश्यक म्हणून योजिला आहे. कालिदासाच्या श्लेषांचा अर्थ साधारण

वाचकांसही सहज समजत असल्यामुळे त्यायोगे कोठेही क्लिष्टता किंवा रसभंग झालेला दिसत नाही.

या ठिकाणी कालिदासाच्या दुसऱ्याही एका लकबीचा उल्लेख करण्यासारखा आहे. त्याच्या मानसपुत्रांची व कन्यांची नावे काही विशिष्ट हेतूने ठेवलेली दिसतात. 'मालविकाग्निमित्रा'च्या पाचव्या अंकात विदूषकाने मालविकेला बन्दिशालेतून सोडवून उद्यानात पाठविल्यावर तो राजाला येऊन मिळतो ; नंतर ते दोघेही उद्यानाकडे जातात, तोच वाटेत राजाला इरावतीची दासी चंद्रिका दिसते. तेव्हा राजा विदूषकास भिंतीआड लपण्यास सुचवितो. तेव्हा विदूषक उत्तर करतो, 'खरेच, चोरांनी व कामुक पुरुषांनी चंद्रिकेला टाळलेच पाहिजे'. यात 'चंद्रिका' या शब्दावर विदूषकाने कोटी केली आहे. याप्रमाणेच वकुलावलिका, ध्रुवसिद्धि, प्रियंवदा इत्यादि पात्रांची नावेही सार्थ असल्याचे कालिदासाने इतर पात्रांच्या संभाषणांतून दर्शविले आहे. त्याचप्रमाणे काव्यांतही उमा, अपर्णा, रघु, राम इत्यादि व्यक्तींच्या नावांची मनोरंजक व्युत्पत्ति त्याने लावली आहे.

यानंतर आपण अर्थालंकारांकडे वळू. यांचे प्रथमच स्वभावोक्ति व वक्रोक्ति असे दोन भेद पडतात. स्वभावोक्तीत कवीने पाहिलेल्या किंवा कल्पिलेल्या पदार्थांचे अगर व्यक्तींचे अगदी हुबेहूब पण रम्य असे चित्र काढावयाचे असते, तर वक्रोक्तीत त्यांच्या अंगावर आपल्या कल्पनाशक्तीने निर्मिलेले अलंकार घालून त्यांना सजवावयाचे असते. या दोन्ही प्रकारांत कालिदासाचे अप्रतिम नैपुण्य दिसून येते. त्याच्या ग्रंथात अनेक प्राण्यांची व व्यक्तींची चित्रे अगदी मोजक्या शब्दांत पण यथातथ्य काढलेली दिसतात. 'शाकुंतला'तील, सारथ्याने लगाम सोडल्यावर दौडणारे घोडे व त्यांच्यापुढे प्राण वाचविण्यासाठी पळणारा हरिण, कन्यावियोगप्रसंगी विव्हल झालेला कण्व, 'रघुवंशा'तील, पित्यासमोर दाईचा हात धरून येणारा लहानगा रघु इत्यादिकांच्या शब्दचित्रांवरून कालिदासाची सूक्ष्म निरीक्षणशक्ति व वर्णनकौशल्य ही प्रत्ययास येतात. त्या जातीचे आणखीही एक उदाहरण घेऊ---

**स चापकोटीनिहितैकबाहुः शिरस्त्रनिष्कर्षणभिन्नमौलिः।**
**ललाटबद्धश्रमवारिबिन्दुर्भीतां प्रियामेत्य वचो बभाषे॥** रघु० ७, ६६.

आपला मार्ग अडवून बसलेल्या शत्रूशी युद्ध करून विजयी झालेल्या अजाने भयत्रस्त इंदुमतीकडे येऊन भाषण केले, त्या वेळचे हे वर्णन आहे. यात धनुष्यकोटीवर टेकून उभे राहण्याची अजाची ऐट, शिरस्त्राण काढून घेतल्यामुळे मोकळे सुटलेले त्याचे केश, श्रमाने त्याच्या कपाळावर दिसणारे घर्मबिंदु यांचे कवीने वेचक शब्दांत इतके सुंदर चित्र काढले आहे की, एखाद्या कसलेल्या चित्रकारालाही ते मार्गदर्शक होईल.

पण स्वभावोक्तीपेक्षा वक्रोक्तिमूलक उपमा, उत्प्रेक्षा, दृष्टान्तादि अलंकारांत कवीच्या तरल कल्पनेचा रम्य विलास दृष्टीस पडतो. त्यांतच पृथ्वीपासून आकाशापर्यंत सर्वत्र स्वैर फिरणारी व सामान्य जनांना नीरस व ओबडधोबड वाटणाऱ्या पदार्थांतही सौंदर्य पाहणारी त्याची भेदक दृष्टि, विविध शास्त्रांच्या व्यासंगाने आलेली बहुश्रुतता, अनेक कलांच्या प्रयोगाने प्राप्त झालेले नैपुण्य, व्यवहारात मिळालेले अनुभव यांचे स्वच्छ प्रतिबिंब पडलेले दिसते. यास्तव त्याच्या चरित्राकरिता आम्ही मागे त्यांचा उपयोग केला आहे. एका सुभाषितकाराने 'उपमा कालिदासस्य' असे म्हणून त्याच्या उपमांचे अलौकिकत्व दर्शविले आहे. कालिदासाने योजिलेल्या उपमांची विविधता, मार्मिकता व रम्यता लक्षात घेता ते विधान यथार्थ आहे, यात संशय नाही. पण उपमा या शब्दाचा व्यापक अर्थ घेऊन रूपक, उत्प्रेक्षा, अतिशयोक्ति, दृष्टान्त, अर्थान्तरन्यास इत्यादि इतर सादृश्यमूलक अलंकारांविषयीही ते विधान केले आहे असे मानले, तरी ते अन्वर्थच होणार आहे. प्रथम कालिदासीय उपमांचे विशेष सांगून नंतर या इतर अलंकारांकडे वळू.

(१) **रम्यता**—कालिदासीय उपमांचा प्रथमच नजरेत भरणारा विशेष म्हणजे त्यांचे सौंदर्य हा होय. सामान्य जनांच्या चर्मचक्षूंना न दिसणारे वस्तूंचे सौंदर्य कवीच्या मनश्चक्षूपुढे लपत नाही. उदाहरणार्थ, 'मेघदूता'तील 'रेवां द्रक्ष्यस्युपलविषमां विन्ध्यपादे विशीर्णां, भक्तिच्छेदैरिव विरचितां भूतिमङ्गे गजस्य।' (मेघ. १९) ही उपमा घ्या. विन्ध्य पर्वताच्या पायथ्याशी खडकाळ प्रदेशातून वाहणाऱ्या नर्मदा नदीच्या प्रवाहाला हत्तीच्या अंगावर काढलेल्या चित्रविचित्र रंगाच्या वेलबुट्टीची उपमा देऊन त्याचे सौंदर्य कवीने व्यक्त केले आहे. कालिदासाच्या उपमा कोठेही श्लेषमूलक नाहीत ; त्या सहजरम्य

साम्यावर बसविलेल्या असतात. याच्या उलट बाण, सुबंधु, श्रीहर्ष इत्यादिकांनी आपल्या उपमा श्लेषाधिष्ठित केल्यामुळे त्या अतिशय कृत्रिम वाटतात. उदाहरणार्थ, 'सा (कादंबरी) जानकीव पीतरक्तेभ्यो रजनिचरेभ्य इव चम्पकाशोकेभ्यो बिभेति' ही बाणाच्या 'कादंबरी'तील उपमा घ्या. हीत राक्षस आणि चंपक व अशोक यात वस्तुतः काही साम्य नसताही दोघांनाही 'पीतरक्त' हे विशेषण लावता येते, म्हणून श्लेषमूलक उपमा साधली आहे. अशा उपमांत कवीचे भाषाप्रभुत्व दिसून येत असले, तरी सहृदय वाचकांस त्या रम्य वाटत नाहीत.

(२) **समर्पकपणा**--कालिदासाने योजिलेल्या उपमा अत्यंत समर्पक वाटतात. त्यांच्या योगे वर्णनीय वस्तूंची यथार्थ कल्पना वाचकांस होते. 'शाकुंतला'त शार्ङ्गरवादि तपस्विजनांबरोबर आलेल्या शकुंतलेला पाहून 'मध्ये तपोधनानां किसलयमिव पाण्डुपत्राणाम्' अशी अत्यंत समर्पक उपमा राजाने योजिली आहे व तिच्या योगे जरठ ऋषींच्या रूक्ष आकृतींनी विशेषच खुलणारे तिचे मुग्ध तारुण्य सूचित केले आहे. 'मेघदूता'त (श्लो. ९) स्त्रियांच्या हृदयाला कुसुमाची उपमा यक्षाने दिली आहे. देशी पुष्पांचे सुगंधित्व, रमणीयता व किंचित् उष्णतेनेही करपून जाऊन गळून पडण्याची त्यांची प्रवृत्ति, ही लक्षात घेता स्त्रियांच्या निसर्गमधुर, प्रेमळ व अल्पविरहानेही व्याकुळ होणाऱ्या हृदयाला दिलेली त्यांची उपमा यथातथ्य वाटते. इंदुमतीच्या निधनानंतर वसिष्ठ ऋषींच्या उपदेशास मान देऊन व आपला पुत्र दशरथ अल्पवयस्क होता म्हणून अजाने काही दिवस काढले, तरी त्या काळात पत्नीशोकाने त्याचे हृदय हळूहळू विदीर्ण होत होते, ही कल्पना एखाद्या विशाल सौधाजवळ उगवणाऱ्या व आपल्या हळूहळू पसरणाऱ्या मुळांनी त्याला कालांतराने उखडून टाकणाऱ्या प्लक्ष वृक्षाच्या रोपट्याच्या उपमेने कवीने व्यक्त केली आहे.

(३) **विविधता**--कालिदासाच्या उपमांचा साकल्याने विचार करता त्यांच्या विविधतेने मन आश्चर्यचकित होते. आगमभेदाने त्यांचे येणेप्रमाणे वर्गीकरण करता येईल.--

(अ) **सृष्टपदार्थीय**--लता, वृक्ष, फुले, फळे, पृथ्वीवरील नानाप्रकारचे प्राणी, आकाशातील ग्रह, तारे, सूर्य, चंद्र, धूमकेतु इत्यादि

सृष्टीतील यच्चयावत् पदार्थांतून त्याने आपल्या उपमा घेतल्या आहेत ; त्यांवरून त्याच्या दृष्टीची विशालता नजरेत भरते. उदाहरणार्थ, कण्वऋषीला अवचित मिळालेल्या बाल्यावस्थेतील सुंदर शकुंतलेला रुईच्या झाडावर यदृच्छेने गळून पडलेल्या नवमालिका कुसुमाची, मदनदाहानंतर दु:खाने तळमळणाऱ्या रतीला तळ्यातील पाणी आटल्यामुळे तडफडणाऱ्या शफरीची, व त्रिभुवनाला त्रस्त करणाऱ्या तारकासुराला धूमकेतूची दिलेली उपमा पाहा.

(आ) **शास्त्रीय**—कालिदासाने व्याकरण, तत्त्वज्ञान, राजनीति, वैद्यक इत्यादि अनेक शास्त्रांतून अनेक सुंदर व निवडक उपमा घेतल्या आहेत. देवांना स्वस्थानावरून हुसकून देणाऱ्या शत्रूंना सामान्य नियमांचा बाध करणाऱ्या अपवादांची, वालीच्या गादीवर बसविलेल्या सुग्रीवाला धातूच्या जागी येणाऱ्या आदेशाची, स्वबलाने शत्रूंचा नि:पात करण्यास समर्थ असलेल्या शत्रुघ्नाच्या मागून रामाज्ञेने जाणाऱ्या सेनेला अध्ययनार्थ 'इ' या धातूच्या मागे लागलेल्या निरर्थक 'अधि' उपसर्गाची इत्यादि व्याकरणविषयक उपमा वाचून संस्कृतव्याकरणाभिज्ञ वाचकांस मौज वाटते. मेनकेला हिमालयापासून झालेल्या पार्वतीला राजनीतीत उत्साहगुणाने मिळणाऱ्या संपत्तीची उपमा अर्थशास्त्रातून, प्रबल तारकासुरापुढे निष्फळ झालेल्या देवांच्या उपायांना जालीम औषधांनाही न जुमानणाऱ्या सान्निपातिक ज्वराची उपमा वैद्यकशास्त्रातून, आणि ब्राह्मसरोवरातून उगम पावणाऱ्या सरयू नदीला अव्यक्तातून उद्भूत होणाऱ्या बुद्धि (महत्) तत्त्वाची उपमा सांख्य तत्त्वज्ञानातून घेतली आहे. या उपमांनी त्या त्या प्रकरणांतील भाव उत्तम रीतीने व्यक्त होऊन वहुश्रुत वाचकांस आनंद होतो.

(इ) **आध्यात्मिक**—सृष्टीतील व्यक्त पदार्थांतून उपमाने घेऊन वर्ण्य विषय सुगम करण्याची कवीची सामान्यत: प्रवृत्ति असते व आपल्या 'ऋतुसंहारा'त कालिदासाने तोच मार्ग स्वीकारला आहे. पण पुढे जास्त सराव झाल्यावर अमूर्त कल्पनांतून किंवा मनोव्यापारांतूनही त्याने काही उपमा उचलल्या आहेत. वसिष्ठधेनूच्या मागून जाणाऱ्या दिलीपाला श्रद्धायुक्त विधीची, व मातेला अलंकृत करणाऱ्या भरताला संपत्तीला शोभविणाऱ्या विनयाची उपमा वाचून चमत्कृति उत्पन्न होते.

कालिदासपूर्वकालीन अश्वघोषानेही या तऱ्हेच्या काही उपमा योजिल्या होत्या, त्यांवरूनही कालिदासाला अशा उपमा सुचल्या असतील.

(ई) **व्यावहारिक**—काही उपमा कवीला व्यवहारातील अनुभवावरून सुचलेल्या दिसतात. 'सच्छिष्याला दिलेल्या विद्येप्रमाणे शकुंतले ! दुष्यंताला अर्पिलेली तू अशोचनीय झाली आहेस' या कण्वांच्या भाषणातील उपमेत व 'अभ्यासाने विद्येला प्रसन्न करता येते, त्याप्रमाणे सदैव सेवा करून तू या धेनूला प्रसन्न कर' या वसिष्ठांनी दिलीपाला केलेल्या उपदेशात कालिदासाच्या स्वानुभवाचे प्रतिबिंब दिसते.

(४) **औचित्य**—कालिदासाने आपल्या काव्यनाटकादि ग्रंथांत पात्रांच्या तोंडी घातलेल्या उपमा त्यांना त्या त्या प्रसंगी सुचतील अशाच आहेत. त्यामुळे त्या अत्यंत स्वाभाविक वाटतात. खादाड विदूषकाने अर्धचंद्राला दिलेली मोडक्या मोदकाची, समुद्रगृहाजवळ शिलेवर झोपलेल्या लठ्ठ विदूषकाला निपुणिका दासीने दिलेली बाजारातील पोळाची, आणि सदैव अध्यापनरत कण्वांनी शकुंतलेला दिलेली विद्येची उपमा पाहा. त्यांत त्या त्या व्यक्तींचे स्वभाव स्पष्ट रीतीने दिसून येतात.

(५) **पूर्णता**—कालिदासपूर्वकालीन व्यास-वाल्मीक्यादि कवींनी योजिलेल्या उपमांत उपमान व उपमेय यांचे एखाद्याच बाबतीत साम्य दर्शविलेले असते. इतर बाबतींत साम्य वाचकांनी स्वकल्पनेने जाणावे लागते. उदाहरणार्थ, 'महाभारता'न्तर्गत नलदमयंती आख्यानातील पुढील उपमा घ्या : 'तां राजसमितिं पुण्यां नागैर्भोगवतीमिव। संपूर्णां पुरुषव्याघ्रैः सिंहैर्गिरिगुहामिव ॥' यात दमयंतीस्वयंवरार्थ जमलेल्या राजांच्या सभेला एकाच श्लोकात भोगवती नगरीची व गिरिगुहेची अशा दोन उपमा दिल्या आहेत. पण त्यांपैकी एकीचाही पूर्ण विस्तार झाला नाही. याच्या उलट कालिदास आपल्या उपमांत उपमान व उपमेय यांचे सर्वांगीण साम्य दर्शवितो, त्यामुळे त्यांनी जास्त चमत्कृति उत्पन्न होते. उदाहरणार्थ, इंदुमती-स्वयंवरप्रसंगी अज स्वासनावर जाऊन बसला, त्याचे वर्णन घ्या—

**वैदर्भनिर्दिष्टमसौ कुमारः क्लृप्तेन सोपानपथेन मञ्चम्।**
**शिलाविभङ्गैर्मृगराजशावः स्तुङ्गं नगोत्सङ्गमिवारुरोह॥** रघु० ६, ३.

यात अजाच्या उच्च आसनाला पर्वतशिखराची, व त्या आसनावर चढून जाण्याकरिता केलेल्या पायऱ्यांना पर्वताच्या बाजूवर पडलेल्या खडकांची उपमा दिल्यामुळे अजाचे सिंहाशी सर्वांगीण साम्य ध्यानात येते. तसेच उपमान व उपमेय यांचे लिंगवचनादि बाबींत साम्य असावे, असा आलंकारिकांनी नियम केला आहे. कालिदासपूर्वकालीन कवींच्या उपमा या बाबतीत अत्यंत सदोष दिसतात. कालिदासानेही आपल्या प्रथमच्या ग्रंथांत सर्वत्र असा नियम पाळल्याचे दिसत नाही. उदाहरणार्थ, 'मालविकाग्निमित्रा'त 'सा तपस्विनी देव्याधिकतरं रक्ष्यमाणा नागरक्षितो निधिरिव न सुखं समासादयितव्या।' ही उपमा पाहा. यात धारिणीला नागाची व मालविकेला निधीची अशा ज्या दोन उपमा योजिल्या आहेत, त्या इतर दृष्टीने अन्वर्थ असूनही उपमानोपमेयांच्या लिंगसाम्याभावी सदोष दिसतात. याच्या उलट 'शाकुंतला'त 'कथमिदानीं तातस्याङ्कात्परिभ्रष्टा मलयतटोन्मूलिता चन्दनलतेव देशान्तरे जीवितं धारयिष्ये' या शकुंतलेच्या भाषणात मुद्दाम 'चन्दनलता' असा शब्द योजून कवीने लिंगसाम्य साधले आहे. लिंगवचनभेद असला तरी सहृदयांना उद्वेग वाटत नसल्यास उपमा सदोष मानू नये, असे 'काव्यादर्श'काराचे वचन प्रमाण मानून इतर ठिकाणीही कालिदासाच्या उपमांचे समर्थन करता येईल. असो.

उपमालंकाराकडे कालिदासाचा विशेष ओढा असला तरी इतरही अनेक रमणीय अलंकार त्याने आपल्या ग्रंथांत साधले आहेत. 'रघुवंशा'तील 'राममन्मथशरेण ताडिता' (११, २०) इत्यादि प्रसिद्ध श्लोकात व 'अनाघ्रातं पुष्पं किसलयमलूनं कररुहैः' (शाकुं. २, १०) इत्यादि मनोहर दुष्यन्तोक्तीत रूपकालंकार आला आहे. यांपैकी पहिल्या स्थली एकाच कल्पनेचा विस्तार करून सांग रूपक साधले आहे, तर दुसऱ्यात एकामागून एक अशी अनेक रूपके योजून शकुंतलेचे सौंदर्य, कोमलता, उन्मादकत्व इत्यादि गुण सुचविले आहेत. तथापि, एकंदरीत रूपकापेक्षा उत्प्रेक्षा, दृष्टान्त व अर्थान्तरन्यास या अलंकारांतच कालिदासाचे मन विशेष रमलेले दिसते. त्याच्या प्रथमच्या 'ऋतुसंहार', 'मालविकाग्निमित्रा'दि ग्रंथात कवीच्या प्रतिभेने उत्प्रेक्षांचे कटाक्ष क्वचितच फेकलेले दिसतात. पण 'मेघदूता'त उत्प्रेक्षांचा केवळ पाऊस

पडतो आहे, असे वाटते. त्या वीणागीताचा विषयही त्या अलंकारास अत्यंत अनुकूल आहे. अलकेचा मार्ग सांगताना वाटेतले पर्वत, नद्या वगैरेंवर मेघ आला असता कसा दिसेल, याचे वर्णन यक्षमुखाने कालिदासाने अनेक उत्प्रेक्षा योजून केले आहे. पक्वफलधारी आम्रवृक्षांनी आच्छादलेल्या आम्रकूट पर्वतावर मेघ गेला असता तो पर्वत जणू काय पृथ्वीचा अनावृत स्तन आहेसा वाटेल, चर्मण्वती नदीचे जल घेण्यास तो वाकला असता गगनचारी व्यक्तींना आपण जणू काय मध्ये स्थूल इन्द्रनील मणि घातलेला पृथ्वीचा मोत्यांचा हार पाहत आहो असे वाटेल, शुभ्र कैलास पर्वत हा जणू काय भगवान् शंकराचा प्रतिदिनी वाढणारा हास्यसंचय आहे, इत्यादि 'मेघदूता'तील उत्प्रेक्षा अत्यंत हृदयंगम झाल्या आहेत. उत्प्रेक्षेप्रमाणे दृष्टान्तही कवीचा आवडता अलंकार दिसतो. 'रघुवंशा'त आकस्मिक निधन झाल्यामुळे इंदुमतीचा देह अजाच्या अंगावर पडला त्यामुळे त्यालाही तत्काळ मूर्च्छा आली, या प्रसंगाचे वर्णन करताना समईतून तैलबिंदूबरोबर खाली पडणाऱ्या दीपज्योतीचा हृद्य दृष्टान्त कवीने योजिला आहे. शकुंतलेने दुष्यंतावर आपले प्रेम जडले आहे, हे सूचित केल्यावर तिच्या प्रेमळ सख्या 'सागरमुज्झित्वा कुत्र वा महानद्यवतरति', 'क इदानीं सहकारमुज्झित्वाऽतिमुक्तलतां पल्लवितां सहते' अशा अनुरूप दृष्टान्तांनी आपली संमति व्यक्त करतात. निर्दय दुर्वासाशिवाय दुसऱ्या कोणाला निरागस शकुंतलेला शाप देववेल, हा भाव 'कोऽन्यो हुतवहाद्दग्धुं प्रभवति' या दृष्टान्तात उत्तम रीतीने व्यक्त झाला आहे. अशी अनेक उदाहरणे देता येतील. कालिदासाच्या अर्थान्तरन्यासात त्याच्या व्यावहारिक अनुभवांचे सारसर्वस्व अत्यंत रम्य भाषेत ग्रथित झाले असल्यामुळे त्यांपैकी कितीएक म्हणीसारखे भाषेत रूढ झाले आहेत. उदाहरणार्थ, 'मरणं प्रकृतिः शरीरिणाम्', 'महदपि परदुःखं शीतलं सम्यगाहुः', 'भिन्नरुचिर्हि लोकः', 'किमिव हि मधुराणां मण्डनं नाकृतीनाम्', इत्यादि वचने पाहा. याशिवाय निदर्शना, अतिशयोक्ति, सहोक्ति, पर्याय, समुच्चय, ससंदेह, विभावना इत्यादि अनेक अलंकार घडवून कवीने आपल्या कवितावधूस भूषविले आहे. या सर्वांची उदाहरणे स्थलाभावास्तव येथे देता येत नाहीत. जिज्ञासूंस ती मम्मटादि आलंकारिकांच्या ग्रंथांत निवडलेली दृष्टीस पडतील.

येथवर ध्वनि, रस, रीति व अलंकार या संस्कृत साहित्यशास्त्रज्ञांच्या मतचतुष्टयास अनुसरून कालिदासीय ग्रंथांचे परीक्षण करून काव्य या पदवीस ते कसे प्राप्त होतात ते पाहिले. आता त्याच्या इतर विशेषांकडे वळू.

आधुनिक टीकाकार रसालंकारादिकांइतकेच काव्यनाटकांच्या संविधानकरचना, स्वभावपरिपोष इत्यादि अन्य विशेषांकडे लक्ष देतात. या इतर बाबींत कालिदासाचे ग्रंथ इतर कवींच्या ग्रंथांच्या मानाने कमी सरस ठरणार नाहीत. 'मालविकाग्निमित्रा'च्या कथानकात अनेक धाग्यांची गुंतागुंत असून ती शेवटी कुशलतेने सोडविली आहे, तर 'शाकुंतला'त नायकनायिकांच्या स्वभावातील भिन्न भिन्न मनोविकारांचे पापुद्रे हलक्या हाताने उलगडले आहेत. शिवाय कालिदासाच्या ग्रंथांत अनेक जातींच्या, वेशांच्या, धंद्यांच्या व्यक्तींची चित्रे मार्मिकपणे काढलेली आढळतात. त्याने निर्मिलेल्या रम्य सृष्टीत काश्यप, कण्व व दुर्वास हे परस्परभिन्न स्वभावाचे महर्षि, कौत्सासारखा निःस्पृह ब्राह्मण, दुष्यंत, दिलीप, रघु, राम यांसारखे कर्तव्यतत्पर राजर्षि, अज व यक्ष यांसारखे पत्नीवियोगाने तळमळणारे प्रेमी जीव, अग्निमित्र व अग्निवर्ण यांसारखे विलासी राजे, हरदत्त व गणदास यांच्यासारखे कलानिपुण पण परस्परकीर्त्यसहिष्णु नाट्याचार्य, गौतम, माणवक, माढव्य हे तीन तऱ्हांचे विदूषक आणि स्वशौर्याने यवनांचा पराभव करून अश्वमेधाश्व परत मिळविणाऱ्या वसुमित्रापासून मुग्धत्वाने सिंहशावकाचे दात मोजणाऱ्या सर्वदमनापर्यंत लहान-मोठे राजकुमार आढळतात. परिस्थितीच्या बदलामुळे आपणांस याच व्यक्ति आजकालच्या नेहमीच्या व्यवहारात दिसल्या नाहीत तरी या प्रकारच्या दिसतील, यात संशय नाही. कालिदासकालीन परिस्थिति लक्षात घेता त्याने आपली पात्रे सभोवतालच्या जगातून घेतली असावीत, असे वाटते. 'विक्रमोर्वशीया'तील राजाच्या वर्णनात तत्कालीन नागरकांच्या वृत्तीचे असे प्रतिबिंब पडले आहे, हे आम्ही मागे दाखविलेच आहे.

पण कालिदासाच्या पुरुषपात्रांपेक्षा तन्निर्मित स्त्रीसृष्टीने रसिकांचे मन जास्त आकृष्ट केले आहे. त्याने आपल्या ग्रंथांत धारिणी, औशीनरी, पार्वती, उर्वशी, इरावती, मालविका, यक्षपत्नी, शकुंतला, प्रियंवदा,

अनसूया, सुदक्षिणा, इंदुमती व सीता अशी तेरा महत्त्वाची स्त्रीपात्रे निर्माण केली आहेत. यांपैकी धारिणी, औशीनरी व सुदक्षिणा या मध्यम वयाच्या, व बाकीच्या तरुण स्त्रिया आहेत. उर्वशी अप्सरा असल्याने तिचीही गणना तरुण स्त्रियांतच करता येईल. कालिदासाच्या स्त्रीसृष्टीतील तरुण स्त्रियांचे संख्याधिक्य लक्षात घेता त्या विलासी व रंगेल कवीचे मन त्यांच्या मुग्धमधुर लीलांत विशेष रममाण होत असावे, असे वाटते. या सर्व स्त्रिया भिन्न भिन्न स्वभावांच्या आहेत. धारिणी, औशीनरी व अनसूया यांचा गंभीर स्वभाव, इरावतीचा मत्सरीपणा, मालविका, उर्वशी, यक्षपत्नी व इंदुमती यांचे विलासित्व, पार्वतीचा करारीपणा, शकुंतला व सीता यांचा स्वाभिमानीपणा, प्रियंवदेचा विनोदी स्वभाव आणि सुदक्षिणेची कर्तव्यतत्परता हे यांच्या स्वभावांतील भिन्न भिन्न विशेष प्रामुख्याने नजरेस येतात. तथापि, त्यांचे अनेक बाबतींत साम्यही दाखविता येते. या सर्व स्त्रिया अत्यंत प्रेमळ आहेत. यांपैकी विवाहित स्त्रियांचे आपल्या पतीवरचे, पुत्रवतींचे आपल्या मुलांवरचे, आणि प्रियंवदा व अनसूया यांचे मैत्रिणींवरचे प्रेम निस्सीम आहे. उत्कट पतिप्रेमामुळेच धारिणी व औशीनरी ह्या आपापल्या पतीचे प्रेमविषयक चाळे पसंत नसताही केवळ त्याने सुखी व्हावे म्हणून त्याच्या नूतनदारपरिग्रहास संमति देतात. पतिप्रेमामुळेच यांपैकी बहुतेकांच्या स्वभावात थोडयाफार अंशाने स्त्रीभावसुलभ मत्सरही आढळतो. यक्षपत्नीला पतीचे आपल्यावर अनन्यसाधारण प्रेम आहे हे माहीत आहे; तथापि, स्वप्नात तो दुसऱ्या एका स्त्रीचे आराधन करीत आहे, असे पाहताच ती दु:खित होऊन दचकून उठते (मेघ. ११६) ; आणि इरावती व औशीनरी या, पति आपल्या पायां पडून चुकी कबूल करीत असला तरी, त्याला झिडकारितात. कालिदासाच्या बहुतेक मानसकन्या कलानिपुण आहेत. इरावती व मालविका या नृत्यकलेत, आणि प्रियंवदा व अनसूया या चित्रकलेत निपुण दाखविल्या आहेत. यक्षपत्नी तर विरहावस्थेत आपल्या दु:खी मनाला विरंगुळा आणण्याकरिता कधी पतीचे नाव ज्यांत गोविले आहे अशी गाणी रचते व ती वीणा वाजवून गाण्याचा प्रयत्न करताना दिसते, तर कधी विरहाने कृश झालेल्या पतीचे चित्र काढून मनाला रमवीत

असते. तसेच यांपैकी बहुतेक स्त्रिया लतावृक्षांवर अपत्यनिर्विशेष प्रेम करणाऱ्या दिसतात. पार्वती, सीता, शकुंतला व तिच्या सख्या या आश्रमांतील वृक्षांना पाणी घालून प्रेमाने त्यांची जोपासना करीत असत. यक्षपत्नीने आपल्या घरच्या अंगणात लहान मंदारवृक्षाला दत्तक मुलाप्रमाणे मोठ्या काळजीने वाढविले होते. धारिणीचे आपल्या उद्यानातील सुवर्णाशोकावर इतके प्रेम होते की, वसन्तसमयी इतर वृक्षांबरोबर त्याला कळ्या आल्या नाहीत म्हणून तिला अतिशय वाईट वाटले व मालविकेच्या लत्ताप्रहारानंतर लौकरच प्राप्त झालेला त्याचा पुष्पसंभार पाहून आनंदाच्या भरात स्त्रीस्वभावसुलभ सवतीमत्सर विसरून तिने स्वत: मालविकेचा राजाशी विवाह लावला. कालिदासाच्या नायिका लतावृक्षांप्रमाणे पशुपक्ष्यांवरही निस्सीम प्रेम करणाऱ्या आहेत. यक्षपत्नी सायंकाळी अंगणातल्या रत्नखचित सुवर्णयष्टीवर बसलेल्या मोराला मधुर तालरवाने नाचवीत असे ; शकुंतलेने जन्मापासून मातृहीन झालेल्या दीर्घापाङ्ग नामक हरिण बालकाची सर्व तऱ्हेने काळजी घेऊन त्याला वाढविले होते ; हरिणी पार्वतीच्या इतक्या सवयीच्या झाल्या होत्या की, ती त्यांच्या नेत्रांची लांबी मोजून त्यांच्याशी आपल्या सखीच्या नेत्रांची तुलना करीत असे, असे कालिदासाने वर्णिले आहे.

वर उल्लेखिलेल्या प्रमुख स्त्रीपात्रांशिवाय इतरही अनेक तरुण स्त्रियांची अस्फुट शब्दचित्रे 'मेघदूता'त कवीने काढली आहेत. त्यांत शिथिल नीतिकल्पनांमुळे वनकुंजांत रममाण होणाऱ्या वनचरवधू व विदिशेजवळच्या नीचैगिरीवरील गुहांत नागरकांबरोबर विलास करणाऱ्या पण्यस्त्रिया व महाकालेश्वरासमोर रात्री नृत्य करणाऱ्या वेश्या आहेत, तशाच आकाशात काळेभोर विशाल मेघ पाहून, ही वाऱ्याने वाहून नेलेली पर्वताची शिखरेच आहेत की काय, असे वाटणाऱ्या भोळ्या सिद्धांगना, व कृषिकार्याकरिता अवश्य अशा मेघांकडे स्निग्ध दृष्टीने पाहणाऱ्या भ्रूविलासानभिज्ञ ग्रामतरुणीही आहेत. तथापि यांपेक्षा पौरवधूंचेच वर्णन त्याच्या ग्रंथांत वारंवार येते. अंधाऱ्या रात्री रत्नालंकारांनी भूषित होऊन प्रियकराकडे जाणाऱ्या व मेघगर्जनेने भयत्रस्त होणाऱ्या अभिसारिका, नगराजवळच्या उद्यानांत फुले खुडण्याच्या श्रमाने घामाघूम

होणाऱ्या 'पुष्पलावी' तरुणी, कटाक्षनिक्षेपांत चतुर व चंचल नेत्रांच्या पौरस्त्रिया, परदेशगत प्रियकरांच्या विरहामुळे झुरणाऱ्या व अंग-संस्कारांकडे लक्ष न देणाऱ्या पथिकवनिता, यांची शब्दचित्रे कवीने मोठ्या कुशलतेने थोडक्यात काढली आहेत. कवीने भगवान् शंकर व अज विवाहाकरिता नगरप्रवेश करू लागले त्यावेळच्या स्त्रियांच्या गडगवडीचे वर्णन केले आहे, त्यावरून व 'मेघदूता'तील यक्षपत्नीच्या वर्णनावरून आपणांस तत्कालीन पौरस्त्रियांच्या विलासी जीवनक्रमाची चांगली कल्पना करता येते.

कालिदासाच्या स्त्रीविषयक कल्पना उदात्त होत्या, हे 'गृहिणी सचिव: सखी मिथ: प्रियशिष्या ललिते कलाविधौ।' या त्याच्या अजविलापातील उक्तीवरून दिसून येते. तथापि, गृहिणी व मंत्री या दोन नात्यांनी त्याच्या स्त्रीपात्रांनी आपली कर्तव्ये पार पाडल्याचे वर्णन फारसे कोठे त्याच्या ग्रंथांत आढळत नाही. या दृष्टीने 'स्वप्नवासवदत्ता'तील राज-कारणाकरिता स्वत:च्या मृत्यूची खोटी बातमी पसरू देऊन पतिविरह-दु:ख सोसणारी व मत्सरादि विकारांस मनात थारा न देता स्वत:च्या सवतीलाही पुष्पालंकारांनी भूषित करणारी भासाची नायिका वासवदत्ता, व पतीने विनाकारण आपला त्याग केला असताही प्रजारंजनतत्परतेस्तव त्याचे कौतुक करणारी भवभूतीची नायिका सीता या कालिदासाच्या विलासी स्त्रीपात्रांपेक्षा जास्त उदात्त दिसतात. कालिदासाच्या तिन्ही नाटकांतील नायक बहुपत्नीक आहेत. त्यामुळे त्याला एकपत्नीव्रताची महती माहीत नव्हती, असे काही टीकाकार म्हणतात, ते मात्र आम्हांस संमत नाही. कारण मेघदूतातील यक्ष व रघुवंशातील अज व राम हे एकपत्नीकच आहेत ; व त्यांच्या उत्कट पत्नीप्रेमाचे वर्णन कालिदासाने अत्यंत विस्तृतपणे व रम्यतेने केले आहे. त्याच्या नाटकांतील नायक बहुपत्नीक असण्याचे कारण त्याचा राजाश्रय हे होय. राजदरबारी दाखविल्या जाणाऱ्या नाटकांचा विषय राजचरित हाच असावयाचा व त्यांत त्यांचे बहुपत्नीकत्व आले नसते तरच आश्चर्य. भवभूतीने आपली नाटके लिहिली त्यावेळी त्याला राजाश्रयाभावी अशी बंधने नव्हती ; म्हणून त्याच्या 'मालतीमाधव' व 'उत्तररामचरित' या नाटकांत विशुद्ध पत्नीप्रेमाचे चित्र रंगविले आहे.

**सृष्टिवर्णन**—आधुनिक वाचकांना कालिदासाचे ग्रंथ आवडण्याचे दुसरे एक कारण त्यांतील अप्रतिम सृष्टिवर्णन हे होय. कालिदासाला सृष्टि-वर्णन करण्याची अत्यंत हौस होती. त्याच्या ग्रंथांत एका ना एका ऋतूचे वर्णन आले आहे, हे आम्ही मागे दाखविलेच आहे. तथापि, 'ऋतुसंहारा'-पासून 'रघुवंशा'पर्यंत त्याचे ग्रंथ क्रमाने वाचीत गेल्यास त्याच्या निसर्गा-कडे पाहण्याच्या दृष्टीत व सृष्टिवर्णनाच्या पद्धतीत कसा फरक पडत गेला, ते दिसून येते. 'महाभारत' व 'रामायण' यांतील बहुतेक भागांत लतावृक्षांच्या लांबलचक याद्या देऊन सृष्टिवर्णन केलेले आढळते. 'ऋतुसंहारा'त कालिदास त्यापुढे पुष्कळच गेला आहे, यात संशय नाही. सृष्टीतील उज्ज्वल वर्णाकडे कवीचे लक्ष गेलेले दिसते (ऋतु. ३, २). तीतील ऋतुभिन्नत्वाने कामिजनांवर होणाऱ्या परिणामांचे व त्यांच्या मनात उत्पन्न होणाऱ्या विकारविचारांचे यथातथ्य वर्णन त्याने केले आहे. क्वचित् निसर्गातील नदीवृक्षांवर चेतनधर्माचा आरोप करून केलेले त्यांचे आलंकारिक वर्णनही त्यात आले आहे, यात शंका नाही. तथापि, सर्व सृष्टीत एकच चैतन्य भरून राहिले आहे ; स्त्रीपुरुषांप्रमाणे लतावृक्षादि त्याचीच भिन्न भिन्न रूपे होत, ही कल्पना त्याच्या प्रथमच्या ग्रंथांत दिसत नाही. नंतरच्या ग्रंथांत उपनिषदांतील वर्णनास अनुसरून त्याने काही ठिकाणी लतावृक्षांत वनदेवतांचे अस्तित्व असते हे दाखविले आहे. स्वप्नामध्ये मोठ्या प्रयासाने आपल्या पत्नीचे दर्शन झाल्यावर तिला घट्ट मिठी मारण्याकरिता यक्ष आपले बाहु पसरी, ते पाहून वनदेवतांच्या नेत्रांतून मोत्यांसारखे स्थूल अश्रुबिंदु झाडांच्या पानांवर पडत असत, असे 'मेघदूता'त वर्णिले आहे. शकुंतला सासरी जाऊ लागली त्यावेळी काही वृक्षांतून वनदेवतांनी आपले कोमल हात मनगटापर्यंत बाहेर काढून तिजकरिता अलंकार दिले, असे 'शाकुंतला'त दाखविले आहे. इतर ठिकाणी लतावृक्षांना सचेतन मानून मनुष्यप्राण्यांच्या दुःखावस्थेत पशु-पक्ष्यांप्रमाणे त्यांनाही सहानुभूति वाटते, असे वर्णन आले आहे. रावणाने सीतेला ज्या मार्गाने नेले तो मार्ग लतांनी आपल्या शाखांचे पल्लव त्या बाजूला वळवून रामाला सुचविला, हरिणींनी दर्भांकुर खाण्याचे टाकून दक्षिण दिशेकडे डोळे लावून तेच कार्य केले (रघु. १३, २४, २५), अशा तऱ्हेच्या वर्णनाने निसर्गातील सुखदुःखसंवेदित्व कवीने प्रकट केले

आहे. तसेच मनुष्यांप्रमाणेच इतर प्राण्यांवर व लतावृक्षादि अचेतन समजल्या जाणाऱ्या वस्तूंवरही वसंतादि ऋतूंचा कसा परिणाम होतो, हे त्याने 'कुमारसंभवा'त दाखविले आहे ( कुमार ६, ३६, ३९ पहा). त्याच्या सर्व नायिकांना पुष्पांची अतिशय आवड आहे. एकंदरीत कालिदासाच्या ग्रंथांवरून तत्कालीन लोकांना पुष्पांचा अतिशय शौक दिसतो. शहराबाहेर फुलांची विस्तृत उपवने असत व त्यांतील फुले खुडून शहरात विकण्याचे काम तरुण बालिका करीत असत. मोठमोठ्या वाड्यांत फुलांचा सुगंध दरवळलेला असे. तत्कालीन स्त्रियांच्या पुष्पमय वेशभूषेवरून कालिदासाला अलकेतील स्त्रियांचे पुढील वर्णन सुचलेले दिसते—

हस्ते लीलाकमलमलके बालकुन्दानुविद्धं
नीता लोध्रप्रसवरजसा पाण्डुतामाननश्रीः ।
चूडापाशे नवकुरबकं चारु कर्णे शिरीषं
सीमन्ते च त्वदुपगमजं यत्र नीपं वधूनाम् ॥

मेघ० ७१.

कालिदासाचे निसर्गवर्णन अत्यंत सूक्ष्म व मार्मिक आहे. त्याचे मन राजशिबिराच्या सभोवार दिसणाऱ्या दृश्यांत, तसेच ऋषींच्या तपोवनांत, पर्वतांच्या उत्तुंग शिखरांवर आणि मृगयारण्यांत सारखेच रमते. त्याने काढलेली निसर्गाची चित्रे सांप्रदायिक पद्धतीची व ठरीव ठशांची नसून त्यांत प्रत्यक्ष निरीक्षणाचा ताजेपणा, सहृदयतेचा ओलावा, भावनेची रसिकता व कल्पनेची भरारी ही दृष्टीस पडतात. विस्तारभयास्तव आणखी उदाहरणे देता येत नाहीत; पण पूर्वी उद्धृत केलेल्या श्लोकांवरूनही सहृदय वाचकांस वरील विधानांची सत्यता पटेल. हा विषय संपविण्यापूर्वी कालिदासाच्या कल्पकतेचे उदाहरण म्हणून त्याच्या सृष्टिवर्णनातील एका विशेषाचा येथे उल्लेख करणे अवश्य आहे. आकाशस्थ व्यक्तींना भूपृष्ठावरील पदार्थ कसे दिसतात, याचे त्याने स्वकल्पनेने अनेक ठिकाणी रम्य वर्णन केले आहे. 'मेघदूता'त मेघ नदी-पर्वतांवर आला असता कसा दिसेल, याचे यक्षाने केलेले वर्णन मागे दिलेच आहे. 'रघुवंशा'त रावणवधानंतर पुष्पक विमानात बसून अयोध्येस जात असता रामाने खाली दिसणाऱ्या समुद्र, नद्या, सरोवरे, नगरे इत्यादिकांचे मनोहर वर्णन

केले आहे. स्वर्गातून हेमकूट पर्वतावर उतरताना दुष्यंताला पृथ्वी कशी दिसली, ते खालील श्लोकात वर्णिले आहे—

शैलानामवरोहतीव शिखरादुन्मज्जतां मेदिनी
पर्णाभ्यन्तरलीनतां विजहति स्कन्धोदयात्पादपाः।
सन्तानात्तनुभावनष्टसलिला व्यक्ति भजन्त्यापगाः
केनाप्युत्क्षिपतेव पश्य भुवनं मत्पार्श्वमानीयते ॥ शाकुं० ७, ८.

'पर्वत जोराने वर येत असल्यामुळे त्यांच्या शिखराखाली पृथ्वी जात आहे, असे वाटते. वृक्षांच्या शाखा दिसू लागल्यामुळे ते आता पूर्वीप्रमाणे पानांनी झाकून गेलेले असे दिसत नाहीत. लांबून निर्जल वाटणाऱ्या नद्या आता स्पष्ट दिसू लागल्या आहेत. कोणी तरी जग मजजवळ उंच फेकीत आहे पाहा!' हल्ली विमानांतून खाली उतरणाऱ्या लोकांस या तऱ्हेचाच अनुभव येतो, त्यावरूनही कालिदासाच्या कल्पकतेचे सानंदाश्चर्य वाटते.

**विनोद**—कालिदासीय ग्रंथांचा आणखी एक लक्षात घेण्यासारखा विशेष म्हणजे त्यांतील विनोद हा होय. जयदेव कवीने कविताकामिनीच्या वर्णनात भासाला तिचा 'हास' असे म्हटले आहे. सध्या उपलब्ध असलेल्या भासाच्या तेरा नाटकांपैकी फक्त चार-पाच नाटकांतच विनोद आढळतो; त्यामुळे अनुप्रासलालसेने तर जयदेवाने असे वर्णन केले नसेल ना, अशी शंका येते. ते कसेही असले तरी इतर कवींच्या नाटचकृतींत उत्कृष्ट प्रकारचा विनोद आढळत नाही, असा त्याचा अर्थ घ्यावयाचा नाही. किंबहुना, कालिदासाच्या कृतींतच अनेक ठिकाणी उत्तम प्रकारचा भारदस्त विनोद आला आहे, तो लक्षात घेता त्यालाही 'कविताकामिनीचा हास' ही पदवी शोभली असती, असे वाटल्याशिवाय राहत नाही.

असंबद्धता, अनपेक्षितपणा, कृत्रिमता, ढोंगीपणा इत्यादि कारणांमुळे जो हास्योत्पादक चमत्कार उत्पन्न होतो तो विनोद, अशी विनोदाची व्याख्या करता येईल. विनोदाचे स्वभावनिष्ठ, प्रसंगनिष्ठ व शब्दनिष्ठ असे तीन प्रकार करता येतात. या तीनही प्रकारांची उदाहरणे कालिदासाच्या ग्रंथांत आढळतात. त्याच्या नाटकांतील मुख्य विनोदी पात्र म्हणजे विदूषक. हा त्याच्या तिन्ही नाटकांत दिसतो. 'मालविकाग्निमित्रा'तील गौतम, 'विक्रमोर्वशीया'तील माणवक व 'शाकुंतला'तील माढव्य यांच्या स्वभावांत काही बाबतीत साम्य तर काहींत वैषम्य आढळते. हे तिन्ही

विदूषक ब्राह्मण असून नायकांचे नर्मसचिव आहेत. त्यांचे काम राजाचे मनोरंजन करणे व त्याच्या प्रेमव्यवहारात यथाशक्ति मदत करणे हे होय. तिघेही ब्राह्मण जातीचे असले तरी विद्वत्तेच्या नावाने शून्यच! त्यामुळे त्यांना महाब्राह्मण असे औपरोधिकपणे म्हटले आहे. तिघेही दिसण्यात कुरूप आहेत. 'मालविकाग्निमित्रा'त अनपेक्षितपणे इरावती उपस्थित झाल्यामुळे राजाबरोबर गौतमही पेचात सापडतो. तितक्यात पिंगल वानराने वसुलक्ष्मी नामक लहान राजकन्येला भिवविल्यामुळे तिला उगी करण्याकरिता इरावती राजाला तिकडे जावयास सांगते व गौतमाचीही अडचणीतून सुटका होते. तेव्हा तो म्हणतो, 'शाबास! पिंगल वानरा, शाबास! योग्य वेळी तू आपल्या सोबत्याच्या रक्षणार्थ धावून आलास!' 'विक्रमोर्वशीया'त राजाने आपल्या पुत्राला मनात काही शंका न आणता माणवकाला नमस्कार करण्यास सांगितले; तेव्हा माणवक म्हणतो, 'शंका (भीति) वाटण्याचे कारण काय? याने आश्रमात माकडे पाहिलीच असतील!' या ठिकाणी शरीराच्या कुरूपतेमुळे विनोद उत्पन्न झाला असला तरी कुरूप माणसानेच तो स्वतःविषयी केला असल्यामुळे बोचक झाला नाही. असो. याशिवाय तिघेही विदूषक खाद्यलोलुप व आळशी आहेत. 'मालविकाग्निमित्रा'तील गौतम अन्तःपुरातील स्त्रियांच्या स्वस्तिवायनांनी गलेलठ्ठ झालेला दाखविला आहे. 'विक्रमोर्वशीया'तील माणवकाला पाकशाळेतील पंचविध पक्वान्ने तयार होत असता ती पाहण्या-खेरीज दुसरे विनोदाचे साधन सुचत नाही. 'शाकुंतला'तील माढव्य अरण्यात अनियमित वेळी मिळणारे कदन्न व कडवट पाणी यांनी अगदी बेजार होतो. खाद्यपदार्थ नेहमी डोळ्यांपुढे असल्यामुळे तिन्ही विदूषकांना उपमादृष्टांतादि अलंकार त्यांवरूनच सुचलेले दिसतात. तसेच हे तिघेही अत्यंत भित्रे आहेत. गौतम केतकीच्या अग्राने बोटाला टोचून घेऊन सर्पदंशाचा अभिनय करण्यात निपुण असला, तरी निद्रित असता सापा-सारखे वाकडे लाकूड अंगावर पडले असता गर्भगळित होतो. माढव्याला प्रथम शकुंतलेला पाहण्याची अत्यंत उत्सुकता होती, पण पुढे ती राक्षसांच्या भीतीमुळे पार आटून गेली. याप्रमाणे त्यांच्या स्वभावांत अतिशय साम्य असले तरी फरकही पुष्कळच आहेत. यांपैकी गौतम हा युक्तिबाज, हजरजबाबी व चतुर आहे, तर माणवक अगदी भोळा, व माढव्य सांगकाम्या

आहे. विदूषकांच्या स्वभावांत हा जो उत्तरोत्तर फरक दिसतो, तो कालिदासाने बुद्धिपुरःसर केला आहे. मागे 'मालविकाग्निमित्रा 'तील पात्रांचे स्वभाववर्णन करते वेळी त्या नाटकांत गौतमाच्या कर्तबगारीमुळे नायक कसा मेषपात्र बनला आहे, ते आम्ही दाखविले आहे. नायकाच्या स्वभावाला उठाव देण्याकरिता व विदूषकाच्या स्वभावातील विसंगति टाळण्याकरिता कालिदासाने आपल्या इतर नाटकांत प्राचीन परंपरेप्रमाणे विदूषकाला खादाड, मूर्ख व आळशी असेच रंगविले आहे.

विदूषकाच्या भाषणातील साध्या घरगुती उपमादृष्टांतांनी चमत्कृति उत्पन्न होते व विनोद खुलतो. हरदत्त व गणदास यांच्या कलहामुळे मालविका राजाच्या दृष्टीस पडेल अशी धारिणीला भीति वाटते; म्हणून 'यांचा हा विवादच मला पसंत नाही ' असे ती म्हणते, तेव्हा गौतम उत्तर करतो, 'राणीसाहेब ! पाहू या बोकडांची टक्कर ! उगीच का यांना वेतन द्यावे ?' यात कलह करणाऱ्या नाट्याचार्यांना दिलेली बोकडाची उपमा अनपेक्षित असल्यामुळे विनोदकारक आहे. आपला पति उर्वशीचा नाद सोडीत नाही, असे पाहून औशीनरी राणी प्रियानुप्रसादन व्रताच्या मिषाने रोहिणीयुक्त चंद्रास साक्ष ठेवून उर्वशीशी प्रेमभावाने वागण्याचा आपला निश्चय प्रकट करते ; तेव्हा विदूषक म्हणतो, "हातातून मासा निसटून गेला की धीवर म्हणतो, 'बरे झाले मला पुण्य लागेल ! '" यातील धीवराचा दृष्टान्तही असाच चमत्कृति उत्पन्न करणारा आहे. अन्त:पुरातील सुंदर स्त्रिया सोडून वनातील मुनिकन्येच्या मागे लागणाऱ्या दुष्यंताला सदैव पेंडखजूर खाऊन कंटाळल्यामुळे चिंचेवर वासना जाणाऱ्या माणसाची दिलेली उपमाही त्याच प्रकारची आहे.

विदूषक हा अगदी साधाभोळा व मंदबुद्धि असल्यामुळे त्याला काव्यमय उक्ति किंवा लाक्षणिक वचने समजत नाहीत. त्यांचा वाच्यार्थच खरा समजून तो आपणास हास्यास्पद करून घेतो. वसंतऋतूतील आम्रमंजरीला दुष्यंताने 'मदनबाण ' म्हटलेले ऐकून माढव्य आपला सोटा उगारून त्या बाणांचा नाश करावयाला धावतो, ते पाहून दु:खित राजालाही हसू येते. असो.

कालिदासाने आपल्या नायकांना जसे विदूषक तशा नायिकांना त्यांच्या विनोदी सख्या दिल्या आहेत. 'मालविकाग्निमित्रा 'तील मालविकेची समदु:खी, संकटात न डगमगणारी 'विमर्दसुरभि ' सखी बकुलावलिका

सदैव उर्वशीबरोबर असणारी चित्रलेखा व शकुंतलेची प्रेमळ, चेष्टेखोर मैत्रीण प्रियंवदा यांच्या संभाषणांत उत्तरोत्तर जास्त विनोद आला आहे. श्लिष्ट शब्दांच्या प्रयोगाने वकुलावलिका मालविकेच्या तोंडून तिचे राजावर बसलेले प्रेम कसे व्यक्त करविते, ते आपण मागे (पृ. १५८) पाहिलेच आहे. चित्ररथ गंधर्वाबरोबर स्वर्गात जाताना राजाला आणखी एकदा पाहावे म्हणून उर्वशी आपली मोत्यांची एकावली लतेत अडकली आहे असे दाखविते व चित्रलेखेला ती सोडविण्यास सांगते. तेव्हा तीही हसून म्हणते, 'फारच बाई गुंतून गेली आहे ही ! सुटायला मोठी कठीण दिसते. पाहते प्रयत्न करून.' पण या दोघींपेक्षाही प्रियंवदा जास्त विनोदी आहे. तिच्या विनोदात तिचा मनमोकळेपणा व आनंदी स्वभाव उत्तम रीतीने व्यक्त झाला आहे. वसंत ऋतूतील नूतन पालवीने भरून गेलेला आम्रवृक्ष व नुकतीच वहरलेली वनज्योत्स्ना यांच्या कमनीय संयोगाकडे शकुंतला बराच वेळ पाहत उभी राहते, ते पाहून प्रियंवदा म्हणते, 'अनसूये ! ही शकुंतला वनज्योत्स्नेकडे इतकी निरखून का पाहत आहे, आले का ध्यानात ? वनज्योत्स्नेला योग्य असा वृक्ष मिळाला तसा मलाही अनुरूप पति मिळेल का, असे विचार तिच्या मनात चालले आहेत.' शकुंतलेला तिची चेष्टा मनातून आवडते पण वरकरणी ती तिच्यावर रागावते. असे तीन-चार प्रसंग 'शाकुंतला'च्या पहिल्या अंकात आले आहेत. त्यांत समवयस्क व प्रेमळ अशा अविवाहित तरुण मुलींमध्ये नेहमी चालणाऱ्या रम्य विनोदाचे सुंदर चित्र कवीने काढले आहे. 'कुमारसंभवा'त विवाहप्रसंगी पार्वतीच्या पायांना रंग लावून 'याने आपल्या पतीच्या डोक्यावर बसलेल्या चंद्रकलेला ताडन कर' असे तिची सखी विनोदाने म्हणाली ; त्यावर पार्वतीने काही न बोलता हातातील पुष्पमालेने तिला ताडन केले, असा प्रसंग कवीने वर्णिला आहे. 'रघुवंशा'तही अनेक राजांना नापसंत करणाऱ्या इंदुमतीचे अजावर प्रेम बसलेले पाहून 'चला, आपण दुसऱ्या राजाकडे जाऊ' असे चेष्टेने सुनंदा म्हणाली ; त्यावर इंदुमती तिच्याकडे रागाने पाहू लागली, असे वर्णन आले आहे. यातही त्याच प्रकारचा विनोद दिसून येतो. याशिवाय स्वतःच्या विसंगत वर्तनाने आपला ढोंगीपणा व्यक्त करणारी पात्रे निर्माण करून मानवी स्वभावातील दोष कालिदासाने हलक्या हाताने दाखविले आहेत. स्वतःला शिकारीचा कंटाळा आला

असताही केवळ राजाच्या मर्जीकरिता तिची स्तुति करणारा तोंडपुजा सेनापति व घटकेपूर्वी धीवराच्या गळ्यात तांबड्या फुलांची माला बांधून त्याला वधस्तंभाकडे नेण्याकरिता अत्यंत उत्सुक असणारे, पण त्याला मिळालेले मोठे बक्षीस पाहून दारूच्या आशेने त्याचे जिवलग दोस्त होणारे पोलीस शिपाई यांचे विनोदी चित्र 'शाकुंतला'त काढले आहे.

कालिदासाच्या ग्रंथांत प्रसंगनिष्ठ विनोदांचीही काही स्थळे आढळतात. एखादी व्यक्ति स्वत: विनोदी नसली तरी ती एखादे वेळी अशा परिस्थितीत सापडते की, त्या वेळचे तिचे वर्तन व भाषण ही तिला न कळत विनोदोत्पादक होतात. 'मालविकाग्निमित्रा'च्या पहिल्या अंकातील नाट्याचार्यांच्या कलहाचा प्रसंग या प्रकारचा आहे. मालविकेला पाहण्याला अन्तर्यामी उत्सुक असलेला पण बाह्यात्कारी आपण त्या गावचेच नव्हे असा बहाणा करणारा अग्निमित्र, नि:पक्षपातीपणाचा आव आणून राजाचा मनोरथ पूर्ण करण्याकरिता सर्वांसमक्ष मालविकेचा नाट्यप्रसंग घडवून आणणारी परिव्राजिका, औपरोधिक भाषणाने गणदासास चिथावणारा गौतम, ही धारिणी राणीस अशा कचाट्यात आणतात की, त्या नाट्यप्रयोगाला संमति देण्याशिवाय तिला गत्यंतर नव्हते. हा प्रयोग राजासमोर होऊ नये म्हणून ती जो जो प्रयत्न करते, तो तो तिच्या अंगलट येतो. हा प्रसंगही बहारीचा वठला आहे. याशिवाय कालिदासाने दुसऱ्याही एका विनोदी प्रसंगाची योजना काही ठिकाणी केली आहे. दोन व्यक्तींची गाठ पडली असता त्यांच्यापैकी एकीचे खरे स्वरूप दुसरीस माहीत नसेल तर त्यांच्या संभाषणात विनोद उत्पन्न होतो. असे प्रसंग भासाच्या 'मध्यम-व्यायोग' व 'पञ्चरात्र' या नाटकांत आले आहेत. कालिदासाच्या 'कुमारसंभवा'तही अजिनदण्डधारी बटूचे स्वरूप धारण करणारे भगवान् शंकर व दृढनिश्चयाने पतिप्राप्तीकरिता तपश्चर्या करणारी पार्वती यांच्या संभाषणात या तऱ्हेचाच विनोद साधला आहे. अशा तऱ्हेचाच दुसरा प्रसंग 'रघुवंशा'तील सिंहदिलीप संवादात आला आहे. पण त्याचे पर्यवसान दिलीपाच्या आत्मयज्ञात होत असल्यामुळे त्यात विनोदापेक्षा गांभीर्याचीच छटा जास्त आहे. असो.

कालिदासाची नाटके राजदरबारी विद्वत्परिषदेसमोर होत असल्याने गांवढळ लोकांना समजणारा व रुचणारा पाचकळ विनोद व बाष्कळ

कोटिक्रम त्याच्या नाटकांत दिसून येत नाही. शब्दनिष्ठ विनोदाची काही स्थळे त्यात आढळतात ; पण त्या ठिकाणचाही विनोद विद्वानांना रुचेल असाच आहे. आपणावर शकुंतलेचे प्रेम असावे, असे वाटण्याची कारणे राजाने सांगताच विदूषक म्हणतो, 'कृतं त्वयोपवनं तपोवनमिति पश्यामि' (तू तपोवनाला उपवनच केलें आहेंस असे वाटते). यात उपवन व तपोवन यांतील उच्चारसादृश्यावरून विदूषकाने कोटि केली आहे. 'मालविकाग्निमित्रा'त बकुलावलिका व विदूषक यांनी केलेल्या शब्दश्लेषमूलक कोटयांची उदाहरणे मागे दिलीच आहेत. 'विक्रमोर्वशीया'त राजाने उर्वशीच्या सौंदर्याचे वर्णन केल्यावर विदूषक म्हणतो, 'म्हणूनच आपण दिव्यरसाभिलाषी होऊन चातकव्रत घेतलेले दिसते !' उर्वशी ही स्वर्गीय अप्सरा. म्हणून राजाच्या तद्विषयक प्रेमास 'दिव्यरसाभिलाष' म्हटलें आहे. चातक पक्ष्याचाही पर्जन्यरूपी दिव्यरसाचा (जलाचा) अभिलाष प्रसिद्ध आहे. या ठिकाणीही शब्दश्लेषाने कोटी झाली आहे. तथापि, शब्दश्लेषाची कालिदासाला फारशी आवड नसल्याने अशा कोटया त्याच्या ग्रंथांत फारशा आढळत नाहीत.

परिहासाप्रमाणे उपहासातही कालिदासाचे नैपुण्य दिसून येते. मालविका राजाच्या दृष्टीस पडू नये म्हणून धारिणी आपल्या नाटयाचार्यास 'या निरर्थक कामात पडू नको' म्हणून सांगते. त्यावर विदूषक म्हणतो, 'ठीक बोलता राणीसाहेब ! अरे गणदासा ! संगीताच्या मिषाने सरस्वतीपुढले नैवेद्याचे मोदक खाणारा तू ! तुला या विवादाची कटकट कशाला पाहिजे ? यात तुझा हटकून पराजय व्हावयाचा !' मालविकेच्या दर्शनाकरिता राजाला हरतऱ्हेचा प्रयत्न करताना पाहून धारिणी 'राजकार्यात अशीच उपायनिपुणता आपण दाखविली तर फार बरे होईल', असा टोमणा त्याला मारते. मालविकेशी लघळपणा करताना पकडला गेल्यावर 'तू उशीर केलास म्हणून मी हिची थोडी थट्टा करून मनाला रमवीत होतो', असे म्हणून राजा इरावतीचे समाधान करण्याचा प्रयत्न करतो ; त्यावर ती उत्तर करते, 'मला नव्हते माहीत, असले विनोदपात्र आपणाला लाभले आहे म्हणून. नाही तर ही मन्दभागिनी येथे आली नसती !' इतर नाटकांतही अशा तऱ्हेच्या उक्ति आल्या आहेत.

येथवर कालिदासाच्या ग्रंथांतील अनेक रम्य विशेषांचे विवेचन केले.

त्यावरून कालिदासाचे ग्रंथ आज दीड हजार वर्षे संस्कृतज्ञांस का प्रिय झाले आहेत, ते वाचकांच्या ध्यानात येईल. पण कोणतीही मानवी कृति घेतली तरी तीत कांहीना काही तरी वैगुण्य अथवा दोष राहत नाही, असे सहसा होत नाही. या न्यायाने कालिदासाच्या ग्रंथांतही टीकाकारांनी व आलंकारिकांनी अनेक उणीवा व दोष दाखविले आहेत. हे प्रकरण संपविण्यापूर्वी त्यांचा थोडक्यात विचार करणे जरूर आहे.

प्रथम उणीवांचा विचार करू. मागे सांगितल्याप्रमाणे कालिदासाच्या ग्रंथांत शृंगार व करुण ह्या दोनच रसांचा उत्तम परिपोष झालेला आढळतो. त्यांतही करुणरसात भवभूति त्याच्यापेक्षा वरचढ ठरेल. 'कारुण्यं भवभूतिरेव तनुते' ही सुभाषितकारांची उक्ति प्रसिद्धच आहे. आपल्या विलासी, रंगेल व सौंदर्यान्वेषी कवीला रौद्र, वीर व बीभत्स हे रस चांगले साधत नाहीत. 'रघुवंशा'च्या सातव्या सर्गात इंदुमतीविवाहानंतर अज, आणि इंदुमती न मिळाल्यामुळे निराश झालेले इतर राजे यांचे युद्ध वर्णिले आहे. पण त्यातही ललितमधुर शब्दांची योजना केल्यामुळे वीर किंवा रौद्र रसांची प्रतीति होत नाही. भट्टनारायणाचे 'वेणीसंहार' हे नाटक वीररसात अधिक सरस आहे. कालिदासाच्या ग्रंथांत खल पुरुषांची चित्रे कोठेही काढलेली दिसत नाहीत. त्याच्या नाट्यसृष्टीत विविधता कमी आहे. 'विक्रमोर्वशीय' व 'शाकुंतल' यांच्या प्रारंभीच्या प्रवेशांत— नायकनायिकांचे प्रथम दर्शन, परस्पर प्रेमदर्शक हावभाव, नायकाला पुनः एकदा पाहता यावे म्हणून नायिकेने काही निमित्ताने मागे राहणे, इत्यादि प्रसंगांत इतके साम्य आहे की, 'शाकुंतल' हे सर्वोत्कृष्ट नाटक रचता यावे म्हणून कवीने 'विक्रमोर्वशीय' हा पहिला प्रयत्न केला असावा, असे वाटते. 'मालविकाग्निमित्र' व 'विक्रमोर्वशीय' यांतही असेच प्रसंगसाम्य आहे. त्याच्या नाटकांतील बहुतेक पात्रे राजदरबारी असणाऱ्या कवीच्या दृष्टीसमोर येतील अशीच आहेत. त्यात भास व शूद्रक कवींची सर्वतोगामी निरीक्षणशक्ति व सहानुभूति दिसत नाही. त्याच्या नाट्यस्त्रीसृष्टीत उदात्ततेचा अंश कमी आहे, हे मागे दाखविलेच आहे. निसर्गाच्या भव्य व भीषण स्वरूपाकडे कवीचे लक्ष गेलेले दिसत नाही ; किंवा ते गेले असल्यास स्वतःच्या सौम्य स्वभावामुळे त्याला ते स्वरूप आवडले नसावे. गंभीरप्रकृति भवभूतीच्या नाटकात त्याचे यथार्थ वर्णन दृष्टीस पडते.

प्रो. कीथ यांनी आपल्या Sanskrit Drama या ग्रंथात (पृ. १६०) कालिदासाविषयी पुढील उद्गार काढले आहेत: "कालिदासाचे ग्रंथ प्रशंसनीय आहेत. तथापि, तो आपल्या काव्यांत तसेच नाटकांतही जीवित व दैव ( Destiny ) या महत्त्वाच्या प्रश्नांत मुळीच लक्ष घालीत नाही, ही गोष्ट दृष्टिआड करणे न्याय्य होणार नाही. जर्मन कवि गटेने केलेली प्रशंसा, व 'हिंदुस्थानचा शेक्सपीयर' ही सर विल्यम् जोन्सने कालिदासाला दिलेली पदवी यथार्थच आहे. तथापि, कालिदासाची स्वकालीन ब्राह्मणप्रणीत धर्मावर निष्ठा होती, हे स्पष्ट दिसते. तिजमुळे त्याच्या सहानुभूतीचे विषय कमी झाले आहेत, याकडेही आपण दुर्लक्ष करता कामा नये. मनुष्य आपल्या कर्मांनी दैवाची उत्पत्ति करतो; त्या दैवाचाच सर्वत्र न्याय्य अधिकार चालत आहे, अशी त्याची खात्री होती. त्यामुळे जग हे एक दुःखपूर्ण स्थळ आहे, त्यात अन्यायाचा अंमल चालला आहे, असे मानणे व बहुजनसमाजाच्या कष्टमय जीविताबद्दल सहानुभूति वाटणे त्याला शक्य नव्हते. स्वतःच्या आकुंचित मर्यादेबाहेर त्याला जाता येईना." प्रो. कीथ यांची ही टीका पुष्कळ अंशी अयोग्य आहे. कालिदासाच्या नाटचसृष्टीत विविधता कमी आहे, ही गोष्ट आम्हीही मागे दाखविली आहे. पण याचे कारण तो ब्राह्मणधर्मानुयायी होता, हे नसून तो राजकवि होता हे होय. पण प्रो. कीथ यांच्या टीकेतील मुख्य मुद्दा दुसराच आहे. वरील विधाने करताना त्यांच्या दृष्टिसमोर प्राचीन ग्रीक नाटचवाङ्मय होते, असे वाटते. प्राचीन ग्रीक नाटकांचे आनंदपर्यवसायी व दुःखपर्यवसायी असे दोन भाग पडतात. ग्रीक लोक स्वतः मोठे आनंदी, विलासी व कलाभिज्ञ होते. ऋग्वेदकालीन आर्यांप्रमाणेच त्यांनीही सृष्टीच्या भिन्न भिन्न स्वरूपांवर व व्यापारांवर चेतनधर्मारोप करून अनेक सुंदर देव व देवता कल्पिल्या होत्या. तथापि, त्यांच्या शोकपर्यवसायी नाटकांवर दैववादाची भीषण छाया पडलेली दिसते. सृष्टीतील गूढांच्या मुळाशी दैव ( Destiny ) म्हणून एक बलिष्ठ, सर्वव्यापी व निष्ठुर शक्ति आहे. मनुष्यप्राण्यांप्रमाणे देवादिकांवरही तिचा अंमल चालतो. सर्वांनी तिच्यापुढे आपली मान लवविलीच पाहिजे. कोणी तिचा प्रतिकार करू लागल्यास अधिकच निष्ठुरपणे ती आपली इच्छा पूर्ण करते, असे त्यांचे मत होते.

या दैवाच्या कृतीत काही विशिष्ट हेतु दिसतो की नाही, त्याचा मानवी कर्मांशी काही नैतिक संबंध असतो काय, असल्यास तो कोणत्या तऱ्हेचा, इत्यादि प्रश्नांचा विचार ग्रीक शोकपर्यवसायी नाटकांत केलेला आढळतो व तद्द्वारे जीवितातील सुखदु:खांची गूढ कोडी उलगडण्याचा प्रयत्न केलेला असतो. काही नाटकांत विविध कर्तव्यांचा कलह प्रतिबिंबित झाला आहे. कित्येक प्रसंगी नागरिकत्वामुळे प्राप्त झालेले कर्तव्य किंवा समाजसंस्थेचा घटक असल्यामुळे प्राप्त झालेले कर्तव्य कौटुंबिक कर्तव्याशी विरोधी असते. अशा वेळी उत्पन्न होणाऱ्या कर्तव्यकलहावर काही नाटकांची उभारणी झाली आहे. अशा प्रकारच्या प्रश्नांचा विचार कालिदासीय ग्रंथांत आढळत नाही. हा प्रो. कीथ यांच्या टीकेचा भावार्थ आहे.*

या बाबतीत प्रथम लक्षात घेण्यासारखी गोष्ट ही की, कोणत्याही कवीचे ग्रंथ परिस्थितिनिरपेक्ष नसतात. प्रत्येक ग्रंथकाराच्या कृतीवर तत्कालीन आचारविचारांचा परिणाम थोडया ना थोडया अंशाने झालेला असतो. त्याच्या कृतींतील सौंदर्याचा आस्वाद घ्यावयाचा असेल तर वाचकाने स्वत:ला तत्कालीन परिस्थितीत नेले पाहिजे. वर्धिष्णु, जयिष्णु व समृद्ध अशा गुप्त साम्राज्यात राहणाऱ्या कवीच्या कलाकृतीत सर्वत्र उत्साह, आनंद व आशावादित्व आढळले तर त्यात आश्चर्य कसले ? त्याच्या ग्रंथांवर दु:खवादाची किंवा नैराश्याची कृष्ण छाया पसरलेली दिसत नाही, याबद्दल नाक मुरडणे योग्य होणार नाही. शिवाय ग्रीक नाटककारांनी जे प्रश्न आपल्या ग्रंथांत विचारार्थ घेतलेले दिसतात, त्यांची उत्तरे कालिदासपूर्वकालीन ऋषींनी शेकडो वर्षांच्या विचारान्ती आपल्या उपनिषदादि ग्रंथांत लिहून ठेवली आहेत. सृष्टीच्या मुळाशी कोणी अघोर व निर्दय अशी दैत्यरूपी शक्ति नसून सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ व दयाळू परमेश्वराचे न्यायी राज्य चालू आहे. सृष्टीत बाह्यत: दिसणाऱ्या अन्यायाच्या मुळाशी न्यायच आहे. मनुष्य स्वत:च्या कर्मांची फळे इहपरलोकी भोगत असतो. म्हणून जीवितातील त्रिविध तापांनी निराश न होता 'उद्धरेदात्मनात्मानम्', प्रत्येकाने स्वत:च्या प्रयत्नांनी आपले नि:श्रेयस साध्य करून घ्यावे, ही आमच्या प्राचीन

* Cf. Keith : *The Sanskrit Drama*, pp. 280-281.

ग्रंथांची शिकवण आहे. कालिदासाची उपनिषदे व भगवद्गीता यांवर निस्सीम श्रद्धा असल्याने त्यांतील धार्मिक व तात्त्विक विचारांचा त्याने आपल्या ग्रंथांत पुरस्कार केला आहे, हे आम्ही पुढील प्रकरणात दाखविणार आहो. शिवाय सर्व भारतीय तत्त्ववेत्त्यांनी कर्मवादाचा स्वीकार केला असल्यामुळे कालिदास ब्राह्मणमतानुयायी नसून बौद्ध किंवा जैन धर्मानुयायी असता तरी त्याच्या ग्रंथांत ग्रीक नाटकांत विचारार्थ घेतलेल्या प्रश्नांची तशी उत्तरे सापडली नसती.

पण याचा अर्थ त्याच्या ग्रंथात दैववाद कोठेही आढळत नाही, असे नाही. दैव किंवा भवितव्यता यांनी प्राणिमात्राचे जीवित नियंत्रित झाले आहे, हे त्याने अनेक ठिकाणी सुचविले आहे. 'इन्द्रिये भवितव्यतेला अनुसरत असतात'; म्हणूनच 'लक्ष्मीस्वयंवर' नाटकाच्या प्रसंगी उर्वशीच्या मुखातून 'पुरुषोत्तमे' याबद्दल 'पुरूरवसि' असा शब्द बाहेर पडला. काही कारण नसता मालविकेला वर्षभर अज्ञातवासातील दुःखे सहन करावी लागली. दैवामुळे शकुंतलेला पतिवियोगाचे दारुण दुःख प्राप्त होणार, हे जाणून कण्व मुनींनी तिच्या प्रतिकूल दैवाची शांति करण्याकरिता सोमतीर्थासारख्या दूरच्या तीर्थाची यात्रा केली. या सर्व ठिकाणी कालिदासाने दैव किंवा भवितव्यता यांचा अप्रतिकार्य आक्रम सुचविला आहे. तथापि, दैव म्हणजे कोणी आंधळी किंवा निष्ठुर शक्ति नसून आपल्याच पूर्वजन्मीच्या कृत्यांचा परिणाम असतो, हेही त्याने अनेक ठिकाणी दाखविले आहे. आपण निरपराधी आहो व पतीने आपला विनाकारण त्याग केला आहे, हे माहीत असताही त्याला दोष न देता सीता 'ममैव जन्मान्तरपातकानां विपाकविस्फूर्जथुरप्रसह्यः।' [हा माझ्याच पूर्वजन्मीच्या पातकांचा असह्य असा परिणामरूपी वज्राघात आहे] असे म्हणते. विहार करताना इंदूमतीला आकस्मिक मृत्यु येतो, त्याचे कारण तिचा पूर्वजन्मीचा अविवेक असे कालिदासाने दाखविले आहे. भारतीय तत्त्वज्ञानात कर्मवादाला पुनर्जन्माच्या कल्पनेची जोड दिली असल्याने अत्यंत दुःखी, हीन व दीन मनुष्यही आशावादी असतो. कारण इहलोकीचा अन्याय व दुःख ही सर्वकाळ टिकणारी नसून चक्रनेमिक्रमाने स्वकर्मानुसार त्यांची परिणति या नाही तर पुढील जन्मात तरी न्यायात व सुखात होईल, असा त्याला भरवसा असतो. कालिदासाच्या ग्रंथांत

शोकपूर्ण प्रसंगांची वाण नाही. मदनदाह, इंदुमतीनिधन, उर्वशीरूपपरिवर्तन, शकुंतलाप्रत्यादेश, इत्यादि अनेक प्रसंगांच्या वर्णनावरून मानवी जीवित म्हणजे सर्वस्वी 'गुलाबाची शय्या' होय, असे कवीचे मत असेल असे वाटत नाही. तथापि, हे दु:खपूर्ण प्रसंग अंतिम न मानता त्याने त्यांचे सुखात व आनंदात पर्यवसान केले आहे. त्यामुळे त्याचे ग्रंथ वाचून मनास आनंदाबरोबरच शांति व समाधान ही प्राप्त होतात. याविषयी प्रो. विल्सन यांचे पुढील उद्‌गार चिंतनीय वाटतील : "हिंदुस्थानात शोकपर्यवसायी व आनंदपर्यवसायी असे नाटकांचे भेद नसले तरी सर्व हिंदु नाटकांचा पट विविध रंगांच्या धाग्यांनी विणलेला दिसतो. त्यात गांभीर्य व दु:ख यांची सांगड रंगेलपणा व हास्य यांच्याशी घातलेली असते. मानवी हृदयातील भीति, अनुकंपा यांसुद्धा सर्व भावनांचा उद्रेक व्हावा असे त्यांचे उद्दिष्ट असले तरी प्रेक्षकांच्या मनावर दु:खपूर्ण परिणाम करून ते साध्य केलेले नसते." असो.

येथवर कालिदासाच्या ग्रंथांतील उणीवांचा विचार केला. जगात कोणीही सर्वगुणसंपन्न नसल्यामुळे एखाद्याच्या स्वभावातील किंवा कृतीतील उणीवांबद्दल त्याला नावे ठेवणे योग्य होणार नाही. पण त्याची कृति किंवा उक्ति निर्दोष असावी, अशी आपली अपेक्षा असते. शिवाय काव्यामध्ये दोष असल्यास त्यायोगे साक्षात् किंवा परंपरेने रसापकर्ष होतो. म्हणून सर्व आलंकारिकांनी दोषांचा सविस्तर विचार व वर्गीकरण केले आहे. आनंदवर्धनासारख्या रसिक साहित्यशास्त्रज्ञाने 'तत्तु सूक्तिसहस्रद्योतितात्मनां महात्मनां दोषोद्‌घोषणमात्मन एव दूषणं भवति।' [हजारो सुंदर वचनांनी ज्यांनी स्वत:ला उज्ज्वल केले आहे, अशा महात्म्यांच्या दोषांचे आविष्करण करणे हे टीकाकारासच दूषणास्पद होते] असे मानून दोषांची उदाहरणे देण्याचे टाळले आहे. पण इतर आलंकारिकांनी इतका विवेक न करता प्रत्येक दोषाचे उदाहरण महाकवींच्या ग्रंथातून काढून दिले आहे. त्यांत खुद्द कालिदासाच्या ग्रंथांतून इतरांच्या मानाने जास्तच उदाहरणे घेतली आहेत. त्यावरून कालिदासाचे ग्रंथ इतर कवींच्या ग्रंथांपेक्षा जास्त सदोष आहेत, असा काही अविवेकी वाचकांचा समज व्हावयाचा! पण वस्तुस्थिति तशी नाही. कालिदासाच्या ग्रंथांतूनच बरीचशी उदाहरणे निवडण्याचे कारण

त्याच्या ग्रंथांची लोकप्रियता हे होय. स्वतःला माहीत असलेल्या श्लोकातील दोष दाखविल्यास विद्यार्थ्यास तो चटकन समजतो. इतर महाकवींची काव्ये क्लिष्ट असल्याने त्यांचा प्रचार कमी होता ; म्हणून या आलंकारिकांनी उदाहरणार्थ कालिदासाचे ग्रंथ निवडलेले दिसतात. दुसरे असे की, कालिदास हा कविकुलगुरु. दैवी प्रसादाने त्याची प्रतिभा स्फुरली, अशी परंपरागत समजूत. अशा कवीच्या हातूनही अशा चुका होतात, मग इतर कवींविषयी बोलावयासच नको! असे सुचवून दोषांचे सार्वत्रिकत्व व दोषवर्जनाचे महत्त्व विद्यार्थ्यांस व होतकरू कवींस पटवून द्यावे, हाही या आलंकारिकांचा उद्देश असावा. असो. येथे कालिदासाच्या ग्रंथांतील सर्व बारीक सारीक दोषांचा विचार न करता काही प्रमुख दोषांचेच विवेचन केले आहे :—

१. अश्लीलता—सहृदय वाचकांस उद्वेगजनक असा कालिदासाच्या ग्रंथांतील मुख्य दोष म्हणजे अश्लीलता हा होय. वर्णन करण्याच्या भरात आपल्या रंगेल व विलासी कवीस याचे भान राहिलेले दिसत नाही. 'ज्ञातास्वादो विवृतजघनां को विहातुं समर्थः।' (मेघ. ४३), 'नितम्बमिव मेदिन्याः स्रस्तांशुकमलङ्घयत्।' (रघु. ४, ५२) इत्यादि उक्तींत व अग्निवर्णाच्या स्त्रीसंभोग-वर्णनात हा दोष आढळतो. उत्तान शृंगारामुळे कालिदासाच्या ग्रंथांचे काही भाग पाठशाळांतील अध्यापनास अयोग्य झाले आहेत. 'कुमारसंभवा'तील देवीसंभोगवर्णनात तर ह्या दोषाचा अगदी कळस झाला आहे. आधी उत्तमप्रकृति पात्रांच्या संभोगशृंगाराचे वर्णन वाचून वाचकांच्या मनात लज्जा उत्पन्न होते. तशात, हा शृंगार कवीला अत्यंत पूज्य वाटणाऱ्या त्रैलोक्याच्या जनकजननींचा–शिवपार्वतींचा–त्यामुळे तो अत्यंत अनुचित वाटतो. या शृंगाराचे वर्णन वाचून प्रत्येक सहृदय वाचकास स्वतःच्या मातापित्यांच्या संभोगवर्णनाने येते तशी किळस आली पाहिजे, असे सर्व प्रमुख आलंकारिकांनी म्हटले आहे. कालिदासासारख्या महाकवीच्या ग्रंथांत तो दोष इतका भासत नाही, याचे कारण तो त्याच्या अलौकिक प्रतिभेने झाकला जातो, असे आनंदवर्धनाने म्हटले आहे. तथापि, तत्कालीन विद्वानांनी याला गर्ह्य ठरविल्यामुळे कालिदासाने 'कुमारसंभव' अर्धवट सोडून दिले असावे, हे आम्ही मागे दाखविलेच आहे.

मात्र हा दोष केवळ कालिदासाच्या ग्रंथांत दिसतो असे नाही. संस्कृत वाङमयात शृंगार रसास अग्रपूजेचा मान मिळाला असल्याने सर्व संस्कृत काव्यांत तो थोड्याबहुत प्रमाणात दिसून येतो.* नाटक हे दृश्य काव्य असल्याने स्त्रीपुरुषांच्या मिश्र समाजाने एकत्र बसून त्याचा रसास्वाद घ्यावयाचा असतो. त्यामुळे नाटकात तर अश्लीलता हा दोष जास्तच दूषणार्ह होतो. पण भवभूतीसारख्या गंभीर स्वभावाच्या सोवळ्या नाटककाराच्या 'मालतीमाधव' नाटकात तो उत्तान स्वरूपात आढळतो, हे आश्चर्य आहे. कालिदासाच्या नाटकांत मात्र तो बहुधा दिसत नाही, हे लक्षात घेण्यासारखे आहे. बहुधा म्हणण्याचे कारण कालिदासाच्या पहिल्या नाट्यकृतीत—'मालविकाग्निमित्रा'त—इरावतीच्या भाषणात अश्लीलार्थ सूचित झाला आहे. अशोकाप्रमाणे स्वतःलाही पदप्रहार करून आपले मनोरथ पूर्ण करण्याविषयी राजा मालविकेला विनंती करतो, त्यावेळी इरावती एकदम पुढे होऊन म्हणते, 'कर, कर पूर्ण यांचे मनोरथ! अशोक केवळ फुले देईल. हे तर फुले व फळेही देतील!'

२. च्युतसंस्कृतित्व—काव्यात अशुद्ध व्याकरणप्रयोगाचा उपयोग केला असल्यास 'च्युतसंस्कृतित्व' हा दोष होतो. शुद्ध भाषेचे महत्त्व ध्यानात आणून प्राचीन आलंकारिकांनी आपल्या ग्रंथांचा एक स्वतंत्र परिच्छेद संस्कृत कवींच्या विवादास्पद प्रयोगांची छाननी करण्यात खर्च केला आहे. कालिदासपूर्वकालीन अश्वघोष व भास या कवींचे व्याकरणशुद्धतेकडे फारसे लक्ष नव्हते; त्यामुळे त्यांच्या ग्रंथांत अशुद्ध व्याकरणप्रयोगांची गर्दी उडालेली दिसते. व्यासवाल्मीक्यादि ऋषींच्या काव्यांतही हे दोष आढळतात; पण त्यांच्या अलौकिक तपस्येने त्यांच्या ग्रंथांस पूज्यता प्राप्त झाल्यामुळे त्यांतील व्याकरणदुष्ट प्रयोगांस आर्ष म्हणण्याचा प्रघात आहे. पण अश्वघोषादिकांच्या ग्रंथांतील अशुद्ध प्रयोगांस दूष्यच मानतात. कालिदासाचे भाषाशुद्धतेकडे विशेष लक्ष होते. 'संस्कारवत्येव गिरा मनीषी' (कुमार. १, २८) या उपमेत सुसंस्कृत भाषेने विद्वान् पवित्र होतो व शोभतो, असे त्याने स्वतःच म्हटले आहे व सामान्यतः त्याच्या ग्रंथांत दुष्ट प्रयोग क्वचितच सापडतात.

* 'बुद्धचरित' ५, ५६ पाहा.

तथापि, क्वचित् अनवधानाने त्याच्याही हातून झालेल्या चुका आलंकारिकांनी व टीकाकारांनी दाखविल्या आहेत. उदाहरणार्थ—

१. लावण्य उत्पाद्य इवास यत्नः । [कुमार० १, ३५]
[तेनास लोकः पितृमान् विनेत्रा । [रघु० १४, २३]
या पंक्तीत 'आस' असे अस् धातूचे द्वितीय भूतकाळी तृतीय पुरुषी एकवचनी रूप कवीने योजिलें आहे. पण 'अस्तेर्भूः' (२, ४, ५२) या पाणिनिसूत्राप्रमाणे अस् धातूचे द्वितीय भूतकाळी स्वतंत्र रूप योजीत नाहीत. या ठिकाणी 'आस' हे 'अस गतिदीप्त्यादानेषु।' या धातुपाठातील सूत्राप्रमाणे दुसऱ्याच एका दीप्त्यर्थक अस् धातूचे रूप मानावे, असे 'काव्यालंकारसूत्रवृत्ति'कार वामनाने सुचविले आहे, तर शाकटायनाने हे विभाक्तप्रतिरूप–विभक्त्यन्त शब्दरूपासारखे दिसणारे–अव्यय मानावे असे म्हटले आहे. तथापि, या ठिकाणी अनवधानाने कवीच्या हातून हा प्रामादिक प्रयोग झाला असावा, असे वाटते. *

२. राजयक्ष्मपरिहानिराययौ कामयानसमवस्थया तुलाम् । रघु० १९, ५०.
या पंक्तीतील 'कामयान' हे रूप 'कामयमान' या शुद्ध रूपाबद्दल योजिलेले, अत एव दुष्ट आहे.

काही ठिकाणी पाणिनीय व्याकरणाप्रमाणे एखादे रूप अशुद्ध वाटत असले तरी अभिजात कवींनी अनेकदा योजल्यामुळे शिष्टसंमत अत एव अदूष्य मानले जाते. कालिदासपूर्वकालीन महामान्य कवींनी अशी काही रूपे प्रचारात आणल्यामुळे कालिदासाने आपल्या ग्रंथांत त्यांचा उपयोग केलेला दिसतो. उदाहरणार्थ, पाणिनि, कात्यायन व पतञ्जलि या तीनही व्याकरणाचार्यांच्या मते द्वितीय भूतकालवाचक धातुसाधितांचा प्रयोग वैदिक भाषेतच होतो, संस्कृत भाषेत होत नाही. पण स्वकालीन शिष्ट संप्रदायास अनुसरून 'तं तस्थिवांसं नगरोपकण्ठे' (रघु. ५, ६), 'श्रेयांसि सर्वाण्यधिजग्मुषस्ते' (रघु. ५, ३४) इत्यादि ठिकाणी कालिदासाने त्या धातुसाधितांची रूपे योजिली आहेत. इतर कवींनीही

* कालिदासाच्या अगोदर सुमारे शंभर वर्षे होऊन गेलेल्या आर्यशूराच्या 'जातकमाले'त अशा तऱ्हेचे प्रयोग आढळतात, हे लक्षात घेण्यासारखे आहे. उदाहरणार्थ, 'नरेन्द्रचूडाधृतशासनस्य तस्य त्वलङ्कारवदास शस्त्रम्।' (मैत्रीबलजातक) हा श्लोकार्ध पाहा.

अशी रूपे योजिली आहेत.* तसेच 'व्यापारयामास', 'हासयामास' इत्यादि द्वितीय भूतकाळाची रूपे अखंड योजावी, असा स्पष्ट नियम कात्यायनाने आपल्या वार्त्तिकात घालून दिला आहे. तथापि, अश्वघोषाने आपल्या 'बुद्धचरिता'त 'यथावदेनं दिवि देवसङ्घा दिव्यै-र्विशेषैर्महयाञ्च चक्रुः।' (६, ५८) या पंक्तीत 'महयां' व 'चक्रुः' असे दोन भाग पाडून मध्ये 'च' हे अव्यय घुसडले आहे.† कालिदासानेही या तऱ्हेची तीन रूपे योजिली आहेत—'तं पातयां प्रथममास पपात पश्चात्।' (रघु. ९, ६१), 'प्रभ्रंशयां यो नहुषं चकार' (रघु. १३, ३६), 'संयोजयां विधिवदास समेतबन्धुः।' (रघु. १६, ८६). अशी रूपे त्या काळी शिष्टसंमत होती म्हणून इ. स. ४५७ च्या एका शिलालेखातही दोन ठिकाणी त्यांचा प्रयोग केलेला दिसतो.‡

३. अनौचित्य—औचित्य हा रसाचा आत्मा होय. काव्यात अनेक गुण व अलंकार असले तरी त्यात औचित्य नसेल तर ते रसिकांस निर्जीव भासते, असे क्षेमेंद्राने म्हटले आहे. कालिदासाच्या ग्रंथांच्या रचनेत, अलंकारांत, पदवाक्यादिकांच्या प्रयोगांत सर्वत्र औचित्य असते, हे आलंकारिकांनी सोदाहरण दाखविले आहे. तथापि, काही ठिकाणी त्याच्या हातूनही औचित्यभंग झाला आहे. उदाहरणार्थ, 'कुमारसंभवा'त भगवान् शंकराच्या विलोभनार्थ प्रसृत झालेल्या वसंतऋतूचे वर्णन करताना कालिदासाने खालील श्लोक घातला आहे—

> वर्णप्रकर्षे सति कर्णिकारं दुनोति निर्गन्धतया स्म चेतः।
>
> प्रायेण सामग्र्यविधौ गुणानां पराङ्मुखी विश्वसृजः प्रवृत्तिः॥ कुमार० ३, २८.

यात पांगाऱ्याच्या सुंदर फुलांना सुवासिक न केल्याबद्दल विधात्याला दोष दिला आहे. पण त्यायोगे प्रकृतशृंगाररसोद्दीपन मुळीच होत नसल्यामुळे येथे औचित्यभंग हा दोष झाला आहे.

> क्रोधं प्रभो संहर संहरेति यावद्गिरः खे मरुतां चरन्ति।
>
> तावत्स वह्निर्भवनेत्रजन्मा भस्मावशेषं मदनं चकार॥ कुमार० ३, ७२.

यात शंकराच्या तृतीयनेत्रवह्नीने झालेल्या मदनदाहाचे वर्णन आले

* अश्वघोषकृत 'बुद्धचरित'–ऊचिवान्, ३, ४३; उपजग्मिवान्. १२, ३ इ.

† बुद्धचरित–'संवर्धयामात्मजवद्बभूव।' (२, १९), 'प्रत्यर्चयां धर्मभृतां बभूव' (८, ९) या पंक्तीही पाहा.

‡ Girnar Rock Inscription of Skandagupta, *G. I.*, No. 14.

असल्यामुळे संहारार्थक असे एखादे शंकराचे नाव न योजिता उत्पत्त्यर्थक 'भव' या नावाचा प्रयोग केल्याने औचित्यहानि झाली आहे. तसेच 'मालविकाग्निमित्रा'च्या पहिल्या अंकात परिव्राजिकेच्या तोंडी 'अनिमित्तमिन्दुवदने किमत्रभवत: पराङ्मुखी भवसि' असे शब्द घातले आहेत. एका स्त्रीने दुसरीस 'इंदुवदना' म्हणावे, हे चमत्कारिक दिसते ; यामुळे येथेही तो दोष झाला आहे.

४. **रसदोष**—एखाद्या रसाचे वर्णन करताना कवीने त्याचा ओघ अखंड चालू ठेवावा. त्यात मध्ये खंड पडल्यास सहृदय वाचकांचा विरस होतो. 'कुमारसंभवा'तील चौथ्या सर्गात मदनाला भस्मशेष झालेला पाहून त्याची स्त्री रति हिने अत्यंत शोक केला, त्याचे वर्णन आले आहे. त्यात मध्यंतरी वसन्तागमनाच्या वर्णनाने खंड पडल्यामुळे रसहानि झाली आहे, असे 'साहित्यदर्पणा'त दाखविले आहे. तसेच 'रघुवंशा'तील ताडकावधवर्णनात 'राममन्मथशरेण ताडिता दु:सहेन हृदये निशाचरी। गन्धवद्रुधिरचन्दनोक्षिता जीवितेशवसतिं जगाम सा ॥' (११, २०) असा श्लोक घातला आहे. त्यात बीभत्स व शृंगार या परस्परविरोधी रसांच्या साहचर्याने रसभंग झाला आहे.

यांशिवाय अविमृष्टविधेयांशत्व, भग्नप्रक्रमत्व, अक्रमत्व, श्रुतिकटुत्व, निहतार्थत्व, अनुचितार्थत्व इत्यादि दोषांचीही एक-दोन उदाहरणे कालिदासाच्या ग्रंथांतून आलंकारिकांनी दिली आहेत. विस्तारभयास्तव त्यांचा येथे विचार करता येत नाही. काही ठिकाणी या टीकाकारांनी दोषदर्शनाच्या बाबतीत कवीला अन्याय केला आहे. उदाहरणार्थ,

काप्यभिख्या तयोरासीद्व्रजतोः शुद्धवेषयोः।
हिमनिर्मुक्तयोर्योगे चित्राचन्द्रमसोरिव॥ रघु० १, ४६.

यात वसिष्ठाश्रमी स्वच्छ वस्त्रे धारण करून जाणाऱ्या राजाराणींना धुके नाहीसे झाल्यावर उज्ज्वल दिसणाऱ्या चित्राचंद्राची सुंदर उपमा कवीने योजिली आहे व ती उपमानोपमेयांच्या लिंगवचनांच्या बाबतीतही निर्दोष आहे. तथापि, 'चित्रा व चंद्र हे सुंदर दिसतात' व 'राजा व राणी सुंदर दिसले' असा येथे कालभेद आल्यामुळे विश्वनाथाने येथे 'भग्नप्रक्रमत्व' नामक दोष मानला आहे. इतकी बारीक दृष्टि स्वीकारली तर कालिदासाप्रमाणे इतरही अनेक कवींच्या शेकडो उपमा त्याज्य मानाव्या

लागतील. यास्तव कालविध्यादि भेद असला तरी सहृदयांना उद्वेग वाटत नसेल, तर उपमा सदोष मानू नये, हा 'काव्यादर्श'कारांचा नियमच जास्त ग्राह्य वाटतो. तसेच 'पदं सहेत भ्रमरस्य पेलवं शिरीषपुष्पं न पुन: पतत्रिण:' (कुमार. ५, ४), 'सा संन्यस्ताभरणमबला पेलवं धारयन्ती' (मेघ. ९८), 'नवमालिकाकुसुमपेलवा' (शाकु. १) इत्यादि ठिकाणी 'कोमल' या अर्थी 'पेलव' या शब्दाचा प्रयोग कालिदासाने केला आहे. किंबहुना, तो शब्द त्याचा विशेष आवडता असावा; तथापि, त्यातील 'पेल' या अंशाने स्वकालीन लाटी (गुजराती) अपभ्रंशात अश्लीलार्थ व्यक्त होतो, म्हणून कालिदासानंतर शेकडो वर्षांनी झालेल्या मम्मट, विश्वनाथ इत्यादि आलंकारिकांनी तो शब्द त्याज्य ठरविला आहे. आम्हांस तर हा सोवळेपणाचा अतिरेक दिसतो. आपण योजलेल्या शब्दांचा असा कीस काढला जाईल, असे कवीला स्वप्नही पडले नसेल; व पडले असते तरी पुढे कधी काळी एखाद्या भाषेत त्याचा असा अर्थ होईल हे त्याला सर्वज्ञत्वाभावी समजले नसते. तेव्हा या ठिकाणी अश्लीलत्व हा दोष मानणे अयोग्य आहे.

आलंकारिकांनी दाखविलेले सर्व दोष मानले तरी कालिदासाच्या विशाल ग्रंथसंपत्तीच्या मानाने ते अत्यल्पच आहेत. त्याच्या ग्रंथांतील गुणसन्निपातात तर ते अगदी लोपून जातात; त्यामुळे कालिदासाच्या वाणीचे वर्णन करताना एका सहृदय ग्रंथकाराने तिला 'निर्दोष' असे विशेषण लाविले आहे. श्रीकृष्ण कवि आपल्या 'भरतचरित' काव्याच्या आरंभी कालिदासाच्या भाषेचे येणेप्रमाणे वर्णन करतो—

**अस्पृष्टदोषा नलिनीव दृष्टा हारावलीव ग्रथिता गुणौघैः।**
**प्रियाङ्कपालीव विमर्दहृद्या न कालिदासादपरस्य वाणी॥** १, ३.

'कमलिनीसारखी अस्पृष्टदोषा (रात्री विकास न पावणारी, पक्षी दोषरहित) मुक्ताहारासारखी गुणौघांनी (अनेक सूत्रांनी, पक्षी गुणसमुच्चयांनी) युक्त, प्रियेच्या मांडीप्रमाणे विमर्दाने (संवाहनाने, पक्षी परीक्षणाने) आल्हादकारक होणारी, अशी कालिदासाशिवाय इतर कोणाही कवीची भाषा नाही.'*

* या श्लोकात श्लिष्ट विशेषणांचा पहिला अर्थ कमलिनी, मुक्ताहार इत्यादि उपमानांकडे व दुसरा कालिदासाच्या वाणीकडे लावावा.

प्रकरण आठवे

# कालिदासीय विचार

**स्वादुकाव्यरसोन्मिश्रं शास्त्रमप्युपयुञ्जते ।**
**प्रथमालीढमधवः पिबन्ति कटु भेषजम् ।।**

भामहकृत काव्यालंकार. ५, ३.

कालिदासाच्या चरित्राचे वर्णन करताना त्याने अनेक ग्रंथांचे अवलोकन केले होते व अनेक विषयांचा सूक्ष्मपणे अभ्यास केला होता, असे आम्ही दाखविले आहे. धर्म, तत्त्वज्ञान, समाजस्थिति, राजकारण, शिक्षण इत्यादि अनेक विषयांवर त्याने मननपूर्वक आपली मते निश्चित करून त्यांचा आपल्या ग्रंथांत पुरस्कार केलेला दिसतो. मागे एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे हे उल्लेख तुरळक आहेत ; तथापि त्यांवरून त्याची तद्विषयक मते अजमावणे शक्य आहे. काही महत्त्वाच्या विषयांसंबंधाने तसा प्रयत्न या प्रकरणात केला आहे.

या सर्व विषयांत धर्म व तत्त्वज्ञान हे अत्यंत महत्त्वाचे आहेत. कोणत्याही समाजाचे धारण करून त्याला इहलोकी अभ्युदय व परलोकी निःश्रेयस प्राप्त करून देण्यास धर्माची अत्यंत जरूरी असते. 'धारणाद्धर्ममित्याहुः।', 'यतोभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः।' इत्यादि धर्माच्या व्याख्या सुप्रसिद्ध आहेत. आपल्या हिंदुस्थानात तर धर्माचे अत्यंत महत्त्व आहे. या पुण्य भूमीतच वैदिक, बौद्ध व जैन या जगातील

तीन महत्त्वाच्या धर्मांचा उद्‌गम व विकास झाला. धार्मिक कल्पनांचा मनुष्याच्या मनावर मोठा परिणाम होतो व त्यामुळे त्याचे व्यावहारिक जीवन सुयंत्रित करण्यात त्याची अतिशय मदत होते, हे ध्यानात आल्यावरून आपल्या प्राचीन ऋषींनी धर्माची व्यवहाराशी बेमालूमपणे सांगड घालून दिली आहे. धर्माला तत्त्वज्ञानाचे अधिष्ठान नसले तर तो अंधश्रद्धेचा विषय होऊन बसतो, व काही काळ परिस्थितीच्या अनुकूलतेमुळे किंवा धर्मसंस्थापकाच्या आकर्षक वैयक्तिक गुणांमुळे त्याचा प्रसार झाला तरी तो चिरस्थायी होत नाही, हे ध्यानात आणून बौद्ध व जैन तत्त्वज्ञांनी लौकरच आपापल्या धर्माला तत्त्वज्ञानाची जोड दिली. हिंदु धर्माचे तर प्रथमपासून तत्त्वज्ञान हे एक प्रधान अंग झाले होते, हे ऋग्वेदातील तत्त्वज्ञानविषयक सूक्तांवरून दिसून येते. असो.

कालिदासकाळी हिंदु धर्म संक्रमणावस्थेत होता. विजिगीषु जैन व विशेषत: बौद्ध धर्माच्या आघातांनी त्यांतील विचारी लोक खडबडून जागे झाले व त्यांनी आपल्या अफाट धर्मग्रंथांतील अनावश्यक भाग गाळून व राहिलेल्यास व्यवस्थित स्वरूप देऊन प्रथम सूत्रग्रंथांची व नंतर सुबोध स्मृतिग्रंथांची रचना केली. तसेच प्रतिपक्ष्यांनी घेतलेल्या तत्त्वज्ञानविषयक आक्षेपांचे त्यांनी आपल्या वेदान्तादि दर्शनांच्या सूत्रांत निरसन केले व त्यांच्या पाखंडी मतावर उलट हल्ले चढविले. खुद्द हिंदु धर्मही अनेक स्थित्यंतरांतून जात होता. बौद्ध धर्माला राजाश्रय मिळाल्यामुळे अहिंसातत्त्वाचा जनतेत प्रसार होऊन वैदिक यज्ञयागांविषयी औदासीन्य उत्पन्न झाले होते. बौद्धांच्या उपहासात्मक टीकेमुळे वर्णाश्रमधर्मावर लोकांचा विश्वास राहिला नव्हता. प्राचीन चातुर्वर्ण्यव्यवस्था बिघडून गेली होती. सर्वांस बौद्ध धर्माचा स्वीकार करून संघात प्रवेश करता येत असल्याने पोटभरू व आळशी लोकांचे चांगलेच फावले होते. अशा बिकट प्रसंगी राष्ट्रातील विवेकी सनातनधर्मीय विद्वानांनी स्वकालीन परिस्थिति लक्षात घेऊन हिंदु धर्माची पुनर्घटना करण्याकरिता याज्ञवल्क्य, नारद, कात्यायन इत्यादि स्मृति रचल्या. तथापि राजाश्रयाच्या अभावी काही काळ त्यातील धार्मिक तत्त्वांचा जनतेत फारसा प्रसार झाला नाही. खिस्तोत्तर चौथ्या शतकाच्या आरंभी गुप्तवंशाचा उदय होऊन हिंदु धर्माला अत्यंत आवश्यक असलेल्या राजाश्रयाची जोड मिळाली. गुप्तवंशीय

सम्राट् हिंदु धर्माचे पक्के अभिमानी असल्याने त्यांनी स्वत: यज्ञयागादि करून, हिंदु देवतांची देवालये बांधून व हिंदुधर्मीय विद्वानांना मोठमोठ्या अधिकाराच्या जागा देऊन आपल्या धर्माचे पुनरुज्जीवन केले. अशा प्रसंगी प्राचीन हिंदु संस्कृतीची उदात्त तत्त्वे व उच्च ध्येये मनोरंजकपणे लोकांपुढे मांडून त्यांकडे त्यांचे चित्त आकर्षण करणे आवश्यक होते. हे कार्य काव्य-नाटकांसारख्या न कळत उपदेशामृत पाजणाऱ्या ग्रंथांनीच करणे शक्य असते. मम्मटाने आपल्या 'काव्यप्रकाशा'त 'कान्तासम्मिततयो-पदेशयुजे' असे काव्यनिर्मितीचे एक प्रधान प्रयोजन सांगितले आहे. जशी एखादी सुंदर स्त्री रम्य विलासांनी आपल्या प्रियकराचे चित्त आकृष्ट करून त्याच्याकडून आपल्याला इष्ट ते करवून घेते, तद्वत् कविही आपल्या मनोरम काव्यनाटकादि ग्रंथांनी वाचकप्रेक्षकांच्या मनावर सदुपदेश बिंबवू शकतो. या कारणामुळेच अश्वघोष नामक जाडच्या विद्वानाने आपल्या तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांकडे सामान्य जनांचे लक्ष जात नाही, असे पाहून बौद्ध धर्म व तत्त्वज्ञान यांच्या प्रसारार्थ आपली 'सौन्दर-नन्दा'दि काव्ये व 'सारिपुत्रप्रकरणा'दि नाटके लिहिली. ललित वाङ्मयाने सामाजिक सुधारणेस कशी मदत होते, हे कै. हरि नारायण आपटे यांनी आपल्या आबालवृद्धांस प्रिय झालेल्या सुंदर कादंबऱ्यांनी चांगलेच दाखवून दिले आहे. कालिदासाने आपल्या ग्रंथांत कोठेही अश्वघोषाप्रमाणे आपण हिंदु धर्माच्या प्रसारार्थ काव्ये अगर नाटके लिहितो, असे म्हटले नाही. तथापि तत्कालीन परिस्थिति व त्याच्या ग्रंथांतील उदात्त ध्येयांनी प्रेरित झालेल्या व्यक्तींची मनोहर चित्रे लक्षात घेता त्याचा हाही अप्रत्यक्ष उद्देश असावा, असे वाटल्याशिवाय राहत नाही.

कालिदासाच्या वेळी अश्विनीकुमार, धर्म, इंद्र, संकर्षण, कुबेर इत्यादि प्राचीन देवतांची पूजा प्रचारातून जाऊन त्यांच्या जागी ब्रह्मा, विष्णु व शिव या देवतांस प्राधान्य आले होते. तथापि, या देवतांच्या उपासकांमध्ये पुढे जे हाडवैर उत्पन्न झाले, त्याचा मागमूसही या काळात दिसत नाही. कदाचित् बौद्ध धर्मीयांच्या हल्ल्यामुळे भिन्न भिन्न देवतांचे उपासक आपापले भेदभाव विसरून एकत्र झाले असावेत व तत्कालीन तत्त्वज्ञांची शिकवणही त्याच प्रकारची असावी. कारण काही असले तरी या काळात त्यांच्यामध्ये सख्य दिसते, यात संशय नाही. एवढेच नव्हे तर एकाच कुटुंबात आईबाप

एका देवतेचे, तर मुले दुसऱ्याच देवतेची उपासक असत, हे वाकाटक नृपति द्वितीय प्रवरसेन याच्या उदाहरणावरून आम्ही मागे दाखविलेच आहे. कालिदास हा स्वतः शिवोपासक होता. त्याच्या सर्व नाटकांच्या नांदीत श्रीशंकराची स्तुति आढळते. 'मालविकाग्निमित्रा'च्या आरंभी त्याने आपल्या इष्टदेवतेचे खालीलप्रमाणे वर्णन केले आहे—

एकैश्वर्यस्थितोऽपि प्रणतबहुफलो यः स्वयं कृत्तिवासाः
कान्तासंमिश्रदेहोऽप्यविषयमनसां यः परस्ताद्यतीनाम्।
अष्टाभिर्यस्य कृत्स्नं जगदपि तनुभिर्बिभ्रतो नाभिमानः
सन्मार्गालोकनाय व्यपनयतु स वस्तामसीं वृत्तिमीशः॥

'भगवान् शंकर सर्व जगाचा ईश्वर असून भक्तांच्या बहुविध इच्छा पूर्ण करीत असला तरी स्वतः गजचर्मच वापरतो. त्याच्या देहाचा अर्धभाग पत्नीने व्यापला असला तरी विषयोपभोगापासून विरक्त झालेल्या यतींनाही त्याचे स्वरूप आकलन करता येत नाही. स्वतः अष्टविध स्वरूपाने तो सर्व जगाला आश्रय झाला असला तरी त्याला मुळीच अभिमान नाही.' अशा रीतीने कवीने श्रीशंकराचे विरोधगर्भ यथार्थ वर्णन केले आहे. यातील कल्पनांचाच दुसऱ्या नाटकांच्या नांदीत विस्तार केला आहे. 'शाकुंतला'-च्या भरतवाक्यात—

ममापि स क्षपयतु नीललोहितः
पुनर्भवं परिगतशक्तिरात्मभूः॥

अशा रीतीने आपणाला पुनर्जन्मातून मुक्त करण्याबद्दल त्याने शंकराची प्रार्थना केली आहे. कवीने आपल्या 'कुमारसंभव' काव्यात श्रीशंकराच्या चरित्रातील एका रम्य प्रसंगाचे रसभरित वर्णन केले आहे. त्या काव्याच्या सहाव्या सर्गात जगाची उत्पत्ति, पोषण व लय करणारा व सर्व प्राण्यांचा अंतर्यामी म्हणून ऋषींनी शंकराची स्तुति केली आहे. तसेच दुसऱ्या सर्गात देवांच्या प्रार्थनेला उत्तर देताना ब्रह्मदेवाने खालील श्लोकात 'स्वतः मला किंवा विष्णूला श्रीशंकराच्या प्रभावाचे सम्यग्ज्ञान होत नाही', असे म्हटले आहे :—

स हि देवः परं ज्योतिस्तमःपारे व्यवस्थितम्।
परिच्छिन्नप्रभावर्द्धिर्न मया न च विष्णुना॥

कुमार० २, ५८.

तेव्हा कालिदासाच्या शिवोपासकत्वाविषयी संशय राहत नाही. तथापि, तो एखाद्या विशिष्ट शैव संप्रदायाचा अनुयायी होता, असे वाटत नाही; कारण त्याच्या ग्रंथांत कोठेही सांप्रदायिक पारिभाषिक संज्ञांचा किंवा विशिष्ट आचारांचा उल्लेख नाही. कालिदासाने उपनिषदांचा व भगवद्गीतेचा चांगला अभ्यास केला होता, हे आम्ही मागे दाखविले आहे. या अभ्यासाने त्याची दृष्टि विशाल व मते उदार झाली होती. 'कुमारसंभवा'च्या दुसऱ्या सर्गात ब्रह्मदेवाचे व 'रघुवंशा'च्या दहाव्या सर्गात विष्णूचे वर्णन त्याने परमेश्वररूपानेच केले आहे, हे खालील श्लोकांवरून दिसून येईल:—

तिसृभिस्त्वमवस्थाभिर्महिमानमुदीरयन्।
प्रलयस्थितिसर्गाणामेकः कारणतां गतः॥ कुमार० २, ६.

नमो विश्वसृजे पूर्वं विश्वं तदनु बिभ्रते।
अथ विश्वस्य संहर्त्रे तुभ्यं त्रेधास्थितात्मने॥ रघु० १०, १६.

ब्रह्मा, विष्णु व शंकर ही एकाच परमेश्वराची कार्यनिमित्ताने भिन्न भासणारी रूपे होत. कार्यवशात् कधी ब्रह्मदेवाला, कधी विष्णूला, तर कधी शंकराला श्रेष्ठत्व येते; त्यामुळे श्रेष्ठकनिष्ठ भाव या तिघांच्या बाबतीत सारखाच दृष्टीस पडतो, हे उदात्त तत्त्व खालील श्लोकात त्याने सांगितले आहे:—

एकैव मूर्तिर्बिभिदे त्रिधा सा सामान्यमेषां प्रथमावरत्वम्।
विष्णोर्हरस्तस्य हरिः कदाचिद्वेधास्तयोस्तावपि धातुराद्यौ॥ कुमार० ७, ४४.

आपल्या सनातन धर्माचेही हेच तत्त्व आहे. मनुष्याने कोणत्याही देवतेची श्रद्धेने उपासना केली तरी ती एकाच परमेश्वराला पोचते व त्याकडूनच त्याच्या इच्छा पूर्ण होतात, असे भगवद्गीतेत म्हटले आहे (भ. गी. ७, २२). असो. आता 'कुमारसंभव' व 'रघुवंश' यातील ब्रह्मा, विष्णु व शंकर यांच्या विविध प्रसंगांनी आलेल्या स्तुतीत कालिदासाने परमेश्वराचे कसे वर्णन केले आहे, ते पाहू.

परमेश्वराच्या स्वरूपाचे यथार्थ वर्णन करणे अशक्य आहे. कारण तो आवाङ्मनसगोचर आहे, असे कालिदासाने अनेक ठिकाणी म्हटले आहे. प्रत्यक्ष, अनुमान व आप्तवचन किंवा शब्द ही ज्ञानाची प्रमुख साधने होत. वस्तु इन्द्रियगोचर असल्यास तिचे ज्ञान सुलभ असते, हा नेहमीचा अनुभव आहे. ईश्वर स्वतः तर सामान्य जनांना प्रत्यक्ष होत नाहीच; पण

त्याचे ऐश्वर्य ज्यात व्यक्त होते, त्या पृथिव्यादि पदार्थांचेही सम्यग् ज्ञान त्यास होत नाही. मग ज्याच्या बाबतीत अनुमान व वेदादि आप्तवचने यांवरच आपणांस अवलंबून राहावे लागते, त्या ईश्वराच्या स्वरूपाची यथार्थ कल्पना आपणांस होत नाही, यात नवल काय ? हा आशय कवीने खालील श्लोकात व्यक्त केला आहे :—

प्रत्यक्षोऽप्यपरिच्छेद्यो मह्यादिर्महिमा तव।
आप्तवागनुमानाभ्यां साध्यं त्वां प्रति का कथा॥ रघु० १०, १९.

ईश्वराच्या ठिकाणी अनेक विरोधी गुणांचा समुच्चय झालेला दिसतो. त्यामुळे कोणासही त्याच्या स्वरूपाचे आकलन करता येत नाही. तो स्वतः अज म्हणजे जन्मरहित आहे, तरी पृथ्वीवर अवतार घेतो; स्वतः आप्तकाम असूनही शत्रूंचे निर्दालन करतो; सर्व प्राण्यांचे रक्षण करीत असूनही उदासीन राहू शकतो (रघु. १०, २५); तो सर्व प्राण्यांच्या हृदयात वास करीत असूनही त्यांच्याजवळ नसतो; निरिच्छ असूनही नेहमी तपश्चर्या करीत असतो; तो दयाळू आहे तरी त्याला कधीही दुःख होत नाही; तो पुराण पुरुष आहे तरी त्याला कधीही वार्द्धक्याची बाधा होत नाही (रघु. १०, १९) ; तो द्रव तसाच घन, स्थूल तितकाच सूक्ष्म, लघु त्याप्रमाणेच गुरु, व्यक्त आणि अव्यक्तही आहे (कुमार. २, ११).* परमेश्वर हा चराचर सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व लय यांचे एकमेव कारण आहे. सांख्य तत्त्वज्ञानी म्हणतात त्याप्रमाणे पुरुष व प्रकृति ही दोन परस्परस्वतंत्र तत्त्वे नसून ती एकाच परमेश्वराची दोन रूपे आहेत. (कुमार. २, १३). त्याला सृष्टीच्या उत्पत्तिलयाकरिता दुसऱ्या कोणत्याही साधनांची जरूरी लागत नाही (कुमार. २, १०). तो चराचर सृष्टि व्यापून असतो. आकाशातून पडणारे मेघोदक सर्वत्र एकच प्रकारचे असले तरी भिन्न भिन्न स्थली त्याला भिन्न भिन्न चव प्राप्त होते, त्याप्रमाणे परमेश्वर स्वतः एकरूप असला तरी सत्त्व, रज व तम या गुणांच्या योगे विविध स्वरूपे धारण करतो. हव्य व होता, भक्ष्य व भोक्ता, ज्ञेय व ज्ञाता, ध्येय व ध्यान करणारा, या सृष्टीत सर्वत्र दिसणाऱ्या द्वंद्वांच्या मुळाशी

* या तऱ्हेचे परस्परविरुद्ध विशेषणांनी केलेले ब्रह्माचे वर्णन उपनिषदांतही आढळते. उदाहरणार्थ, पुढील उतारे पाहा :— 'एतद्वै तदक्षरं गार्गि ब्राह्मणा अभिवदन्त्यस्थूलमनण्वह्रस्वमदीर्घमलोहितमस्नेहमच्छायमतमः।' इ. (बृहदारण्यक, ३, ८, ८,); 'अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः।' (श्वेताश्वतर, ३, १९).

एकच तत्त्व आहे (कुमार. २, १५) व तेच प्राण्यांच्या हृदयात अन्तरात्म्याच्या रूपाने वास करीत असते, ही उपनिषदे, ब्रह्मसूत्रे व भगवद्गीता यांची शिकवण कालिदासाच्या ग्रंथांत सर्वत्र दिसून येते. उपनिषदांत या तत्त्वाला ब्रह्म ही संज्ञा दिली आहे व तीच कालिदासाने एके ठिकाणी योजिली आहे (कुमार. ३, १५). तथापि निर्गुण ब्रह्म जाणणे, त्याचप्रमाणे वर्णन करणेही अवघड असते, म्हणून त्याने सर्वत्र ब्रह्मा, विष्णु व शिव ह्या सगुण मूर्तींचेच मनोरम वर्णन केले आहे.

परमेश्वर स्वत: आप्तकाम असला तरी सज्जनांचे रक्षण व दुर्जनांचा नाश करण्याकरिता पुन: पुन: अवतार घेतो व लोकसंग्रहाकरिता विविध कर्मांत व्यापृत असलेला दिसतो, हे भगवद्गीतेतील तत्त्व कालिदासाने खालील श्लोकात सांगितले आहे:——

अनवाप्तमवाप्तव्यं न ते किञ्चन विद्यते।
लोकानुग्रह एवैको हेतुस्ते जन्मकर्मणोः॥

यातील शब्दयोजनाही भगवद्गीतेवरूनच सुचलेली आहे, हे दिसून येईल. या कारणास्तवच श्रीशंकरांनी विवाहप्रसंगी अग्निप्रदक्षिणा, लाजाहोम, ध्रुवदर्शन इत्यादि स्मृत्युक्त कर्मे केली, असे कवीने वर्णिले आहे. कालिदासकाळी वेदान्ताची केवलाद्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत इत्यादि मते प्रचलित नव्हती, त्यामुळे त्यांपैकी कोणते त्याला अभिमत होते, याचा निर्णय करणे शक्य नाही. शंकराचार्यांच्या मायावादाची बीजे उपनिषदांत दिसत असली तरी त्यांच्या काळापर्यंत त्याचे पूर्ण विवेचन कोणीही केले नव्हते ; त्यामुळे कालिदासाच्या ग्रंथांतही मायेचा उल्लेख आला नाही, यात आश्चर्य नाही. कालिदासापूर्वीच्या ब्रह्मसूत्रे व भगवद्गीता या ग्रंथांतही मायावादाला पोषक असे स्पष्ट उल्लेख आले नाहीत. कालिदास स्वत: शिवोपासक असला तरी तत्त्वज्ञानाच्या बाबतीत भगवद्गीतेचाच अनुयायी होता, हे आम्ही मागे दाखविले आहे. त्याची तत्त्वज्ञानविषयक मते शंकर, रामानुज, मध्व, वल्लभ इत्यादि आचार्यांच्या वेदान्तमतांशी तंतोतंत जुळत नाहीत, म्हणून तो काश्मीरी शैव मताचा अनुयायी होता असे काही विद्वानांनी प्रतिपादिले आहे, त्याचा आता विचार करू.

काश्मीरी शैव मताच्या स्पन्दशास्त्र व प्रत्यभिज्ञाशास्त्र अशा दोन शाखा आहेत. यापैकी पहिली नवव्या शतकाच्या आरंभी होऊन गेलेला वसुगुप्त

व त्याचा शिष्य कल्लट यांनी स्थापिली व दुसरी त्यानंतर दहाव्या शतकात होऊन गेलेल्या सोमानंदाने प्रचलित केली, असे विद्वानांनी ठरविले आहे. पहिल्या मताचा मुख्य ग्रंथ शिवसूत्रे हा काश्मीरातील महादेवगिरीवर उत्कीर्ण रूपाने होता; श्रीशंकराचा साक्षात्कार झाल्यावर वसुगुप्ताने तेथे जाऊन व तो उतरून घेऊन प्रचलित केला, अशीही सांप्रदायिकांची समजूत आहे. तथापि ते मत वसुगुप्ताहून प्राचीन आहे, हे दाखविण्याकरिताच ती समजूत प्रथम प्रचलित झाली असावी, असे डॉ. सर रामकृष्णपंत भांडारकरांनी अनुमान केले आहे. या मताचे तत्पूर्वीचे ग्रंथ अगर उल्लेखही आढळत नाहीत, यावरूनही ते अनुमान सयुक्तिक दिसते. तेव्हा ही मते कालिदासकाळी प्रचलित होती, असे दिसत नाही. शिवाय त्या मतांत व कालिदासाच्या तत्त्वज्ञानात फारसे साम्य दिसत नाही व जे थोडेसे दिसते ते कवीच्या उपनिषदादि ग्रंथांच्या अभ्यासामुळे आले असावे, असे म्हणता येते. काश्मीरी शैव संप्रदायात ईश्वर स्वेच्छेने जगताची उत्पत्ति करतो, त्याला प्रधानादि उपादानकारणांची जरूरी लागत नाही किंवा तो स्वतःही उपादान कारण होत नाही, असे मानले जाते. जसा एखादा योगी आपल्या यौगिक बलाने विविध पदार्थ उत्पन्न करू शकतो, त्याप्रमाणे ईश्वरही स्वशक्तीने जीव व जगत् यांची उत्पत्ति करतो, असे त्या संप्रदायाचे अनुयायी मानतात. 'निरुपादानसंभारमभित्तावेव तन्वते। जगच्चित्रं नमस्तस्मै कलाश्लाघ्याय शूलिने।।' या वसुगुप्ताच्या श्लोकात तीच कल्पना ग्रथित केली आहे. ईश्वराला अन्य साधनांची जरूरी लागत नाही, ही कल्पना उपनिषदांतही आढळते व 'उपसंहारदर्शनान्नेति चेन्न क्षीरवद्धि।' यासारख्या ब्रह्मसूत्रांतही तिचाच उल्लेख केला आहे. कालिदासानेही आपल्या ग्रंथांत तेच मत प्रतिपादिले आहे. तथापि परमेश्वर स्वतःही उपादानकारण होत नाही ही कल्पना त्याला मान्य असावी, असे वाटत नाही. 'कुमारसंभवा'च्या दुसऱ्या सर्गात देवांनी केलेल्या ब्रह्मदेवाच्या स्तुतीत 'आत्मानमात्मना वेत्सि सृजस्यात्मानमात्मना। आत्मना कृतिना च त्वमात्मन्येव प्रलीयसे।।' असा श्लोक आला आहे. त्यात परमेश्वर जगाची उत्पत्ति स्वतःमधूनच करतो, व स्वतःमध्ये त्याचा लय करतो असे स्पष्ट म्हटले आहे. दुसऱ्याही एका बाबतीत कालिदासाचे मत काश्मीरी शैव संप्रदायाहून भिन्न आहे. जीव

हा परमेश्वररूपच आहे पण त्रिविध मलांमुळे त्याला स्वस्वरूपाचे ज्ञान होत नाही ; ध्यानविधीने त्या मलांचा नाश झाल्यावर ते ज्ञान होते, असे स्पन्दशास्त्रानुयायी मानतात. प्रत्यभिज्ञाशास्त्राचे मत याहून थोडे निराळे आहे. जीव हा मूलतः परमेश्वराहून भिन्न नसला तरी एखाद्या गुरूने अनुग्रह करीपर्यंत त्याला स्वस्वरूपांची ओळख पटत नाही, असे प्रत्यभिज्ञाशास्त्रानुयायी मानतात. मागे काश्मीर ही कालिदासाची जन्मभूमि होती, या मताचा विचार करताना, त्याच्या नाटकांवर प्रत्यभिज्ञामताची छाप पडली आहे, या मताचे आम्ही सविस्तर निराकरण केले आहे. कालिदासाने आपल्या ग्रंथांत कोठेही केवळ गुरूपदेशाने जीवाला स्वस्वरूपाचे ज्ञान होते, असे म्हटलेले दिसत नाही. स्पन्दशास्त्रात म्हटल्याप्रमाणे योग हे मोक्षाचे साधन आहे, असे कालिदासाचेही मत आहे. पण ते भगवद्गीतेतही आढळते. याकरिताच भगवद्गीतेच्या सहाव्या अध्यायात योगविधीचे वर्णन आले आहे. कालिदासाने आपल्या ग्रंथांत अनेक पुरुषांनी मुक्तीकरिता योगाचा अवलंब केलेला दाखविला आहे. मदन हिमालयावर आला तेव्हा स्वतः भगवान् शंकर पर्यङ्कबन्ध आसन घालून व प्राणायामनिरोधाने निवान्त स्थली ठेवलेल्या दीपाप्रमाणे निष्कम्प राहून योगबलाने अन्तरात्मदर्शनात मग्न होते, असे 'कुमारसंभवा'त वर्णिले आहे. 'रघुवंशा'तही 'तमसः परमापदव्ययं पुरुषं योगसमाधिना रघुः।' [रघुने योगसमाधीने अज्ञानाच्या पलीकडे असलेल्या अविनाशी परमात्म्याची प्राप्ति करून घेतली], असे म्हटले आहे. तथापि यावरून त्याला काश्मीरी शैव संप्रदायातील प्रत्यभिज्ञामत सर्वस्वी मान्य होते, असे दिसत नाही.

कालिदासाने 'रघुवंशा'तील अनेक राजांची मरणोत्तर गति वर्णिली आहे, त्यावरून त्याच्या दृष्टीने मनुष्याचे अत्युच्च ध्येय काय असावे, हे अजमावता येते. दिलीपाने नव्याण्णव अश्वमेध यज्ञ करून मृत्यूनंतर स्वर्गारोहण करण्याकरिता जणू काय नव्याण्णव पायऱ्याच तयार केल्या. अजाने गंगा व सरयू यांच्या संगमाने निर्माण झालेल्या तीर्थात देहत्याग करून स्वर्गात इंदुमतीची प्राप्ति करून घेतली व नंतर तिच्यासह नंदनवनातील क्रीडागृहात तो रममाण झाला, असे त्याने वर्णिले आहे. तसेच 'मेघदूता'त अलकेतील यक्षांच्या विविध विलासांचे रम्य वर्णन आहे.

तथापि, स्वर्गाची प्राप्ति करून घेऊन तेथील सुखांत रममाण होणें, हे त्याच्या दृष्टीने अत्युच्च ध्येय होते, असे दिसत नाही. 'तद्यथेह कर्मजितो लोकः क्षीयते एवमेवामुत्र पुण्यजितो लोकः क्षीयते' या छांदोग्य उपनिषदातील (८, १, ६) उक्तीप्रमाणे स्वर्गातील सुखे ही नाशवंत असतात. भगवद्गीतेतही 'ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति।' (९, २१) असे म्हटले आहे. स्वर्गातील सुखोपभोगामुळे पुण्यसंचय ऱ्हास पावतो, ही कल्पना कालिदासाला संमत होती. म्हणूनच त्याने आपल्या 'मेघदूता'त 'पुण्यसंचय कमी झाल्यामुळे स्वर्गीय जनांनी भूमीवर येऊन आपल्या अवशिष्ट पुण्याईने उज्जयिनी नगरीच्या रूपाने स्वर्गाचा एक सुंदर भागच वसविला आहे', अशी उत्प्रेक्षा केली आहे. स्वर्गातील सुखे अक्षय्य नसल्यामुळे मारीचाश्रमातील ऋषि त्यांचा मोह दूर सारून उच्चतर पदप्राप्तीकरिता सदैव तपश्चर्या करीत होते, असे त्याने 'शाकुंतला'त दाखविले आहे. स्वर्गप्राप्ति झाली तरी जन्म, जरा व मरण यांच्या फेऱ्यांतून मनुष्य सुटत नाही, म्हणून त्याने 'शाकुंतला'च्या भरतवाक्यात स्वर्गप्राप्ति न मागता आपल्याला पुनर्जन्मातून मुक्त करावे, अशी शंकरांना प्रार्थना केली आहे. तेव्हा संसारातून मुक्त होण्याला यज्ञयागादि साधने उपयोगी पडत नाहीत; योगाभ्यासाने परमेश्वरस्वरूपाचे ज्ञान करून घेतल्यानेच मोक्ष प्राप्त करून घेता येतो, असे त्याचे मत होते, हे निर्विवाद आहे, व तेच त्यानें 'तमसः परमापदव्ययं पुरुषं योगसमाधिना रघुः।' या श्लोकार्धात सांगितले आहे. रघु हा अत्यंत सच्छील, दानशूर व कर्तव्यतत्पर राजा होता. धर्मशास्त्रात सांगितल्याप्रमाणे त्याने प्रजेकडून वर्णाश्रमधर्माचे पालन करविले; इतकेच नव्हे तर स्वतःही गृहस्थाश्रमातील सर्व कर्तव्ये पार पाडून संन्यासाश्रम स्वीकारला व योगाभ्यासाने परमात्मदर्शन प्राप्त करून घेऊन मरणोत्तर अविद्येच्या पलीकडे असलेल्या परमात्म्याची प्राप्ति करून घेतली, असे कवीने म्हटले आहे. प्रत्यभिज्ञादर्शनातल्याप्रमाणे त्याला स्वतःच्या शिवस्वरूपाची ओळख पटली असे म्हटले नाही, हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. कालिदासाच्या वरील पंक्तीवरून मोक्षावस्थेत जीवेश्वरभेद कायम राहतो, असे त्याचे मत होते, असे वाचकांस वाटण्याचा संभव आहे. तथापि, त्याने इतरत्र (रघु. १८, २८) केलेल्या

'स ब्रह्मभूयं गतिमाजगाम' या वर्णनावरून परब्रह्मरूप होऊन जाणे, हेच त्याच्याही दृष्टीने उच्चतम ध्येय होते, यात संशय राहत नाही.

परमात्म्याच्या प्राप्तीकरता योगाभ्यासासारखी आणखीही दोन साधने कालिदासाने प्रसंगवशात् उल्लेखिली आहेत. 'विक्रमोर्वशीया'च्या

अन्तर्यश्च मुमुक्षुभिर्नियमितप्राणादिभिर्मृग्यते
स स्थाणुः स्थिरभक्तियोगसुलभो निःश्रेयसायास्तु वः ॥

या मंगल श्लोकार्धात मुमुक्षु जन प्राणायामादि साधनांनी ज्या हृदयस्थ शंकराचे दर्शन घेण्याचा प्रयत्न करतात तो एकनिष्ठभक्तीने लौकर प्रसन्न होतो, असे म्हटले आहे. तसेच फलेच्छा टाकून स्वकर्तव्ये केली असता मनुष्य संसारातून मुक्त होतो, हे त्याने 'मारुतिः सागरं तीर्णः संसारमिव निर्ममः ।' (रघु. १५, ६०) या उपमेत सुचविले आहे. योगसाधन, निष्काम कर्मयोग, भक्तियोग हे एकाच परमेश्वराला पोचण्याचे निरनिराळे मार्ग आहेत ; प्रत्येकाने आपापल्या शक्तीप्रमाणे त्यांचा उपयोग करावा, असे त्याचे मत दिसते. हेच त्याने खालील श्लोकात सांगितले आहे :—

बहुधाप्यागमैर्भिन्नाः पन्थानः सिद्धिहेतवः ।
त्वय्येव निपतन्त्योघा जाह्नवीया इवार्णवे ॥ रघु० १०, २६.

श्रीमद्भगवद्गीतेमध्येही ज्ञान, पातञ्जलयोग, भक्ति, निष्काम कर्म या परमेश्वरप्राप्तीच्या विविध साधनांचे वर्णन करून त्यांचा समन्वय केला आहे. तीच दृष्टि कालिदासाचीही होती, हे वरील विवेचनावरून दिसून येईल.

कालिदासाचा कर्मवाद व पुनर्जन्म यांवर विश्वास होता, हे आम्ही मागील प्रकरणात दाखविले आहे. स्वतःच्या कर्मामुळेच उर्वशी व हरिणी या अप्सरांस मृत्युलोकात यावे लागले. 'आत्म्याला स्वकर्मानुसार मरणोत्तर गति प्राप्त होत असते ; तेव्हा तू देहत्याग केलास तरी तुला परलोकी तुझ्या पत्नीचा सहवास प्राप्त होईल असे नाही', असे सांगून वसिष्ठांनी अजाला पत्नीशोकापासून निवृत्त करण्याचा प्रयत्न केला, असे त्याने दाखविले आहे. मनुष्याने कृतकर्मांची फळे भोगिलीच पाहिजेत. फक्त ज्ञानानेच त्याला त्यांचे भस्म करता येते, हे भगवद्गीतेतील तत्त्व 'इतरो दहने स्वकर्मणां ववृते ज्ञानमयेन वह्निना ।' [दुसरा म्हणजे रघु ज्ञानरूपी वह्नीने स्वकर्मांचे दहन करण्यास प्रवृत्त झाला], या श्लोकार्धात

कवीने उल्लेखिले आहे. मोक्षप्राप्तीकरिता इन्द्रियनिग्रहाची अत्यंत आवश्यकता असते, हेही त्याने अन्यत्र (रघु. ८, २३) प्रतिपादिले आहे.

जीव जन्ममरणाच्या फेऱ्यांतून जात असल्यामुळे कित्येकदा नकळत पूर्वजन्मीच्या गोष्टींची आठवण होऊन तो खिन्न होतो, असे कालिदासाने काही ठिकाणी म्हटले आहे. विश्वामित्राबरोबर राम वामनाश्रमी प्राप्त झाला ; त्या वेळी आपल्या पूर्वावतारातील कृत्ये त्याला आठवत नव्हती, तरी त्याच्या अन्तःकरणात खळबळ उडाली असे त्याने 'रघुवंशा'त (रघु. ११, २२) वर्णिले आहे. 'शाकुंतला'तील खालील श्लोकातही तेच तत्त्व ग्रथित केले आहे—

रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान्
पर्युत्सुकीभवति यत्सुखितोऽपि जन्तुः।
तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वं
भावस्थिराणि जननान्तरसौहृदानि॥ शाकु० ५, २.

अलीकडे अमेरिकेत परलोकविद्येचे संशोधन चालू आहे ; तेथे संशोधकांना अशा तऱ्हेचे अनुभव येत असलेली माणसे आढळली आहेत व त्यावरून त्यांना पुनर्जन्माची कल्पना पटू लागली आहे ; ते पाहून कालिदासाच्या सूक्ष्म मानससंशोधनाचे कौतुक वाटते.

यानंतर आपण कालिदासाच्या समाजविषयक विचारांकडे वळू. बौद्ध धर्माने जातिभेदाचे उच्चाटन केले होते व संसार दुःखमय आहे असे लोकांच्या कानी कपाळी ओरडून आबालवृद्धांस संन्यासमार्गाचा उपदेश चालविला होता. या उपदेशाचा अस्वाभाविकपणा व मनुष्याच्या नैसर्गिक मनोवृत्तींशी विरोध लक्षात घेऊन सनातन धर्माच्या पुनरुज्जीवनार्थ लिहिलेल्या स्मृतींत वर्णाश्रमधर्माची श्रेष्ठता प्रतिपादिली होती. कालिदासाने आपल्या ग्रंथांत त्याचीच महती गाइली आहे. 'रघुवंशा'तील श्रेष्ठ राजांनी आपल्या राज्यात प्रत्येक जातीचे लोक आपापली कर्तव्ये करीत आहेत की नाही, याकडे पूर्ण लक्ष दिले होते, असे कालिदासाने वर्णिले आहे. दुष्यन्ताच्या राज्यात हलक्या जातीचे लोकही वाईट मार्गाने जात नसत, असे 'शाकुंतला'त म्हटले आहे. ब्राह्मणादि वर्णांनी आपापली स्मृत्युक्त कर्मे केली असता राज्यात सर्वत्र भरभराट होते, लोक दीर्घायुषी होतात, त्यांच्यावर मानवी व दैवी आपत्ति येत नाहीत, असे दिलीपादि

राजांच्या राज्यव्यवस्थेच्या वर्णनात कवीने सुचविले आहे. वर्णधर्माबरोबर आश्रमधर्माचाही कालिदासाने पुरस्कार केला आहे. 'शैशवेऽभ्यस्तविद्यानां यौवने विषयैषिणाम्। वार्द्धक्ये मुनिवृत्तीनां योगेनान्ते तनुत्यजाम् ।। [रघुवंशातील राजे बालपणी विद्येचा अभ्यास करीत, तारुण्यात विषयोपभोग घेत, वृद्धपणात ऋषींप्रमाणे तपोवनात राहून तपश्चर्या करीत आणि शेवटी योगाने देहत्याग करून मुक्त होत],' या वर्णनात त्याने आश्रमधर्मातील कर्तव्ये थोडक्यात सांगितली आहेत. त्याच्या ग्रंथांत राजे लोकांचा जीवनक्रम अगदी याच तऱ्हेचा वर्णिला आहे. त्याच्या नाटकातील राजकुमारांचे बालपण एखाद्या आश्रमातच गेलेले दाखविले आहे. बालपणी ब्रह्मचर्यव्रत पाळून विद्या संपादन करावी व नंतर तारुण्यात विषयोपभोग घ्यावा, जगातील सुखे अनुभवावी व आनंद लुटावा; पण त्यांतही 'न पुनरेति गतं चतुरं वयः' (रघु. ९, ४७) [उपभोगक्षम वय म्हणजे तारुण्य पुन: येणार नाही] म्हणून सदैव विषयासक्त होऊन शरीराची हानि करून घेऊ नये; एकदा इन्द्रियांना विषयोपभोगाची चटक लागली म्हणजे त्यांना त्यापासून परावृत्त करणे अत्यंत कठीण जाते, हे त्याने अग्निवर्ण राजाच्या विलासाचे वर्णन करताना स्पष्ट म्हटले आहे. इंद्रियतृप्तीपेक्षा इंद्रियनिग्रहच श्रेष्ठ, हे त्याने 'रघुवंशा'च्या तेराव्या सर्गात शातकर्णि व सुतीक्ष्ण या ऋषींच्या परस्परविरोधी जीवनक्रमाची चित्रे जवळ जवळ ठेवून दाखविले आहे. हे दोघेही ऋषि महान् तपस्वी. त्यांच्या उग्र तपश्चर्येला भिऊन इन्द्राने दोघांसही मोह पाडण्याकरिता अप्सरा पाठविल्या. शातकर्णि ऋषि त्यांच्या जाळ्यात सापडला व पञ्चाप्सर नामक सरोवरातील अदृश्य प्रासादात त्यांच्या नृत्यगीतादि विलासांनी आपला काळ घालवू लागला. याच्या उलट सुतीक्ष्णाची स्थिति. त्याच्याही समोर येऊन त्याच्याकडे सस्मित कटाक्ष फेकून व काही मिषाने आपल्या शरीराचा मेखलांकित भाग अर्धवट अनावृत करून अप्सरांनी त्याला भुरळ पाडण्याचा यत्न केला. पण त्यांच्या मोहास बळी न पडता तो पञ्चाग्निसाधन करीत होता, असे कालिदासाने वर्णिले आहे. 'प्रजायै गृहमेधिनाम्, [अपत्योत्पत्तीकरिता गृहस्थाश्रम],' हे ध्येय त्याने वाचकांपुढे ठेविले आहे. सर्व आश्रमांत गृहस्थाश्रम श्रेष्ठ, कारण तो सर्वोपकारक्षम आहे; म्हणजे त्यात मनुष्यास सर्व प्राण्यांवर उपकार करता येतात, असे त्याने म्हटले आहे.

गृहस्थाश्रमातील स्वजातिप्राप्त कर्मे केल्यावर वृद्धपणी एखाद्या तपोवनात जाऊन ऋषींच्या सहवासात आत्मानात्मविचार करावा, योगाभ्यास शिकावा व त्यायोगे शेवटी देह ठेवून जीविताचे सार्थक्य करावे, अशी कालिदासाची शिकवण आहे.

कालिदासाने प्रसंगोपात्त अनेक कौटुंबिक व सामाजिक सद्गुणांचा उल्लेख केला आहे. मातृपितृप्रेम, पतिपत्नीप्रेम, बन्धुप्रेम, अपत्यप्रेम इत्यादि कुटुंबसंस्थेला आवश्यक असलेल्या विविध प्रेमाची मनोहर चित्रे त्याने आपल्या ग्रंथांत काढली आहेत. स्वत:ला चौदा वर्षे वनवासात पाठविणाऱ्या कैकेयीविषयीही रामाला किती आदर होता, 'माते! आमचे वडील स्वर्गसाधनीभूत सत्यापासून चळले नाहीत, याचे श्रेय तुलाच आहे' असे म्हणून त्याने तिची लज्जा कशी दूर केली, ते कवीने सुंदर वर्णिले आहे. याशिवाय, वडील माणसांची आज्ञा तिच्या युक्तायुक्ततेचा विचार न करता पाळावी ['आज्ञा गुरूणां ह्यविचारणीया'], पूज्य जनांचा आदर करावा ['प्रतिबध्नाति हि श्रेयः पूज्यपूजाव्यतिक्रमः।'], अतिथींचे स्वागत करावे, विद्वानांचा गौरव करावा, असा उपदेश त्याने प्रसंगोपात्त केला आहे.

कालिदासाच्या ग्रंथांवरून त्याला प्रौढविवाह संमत होता, याविषयी वाद नाही. मालविका, पार्वती, शकुंतला, इन्दुमती, या कालिदासाच्या ग्रंथांतील मुख्य नायिका विवाहकाली विविधकलानिपुण प्रौढ अशा दाखविल्या आहेत. या सर्वांनी स्वतःच्या पतीची निवड केली आहे. त्यावरून कालिदासाला प्रीतिविवाह संमत होता, असे काही प्रतिपादितात, तर काही 'शाकुंतला'च्या पाचव्या अंकातील शकुंतलाप्रत्यादेशातील 'अतः परीक्ष्य कर्तव्यं विशेषात्संगतं रहः। अज्ञातहृदयेष्वेवं वैरीभवति सौहृदम्॥' [एकांतातील मैत्री विशेष विचार करून करावी ; नाही तर ज्यांच्या मनाची पूर्ण ओळख झाली नाही अशांच्या बाबतीत प्रेमाचे पर्यवसान वैरात होते], या शार्ङ्गरवाच्या उक्तीकडे बोट दाखवून कालिदासाला त्याचे दुष्परिणाम दिसत होते असे म्हणतात. पुष्कळदा सत्य सुवर्णमध्यात सापडते असे म्हणतात, तसे ते येथेही दिसते. कालिदासाने 'रघुवंशा'तील राजांचा सर्वत्र प्रीतिविवाहच वर्णिला नाही. दिलीप, रघु इत्यादिकांचा हल्लीच्या प्रमाणेच ब्राह्म विधीने विवाह झाल्याचे

वर्णिले आहे. राम, कुश इत्यादि काही राजांच्या पराक्रमामुळे त्यांना विशिष्ट स्त्रिया मिळाल्या, असे दाखविले आहे, त्यातही प्रेमाचा संबंध येत नाही. हे संबंध दु:खपर्यवसायी झाले होते, असे कोठेही वर्णन नाही. म्हणून प्रीतिविवाह कौटुंबिक सुखाला आवश्यकच आहे, असे त्याचे मत दिसत नाही. पण अर्थात् त्याचे त्याला वावडेही नव्हते ; नाही तर त्याने आपल्या सर्व नाटकांत त्याची रम्य चित्रे रंगविली नसती, उर्वशी व शकुंतला यांच्यावर विवाहानंतर घोर आपत्ति येतात हे खरे ; पण त्याचे कारण त्यांचा प्रणयविवाह हे नसून भवितव्यता हे होते, असे आम्ही मागे दाखविले आहे. नाटकातील एखाद्या पात्राच्या उद्गारात कवीच्या मताचे प्रतिबिंब पाहणे योग्य होणार नाही. विशिष्ट परिस्थितीत एखाद्या पात्राला जसे विचार सुचतील तसेच त्याच्या तोंडी घालणे यातच कवीचे कौशल्य दिसून येते. तथापि, केवळ बाह्य सौंदर्यावर बसलेले प्रेम टिकाऊ नसते, म्हणून प्रेमी जीवांनी विवाहापूर्वी आपापल्या मातापित्यांची संमति घ्यावी व त्यांनीही सर्व गोष्टींचा विचार करून आपल्या कन्या-पुत्रांच्या सुखाला योग्य तो सल्ला द्यावा, असे त्याचे मत दिसते. हे त्याने 'श्री: साभिलाषापि गुरोरनुज्ञां धीरेव कन्या पितुराचकाङ्क्ष ।' या (रघु. ५, ३८) पंक्तीतील गंभीर स्वभावाच्या कन्येच्या उपमेने व्यक्त केले आहे. त्याच्या सर्व नायिकांत पार्वती ही श्रेष्ठ दिसते. पार्वतीने आपल्या तपश्चर्येने व एकनिष्ठ प्रेमाने शंकरांना वश केल्यावर एकदम त्यांच्याशी गांधर्व विवाह न लावता 'माझ्या पित्याची संमति घ्यावी' असे सखीद्वारा त्यांना सुचविले, असे कवीने 'कुमारसंभवा'त वर्णिले आहे, त्यावरूनही वरील अनुमान युक्त दिसेल.

**राजकारण**—कालिदासाच्या तिन्ही नाटकांचा व 'रघुवंश' या प्रधान काव्याचा विषय राजचरित हाच असल्याने त्याने आपले राजकारण-विषयक विचार अनेक ठिकाणी व्यक्त केले आहेत. राज्यसंस्था कोणत्या प्रकारची असावी, राजाच्या अंगी कोणते गुण असावे, त्याची व प्रजेची परस्परांविषयी कर्तव्ये कोणती, कायदे कोणी करावे, कर किती मर्यादेपर्यंत बसवावे इत्यादि अनेक बाबींविषयी आपली मते निश्चित करून त्याने आपल्या ग्रंथांत प्रतिपादिली आहेत. त्यांचा एकत्र विचार करणे मनोरंजक होईल.

कालिदासकाळी हिंदुस्थानात काही गणराज्ये अस्तित्वात होती, तथापि त्यांचे त्याने कोठेही वर्णन केले नाही. त्याच्या ग्रंथांत त्यांचे वर्णन करण्याचा प्रसंग आला नसावा किंवा त्याला ती राज्यपद्धति पसंत नसावी. नाही म्हणावयास, 'उत्सवसंकेत' नामक हिमालयात राहणाऱ्या 'पर्वतीय गणां'चा रघुदिग्विजयात एकदा उल्लेख आला आहे ; पण त्यावरून त्यांच्या युद्धपद्धतीशिवाय त्यांच्याविषयी जास्त माहिती मिळत नाही. एकंदरीत आपल्या कवीला प्रजाहिततत्पर एकतंत्री राज्यपद्धति पसंत होती, असे दिसते. 'मालविकाग्निमित्रा'त एकदा मंत्रिपरिषदेचा उल्लेख आला आहे ; पण ते मंत्री लोकांनी निवडून दिलेले दिसत नाहीत. शिवाय, त्यांचे मत राजावर बंधनकारक होते असेही वाटत नाही. कौटिल्याच्या 'अर्थशास्त्रा'त सल्लागार मंत्री व कार्यकारी अमात्य यांच्यामध्ये फरक केला आहे, तसा कालिदासाने केलेला दिसत नाही. कारण वर उल्लेखिलेल्या मंत्रिपरिषदेला अमात्यपरिषद् असेही म्हटले आहे. अमात्य, मंत्री व सचिव हे शब्द कालिदासाने समानार्थक योजिलेले दिसतात. या मंत्र्यांचा सल्ला घेऊन योग्य वाटेल ते राजा करीत असे. राजाला काही कारणाने राजधानीबाहेर जावे लागले तर तो मंत्र्यांवर राज्यकारभार सोपवून जात असे. वसिष्ठाश्रमी जाताना दिलीपाने, गन्धमादनपर्वतावर उर्वशीसह विहारार्थ जाताना पुरूरव्याने, व राजधानीत असताही विषयोपभोगपर अग्निवर्णाने राज्यधुरा सचिवांच्या स्वाधीन केली होती, असे वर्णन आले आहे. राजाला आकस्मिकपणे मृत्यु आला असता त्याच्या मुलाला गादीवर बसविण्याची व तो अल्पवयस्क असल्यास त्याच्या मातेला साहाय्य करून तिच्याकडून योग्य रीतीने प्रजापालन करविण्याची जबाबदारीही त्यांच्यावरच असे. यामुळे पुष्कळदा मंत्र्यांच्या हातात बरीच सत्ता असे, यात संशय नाही. काही राजे मंत्र्यांच्या धोरणाने वागत असत. मृगया हे एक व्यसन मानण्यात आल्यामुळे दशरथ मंत्र्यांची संमति घेऊन गेला, असे कालिदासाने वर्णिले आहे. राज्यातील निरनिराळ्या खात्यांच्या अधिकाऱ्यांस 'तीर्थ' अशी संज्ञा असे. तिचाही उल्लेख कालिदासाने केला आहे (रघु. १७, ६८).

एकतंत्री राज्यपद्धतीवर मुख्य आक्षेप हा की, सर्व राज्याचा कारभार एका व्यक्तीच्या मर्जीप्रमाणे चालत असल्यामुळे तो दुर्वर्तनी निघाल्यास

प्रजेवर अन्याय व जुलूमजबरदस्ती होण्याचा फार संभव असतो. तसे न व्हावे म्हणून आमच्या प्राचीन राज्यशास्त्रज्ञांनी दोन संरक्षक उपायांची ( Safeguards ) योजना केली होती. त्यांपैकी पहिला हा की, कायदे करण्याची सत्ता राजाच्या हाती न ठेवता ती विद्वान् व निःस्पृह ऋषिवर्गाच्या हाती ठेवली होती. राज्यकारभारास जरूर ते बहुतेक कायदे स्मृतींत लिहून ठेवलेले असत. त्यांत फरक करण्याचा अधिकार राजास नव्हता. कालमानाप्रमाणे कायद्यांत फरक करण्याची जरूरी भासे, त्या वेळी नवीन स्मृति लिहिल्या जात किंवा प्राचीन स्मृतींतून नवीन कालाला योग्य तो अर्थ काढीत असत. कायदा बदलला तरी तो बदलला नाही, असे दाखविण्याची पद्धत ( Fiction ) प्रत्येक देशाच्या प्राचीन न्यायशास्त्रात आढळते. राजाने मन्वादि स्मृतींतील कायद्यांचीच अंमलबजावणी करावयाची, हे कालिदासाने 'नृपस्य वर्णाश्रमपालनं यत्स एव धर्मो मनुना प्रणीतः।' (रघु. १४, ६६); 'रेखामात्रमपि क्षुण्णादामनोर्वर्त्मनः परम्। न व्यतीयुः प्रजास्तस्य नियन्तुर्नेमिवृत्तयः॥' (रघु. १, १७) या श्लोकात सुचविले आहे व न्याय करताना अतिथि राजा धर्मवेत्त्यांचे साहाय्य घेत असे, असे स्पष्ट म्हटले आहे (रघु. १७, ३९). दुसरा संरक्षक उपाय हा की, राजकुमारांस उत्तम शिक्षण देऊन व इंद्रियनिग्रहाचे महत्त्व त्यांस पटवून त्यांच्यापैकी योग्य त्या कुमारासच युवराज करीत असत. कौटिल्याच्या 'अर्थशास्त्रा'त राजकुमारांच्या शिक्षणाविषयी सविस्तर विवेचन आहे व कामलोभादि दुर्गुणांनी नाश पावलेल्या अनेक राजांची उदाहरणे देऊन 'तस्मादरिषड्वर्गत्यागेन इंद्रियजयं कुर्वीत' [स्वशरीरातील षड्रिपूंचा त्याग करून इंद्रियांवर स्वामित्व मिळवावे], असा उपदेश केला आहे. कालिदासकाळीही समुद्रगुप्त, चंद्रगुप्त इत्यादिकांची विद्वत्ता, कलानैपुण्य वगैरेबद्दल जे शिलालेखांत उल्लेख आढळतात, त्यांवरून त्यांच्या शिक्षणाबद्दल चांगली काळजी घेतली जात असे, असे दिसते. मागे प्रयागच्या स्तंभावरील हरिषेणकृत प्रशस्तीतील एक श्लोक दिला आहे, त्यावरून पहिल्या चंद्रगुप्ताने इतर राजकुमारांना दूर सारून समुद्रगुप्ताला केवळ त्याच्या योग्यतेमुळेच आपला उत्तराधिकारी नेमले होते, हे स्पष्ट दिसते ; व या अर्थाचे उल्लेख गुप्तांच्या इतर शिलालेखांतूनही आढळतात. कालि-

दासानेही 'रघुवंशा'त दिलीपाने रघूच्या शिक्षणाची किती काळजी घेतली होती ते वर्णिले आहे व 'निसर्गसंस्कारविनीत इत्यसौ नृपेण चक्रे युवराजशब्दभाक्।' [स्वभावतःच व शिक्षणानेही तो विनयसंपन्न झाला आहे असे पाहून त्याला युवराज केले] असे स्पष्ट म्हटले आहे. राज्यावर अतिथि राजाने बाह्य शत्रूंस जिंकण्याच्या अगोदर सहा अंतः-शत्रूंना जिंकले ; दशरथाला मृगया, द्यूत, मद्य आणि स्त्रिया यांपैकी कशाचेच व्यसन नव्हते (रघु. ९, ७); दिलीप ज्ञानी होता तरी वावदूक नव्हता, बलवान् होता तरी क्षमाशील असे, दाता होता तरी बढाईखोर नव्हता, इत्यादि वर्णनात राजाच्या अंगी कोणते गुण असावे व त्याने कोणती व्यसने टाळावी, याचे त्याने दिग्दर्शन केले आहे. राजाने आपला जीवनक्रम कसा ठेवावा, याविषयी कौटिल्याने आपल्या 'अर्थ-शास्त्रा'त सविस्तर विवेचन केले आहे. त्याने दिवस व रात्र मिळून चोवीस तासांचे सोळा भाग करून प्रत्येक भागास निरनिराळी कर्तव्ये नेमून दिली होती. त्या नियमांप्रमाणे कालिदासाचे नायक चालताना दिसतात. (रात्रिदिवविभागेषु यदादिष्टं महीभृताम् । तत्सिषेवे नियोगेन स विकल्पपराङ्मुखः।। रघु. १७, ४९). सकाळी राजकृत्ये पाहून झाल्यावर (कार्यासनादुत्थितः) विहाराच्या वेळी राजा उर्वशीचे चिंतन करीत होता, असे 'विक्रमोर्वशीया'त दाखविले आहे. 'शाकुं-तला'त कण्वशिष्य शकुंतलेसह राजाकडे येतात, त्यावेळी तो लोकांचे न्यायनिवाडे करून नुकताच उठलेला होता ; त्यामुळे तपस्वी आपणास भेटावयास आले आहेत, असे त्यास कळविण्याचे कंचुकीच्या जिवावर येते. या सर्व उल्लेखांवरून राजाने सदैव प्रजाहिततत्पर राहावे, त्यात स्वसुखाचा अभिलाष धरू नये, असा उपदेश कालिदासाने केला आहे किंबहुना, राजा या शब्दाची व्युत्पत्ति 'राज्-शोभणे' यापासून न लावता 'रञ्ज्-अनुरंजन करणे' या धातूपासून लावून ('तथैव सोऽभूदन्वर्थो राजा प्रकृतिरञ्ज-नात्।') प्रजानुरंजन हेच राजाचे ध्येय असावे, असे त्याने सुचविले आहे

**कर**—राजाला प्रजेकडून प्राप्तीचा एकषष्ठांश भाग कर म्हणून मिळत असे. हा सर्व वर्णांवर व आश्रमांवर बसविलेला असे ('यथा-स्वमाश्रमैश्चक्रे वर्णैरपि षडंशभाक्।' रघु. १७, ६५). अरण्यात राहणारे वानप्रस्थ व तपस्वी हेही अरण्यात उत्पन्न होणाऱ्या नीवार-

धान्याचा षष्ठांश राजाच्या अधिकाऱ्यांना देण्यासाठी नदीच्या काठी रास करून ठेवीत असत ('तान्युञ्छषष्ठाङ्कितसैकतानि शिवानि वस्तीर्थजलानि कच्चित्।') तथापि दुष्यन्तासारखे महात्मे त्याची अपेक्षा करीत नसत. त्याऐवजी अरण्यवासी लोक आपणास स्वतःच्या तपश्चर्येचा सहावा हिस्सा देतात ('तपःषड्भागमक्षय्यं ददत्यारण्यका हि नः।' शाकु.) असे दुष्यन्त म्हणतो. संपत्तीच्या लोभाने राजाने प्रजेकडून पैसा उकळू नये. कर म्हणून घेतलेल्या पैशाचा विनियोग प्रजेच्या कल्याणार्थच केला पाहिजे, हे तत्त्व कवीने अनेक ठिकाणी प्रतिपादिले आहे ('प्रजानामेव भूत्यर्थं स ताभ्यो बलिमग्रहीत्। सहस्रगुणमुत्स्रष्टुमादत्ते हि रसं रविः।' रघु. १, १८). रघूने दिग्विजय करून जी अलोट संपत्ति मिळविली तिचा विनियोग यज्ञ करण्यात केला. त्यानंतर एक विद्वान् ब्राह्मण गुरुदक्षिणेकरिता आला; त्या वेळी स्वतःच्या इभ्रतीकरिता प्रजेवर जास्त कर न लादता त्याने प्रत्यक्ष कुबेरावर चाल करण्याचे ठरविले व त्याकडून मिळालेली सोन्याची सर्व रास त्या ब्राह्मणास देऊ केली. दुष्यन्ताच्या राज्यात कोणी अत्यंत धनवान् व्यापारी निपुत्रिक असता मेला; तेव्हा तत्कालीन कायद्याप्रमाणे त्याची सर्व संपत्ति राजाला मिळत होती, तरी तिचा लोभ न धरता त्याची कोणी स्त्री गर्भवती असल्यास त्या गर्भाच्या नावे ती राखून ठेवावी, अशी दुष्यन्ताने आज्ञा केली. यावरून राजेलोकांच्या अंगी निर्लोभीपणा असणे कसे आवश्यक आहे, ते कालिदासाने दाखविले आहे.

**राज्यकर्तव्ये**—लोकांकडून करभार घेतल्यामुळे राजाला अनेक कर्तव्ये प्राप्त होतात. त्यांपैकी प्रमुखांचा निर्देश 'प्रजानां विनयाधानाद्रक्षणाद्भरणादपि। स पिता पितरस्तासां केवलं जन्महेतवः॥' (रघु. १, २४) या श्लोकात केला आहे. लोकांचे रक्षण करणे, त्यांना शिक्षण देणे व त्यांना उपजीविकेची साधने प्राप्त करून देणे ही राजाची मुख्य कर्तव्ये 'रघुवंशा'तील राजांनी उत्तम रीतीने पार पाडली होती, असे कालिदासाने दाखविले आहे. त्यांच्या कारकीर्दीत लोकांना शत्रूंची स्वारी माहीत नव्हती; दिलीपाच्या कडक शिस्तीमुळे लोकांना चोराची जाणीव भाषेतील तद्विषयक शब्दांवरूनच होत असे; पुत्रजन्मोत्सवप्रसंगी मुक्त करण्यास त्याच्या बंदिखान्यात एकही कैदी नव्हता; त्याच्या

राज्यात इतकी शांतता व सुव्यवस्था होती की, रात्री विहारस्थली जात असताना श्रमल्यामुळे अभिसारिका वाटेवरच निद्रावश झाल्या, तरी त्यांच्या अंगावरील वस्त्र हलविण्याची वाऱ्याची छाती नव्हती ; दशरथाच्या राज्यात रोगराईही नव्हती, मग शत्रूचे नाव कुठले ? (रघु. ९, ४) ; अतिथीच्या कारकीर्दीत व्यापाऱ्यांना नद्या विहिरीसारख्या व वने उपवनांसारखी वाटू लागली ; उत्तुंग पर्वतांवर ते घरातल्याप्रमाणे निःशंकपणे वावरू लागले (रघु. १७, ६४), इत्यादि वर्णन 'रघुवंशा'त आले आहे. व्यापाऱ्यांप्रमाणे तपश्चर्या करणाऱ्या ऋषिवर्गाचे राक्षसादिकांपासून संरक्षण करणे हे राजाचे प्रधान कर्तव्य मानले जात असे. म्हणून आपणाकडे तपस्वी आले, असे समजताच 'ऋषींच्या तपश्चर्येत काही विघ्न तर आले नसेल ना? तपोवनातील प्राण्यांना कोणी इजा तर केली नाही ना ? माझ्या दुष्कृत्यांमुळे अरण्यातील लतावृक्षांना पुष्पे व फळे येण्याचे थांबले नसेल ना ? ' असे नाना प्रकारचे विकल्प दुष्यन्ताच्या मनात येतात. अशा तऱ्हेचेच प्रश्न रघूने कौत्सास विचारले आहेत (रघु. ५, ५-९). त्यावरून राज्यातील शांतता व सुव्यवस्था यांविषयी कालिदासाचे विचार समजून येतात.

**शिक्षण**——लोकांना शिक्षण देणे हेही राजाचे प्रधान कर्तव्य मानले जात असे. याकरिता राज्यात ठिकठिकाणी नदीच्या काठी ऋषींचे आश्रम असत व त्यांच्या निर्वाहाकरिता भोवतालची जमीन राखून ठेवलेली असे. तेथील शिक्षणक्रम निर्विघ्नपणे चालावा म्हणून राजाने एक अधिकारीही नेमलेला असे. आपण अशा तऱ्हेचा अधिकारी असून आश्रमातील कृत्ये निर्विघ्नपणे चालली आहेत काय, हे पाहण्यासाठी तपोवनात आलो आहो, अशी 'शाकुंतला'त दुष्यन्त प्रथम वतावणी करतो. शिक्षणक्रम संपल्यावर शिष्याला गुरूला दक्षिणा द्यावी लागे, तीही राजाकडून मिळे व याप्रमाणे अप्रत्यक्षपणेही राजा शिक्षणास द्रव्यद्वारा मदत करीत असे. कौत्स नावाच्या ब्रह्मचाऱ्यास गुरुदक्षिणेकरिता चौदा कोटी रुपये लागले, ते रघूने कुबेराकडून मिळविले, असा प्रसंग 'रघुवंशा'त वर्णिला आहे.

**पोषण**——राजेलोक रस्ते, पूल इत्यादि दळणवळणाची साधने वाढवून सर्वत्र शांतता व सुरक्षितता राखून व्यापाऱ्यांना उत्तेजन देत. पण

त्याखेरीज स्वतःही संस्थानातर्फे अनेक लहानमोठे कारखाने चालवीत असत. त्यांत लोकांना उपजीविकेचे साधन मिळत असे. कालिदासाच्या ग्रंथांत त्यांचे सविस्तर वर्णन नाही; पण एकदोन ठिकाणी सेतु म्हणजे मोठमोठे पूल बांधणे, शेती करणे, वन्य हत्ती पकडणे, खाणींतून रत्ने काढणे इत्यादि कर्मांचा निर्देश आहे, त्यावरून त्यांची कल्पना करता येते (रघु. १६, २; १७, ६६).

**यज्ञकर्म**—कालिदासकाळी यज्ञकृत्यांनी देव संतुष्ट होतात व योग्यवेळी जलवृष्टि करतात (रघु. १, ६२) अशी लोकांची धार्मिक श्रद्धा असल्याने राजेलोक वेळोवेळी अनेक यज्ञ करीत असत. दक्षिणेतील सातवाहन व वाकाटक यांनी आप्तोर्याम, अग्निष्टोम इत्यादि अनेक यज्ञ केल्याचे कोरीव लेखांत नमूद आहे. कालिदासानेही आपल्या ग्रंथांत दिलीप, रघु इत्यादि राजांनी यज्ञ केल्याचे वर्णन केले आहे. दिलीप यज्ञाने स्वर्गाचे, व इन्द्र वृष्टीने मृत्युलोकांचे धारण करीत असे ( रघु. १, २६). वसिष्ठाश्रमास जाताना स्वतः याज्ञिकांना दिलेल्या ग्रामांतून दिलीपाला यज्ञस्तंभ उभे असलेले दिसले, असे कालिदासाने वर्णिले आहे. त्यावरून यज्ञकर्माकरिता राजेलोक विद्वान् व धार्मिक ब्राह्मणांस अग्रहार देत असत, असे दिसते.

याशिवाय धर्मसंरक्षण, न्यायदान इत्यादि कर्तव्ये राजाने करावयाची असत. राजाने लोकांकडून स्मृत्युक्त वर्णाश्रमधर्माचे आचरण करवावे, कोणालाही स्वजातिविहित कर्मे टाकून परजातीची कर्मे करू देऊ नये, स्वतः राजाने लोकांचे कज्जे पाहून निःपक्षपातीपणाने वादी व प्रतिवादी यांचे समाधान होईल असा न्याय द्यावा, असे कालिदासाने अनेक ठिकाणी सुचविले आहे. दिलीपाला नेहमी गुणांची चाड होती ; सज्जन मनुष्य आपला शत्रु असला तरी तो त्याला मान देत असे व आपल्या मर्जीतला मनुष्य दुर्वर्तनी निघाला तर त्याचा त्याग करीत असे ; अपराधानुरूप शिक्षा देऊन रघूने सर्व लोकांची मने आकर्षित केली, इत्यादि वर्णनाने निःपक्षपातित्व, न्यायीपणा इत्यादिकांचे महत्त्व कालिदासाने दाखविले आहे.

संरक्षण, शिक्षण, पोषण इत्यादि विविध प्रकारे रघुवंशातील राजे आपल्या प्रजेचे पालन करीत असल्याने तेच खरे प्रजेचे पिते होत, असे

कालिदासाने अनेक ठिकाणी म्हटले आहे. प्रजेच्या शोकाचे कारण शोधून ते दूर करण्यात तत्पर असल्यामुळे सर्वांना राम पुत्राच्या ठिकाणी झाला होता (तेनास लोकः पितृमान् विनेत्रा तेनैव शोकापनुदेन पुत्री। रघु. १४, २३), 'जवळ खूप संपत्ति असते तोवर मनुष्याच्या भोवती त्याचे नातेवाईक जमतात ; पण ती संपुष्टात आल्यावर घटकेत त्यांची पांगापांग होते. राजा! तू मात्र सदैव लोकांच्या उपयोगी पडत असल्यामुळे तुझ्या ठिकाणी बंधुत्व परमावधीस गेले आहे', असे वैतालिक म्हणतो, ते दुष्यन्तचरितावरून अक्षरशः खरे दिसते. अशा प्रकारे अष्टौप्रहर प्रजेच्या कल्याणाची चिंता वाहणारा राजा एक प्रकारे तपश्चर्याच करीत असतो ; म्हणून त्याला राजर्षि ही पदवी शोभते, हे कालिदासाने खालील श्लोकात दाखविले आहे—

अध्याक्रान्ता वसतिरमुनाप्याश्रमे सर्वभोग्ये
रक्षायोगादयमपि तपः प्रत्यहं सञ्चिनोति।
अस्यापि द्यां स्पृशति वशिनश्चारणद्वन्द्वगीतः
पुण्यः शब्दो मुनिरिति मुहुः केवलं राजपूर्वः॥ शाकु० २, १४.

प्राचीन काळी इतर राजांना जिंकून स्वतः चक्रवर्ती व्हावे, अशी प्रत्येक राजाची महत्त्वाकांक्षा असे. इतर राजांना आपले सार्वभौमत्व मान्य करावयास लावावे, म्हणून दिलीपाने नव्याण्णव अश्वमेध केले व रघूने दिग्विजय केला. या दिग्विजयात रघूने अनेक राजांचा पराभव केला. कित्येक तर युद्धात मारले गेले ; तथापि, त्यांची राज्ये खालसा न करता त्यांच्याकडून करभार घेऊन व मृत राजांच्या मुलास गादीवर बसवून रघु परत फिरला. शत्रूवर विजय मिळविणे, हे गौतमधर्मसूत्रात क्षत्रियांचे कर्तव्य सांगितले आहे. पण हा विजय परराज्ये लोभाने गिळंकृत करण्याकरिता नसे, तर दुर्बलांचे संरक्षण व दुर्जनांचे पारिपत्य करून धर्माचे राज्य पृथ्वीवर प्रतिष्ठापित करावे, व अश्वमेध, राजसूय, विश्वजित् यांसारखे मोठमोठे यज्ञ करून देवांस संतुष्ट करावे, याकरिताच असे, हे दाखविण्याकरिता जगज्जेत्या रघूस 'धर्मविजयी' असे सार्थ विशेषण कालिदासाने लाविले आहे (रघु. ४, ४३). खिस्ती शकाच्या पहिल्या तीन शतकांत शक व कुशाणवंशीय परकी राजांशी टक्कर देऊन हिंदु धर्माला पुनरुज्जीवित करण्याचे सामर्थ्य हिंदुस्थानच्या लहानसहान राज्यांत

नव्हते. ते कार्य दिग्विजयी समुद्रगुप्त व द्वितीय चंद्रगुप्त यांनीच केले, म्हणून चक्रवर्तित्वाचे ध्येय कवीला पटून त्याने आपल्या ग्रंथांत त्याचा पुरस्कार केलेला दिसतो.

**शिक्षण**—कालिदासाच्या 'विक्रमोर्वशीय', 'शाकुन्तल' व 'रघुवंश' या ग्रंथांत आश्रमांतील परिस्थिति वर्णिली आहे व 'मालविकाग्निमित्र' नाटकात शिक्षणशास्त्रातील तात्त्विक विचार आले आहेत, त्यांवरून कवीची शिक्षणविषयक मते अजमावता येतात. 'मालविकाग्निमित्रा'त मालविकेचा नाटचप्रयोग राजासमोर व्हावा, या उद्देशाने विदूषकाने तो प्रसंग जुळवून आणला आहे; म्हणून तेथील परिव्राजिकादिकांच्या भाषणांतील शिक्षणविषयक विचार एकांगी भासून ते कालिदासाचे नसावे, अशी शंका येण्याचा संभव आहे. तथापि, ते तसे असते तर धारिणीने त्यांविरुद्ध आक्षेप घेतला असता. एकदोन ठिकाणी मतभेदाला जागा होती तेथें तिने तो घेतला आहेही; त्यावरून त्या प्रवेशात कालिदास आपले सर्वसंमत होण्यासारखे शिक्षणविषयक विचार सांगत आहे, याविषयी संशय राहत नाही.

कालिदासीय ग्रंथांत तपोवनांतील ऋषींचे आश्रम हीच शिक्षणाची मुख्य केंद्रे म्हणून वर्णिली आहेत. हे आश्रम बहुधा मोठमोठ्या नगरांपासून लांब एखाद्या नदीच्या तीरी वसलेले असत. 'शाकुंतला'तील कण्वाश्रम दुष्यन्ताच्या राजधानीपासून काही दिवसांच्या वाटेवर हिमालयाच्या पायथ्याशी मालिनी नदीच्या तीरावर होता, असे त्या नाटकातील उल्लेखांवरून दिसते. 'रघुवंशा'तील वसिष्ठाश्रमास पोचण्यास दिलीपास जवळजवळ दिवसभर रथातून प्रवास करावा लागला, असे वर्णिले आहे. 'विक्रमोर्वशीया'तील च्यवनाश्रम मात्र राजधानीपासून फार दूर नसावा; कारण तेथून राजधानीत येण्यास तापसी व राजकुमार आयु यांना फार वेळ लागलेला दिसत नाही. याशिवाय श्रीमंत लोक घरी शिक्षक ठेवून आपल्या मुलांस शिक्षण देत असत, असे दिसते. रघु, पार्वती इत्यादिकांचे शिक्षण घरीच विविध विषयांतील शिक्षक ठेवून झालेले दिसते. मालविका व इरावती यांना नृत्यगायनादिकांचे शिक्षण देण्यास राजवाड्यात स्वतंत्र नाट्याचार्य ठेवले होते. क्वचित् पिता पुत्रास व पति पत्नीस काही विषय शिकवीत असावे. रघूला आपला पिता दिलीप यापासूनच

धनुर्विद्या प्राप्त झाली होती व इंदुमती ही अजाची ललितकला शिकणारी प्रियशिष्या होती, असे कवीने वर्णिले आहे.

आश्रमात मुलांप्रमाणे मुलींनाही शिक्षण दिले जात असे. प्राचीन काळी गृहस्थाश्रमातील कर्तव्यें केल्यावर लोक वानप्रस्थाश्रम स्वीकारून तपश्चर्येकरिता एखाद्या तपोवनात जात, त्यावेळी त्यांच्याबरोबर त्यांची लहान मुलेही असत, असे दिसते. मारीचाश्रमात सर्वदमनाला पाहिल्यावर व तो पुरुवंशातील आहे, असे समजल्यावर दुष्यन्ताला तो एखाद्या वानप्रस्थी पौरव राजाचा मुलगा असेल, असे वाटले. 'तुजकरिता फुले, फळे व देवतांच्या नैवेद्याकरिता उपयुक्त असलेले वन्य नीवारधान्य आणून व तुझ्याशी गोड बोलून मुनिकन्या तुझ्या दुःखाचा परिहार करतील', असे सांगून वाल्मीकि ऋषींनी वनात टाकलेल्या सीतेचे सांत्वन केले. 'शाकुंतला'-तील प्रियंवदा, अनसूया व शकुंतला या आश्रमातच वाढल्या व शिकल्या होत्या. मुलामुलींचे एकत्र शिक्षण होत असे किंवा त्यांचे निरनिराळे वर्ग असत, याचा उल्लेख मात्र कालिदासाच्या ग्रंथांत नाही. तथापि, त्याच्यानंतर सुमारे तीनशे वर्षांनी होऊन गेलेल्या भवभूतीच्या 'उत्तररामचरिता'त आत्रेयी, लव व कुश यांचे काही काळ एकत्र शिक्षण झालेले दाखविले आहे. त्यावरून कालिदासकाळीही तशीच पद्धत असण्याचा संभव आहे.

या आश्रमांत सामान्यतः उपनयन झाल्यावर म्हणजे वयाच्या आठव्या वर्षापासून मुले घेत असत, असे दिसते. तेथे त्यांचे शिक्षण वयाच्या सोळा ते वीस वर्षांपर्यंत होत असावे. 'विक्रमोर्वशीया'तील आयु नामक राजकुमार आश्रमातील शिक्षण संपण्याच्या वेळी कवच धारण करण्यास योग्य झाला होता, असे कवीने वर्णिले आहे, त्यावरून त्यावेळी त्याचे वय सोळा-सतरा वर्षांचे असावे, असे वाटते. ब्राह्मणवर्गातील बुद्धिमान् विद्यार्थी चौदाही विद्यांचा अभ्यास करीत. त्यांना अर्थातच जास्त वर्षे अध्ययन करावे लागे. शकुंतला व तिच्या सख्या उपवर होईपर्यंत आश्रमात राहत होत्या व शकुंतलेनंतर लौकरच त्यांचाही विवाह करण्याचा कण्वांचा विचार होता, असे कळते. 'हारीतधर्मसूत्रा'त आश्रमात शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थिनींचे सद्योवधू व ब्रह्मवादिनी असे दोन वर्ग वर्णिले आहेत. यांपैकी पहिल्या वर्गातील कन्यांचा शिक्षण संपल्यावर विवाह होत असे व दुसऱ्या वर्गातील कन्या आमरण आश्रमात ब्रह्मचर्यव्रताने राहत असत.

अशीच परिस्थिति कालिदासकाळीही असावी ; म्हणून दुष्यंताने शकुंतलेच्या सख्यांस 'ही विवाहापर्यंतच वैखानसव्रताचे आचरण करणार आहे किंवा येथेच सदैव हरिणींच्या सहवासात राहणार आहे', असा शकुंतलेविषयी प्रश्न केला आहे. असो.

आश्रमात घेताना विद्यार्थ्यांच्या शीलाची नीट चौकशी करीत. जो वर्तनाने शुद्ध, बुद्धीने चलाख, कामात प्रमाद न करणारा व ब्रह्मचर्याने युक्त असेल त्यालाच विद्यादान करावे, म्हणजे ती विद्या वीर्यवती राहते, असे यास्काचार्यांच्या 'निरुक्ता'त व 'मनुस्मृती'त म्हटले आहे. सच्छिष्याला विद्या दिली असता गुरूला पुढे पश्चाताप करण्याची पाळी येत नाही, हे कालिदासाने, 'वत्से, सुशिष्यपरिदत्तेव विद्याऽशोचनीयासि संवृत्ता' या कण्वोक्तीतील उपमेने सुचविले आहे.

आश्रमातील जीवनक्रम अगदी साधा असे. राहण्याला वृक्षपर्णांनी तयार केलेली पर्णशाला, नेसण्यास वल्कले, भोजनास अकृष्टरोही म्हणजे जमीन नांगरल्याशिवाय उगवणाऱ्या नीवार धान्याचे पदार्थ, वन्य फळे व कंदमुळे, निजण्यास दर्भाची शय्या किंवा हरिणचर्म, अशी आश्रमातील व्यवस्था असे (रघु. १९, ५ ; १४, ८१) ; रात्री दिव्याकरिता इंगुदी (हिंगणबेटा) च्या तेलाचा उपयोग करीत ; जखमेवर औषध म्हणूनही त्याचा उपयोग होत असे (शाकु. १, १४). कालिदासाने एका उपमेत ('पश्चिमाद्यामिनीयामात्प्रसादमिव चेतना' रघु. १७, १०) म्हटल्याप्रमाणे पहाटेच्या प्रहरी बुद्धि प्रसन्न असते, म्हणून पहाटे उठून विद्यार्थी अध्ययनास लागत. त्यांच्या अध्ययनाने दिलीपाला पहाट झाली, असे समजल्याचे 'रघुवंशा'त दाखविले आहे. सकाळी व संध्याकाळी समिधा, कुश, फळे वगैरे आणण्याकरिता तपस्वी व विद्यार्थी तपोवनाबाहेर जात असत. स्त्रियांना व विद्यार्थिनींना जवळपासच्या नदीतून किंवा पाणवठ्यावरून गृहकृत्यांकरिता किंवा झाडांस घालण्याकरिता पाणी आणावे लागे. सकाळी व सायंकाळी अग्नीची पूजा व होम होत असत (रघु. १, ५३).

आश्रमात सदैव शांततेचे वातावरण असल्याने तेथील पशुपक्ष्यांवरही त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहत नसे. वाल्मिकीच्या आश्रमात सर्व प्रकारचे प्राणी तपस्व्यांच्या संसर्गाने शांत स्वभावाचे झाले होते, असे कालिदासाने म्हटले आहे. आश्रमात कोणीही प्राण्यांची हत्या करू नये,

असा कडक नियम असे. शिकार करता करता दुष्यंत कण्वाच्या तपोवनाजवळ जाऊन पोहोचला. तेथे एक मृग आपल्या आटोक्यात आला, असे पाहून तो बाण मारणार इतक्यात समिधा आणणारे तपस्वी मध्ये पडले व त्यांनी राजाला 'हा आश्रममृग, अतएव अवध्य आहे' असे सांगून बाण परत घेण्याविषयी विनंती केली व ती राजाने ऐकली, असा प्रसंग 'शाकुंतला'त घातला आहे. 'विक्रमोर्वशीया'त ऋषिकुमारांबरोबर फुले, समिधा वगैरे आणण्याकरिता गेलेल्या आयूने संगमनीय मणि घेऊन जाणाऱ्या गृध्राला बाण मारून खाली पाडले, हे आश्रमाच्या नियमांविरुद्ध कृत्य झाले, म्हणून च्यवनऋषींनी तापसीला त्याला त्याच्या नातेवाईकांकडे पाठविण्यास सांगितले. यावरूनही आश्रमातील शिस्त कशी पाळली जात असे, ते दिसून येते.

आश्रमांत ब्राह्मणकुमारांस चौदाही विद्यांचे शिक्षण मिळे. या विद्यांचा उल्लेख मागे आलाच आहे. क्षत्रिय कुमारांस आवश्यक असे धनुर्वेदशिक्षणही आश्रमांत देत असत, असे 'विक्रमोर्वशीया'तील वरील प्रसंगावरून दिसून येते. स्त्रियांस लिहिणे, वाचणे, चित्रकर्म, संगीतकला, गृहकृत्ये इत्यादि उपयुक्त प्रकारचे शिक्षण देत असत, असे 'शाकुंतला'तील शकुंतला व तिच्या सख्या यांच्या भाषणांवरून दिसून येते. ज्या स्त्रियांना संसारात पडावयाचे असेल त्यांना बागाइतीचे शिक्षण अवश्य द्यावे, असा कालिदासाचा अभिप्राय दिसतो. वृक्षांना योग्य वेळी पाणी देऊन त्यांची जोपासना करण्याने स्त्रियांच्या हृदयात नकळत हळूहळू अपत्यप्रेमाचा अंकुर फुटतो, असे त्याने अनेक ठिकाणी म्हटले आहे. तपश्चर्या करीत असता ज्या वृक्षांना पार्वतीने पाणी घालून वाढविले त्यांच्याविषयी तिला कार्त्तिकेयापेक्षा जास्त प्रेम वाटू लागले ; आश्रमातील लहान वृक्षांना स्वतःला उचलता येतील अशा घटांनी पाणी घालण्याने पुत्रोत्पत्तीपूर्वीच तुला अपत्यप्रेमाचा अनुभव येईल, असे वाल्मीकीने सीतेला सांगितले होते, असे कालिदासाने वर्णिले आहे. काही स्त्रिया पुरुषांप्रमाणे इतरही विद्यांचा अभ्यास करीत असतील. 'मालविकाग्निमित्रा'तील परिव्राजिका अशा तऱ्हेची विविधविद्यापारंगत विदुषी दिसते.

'यतस्त्वया ज्ञानमशेषमाप्तं लोकेन चैतन्यमिवोष्णरश्मेः।' या पंक्तीत कालिदासाने अज्ञानाचा नाश करून मनुष्याला नवीन दृष्टि प्राप्त करून

देणाऱ्या शिक्षकाला रात्रीचा अंधकार दूर सारून सर्व विश्वात चैतन्य उत्पन्न करणाऱ्या सूर्याची उपमा दिली आहे व त्यायोगे समाजात शिक्षक वर्गाला किती मान मिळाला पाहिजे, हे सूचित केले आहे. खरा शिक्षकही विद्येवरील निष्ठेने अध्यापनकार्य करीत असतो ; जो केवळ उदरभरणार्थ विद्येचा उपयोग करतो, त्याला ज्ञानरूपी मालमसाला विकणारा वाणी म्हणतात (यस्यागमः केवलजीविकायै तं ज्ञानपण्यं वणिजं वदन्ति।), असे स्पष्ट उद्‌गार त्याने 'मालविकाग्निमित्रा'त काढले आहेत. सर्व शिक्षक सारख्या योग्यतेचे नसतात. काहींचे ज्ञानभांडार विशाल असते, पण त्यांना शिष्याला आपली विद्या शिकवण्याचे साधत नाही. काहींचे ज्ञान तुटपुंजे असले तरी ते शिकविण्याची त्यांची हातोटी चांगली असते. हे दोन्ही गुण ज्यांच्या ठिकाणी एकवटले आहेत, तोच सर्व शिक्षकांत श्रेष्ठ समजावा, असा स्वानुभव कालिदासाने 'शिलष्टा क्रिया कस्यचिदात्मसंस्था सङ्क्रान्तिरन्यस्य विशेषयुक्ता। यस्योभयं साधु स शिक्षकाणां धुरि प्रतिष्ठापयितव्य एव ॥' (माल. १, १६) या श्लोकात सांगितला आहे.

विद्यार्थ्याच्या मनाचा कल, बुद्धि, पात्रता इत्यादि ओळखून त्याला योग्य तो विषय निवडण्यात शिक्षकाचे कौशल्य दिसून येते. अशी काळजी प्रथमच घेतली असता विद्यार्थ्याचे व शिक्षकाचे श्रम फुकट जात नाहीत व विद्यार्थ्याला परीक्षेच्या वाऱ्या कराव्या लागत नाहीत. हे तत्त्व आता सर्वमान्य झाले आहे व तेच कालिदासाने 'मालविकाग्निमित्रा'तील पात्रांच्या वादविवादात पुढे मांडले आहे. उभयता नाट्याचार्यांनी आपापल्या शिष्येकडून नाट्याची परीक्षा देऊन आपले शिक्षणनैपुण्य दाखवावे, असे परिव्राजिकेने सुचविताच धारिणी म्हणते, 'एखादी विद्यार्थिनी मंदबुद्धि असल्यामुळे शिक्षणाचे चीज करीत नसेल तर त्याचा दोष शिक्षकाच्या माथी मारावा काय ?' त्यावर विदूषक उत्तर करतो, 'शिक्षणाकरिता अयोग्य विद्यार्थिनीची निवड करण्यात शिक्षकाचे मंदबुद्धित्व दिसून येते'. इतरत्रही 'क्रिया हि वस्तूपहिता प्रसीदति' (रघु. ३, १९) योग्य विद्यार्थी पाहून शिक्षण दिल्यास ते फलप्रद होते, असे कवीने म्हटले आहे.

वरील प्रवेशात कालिदासाने विद्यार्थ्यांसही काही सूचना केल्या आहेत. 'अपरिनिष्ठितस्योपदेशस्यान्याय्यं प्रकाशनम्' घेतलेले शिक्षण पूर्णपणे

आत्मसात् झाल्याखेरीज परीक्षेस बसण्याने त्यांची स्वतःची हानि व शिक्षकास अन्याय होतो. हल्ली परीक्षा पास होण्यावर सर्व मदार असल्याने व परीक्षा ही बहुतांशी लॉटरी आहे असा समज सर्वत्र पसरल्याने पुष्कळ विद्यार्थी समाधानकारक तयारी नसताही परीक्षेस बसतात. पुष्कळदा ते नापास होतात ; पण यदाकदाचित् पास झाले तरी त्यांना मिळालेले ज्ञान पूर्णपणे मनात भिनले नसल्यामुळे पुढील वर्गात किंवा व्यवहारात त्याचा काही उपयोग होत नाही. तसेच केवळ घोकून कोणतीही विद्या हस्तगत होत नसून तिचा पद्धतशीर अभ्यास करावा लागतो, हे कवीने 'विद्यामभ्यसनेनेव प्रसादयितुमर्हसि' (रघु. १, ८८) या उपमेत सुचविले आहे.

शिक्षक व विद्यार्थी याप्रमाणे परीक्षा घेणारी विश्वविद्यालये व मंडळे यांसही काही उपयुक्त सूचना वरील प्रवेशात सापडतील. हरदत्त व गणदास यांच्या कलहाचा निवाडा आपण करावा, असे राजाने परिव्राजिकेस म्हणताच ती हसून म्हणते,'पुरे ही थट्टा! जवळ शहर असता रत्नांची परीक्षा कोणी खेडेगावात करील काय ?' त्यावर राजा म्हणतो, 'आपण विदुषी व मध्यस्थ आहा. मी व राणी दोघेही यांचे पक्षपाती आहो'. यात विद्यार्थ्यांचे नातेवाईक किंवा त्यांनी पास होण्यात ज्यांचे हितसंबंध आहेत, अशांना परीक्षक नेमू नये, त्यांच्या हातून कळत न कळत पक्षपात होण्याचा संभव असतो, हे कालिदासाने सुचविले आहे. तसेच पुढे 'सर्वज्ञस्याप्येकाकिनो निर्णयाभ्युपगमो दोषाय' या परिव्राजिकेच्या उक्तीत एकाच परीक्षकाच्या मतावर परीक्षेचा निकाल लावल्यास, परीक्षक सर्वज्ञ असला तरी त्याच्या हातून विद्यार्थ्यांना अन्याय होण्याचा संभव असतो ; म्हणून परीक्षेत नेहमी दोन किंवा अधिक परीक्षक नेमावे ; तसे केले असता अन्यायाचा संभव कमी होतो, अशी सूचना कवीने केली आहे. हीच पद्धति अलिकडे सर्वसंमत झाली आहे. चित्रकर्म, नृत्य, गीत इत्यादि ज्या प्रयोगप्रधान कला किंवा विद्या आहेत, त्यांचे केवळ पुस्तकी शिक्षण पुरे होत नसून प्रत्यक्ष प्रयोग पाहून परीक्षकांनी विद्यार्थ्याची लायकी ठरविली पाहिजे, हेही तत्त्व कवीने या प्रवेशात सांगितले आहे.

प्रसंगोपात्त कालिदासाने शिक्षणाच्या हेतूंचा उल्लेख केला आहे. त्यांचा विचार करून हे प्रकरण संपवू. शिक्षणाचे ध्येय अनेकांनी

अनेक प्रकारे वर्णिले आहे. ज्याच्या योगे शरीर सुदृढ, वाणी प्रगल्भ व मन सुसंस्कृत होईल ते खरे शिक्षण, असे काही म्हणतात ; तर काही, ज्यामुळे विद्यार्थी उत्तम नागरिक बनेल, ते उत्कृष्ट शिक्षण, असा आपला अभिप्राय देतात. कालिदासाने 'सम्यगागमिता विद्या प्रबोधविनयाविव' या उपमेत प्रबोध म्हणजे ज्ञानप्राप्ति व विनय म्हणजे शीलसंपन्नता हे विद्येचे दोन उद्देश सांगितले आहेत. केवळ ज्ञानाने मनुष्य श्रेष्ठ होत नाही ; त्याच्या जोडीला सच्छील असले पाहिजे, हे त्याने वरील उपमेत सुचविले आहे. विद्येची चांगली उपासना केली तर हे दोन्ही उद्देश सफल होतात. परीक्षेकरिता नेमलेली पुस्तके घोकून ठराविक वेळेत परीक्षा पास झाल्याने शील तर राहोच, पण ज्ञानही हाती लागत नाही, असा सध्याचाही अनुभव आहे. ज्ञानाने मनुष्याची जगातील सुख-साधने वाढतील ; पण त्याच्या जोडीला सच्छील नसेल तर मानवी स्वभावातील लोभ, मत्सर, द्वेष इत्यादि दुष्ट मनोविकार बळावून जगात सर्वत्र कलह, युद्ध व रक्तपात दिसतील. म्हणून ज्ञानाच्या उद्देशांत प्रबोधा-बरोबर विनयाचाही उल्लेख कालिदासाने केला आहे.





प्रकरण नववे

# कालिदास व उत्तरकालीन ग्रंथकार

ख्यातः कृती सोऽपि च कालिदासः शुद्धा सुधा स्वादुमती च यस्य ।
वाणीमिषाच्चण्डमरीचिगोत्रसिन्धोः परं पारमवाप कीर्तिः ।।

सोड्ढलकृत 'उदयसुंदरीकथा'.

कालिदासाच्या हयातीत त्याच्या सुधामधुर ग्रंथांची प्रशंसा व प्रसिद्धि सर्वत्र झाली होती, असे दिसते. दानशूर गुप्त सम्राटाच्या आश्रयामुळे कीर्तीप्रमाणे धनाचीही प्राप्ति त्याला झाली होती. म्हणून भवभूतीप्रमाणे 'उत्पत्स्यतेऽस्ति मम कोऽपि समानधर्मा कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ।' असे असंतोषाचे व स्वकालीनांविषयी तुच्छतेचे उद्गार त्याने कोठेही काढलेले दिसत नाहीत. त्याच्या निधनानंतर तर त्याची कीर्ति उत्तरोत्तर वृद्धिंगत झाली. त्याच्या ग्रंथांनी आबालवृद्धांस मोहून टाकले. याचे प्रत्यंतर इ. स. च्या सहाव्या शतकापासून आजतागायत प्राचीन व अर्वाचीन कवींनी जी त्याजवर स्तुतिसुमनांची वृष्टि केली आहे, तीत दिसून येते. त्यापैकी काही या ग्रंथाच्या शेवटी संकलित केली आहेत.

पण या प्रत्यक्ष प्रशंसोद्गारापेक्षा उत्तरकालीन ग्रंथकारांनी कालिदासाच्या ग्रंथांतील कल्पना व प्रसंग यांचे अनुकरण करून पर्यायाने जे त्याचे श्रेष्ठत्व कबूल केले आहे, त्याला विशेष महत्त्व आहे. कारण

त्यावरून त्याच्या ग्रंथांच्या लोकप्रियतेची व प्रसाराची स्पष्टपणे कल्पना येते. कालिदासाच्या निधनानंतर लौकरच रचलेल्या वत्सभट्टीच्या मन्दसोर येथील प्रशस्तीत त्याच्या 'ऋतुसंहार' व 'मेघदूत' या ग्रंथांतील कल्पनांचे स्वच्छ प्रतिबिंब कसे दिसते, हे आम्ही मागे दाखविलेच आहे. इ. स. च्या सहाव्या शतकात गयेजवळ नागार्जुनी टेकडीवरील गुहेत कोरलेल्या अनन्तवर्मा नामक मौखरि राजाच्या कोरीव लेखांतील 'यस्याहूतसहस्रनेत्रविरहक्षामा सदैवाध्वरैः। पौलोमी चिरमश्रुपात-मलिनां धत्ते कपोलश्रियम्॥' या श्लोकात 'रघुवंशा'तील एका श्लोकाचे (६, २३) अनुकरण स्पष्ट दिसते. इ. स. च्या सातव्या शतकातील 'भट्टिकाव्या'त व ऐहोळे येथील रविकीर्तिकृत प्रशस्तीत अनेक ठिकाणी कालिदासीय कल्पनांचे पडसाद ऐकू येतात. त्या शतकात केवळ हिंदुस्थानातच कालिदासाची कीर्ति सर्वत्र पसरली होती, असे नसून हिंदुस्थानाबाहेरही सागर ओलांडून ती गेली होती, असे दिसते. कारण त्या शतकाच्या आरंभी कंबोडिया येथे कोरलेल्या भववर्म्याच्या खालील दोन श्लोकांत कालिदासाच्या कल्पना ओळखू येतात :—

शरत्कालाभियातस्य परानावृततेजसः।
द्विषामसह्यो यस्यैव प्रतापो न रवेरपि॥
यस्य सेनारजोधूतमुज्झितालंकृतिष्वपि।
रिपुस्त्रीगण्डदेशेषु चूर्णभावमुपागतम्॥*

उत्तरकालीन ग्रंथकारांनी कालिदासाच्या ग्रंथांतून काही रम्य कल्पनाच तेवढ्या आत्मसात् केल्या असे नाही ; तर त्यांच्या ग्रंथांतील अनेक प्रसंगही कालिदासीय ग्रंथांतील प्रसंगांवरून सुचलेले दिसतात. संस्कृत नाटच-वाङ्मयात कालिदासाच्या खालोखाल भवभूतीचे स्थान आहे. किंबहुना, हे दोन कवि समकालीन असून परस्परांचे प्रतिस्पर्धी होते, अशी दंतकथा आहे. या कवींच्या काळांचा विचार करता तीत काही तथ्य दिसत नाही. इतकेच नव्हे, तर भवभूतीने कालिदासाच्या नाटकांचा सूक्ष्मपणे अभ्यास करून त्यांतील मनोहर कल्पना, शब्दप्रयोग व प्रसंग यांचा मार्मिक-पणे आपल्या नाटकांत उपयोग केला आहे असे दाखविता येते. 'मालती-माधवा'त मालतीचे मन वळविण्याकरिता कामन्दकी दुष्यन्त-शकुंतला

* रघुवंश ४, ४९; ४, ५४ पाहा.

व पुरूरवस्-उर्वशी यांच्या प्रेमकथांचे दाखले देते, ते भवभूतीला कालिदासाच्या तद्विषयक नाटकांवरूनच सुचले असावेत. याच नाटकाच्या नवव्या अंकात मालती एकदम अदृश्य झाल्यामुळे उन्मत्त होऊन माधव आपल्या प्रियतमेकडे संदेश नेण्याविषयी मेघाची विनवणी करतो, व हत्ती, वायु इत्यादिकांस मालतीची वार्ता पुसतो, तो प्रसंग कालिदासाच्या 'मेघदूत' व 'विक्रमोर्वशीय' या ग्रंथांतील तत्सदृश प्रसंगांवरून सुचला असला पाहिजे. 'उत्तररामचरिता'च्या शेवटच्या अंकात विविध कारणांनी कुश व लव हे आपलेच पुत्र आहेत, अशी रामाची खात्री होते, तो प्रसंग 'शाकुंतला'च्या शेवटल्या अंकातील प्रत्यभिज्ञानप्रसंगासारखा दिसतो. याशिवाय 'गौरीगुरोः पावनाः' यासारखे समान शब्दप्रयोग दिसतात, ते निराळेच. या सर्व साम्यांवरून भवभूतीच्या नाटकांवर कालिदासीय ग्रंथांची कशी छाप पडली आहे, ते दिसून येते.

पण काही झाले तरी भवभूतीची नाटके कालिदासीय नाटकांच्या हुबेहुब प्रतिकृति नाहीत. त्यांच्या रचनेत सर्वत्र त्या विख्यात नाटककाराचे वैशिष्टच दिसून येते. याच्या उलट हर्षाची 'प्रियदर्शिका' व 'रत्नावली', राजशेखराची 'कर्पूरमञ्जरी' व 'विद्धशालभञ्जिका' व विल्हणाची 'कर्णसुन्दरी' या नाटिका घ्या. त्यांची रचना सर्वस्वी कालिदासाच्या 'मालविकाग्निमित्र' नाटकासारखी आहे, असे दिसून येईल. कालिदासाच्या त्या नाटकाने संस्कृत वाङमयात एका विशिष्ट नाट्यप्रकाराचा संप्रदाय उत्पन्न केला, असे म्हणता येते. कालिदासपूर्वकालीन भास कवीचे 'स्वप्नवासवदत्त' हेही काही अंशी या प्रकारचेच नाटक आहे. तथापि, त्यातील उदयन, वासवदत्ता व पद्मावती या मुख्य पात्रांसारखी उदात्त स्वभावाची पात्रे हर्षादिकांच्या नाटकांत दिसत नाहीत, तर 'मालविकाग्निमित्रा'तील अग्निमित्र, धारिणी, इरावती, मालविका या प्रकारची पात्रेच आपल्या नाटकांत उत्तरकालीन ग्रंथकारांनी घातलेली आढळतात. शिवाय, त्यांच्या नाटकांतील घटनाही 'स्वप्नवासवदत्ता'तल्यासारख्या नसून 'मालविकाग्निमित्रा'तल्याप्रमाणे दिसतात. त्यांवरून त्या नाटककारांनी कालिदासाचे वरील नाटकच आदर्श मानले होते, यात संशय नाही.

या सर्व नाटकांची उभारणी अन्त:पुरातील कारस्थानावर केली आहे. त्यात नायकाने आपल्या अन्त:पुरात प्रच्छन्नरूपाने राहणाऱ्या एका राजकन्येवर अनुरक्त होणे, त्याच्या पूर्वपरिणीत राणीने मत्सराने त्या प्रेमात विघ्ने आणणे, पुढे काही निमित्ताने त्या राजकन्येचा पूर्ववृत्तांत उघडकीस येणे व नंतर तिचा राजाशी विवाह होणे या कल्पना मुख्य दिसतात. नाटकाच्या शेवटी राजाच्या सैन्याला शत्रूवर विजय प्राप्त झाल्याचीही बातमी येते. पण या घटनेचा संविधानकाशी जसा घनिष्ठ संबंध भास व कालिदास यांच्या नाटकांत दिसून येतो, तसा या इतर नाटकांत दिसत नाही. किंबहुना, बिल्हण व राजशेखर यांचे आश्रयदाते राजेच त्या त्या नाटकांचे नायक असल्याने त्यांच्या विजयोत्सवात किंवा विवाहसमारंभात त्या नाटिकांची राजाज्ञेने निर्मिति झाली होती, असे वाटते. या नाटिकांत विजय व विवाह यांचा कसातरी बादरायण संबंध जोडून दिलेला दिसतो; त्यामुळे त्यांच्या संविधानकात कार्यैक्य ( unity of action ) भासत नाही. स्वभावचित्रण व भाषा या बाबतींतही ही नाटके 'मालविकाग्निमित्रा'पेक्षा कमी प्रतीची आहेत.

नाट्यवाङ्मयाप्रमाणे काव्यवाङ्मयातही कालिदासाने एका संप्रदायाची स्थापना केली. त्याचे नितांतरमणीय 'मेघदूत' काव्य लोकांना इतके आवडले की, इतर कवीही त्याचे अनुकरण करू लागले. शे-दीडशे वर्षांच्या अवधीत वायुदूत, भ्रमरदूत, हारीतदूत, चक्रवाकदूत, शुकदूत अशी अनेक दूतकाव्ये निर्माण झाली. ही काव्ये सध्या उपलब्ध नाहीत, तथापि इ. स. च्या सहाव्या शतकात होऊन गेलेल्या भामह नामक काश्मीरदेशीय आलंकारिकाने अशा दूतकाव्यांवर आपल्या ग्रंथात कडक टीका केली आहे. त्यावरून त्यांचे तत्कालीन अस्तित्व अनुमानिता येते. भामहाच्या टीकेस न जुमानता उत्तरकालीन कवींनी दूतकाव्यांची रचना सुरू ठेवली. सध्या पन्नासांवर अशी काव्ये पूर्णपणे उपलब्ध किंवा नाममात्राने ज्ञात आहेत. त्यांपैकी बहुतेक सर्व इ. स. च्या अकराव्या शतकानंतरची आहेत. या काव्यांत उद्धवासारखा मनुष्य; शुक, कोकिल, चातक, चक्रवाक यांसारखे पक्षी ; चंद्र, वायु वगैरेसारखे अचेतन सृष्ट पदार्थ ; मन, भक्ति यांसारखे अमूर्त पदार्थ किंवा कल्पना, यांना दूत कल्पून तद्द्वारा काव्यनायकनायिकांनी आपला संदेश पाठविला आहे.

यांपैकी बहुतेक विप्रलंभशृंगारात्मक असून मन्दाक्रान्ता वृत्तातच रचली आहेत. त्यांमध्ये अनेक स्थळी 'मेघदूता'तील कल्पना व शब्द यांचा उपयोग केलेला दिसतो. काही कवींनी तर 'मेघदूता'तील प्रत्येक श्लोकाचा चौथा चरण घेऊन समस्यापूर्तीने आपल्या काव्याची रचना केली आहे. अर्वाचीन कालात मेघदूताला पूरक अशी दोन काव्ये निर्माण झाली आहेत, त्यांचाही उल्लेख येथे केला पाहिजे. यांपैकी 'मेघप्रतिसंदेश' नामक एका दूतकाव्यात यक्षपत्नीने मेघद्वारा प्रियकरास उलट संदेश पाठविला आहे, तर दुसऱ्या 'मेघदौत्य'नामक दूतकाव्यात यक्षपत्नीने कुबेराला मेघद्वारा विज्ञप्ति करून आपल्या पतीची सुटका करून घेतली, असा कथाभाग वर्णिला आहे.*

मेघदूत अत्यंत लोकप्रिय झाल्यामुळे वैष्णव व जैन कवींनी स्वधर्मप्रसारार्थ त्याचा उपयोग केलेला दिसतो. वैष्णव कवींनी राम व सीता आणि कृष्ण व गोपी यांच्या प्रेमावर आपल्या दूतकाव्यांची उभारणी केली आहे. याच्या उलट जैन कवींच्या काव्यात शांतरसाचे साम्राज्य दिसून येते. इ. स. च्या आठव्या शतकात जिनसेन नामक जैन कवीने आपल्या 'पार्श्वाभ्युदय' नामक काव्यात 'मेघदूता'तील प्रत्येक ओळ समस्यापूर्तीने घेतली आहे. 'मेघदूत' काव्य पडले शृंगारिक. त्यातील चरणांचा जैन तीर्थंकराच्या चरित्रात उपयोग करताना कवीला अर्थाची बरीच ओढाताण व शाब्दिक कसरत करावी लागलेली दिसते; पण ती त्याने आनंदाने केली. यावरून कालिदासाच्या काव्याने लोकांना कसे मोहित केले होते, ते दिसून येते. इतर जैन कवींनीही वरील कारणास्तव दूतकाव्याच्या रूपाने आपल्या आचार्यांस स्ववृत्तविषयक पत्रे पाठविलेली दिसतात.

'मेघदूता'त अनेक देश, नगरे, पर्वत, नद्या वगैरेचे रम्य वर्णन आल्यामुळे त्याच्या हृद्यतेत भर पडली आहे. कालिदासाने स्वतः देशपर्यटन करून किंवा तद्देशीय प्रवाशांकडून साक्षेपाने माहिती जमविली असल्याने त्याच्या काव्याला ऐतिहासिकदृष्ट्याही महत्त्व आले आहे. त्याचे अनुकरण करणाऱ्यांमध्ये तशी चौकस बुद्धि नसल्याने त्यांची काव्ये

*Chintaharan Chakravarti—The Origin and Development of Dūtakāvya Literature in Sanskrit. (*I. H. Q.*, Vol. III, pp. 273—293.)

या दृष्टीने निरुपयोगी ठरतात. बहुतेक कवींनी भौगोलिक उल्लेख टाळले आहेत व ज्या थोड्यांनी ते केले आहेत, त्यांनाही त्या त्या स्थलांची प्रत्यक्ष माहिती नसल्याने त्यांची वर्णने संशोधकांची दिशाभूल करतात. तेव्हा याही बाबतीत कालिदासाचे श्रेष्ठत्व दिसून येते.

कालिदासाचे ग्रंथ भाषांतररूपाने युरोपात ज्ञात झाल्यावर काही युरोपीय ग्रंथांवर त्यांचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष परिणाम झालेला दिसतो. 'शाकुंतला'चे भाषांतर वाचल्यावर प्रसिद्ध जर्मन कवि गटे याला आपल्या 'फाउस्ट' या जगद्विख्यात नाटकाच्या आरंभी संस्कृत नाटकांतल्यासारखी प्रस्तावना घालण्याची कल्पना सुचली. दुसरा जर्मन कवि शिलर याने 'मेघदूत' वाचल्यावर रचलेल्या आपल्या 'Maria Stuart' या काव्यात कैदेत असलेल्या स्कॉटलंडच्या राणीने आपल्या कारागृहातून एका मेघाला स्वदेशी संदेश देऊन पाठविले, असे संविधानक घातले आहे. असो.

विख्यात आंग्ल तत्त्वज्ञ व ग्रंथकार कार्लाइल याने आपल्या एका ग्रंथात 'कधी काळी शेक्सपीयर व हिंदी साम्राज्य यांपैकी एकाचीच निवड करणे जरूर झाल्यास आपण शेक्सपीयरच पसंत करू', असे म्हटले आहे. कार्लाइलचे हे मत प्रत्येक इंग्रजाने मान्य केले असते असे नाही. पण परिस्थितीमुळे कार्लाइलच्या उक्तीची सत्यता सिद्ध झाली आहे. इंग्रजांचे भारतीय साम्राज्य आज नष्ट झाले आहे. पण त्यांचा शेक्सपीयर कोणीही त्यांच्यापासून हिरावून घेऊ शकणार नाही. कार्लाइलच्या या उक्तीवरून अभिजात ग्रंथकारांचे राष्ट्रातील विचारी लोकांस किती महत्त्व वाटत असते, हे दिसून येईल. एकधर्मी व एकभाषी इंग्लंडला शेक्सपीयरचे महत्त्व वाटते, त्याच्या शतपट कालिदासाचे महत्त्व विविध धर्म, जाति, पंथ व भाषा यांनी विभागलेल्या हिंदुस्थानास वाटले पाहिजे. धर्म, संस्कृति, भाषा यांप्रमाणेच अभिजात व सर्वमान्य ग्रंथकारांचीही राष्ट्राच्या एकीकरणास मदत होते. याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे कालिदास होय. उत्तरेस पंजाबापासून दक्षिणेस मद्रासेपर्यंत व पश्चिमेस महाराष्ट्रापासून पूर्वेस बंगालपर्यंत सर्व प्रांतांच्या विद्वानांनी आत्मीयतेने कालिदासाचा काल, जीवित व ग्रंथ यांची गूढ रहस्ये उलगडण्यात मदत केली आहे. हिंदु संस्कृति व संस्कृत भाषा यांचा युरोपीय विद्वानांस प्रथम परिचय झाला

तो कालिदासाच्या भाषांतरित 'शाकुंतला'मुळेच. आज पाश्चात्य देशांत हिंदी लोकांनी अभिमानाने सांगण्यासारख्या गोष्टीत कालिदासाच्या ग्रंथांचा समावेश केला पाहिजे. इंग्लंडचा शेक्सपीयर, जर्मनीचा गटे, इटलीचा डांटे यांच्याप्रमाणेच हिंदुस्थानच्या कालिदासासही जगताच्या कविमालिकेत प्रमुख स्थान मिळाले आहे. अशा कविश्रेष्ठाचे ग्रंथ कोणता हिंदी मनुष्य अभिमानाने वाचणार नाही ?



# कालिदासस्तुतिकुसुमाञ्जलिः।

१. लिप्ता मधुद्रवेणासन् यस्य निर्विषया गिरः।
तेनेदं वर्त्म वैदर्भं कालिदासेन शोधितम्॥ दण्डिनः। (षष्ठशताब्दी)

२. निर्गतासु न वा कस्य कालिदासस्य सूक्तिषु।
प्रीतिर्मधुरसान्द्रासु मञ्जरीष्विव जायते॥ बाणस्य। (सप्तमशताब्दी)

३. एकोऽपि जीयते हन्त कालिदासो न केनचित्।
शृङ्गारे ललितोद्गारे कालिदासत्रयी किमु॥ राजशेखरस्य। (दशमशताब्दी)

४. प्रसादहृद्यालङ्कारैस्तेन मूर्तिरभूष्यत।
अत्युज्ज्वलः कवीन्द्रेण कालिदासेन वागिव॥ पद्मगुप्तस्य (दशमशताब्दी)

५. अस्पृष्टदोषा नलिनीव दृष्टा हारावलीव ग्रथिता गुणौघैः।
प्रियाङ्कपालीव विमर्दहृद्या न कालिदासादपरस्य वाणी॥ श्रीकृष्णकवेः।

६. ख्यातः कृती सोऽपि च कालिदासः शुद्धा सुधा स्वादुमती च यस्य।
वाणीमिषाच्चण्डमरीचिगोत्रसिन्धोः परं पारमवाप कीर्तिः। सोड्ढलस्य।
(एकादशशताब्दी)

७. साकूतमधुरकोकिलविलासिनीकण्ठकूजितप्राये।
शिक्षासमयेऽपि मुदे रतलीलाकालिदासोक्ती॥ गोवर्धनाचार्यस्य।
(द्वादशशताब्दी)

८. पुरा कवीनां गणनाप्रसङ्गे कनिष्ठिकाधिष्ठितकालिदासा।
अद्यापि तत्तुल्यकवेरभावादनामिका सार्थवती बभूव॥ सुभाषितम्।

९. काव्येषु नाटकं रम्यं तत्र रम्या शकुन्तला।
तत्रापि च चतुर्थोऽङ्कस्तत्र श्लोकचतुष्टयम्॥ सुभाषितम्।

१०. वासन्तं कुसुमं फलं च युगपद् ग्रीष्मस्य सर्वं च यद्
यच्चान्यन्मनसो रसायनमतः सन्तर्पणं मोहनम्।
एकीभूतमभूतपूर्वमथवा स्वर्लोकभूलोकयो-
रैश्वर्यं यदि वाञ्छसि प्रिय सखे! शाकुन्तलं सेव्यताम्॥
शर्मण्यदेशीय-गटे-कवेः। (अष्टादशशताब्दी)

# कालिदासं प्रति*

## ( भज गोविंदम् )

१

विन्ध्यो मोही विलसति विटपः कुञ्जो मञ्जुरयं परितः ।
त्वमेव तत्र कवीन्द्र ! प्रियया यौवनसिंहासने स्थितः ॥
जगदिदमखिलं कालिदास ! तव मरकतमणिमयपदपीठम् ।
बृहदभ्रम इदं तवैव मूर्धनि बिभर्ति छत्रं हेममयम् ॥
ऋतुषड्वर्गच्छलेन नूनं षडिमा वारविलासिन्यः ।
भ्रमन्ति कविवर ! भवन्तमभितः सुललितलीलं नृत्यन्त्यः ॥
मधूनि पात्रैः सदा नूतनैश्छवि नवनवां बिभ्रन्ति ।
तृष्णामभिनवयौवनस्य ते प्रशमयितुं ताः सिञ्चन्ति ॥
क्वापि न शोको न वा यातना न कोऽपि जन्तुर्विलोक्यते ।
नान्तरेण तव राज्ञीं किञ्चित् त्वमेव राजा विराजसे ॥

२

कवितावनिताविलास ! सम्प्रति कविः केवलं, नान्यस्त्वम् ।
क्वासौ राज्ञो विदग्धपरिषद् ? क्व च भवनं भवतो यातम् ॥
क्व गतः सम्प्रति कालिदास ! ननु महान् स नृपतिः स्वामी ते ।
क्व च सावन्ती ! हन्त न लेशः कस्याप्यधुना विलोक्यते ॥
शश्वद्दिव्यानन्दस्यन्दिनि कुबेरनगरे कविनृपते ।
वसति सततं त्वं कृतवानिति लोकः सम्प्रति मन्त्रयते ॥
यदाभ्रंलिहे शिखरिशेखरे सान्ध्यं ध्यानादनन्तरम् ।
हर्षाकुलहृदयेन भगवता शिवेन ताण्डवमारब्धम् ॥
वारिपरिप्लुतमेघगर्जनाच्छलेन पटहध्वनिरभवत् ।
स्फुरत्कान्तिमद्विद्युद्वलय तालैस्ताण्डवमनुगतवत् ॥
संस्तुतिगीतं त्वं च गीतवान्, अन्ते सवयं स्मित्वा स्वम् ।
श्रवणभूषणं मयूरपिच्छं गौर्या मूर्धनि ते निहितम् ।

---

* डॉ. रवीन्द्रनाथ टागोर यांच्या कालिदासविषयक कवितांचे इंग्रजी भाषांतर जून १९३२ च्या मॉडर्न रिव्ह्यूच्या अंकात प्रसिद्ध झाले होते, त्यावरून हा संस्कृत अनुवाद माझे विद्यार्थी मित्र श्री. पु. ना. वीरकर, एम्. ए., यांनी केला आहे.

३

मनोहारिणीं कुमारसम्भवकथां गायता यावत्तौ ।
स्तूयेते स्म कवीश्वर! भवता गौरीगिरिशौ भगवन्तौ ॥
तस्थुः परितः प्रमथाः सर्वे शान्ततमाश्च ततो मन्दम् ।
सायंतन्यो नीरदमाला आचक्रमिरे गिरिशिखरम् ॥
गगनमण्डले तडिल्लतासौ न विलासं निजमदर्शयत् ।
जलदानां वृन्दोऽपि समर्थो न तत्क्षणे गर्जितुमभवत् ॥
कण्ठमुन्नतं निजमवनमयन् कमनीयं च तथा बर्हम् ।
स्कन्दमयूरो देव्यास्तस्थौ गिरिजाया निकटे निभृतम् ॥
किमपि चकम्पे क्वचित्सुमन्दस्मितेन देव्या ओष्ठयुगम् ।
तदनु च शीघ्रं मुक्तवती सा दीर्घमलक्षितनिःश्वसनम् ॥
क्षणे च तस्या नयनापाङ्गे जाते बाष्पैः परिप्लुते ।
व्रीडाकुलसम्भ्रान्तलोचना सपदि स्म च सा विलोक्यते ॥
ततस्तादृशीं देवीं गिरिजां कविकुलभूषण! विलोकयन् ।
सपदि नीतवान् भवान् विरामं मधुगानं निजमसमाप्तम् ॥

४

सुखदुःखाशानिराशादिभिर्द्वन्द्वैर्वयमिव कदाचन ।
किमभूदभिभूतो न भवानपि कथय कवीश्वर सनातन ॥
उपजापा वा राजकुले किं प्रावर्तन्त न दिवानिशम् ।
प्रवृत्तं च किं हननं नासीत्कृपाणादिभिः प्रच्छन्नम् ॥
निर्घृणार्थितानिकारानयैः किं ते पीडा नैव कृता ।
तीव्रवेदनाकुले त्वयि गता किं वाऽनिद्रा नैव निशा ॥
निखिलमूर्ध्नि तव कविता विमला समुल्ललास स्वच्छन्दम् ।
मन्ये शोभापद्मं विकसितमभिप्रमोदप्रभाकरम् ॥
नैवापत्तिर्न चापि शोकः परमदारुणा न वा व्यथा ।
नैताभिस्ते समवलोक्यते कविता क्वचिदपि कलङ्किता ॥
जीवितसिन्धुं प्रमथ्य गरलं प्राणहरं त्वं प्राशितवान् ।
उदीर्णाश्च ये सुधातुषाराः समन्ततस्तान् विकीर्णवान् ॥

रवीन्द्रनाथ ठक्कुरस्य (विंशी शताब्दी)

० ० ०

# काही संदर्भ ग्रंथ व लेख

[ग्रंथांच्या नावांपुढे अर्धवर्तुलाकृति कंसांत दिलेले संक्षेप प्रस्तुत पुस्तकात घातले आहेत].


## (अ) कालिदासाचे ग्रंथ

१. ऋतुसंहार (ऋतु०) [निर्णयसागर प्रेस]
२. कुमारसंभव (कुमार०) [साहित्य अकादमी]
३. मेघदूत (मेघ०) [सं० का. बा. पाठक]
४. रघुवंश (रघु०) [सं० कै. गो. र. नंदर्गीकर]
५. मालविकाग्निमित्र (माल०) [सं० कै. शि. म. परांजपे]
६. विक्रमोर्वशीय (विक्र०) [साहित्य अकादमी]
७. शाकुन्तल (शाकु०) [सं० कै. प्रो. अ. बा. गजेंद्रगडकर]

## (आ) मराठी भाषांतरे

१. रघुवंश (पद्यात्मक भाषांतर)—कै. गणेशशास्त्री लेले त्र्यंबककर.
२. महाराष्ट्र शाकुन्तल—के. वि. गोडबोले.
३. मराठी शाकुन्तल—कै. ल. ग. लेले.
४. मेघदूत—चि. द्वा. देशमुख.
५. सुश्लोक मेघ—रा. चिं. श्रीखंडे.

## (इ) मराठी चर्चात्मक ग्रंथ

१. संस्कृतकविपंचक—कै. विष्णु कृष्ण चिपळूणकर.
२. साहित्यसंग्रह—कै. शि. म. परांजपे.
३. विक्रमोर्वशीय सार व विचार—कै. मा. व्यं. लेले.
४. शाकुन्तल सार व विचार—कै. मा. व्यं. लेले.
५. संस्कृत काव्याचे पंचप्राण—के. ना. वाटवे.
६. कविकुलगुरु कालिदास—कै. के. ल. ओगले.
७. संशोधनमुक्तावलि, सर १ ते ६—वा. वि. मिराशी.
८. वाकाटक नृपति आणि त्यांचा काल—वा. वि. मिराशी.
९. मेघदूतातील रामगिरि अर्थात् रामटेक—वा. वि. मिराशी.

## (ई) संस्कृत ग्रंथ

१. बुद्धचरित (बुद्ध०), अश्वघोषकृत [सं० प्रो. कोवेल]
२. सौन्दरनन्द, अश्वघोषकृत [सं० जॉन्स्टन]

